# प्रबोधनकार ठाकरे

## समग्र वाङ्मय

## खंड तिसरा



# पाच नाटके

# पंच नाटके

लेखक
**प्रबोधनकार**
**केशव सीताराम ठाकरे**

प्रथमावृत्ती (पुनर्मुद्रण) :
**१९९९**

प्रकाशक :
**सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ**
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग
नायगाव, दादर, मुंबई ४०० ०१४



मुखपृष्ठ :
**प्रबोधचंद्र सावंत**

मुद्रक :
**व्यवस्थापक,**
शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय,
मुंबई ४०० ००४

मूल्य :
**रुपये १२०/-**

# प्रबोधनकार ठाकरे

## समग्र वाङ्मय

### खंड तिसरा

### "पाच नाटके"

# अनुक्रमणिका


| क्रम | पृष्ठे |
|---|---|
| □ **प्रस्तावना** . . . . . . | एक ते तेरा |
| □ संगीत **सीताशुद्धी** . . . . . . | ७ ते ११२ |
| □ **टाकलेलं पोर** . . . . . . | १२१ ते १८८ |
| [पद्य पुरवणी] . . . . . . | १८९ ते १९१ |
| □ संगीत **काळाचा काळ** . . . . . . | १९५ ते २७५ |
| □ **खरा ब्राम्हण** . . . . . . | २८१ ते ३४६ |
| [पद्य पुरवणी] . . . . . . | ३४७ ते ३४८ |
| □ संगीत **विधिनिषेध** . . . . . . | ३५३ ते ४१८ |

# निवेदन

गेल्या पिढीतील एक थोर समाजसुधारक, विचारवंत आणि निर्भिड विचारांचे पत्रकार म्हणून प्रबोधनकार ठाकरे यांचे नाव सर्वपरिचित आहे. पत्रकार म्हणून त्यांनी '' प्रबोधन '' मधून आपल्या हिंदु समाजातील जुन्या दुष्ट रूढी, अंधश्रद्धा, जातीभेद आणि या सर्वांच्या पाठीमागे असलेल्या वर्णश्रेष्ठत्वाच्या कल्पना यावर अगदी घणाघाती प्रहार केले. म्हणूनच के. सी. ठाकरे या नावापेक्षा '' प्रबोधनकार ठाकरे '' हेच त्यांचे नाव अधिक परिचित झाले.

पण ठाकरे यांच्या व्यक्तिमत्वाला आणखीही काही पैलू होते. ते केवळ समाजसुधारक आणि तेजस्वी विचारांचे पत्रकार नव्हते. ते स्वतः उत्तम लेखकही होते आणि त्यांच्या लेखनाला कवित्वाचाही स्पर्श होता. प्रारंभीच्या काळात त्यांचा '' नाटक '' आणि प्रत्यक्ष रंगभूमी यांच्याशी निकटचा संबंध आला होता. समाजसुधारणेचा ध्यास घेऊन त्यांनी अनेक नाटके लिहिली. त्या नाटकांचे आजच्या नव्या पिढीला स्मरण नसले तरी अन्यायावर प्रहार करणारा नाटककार या भूमिकेतूनच त्यांनी हे ललित-लेखन केले. ही नाटके कोणत्या नाटक-कंपनीने रंगभूमीवर आणली आणि त्यांचे किती प्रयोग होऊ शकले हा सर्व इतिहास आता पुरेसा उपलब्ध नसला तरी ही नाटके केवळ करमणूकप्रधान नव्हती हे निःसंशय ! '' टाकलेलं पोर '' या महाभारतातील कर्णाच्या जीवनावर आधारलेल्या नाटकात त्यांनी जातीसंस्था, वर्णविषमता यावर कठोर प्रहार केले आहेत. '' सीताशुद्धी '' या नाटकातदेखील रामाने केलेला सीतात्याग आणि तिच्यावर घडलेला अन्याय त्यांनी नाट्यरूप केला आहे. '' खरा ब्राम्हण '' या नाटकाचे कथानक संत एकनाथ यांच्या जीवनातील महत्त्वपूर्ण घटनांवर आधारलेले आहे. त्यातून त्यांनी अस्पृश्योद्धाराचा प्रश्न अत्यंत कळकळीने तत्कालीन समाजापुढे मांडला. दुष्ट रूढी, अंधश्रद्धा, पोथीनिष्ठा आणि वर्णश्रेष्ठत्वाचा अहंकार यामुळे सामान्य माणुसकीलादेखील आपला समाज कसा पारखा झाला आहे याचे चित्रण भेदक शैलीत प्रबोधनकारांनी या नाटकातून केले आहे.

आज विस्मृतीत गेलेल्या या जुन्या काळातील साहित्याचे परिशीलन करीत असताना प्रबोधनकारांची समाजसुधारणेबद्दलची आस्था आणि कळकळ जशी प्रत्ययाला येते तशीच त्यांच्या भेदक, तिखट आणि क्वचित प्रसंगी उपहासगर्भ लेखणीचाही आपल्याला प्रत्यय येतो. '' खरा ब्राम्हण '' नाटकातील त्यांची पदेही प्रासादिक असल्याचा उल्लेख प्रस्तावनेत श्री. प्रभाकर पणशीकर यांनी केलाच आहे. संपादक श्री. पंढरीनाथ सावंत यांनी मोठ्या परिश्रमपूर्वक हे साहित्य संकलित केले आणि आजच्या पिढीला प्रबोधनकारांच्या या वेगळ्या पैलूची ओळख करून दिली याबद्दल महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ त्यांचे मनःपूर्वक ऋणी आहे. मंडळाला हे महत्त्वपूर्ण नाट्य लेखन या तिसऱ्या खंडाच्या रूपाने प्रसिद्ध करण्यात म्हणूनच आज आनंद होत आहे.

वर्षप्रतिपदा, १९९९.
१८ मार्च, १९९९.

**द. मा. मिरासदार,**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

# प्रस्तावना

# ॥ केशवाय नमः ॥

—प्रभाकर पणशीकर

विसाव्या शतकात महाराष्ट्रात जी काही वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तीमत्व निर्माण झाली त्यापैकी एक धगधगतं आणि सळसळतं व्यक्तिमत्व म्हणजे कै. केशवराव सिताराम ठाकरे. अर्वाचीन महाराष्ट्राच्या सामाजिक जाणिवा ज्यांनी समृद्ध केल्या, त्या जाणिवा ज्यांनी सातत्याने आणि प्रामाणिक प्रयत्न करून विस्तारल्या त्यापैकी एक अग्रणी म्हणजे कै. के. सि. ठाकरे. आपल्या ' प्रबोधन ' या नियतकालिकाच्या माध्यमातून सामाजिक समस्यांवर, अंधश्रद्धेवर, भिक्षुकशाहीवर आणि अस्पृश्यांच्या जटिल प्रश्नांवर सातत्याने कठोर भाषेत टीका करून त्यांनी आपल्या या सुस्त समाजाला खडबडून जागं करण्याचा उपक्रम केला. ज्या काळांत वृत्तपत्रांचे संपादकच मालक असत आणि आपलं नाव ते मोठ्या अभिमानानं पहिल्या पानावर ठळक अक्षरांत छापीत असत. आपल्या मतांचा निर्भिड ठसा त्या वृत्तपत्रावर उमटवीत असत त्या काळांतलं ' प्रबोधन ' हे एक दखलपात्र वृत्तपत्र आणि कै. के. सि. ठाकरे हे त्याचे एकमेव संपादक. कालांतरानं त्यांची ' के. सि. ' ही आद्याक्षरं गळून पडली आणि ' प्रबोधनकार ठाकरे ' या नावानेच ते अजरामर झाले !

वयात आल्यापासूनच प्रबोधनकारांनी लेखणी हातात धरली आणि ती अखेरपर्यंत वेगवेगळ्या विषयांवर लिहितच राहिली. लोकहितवादी आणि आगरकरांच्या सामाजिक सुधारणांचा त्यांनी पाठपुरावा केला, महात्मा ज्योतिबा फुल्यांच्या समतावादी आणि आक्रमक विचारांचा यथाशक्ती प्रचार केला, महर्षि शाहू महाराजांच्या बहुजनसमाजाच्या क्रांतीत सहभागी झाले, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या अस्पृश्योध्दाराच्या उठावात सक्रीय भाग घेतला. कर्मवीर भाऊराव पाटलांच्या रयत शिक्षण संस्थेच्या बीजरूपी कल्पनेला आपुलकीचं खतपाणी घातलं. आपल्या माफक उत्पन्नात कुटुंबाच्या किमान गरजा भागवायला न विसरता, प्रबोधनकार आपल्या लेखणीच्या आणि वाणीच्या सहाय्यानं वेगवेगळ्या सामाजिक आघाड्यांवर कायम धडधडत राहिले. वाचन, मनन, चिंतन आणि लेखनांत आकंठ बुडालेल्या प्रबोधनकारांची विविध विषयांवरची ग्रंथसंपदा आणि त्यासाठी त्यांनी व्यसनी माणसाच्या आसक्तीने केलेली ग्रंथ खरेदी आणि वाचन

तर थक्क होण्यासारखं आहे. त्यांची ' जीवनगाथा ' म्हणजे त्यांच्या आयुष्यातल्या सुरस आणि चमत्कारिक गोष्टींच्या माध्यमातून उलगडत जाणारा अर्वाचीन महाराष्ट्राचा सामाजिक इतिहास आहे. तर त्यांचं ' रंगो बापूजी ' म्हणजे, भल्या भल्या इतिहासकारांनीसुद्धा अचंबित व्हावं असा मराठ्यांच्या इतिहासाच्या अखेरच्या पर्वाचा अस्सल ऐतिहासिक दस्तऐवज आहे. धर्मशास्त्रापासून समाजशास्त्रापर्यंत अनेक विषयांवर अभ्यासपूर्ण आणि विवेचक ग्रंथ लिहिणाऱ्या प्रबोधनकारांना मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा बहुमान लाभू नये ही मोठी खेदाची बाब आहे ! परंतु असले सन्मान मिळविण्यासाठी आपल्या तत्त्वांना शाब्दिक मुरडही घालण्याइतके प्रबोधनकार बोटचेपे नव्हते आणि म्हणूनच ते संमेलनाचे अध्यक्ष होऊ शकले नाहीत हाच त्यांचा बहुमान आहे ! अश्या या चाकोरीबाह्य साहित्यकाचं समग्र साहित्य प्रकाशित करण्याच्या महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या निर्णयाचं मनापासून अभिनंदन. एखाद्या चौकात त्यांचा पुतळा उभारण्यापेक्षाही आणि एखाद्या रस्त्याला त्यांचं नांव देण्यापेक्षाही हे प्रबोधनकारांचं उचित स्मारक ठरणार आहे. शब्दकळेचा स्वामी, पुढील पिढ्यांसाठी शब्दकळेतच उपलब्ध करणं हेच त्या शब्दकळाकारांच भाग्य !!

प्रबोधनकारांच्या ग्रंथांचे २ खंड एव्हाना प्रकाशित झाले आहेत. प्रस्तुतचा हा तिसरा खंड त्यांच्या नाटकांचा, ह्या नाट्यखंडाची प्रस्तावना मी लिहावी असा प्रस्ताव, प्रबोधनकारांचे एक भाविक कल्याणशिष्य आणि या संपादक समितीचे निमंत्रक, ' मार्मिक ' साप्ताहिकाचे कार्यकारी संपादक श्री. पंढरीनाथ सावंत यांनी माझ्यासमोर ठेवला आणि मी ताडमाड उडालोच. ' इये मराठीचिये नगरी ' प्रस्तावनेला खूप महत्त्व आहे. अनेक ग्रंथांच्या प्रस्तावना मूळ ग्रंथापेक्षाही सरस उतरल्या आहेत आणि अनेक साहित्यिक त्यांच्या मौलिक ग्रंथापेक्षाही त्यांनी इतरांच्या ग्रंथांना लिहिलेल्या प्रस्तावनांसाठी जास्त प्रसिद्ध आहेत. या मालिकेत प्रकाशीत झालेल्या प्रबोधनकारांच्या चरित्रग्रंथाला कै. धनंजय कीर या ख्यातकीर्तचरित्रलेखकाची तर ' रंगो बापूजी ' या इतिहास ग्रंथाला डॉ. अ. रा. कुळकर्णी या जानेमाने इतिहासतज्ज्ञाची प्रस्तावना लाभली आहे. याच न्यायाने नाटकांच्या खंडाला नाटक्याची प्रस्तावना म्हणून माझी निवड करण्यात आली असली तरी मी शब्दगंगेच्या पलीकडच्या तीरावरचा प्रवासी आहे हे ध्यानात घेणं आवश्यक आहे. निर्मितीच्या आणि भूमिकेच्या दृष्टीने एखाद्या नाटकाचा अभ्यास करणं वेगळं आणि प्रस्तावना लिहिण्याच्या दृष्टीन आवश्यक असणारी वाङ्मयीन शास्त्रीय दृष्टी असणं वेगळं. नाटक ही एकमेव जीवननिष्ठा यापलिकडे माझ्याकडे कोणतंही अधिष्ठान नाही याची मला पुरेपूर जाणीव आहे. परंतु मी नकारासाठी तोंड उघडण्यापूर्वीच माझ्या हातात प्रबोधनकारांची ५ नाटकं कोंबून ' पृष्ठांची मर्यादा नाही. वेळेचं बंधन नाही ' अस मला सुनावून पंढरीनाथ सावंत अंतर्धान

पावले ! ते अंतर्धान पावले तरी त्यांनी माझ्या हातात ठेवलेली नाटकं मला माझ्या जबाबदारीची जाणीव करून देत होती. यथाकाल मी ती वाचली आणि माझ्या प्रतिक्रिया मी शब्दबद्ध करीत आहे. नाट्याचा उत्कर्ष-अपकर्ष, प्रवेशांची आणि अंकांची नाट्यपरिणामाच्या दृष्टीन होणारी मांडणी, स्वभावरेखाटन वगैरे वगैरे शास्त्रीय जंजाळात न गुरफटता मी फक्त नाट्यावलोकन करणार आहे. हे नाट्यावलोकन करीत असताना प्रबोधनकारांचं अन्य साहित्यही मी वाचलं. मला अज्ञात असलेल्या त्यांच्या अनेक पैलूंचं विश्वरूपदर्शन मला घडलं. मी अभावितपणे त्यांच्यासमोर नतमस्तक झालो आणि म्हणूनच माझ्या या किंचित भावुक अंगान घडणाऱ्या नाट्यावलोकनाला मी '' केशवाय नमः । '' म्हणून सुरुवात करीत आहे.

प्रबोधनकार ऐन विशीत असतानाच सांगलीकर स्त्री नाटक मंडळी आपले खेळ करण्यासाठी त्यांच्या जन्मग्रामी पनवेलीस आली होती. आयुष्यात पुढे काय करायचं हे नक्की ठरलं नसलं तरी आपल्या लेखणीची ताकद तरुण केशवरावांना समजली होती. त्या उत्साहाच्या भरांत त्यांनी एक नाटक लिहिलं आणि त्या नाटकाचं वाचन त्या नाटक मंडळीत झालं. पहिल्याच बैठकीत नाटक पसंत पडलं म्हणजे ते नाटक नाकीडोळी नीटस असलं पाहिजे. या नाटकाच्या व्यवहारापोटी बयाणा रक्कम म्हणून पन्नास रुपये खिशात खुळखुळवतच केशवराव घरी परतले. याच नाटकमंडळीबरोबर मास्तर म्हणून जाण्याची संधी त्यांना मिळाली. घरातल्या थोरामोठ्यांच्या आशिर्वादानं आणि गावातल्या कुटाळांच्या '' रांडांच्या कंपनीत गेला '' अशा शेलक्या आहेराच्या बळावर केशवरावांनी नाटक मंडळीत पाऊल ठेवलं. त्या नाटक मंडळीत त्यांच पाऊल स्थिरावलं नाही पण अनेक नाटकमंडळ्यांची बिऱ्हाडं बदलत अखेर ते '' स्वदेशहितचिंतक '' या नामांकित मंडळीत स्थिरावलं. याच मंडळीत त्यांचा जनुभाऊ निंबकरांसारख्या निष्णात नाट्याभिनयशिक्षकाचा अकृत्रिम स्नेह लाभला. कृष्णाराव गोरेंसारख्या अभिजात गायक नटाचा सुरेल सहवास मिळाला आणि '' गुरूणाम् गुरू '' असलेल्या श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांची रसीली साहित्यिक मैत्रीही लाभली. ' स्वदेशहितचिंतक ' मंडळीच्या अमरावती येथील छावणीत मुक्कामाला असताना केशवरावांचं पहिलं ' सीताशुद्धी ' हे नाटक प्रकाशित झालं. कोणत्याही नाटकाचा रंगभूमीवर प्रयोग होण्यापूर्वी त्या नाटकाच पुस्तक प्रकाशित करण्याचा त्यावेळी प्रधात नव्हता त्याअर्थी या नाटकाचे खेळ सुरू झाले असले पाहिजेत, असा तर्क करायला साधार वाव आहे. परंतु ते कोणत्या नाटक मंडळीने केलं, कोणी भूमिका केल्या, किती प्रयोग झाले. प्रयोग कसे झाले याचा तपशील मात्र कुठंच मिळत नाही. नाटकाच्या प्रस्तावनेत 'एकदोन नाटक मंडळ्यांच्या तालमीत तावूनसुलाखून निघालेली रंगावृत्ती ' असा उल्लेख आहे. म्हणजे हे नाटक तालमीत घेतल गेलं होतं. त्यातील प्रत्येक पदाच्या डोक्यावर ते पद कोणत्या गाण्याच्या चालीवर म्हणायचं याचा

रागासकट आणि वृत्तासकट उल्लेख आहे. म्हणजे त्या अवस्थेपर्यंत तालीम गेली होती. प्रत्येक प्रवेशाच्या सुरूवातीला स्थळनिर्देश आहे. नांदी-मंगलाचरणापासून तो थेट भरतवाक्यापर्यंत घेऊन जाणाऱ्या या परिपूर्ण नाटकाचा प्रयोग मात्र झाला की नाही हा एक संशोधनाचा मुद्दा आहे.

' सीताशुद्धी ' हे नाटक रामायणाच्या रामरावण युद्धावर, सीतामुक्तीवर आणि नंतर सीताशुद्धीच्या कथाभागावर बेतलेलं आहे. त्या काळाच्या गरजेप्रमाणे नाटक मोठं आणि ५ अंकात विभागलेलं बहुप्रवेशी आणि अर्थातच बहुपात्री आहे. मूळ कथानकात कल्पनाविलासाच्या जागा सोडल्यास नाटककारानं कोणतंही स्वातंत्र्य घेतलेलं नाही. त्यानंतर याच कथाभागावर आधारलेल्या आधुनिक नाटकात प्रभु रामचंद्राला सीता जाब विचारते, उर्मिला लक्ष्मणाला वाक्ताडन करते, अनार्य जम्बूक आगंतुकपणे कथानकात घुसून रामाची हजेरी घेतो. पण केशवराव तसं काही करीत नाहीत. अतिशय सरळ सोप्या आणि प्रासादिक भाषेत ते आपला कथाभाग मांडतात. हे प्रायः युद्धनाट्य असल्याकारणाने उभयपक्षांचे योद्धे, सेनानी आणि अन्य गोतावळा, राजस्त्रिया आणि दासींच्या घोळक्यासह इथं वावरतो. मारुती आणि वानरसेना, रावण आणि राक्षससेना कोणत्या रंगभूषेत आणि वेशभूषेत वावरत असतील याची आपण फक्त कल्पनाच करू शकतो. सत्ता आणि संपत्तीच्या जोरावर लंकेत उतू जात असलेला उन्माद आणि सत्पक्षाच्या सत्वशीलपणामुळे रामाकडील बाजूचा वाढत जाणारा आत्मविश्वास आणि अंतिम विजय नाटककारानं अचूक पकडला आहे. तत्कालीन रंगभूमीच्या मर्यादा लक्षात घेता २०—२५ फुटांच्या मर्यादेत वरखाली होणाऱ्या पडद्यांच्या सहाय्याने गॅसबत्तीच्या उजेडात या नाटकातील समरांगणापासून समुद्रापर्यंतची दृष्यं कशी दाखवली असतील ? परंतु त्यावेळेचे कलाकार आणि तंत्रज्ञ खूपच वाकबगार होते आणि प्रेक्षक खूपच समजूतदार होता हेच खरं !

या नाटकात रामाकडील पक्षांत वनचर नावाच एक गंजड पात्र आहे. हे विनोदी पात्र बहुशः ह-हा-च्या बाराखडी बोलून धमाल उडवत असलं पाहिजे. अर्वाचीन काळातल्या प्रा. मधुकर तोरडमलांच्या ' तरुण तुर्क, म्हातारे अर्क ' मधील हा-हा- कारी आणि किंचित चावट असलेल्या प्रा. बारटक्क्यांचा चावट असलेला आजोबा शोभावा असं हे पात्र आहे.

सीताशुद्धी नाटकातील लक्ष वेधून घेणारी जमेची बाब म्हणजे त्यातील पदं. संगीत नाटकातील सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे गाण्याच्या जागा आणि त्या जागी उत्तम पदाची योजना. या दोन्ही बाबतीत नाटककार शंभर टक्के यशस्वी झाला आहे. नाटकातल्या पदाची रचना, योग्य आशय कमी शब्दांत व्यक्त करणारी असावी. पदाचं तोंड आणि अंत-याची अखेर शक्यतो आकारांत असावी, गायक नटाला आलापीसाठी आणि तान घेण्यासाठी या जागांचा उपयोग व्हावा. नाट्याचार्य देवलांनी आपल्या आणि

इतरांच्या नाटकांतही आदर्श आणि गेय भावानुकुल पद्य रचनेचा आदर्श निर्माण केला. परंतु नंतर श्रीपाद कृष्ण कोल्हटकर-गडकऱ्यांपासून तो थेट आचार्य अत्र्यांपर्यंत अनेक नाटककारांना ते स्वतः कवी असून उत्तम नाट्यगीतं रचता आली नाहीत. ही एक वेगळीच इल्लम आहे. कोल्हटकर-खाडिलकरांच्या नाटकातली बरीचशी ' पदं ' क्लिष्ट आहेत. गडकऱ्यांच्या नाटकातील अनेक पदं वि. सि. गुर्जरांनी बांधली आहेत. स. अ. शुक्ल उत्तम पद रचीत. अर्वाचीन काळात मो. ग. रांगणेकरांची पदं उत्तम असत. नाट्यपद रचणाऱ्यावर शब्द प्रसन्न हवेतच परंतु त्याला गायनाचं अंग असणंही तितकच महत्त्वाच असतं. सुदैवाने केशवराव या दोन्ही अंगांनी समृद्ध होते. या नाटकांत झटपट गाण्यासाठी केशवरावांनी कीर्तनाच्या अंगानी गायिली जाणारी आर्या, साकी, दिंडी, झंपा इत्यादी वृत्त सफाईन वापरलीतच. मारुतीच्या तोंडी असलेला " धडड झंझावात सुटला, कडड कडकड तरुहि उमलती " हा झंपा तर समर्थ रामदासांच्या शब्दकळेची याद करून देणारा आहे. गायकीच्या रागदारी ढंगातली पदही या नाटकात आहेत. अनेक पदं लोकप्रिय नाट्यगीतांवर बांधली आहेत. ही गाणी रचण्यासाठी आवश्यक असलेली जाण केशवरावांना कृष्णराव गोरेंसारख्या गायक नटाच्या मैत्रीतून लाभली. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांकडून त्यांना नव्या ढंगाच्या उडत्या चाली मिळाल्या. स्वतः केशवराव शास्त्रोक्त गाण्यातले दर्दी होतेच आणि उत्तम सतारही वाजवीत. परिणामस्वरूप केशवरावांनी या नाटकांत अनेक उत्तम पदं रचिली आहेत. आजही श्री. स्नेहल भाटकरांसारख्या बुजुर्ग संगीतदिग्दर्शकाकडून यातील काही निवडक पदं पुन्हा बांधून घेऊन ती श्री. प्रभाकर कारेकर, फैयाज वगैरे गुणी मंडळींकडून गाऊन घेतली तर ती नाट्यगीतांच्या मैफिलीत मानाचं स्थान पटकावतील यात शंका नाही.

परंतु एकूणच ' सीताशुद्धी ' हे नाटक सरलमार्गी आहे. कथानक माहीत असल्याकारणाने अपेक्षित तेच घडतं आणि अपेक्षित तेवढचं घडतं !

इ. स. १९०९ च्या सुमारास ' सीताशुद्धी ' प्रसिद्ध झालं आणि लगेच केशवरावांनी आपला नाटकमंडळीतला गाशा गुंडाळला. परंतु या ५-७ वर्षांच्या नाटक मंडळीतल्या वास्तव्यात त्यांचा अनेक गुणिजनांशी, साहित्यिकांशी, पुढाऱ्यांशी परिचय झाला. ही स्नेहाची शिदोरी त्यांना आयुष्यभर पुरली. याच काळात त्यांच्या मुळातल्या सामाजिक जाणिवा प्रखर बनल्या. जीवनाचं इतिकर्तव्य समजलं. केशवराव ठाकऱ्यांचे प्रबोधनकार ठाकरे बनले. त्यानंतर तब्बल वीस वर्षांनी म्हणजे १९३० साली त्यांनी आपली लेखणी पुन्हा नाटक लिहिण्यासाठी उचलली कारण तत्कालीनच घडल. प्रबोधनकारांचा कर्जत येथे मुक्काम असताना तिथ एक नाटकमंडळी आली. काळ कर्ते शि. म. परांजप्यांच कर्णाच्या जीवनावरील ' पहिला पांडव ' नाटक पहायला ते गेले आणि संतापानं घरी परतले. ' मला पहिला पांडव म्हणा हो ' म्हणून केविलवाणेपणाने

याचना करणारा कर्ण त्यांना बिलकूल पटला नाही. त्याच तिरीमिरीत त्यांनी कर्णाच्याच चरित्रावर नाटक लिहिलं. ' टाकलेलं पोर ' नाटकाच्या नांवातच त्याच्या वेगळेपणाची झलक दिसते. प्रबोधनकारांचा महाभारताचा व्यासंग होताच कर्णचरित्र्याच्या माध्यमातून त्यांनी महाभारतातील अनेक व्यक्तिरेखांच्या यथास्थित परामर्श घेतला आहेच पण त्या ग्रंथातील अनेक अनीतिमान कथांचा मोठ्या आविशाने पर्दाफाश केला आहे. तोपर्यंत प्रबोधनकारांच्या सामाजिक धारणा पक्क्या झाल्या होत्या. भ्रूणत्याग आणि भ्रूणहत्या या दोन अमानुष कलंकांवर त्यांना या नाटकाच्या माध्यमातून टीका करता आली. जन्मतःच त्याग करणाऱ्या जन्मदत्त क्षत्रियकुला-पेक्षा दैवदत्त शूद्र सूतकुळाचा सार्थ अभिमान बाळगणारा कर्ण धीरोदत्त वाटतो. या नाटकातील कर्ण-कृष्ण प्रवेश आणि कर्ण-कुंती प्रवेश तर विचारांच्या दृष्टीने स्फोटक आहेत. कर्णचरित्राचा वेध घेण्याचा प्रयत्न या शतकांत अनेक साहित्यिकांनी केला पण आपल्या जमिनीवर घट्ट पाय रोवून उभा असलेला कर्ण फक्त प्रबोधनकारांनीच रंगवला. शेवटच्या दृष्यातील कर्ण-कृष्ण जुगलबंदी तर अप्रतिम आहे.

या नाटकात विनोदासाठी वापरलेली ' हिरडा बेहडा आणि आवळकटी ' ही त्रयी तर धमालच आहेत. हिरडा गवई आहे. ' नादिर्दिदिरतुम् ' च्या सांगितिक परिभाषेत बोलतो. बेहडा पखवाजी आहे. ' धिरकिट थोम् ' च्या मृदंगी बोलात बोलतो. आवळकटी या अविवाहित दासीची प्रियाराधना करताना हे दोघेही संभावित विवाहित पुरुष तत्कालीन नीतिकल्पनांची आणि त्याचबरोबर महाभारतातील अगम्य जन्मकथांची जी इरसाल खिल्ली उडवतात ती नुसती वाचनीयच नव्हे तर एकूणच नीतिकल्पनांचा पुन्हा एकदा नव्याने विचार करायला लावणारी आहेत. चमत्काराच्या बुरख्याआड, महाभारतासारख्या शिष्टसंमत ग्रंथात उजळ माथ्याने वावरणाऱ्या अनेक अनैतिक कथांचा प्रबोधनकारांनी अतिशय परखड भाषेत समाचार घेतला आहे. प्रबोधनकारांच्या उपहासगर्भ विनोदाला आणि सांगीतिक ज्ञानाला या भूमिकांमधून खूप वाव लाभला आहे.

महाभारताची उत्तम जाण असलेल्या प्रबोधनकारांचं ' टाकलेलं पोर ' हे एक स्फोटक नाटक आहे. त्यांच्या खास ' ठाकरी ' भाषेचा आसूड या नाटकात वाक्यावाक्यातून ओढलेला दिसतो. महाभारताच एक वेगळ चिंतन या नाटकात आहे. कुमारी मातेचा प्रश्न यात आहेच पण अगतिक तरुण विधवा मातांबद्दलही प्रबोधनकार तळमळून लिहितात. निसर्गनियमांपेक्षा मानवनिर्मित नीतिनियम मोठे असू शकत नाहीत हा एक विस्फोटक विचार त्यांनी या नाटकांत दिलाच आणि कुमारी मातांनी आणि विधवा मातांनीही, समाजाचा रोष आणि अवहेलना पत्करूनही आपल्या पोटच्या मुलांना जन्म द्यावा आणि त्यांना वाढवावं असा संदेशही त्या काळात दिला आहे. स्त्री-पुरुष एकत्र आल्याशिवाय अपत्यसंभव संभवत नाही असा निसर्गनियम असताना,

महाभारतातल्या अनेक मान्यवरांच्या जन्माला अद्भुतरम्य जन्मरहस्य बहाल करून त्यांना लब्धप्रतिष्ठित बनवण्याच्या महाभारतकारांच्या खटाटोपाचा प्रबोधनकारांनी या नाटकात खरपूस समाचार घेतला आहे. या नाटकात महाभारतावर एक अश्रुत टीकाटिप्पणी आहे आणि ती आनंद साधल्यांच्या ' हा जय नावाचा इतिहास आहे. ' या ग्रंथापूर्वी अनेक वर्षे प्रबोधनकारांनी केली आहे.

१९३० साली लिहिलेल्या या नाटकाच्या पहिल्या दोन अंकांचा एक प्रयोग प्रबोधनकारांनी आपल्या डेक्कन स्पार्क्स या संस्थेमार्फत १९३४/३५ मध्ये खान्देशात फैझपूर येथे केला. त्यातल्या कुमारी मातेच्या चित्रीकरणाचा प्रेक्षकांवर इतका परिणाम झाला की, दुसऱ्याच दिवशी जवळच्याच यावल गावातल्या एका वाळीत टाकलेल्या कुमारी गर्भार मुलीचा विवाह तिच्याशी लग्न करू इच्छिणाऱ्या आणि त्या स्थितीला जबाबदार असणाऱ्या तिच्याच समाजातल्या तरुणाशी लावून देण्यात आला. हे झालं नसतं तर तिच्यावर आणि तिच्या अपत्यावर हक्क सांगायला गावातला एक मुसलमान तरुण पुढे आलाच होता. तो तिला घेऊन गेला असता आणि तिच्या पोटची मुलं कालांतरानं आपल्याच हिंदु समाजाच्या छाताडावर थै-थै नाचली असती ! असो, परंतु इतक्या परिणामकारक नाटकाचा व्यावसायिक प्रयोग करायला कोणीच पुढं कसं आलं नाही ? जुन्या नाटकमंडळ्या त्या काळात धडाधड बंद पडत गेल्या हे खरं परंतु अनेक नव्या नव्या नाट्यसंस्था जन्माला येतच होत्या. आधुनिकतेच्या नावाखाली विलायती नाटकांची रोपटी मराठी मातीत रुजवण्याची त्या काळी फॅशन होती. प्रबोधनकारांच्याच शब्दात सांगायचं तर त्यांच्याकडे ' बर्नार्ड शॉचा मंत्र आणि इब्सनी तंत्र ' नव्हतं तरीही ' टाकलेलं पोर ' नाटकामध्ये भरपूर सामाजिक आशय होता याची दखल का घेतली गेली नाही ? नाटक लिहून पूर्ण झाल्यानंतर ९ वर्षांनी १९३९ साली मुंबईतल्या पाठारे प्रभू समाजातल्या हौशी पण गुणी नटांच्या चित्तरंजन नाट्य समाजाने या नाटकाचे बरेच प्रयोग केले. या नाटकानंतर कर्णासारख्या व्यक्तीरेखेच्या उदास आत्ममग्न आणि हॅम्लेटी स्वरूपाच्या नाट्यआवृत्त्या खूप निघाल्या. त्या रंगभूमीवर आल्या गेल्या देखील. पण धीरोदत्त स्पष्टवक्ता जन्मदात्या आईला तिच्या कर्तव्यच्युतीची जाणीव करून देणारा आणि दैवायत्त शूद्र सूतकुळाशी इमान राखणारा प्रबोधनकारांचा कर्ण त्या व्यक्तीरेखेइतकाच अजूनही उपेक्षित राहिला आहे. कारण फक्त ' ठाकरे ', दुसरं काय ? मराठी नाट्यकलेच्या पुनरुत्थानासाठी १९४४ पासून मुंबई मराठी साहित्य संघाने अनेक नाट्यमहोत्सव घडवून, त्या महोत्सवात अनेक नव्या जुन्या नाटकांचे क्वचित चांगल्या नसलेल्या नाटकांचेही प्रयोग केले पण प्रबोधनकारांच्या एकाही नाटकाचा प्रयोग त्या महोत्सवात झाला नाही. याबाबतील प्रबोधनकारांचं भाष्य खूपच बोलकं आणि बोचरं आहे. ते म्हणतात ' मराठी रंगभूमीतील मर्त्य पृथ्वीवरून स्वर्गीय ऐश्वर्याचे आनंदसाम्राज्य देण्यासाठी ' आपल्या कलावंत जीवनाचे पापड भाजणाऱ्या

पांढरपेशा शहरी शहाण्यांनी काय म्हणून माझ्या नाटकांची दखल घ्यावी ? असो, निदान त्यांच्या या नाटकांच्या खंडाच्या प्रकाशनाच्या सोहळ्यांत तरी त्यांच्या सगळ्याच नाही तरी एखाद्या नाटकाचा प्रयोग घडवून आणावा अशी अपेक्षा आहे !

' टाकलेलं पोर ' नाटक लिहिण्याच्या काळांतच कर्जत येथे मुक्काम असताना प्रबोधनकारांनी ' ध्रुवाचं अढळपद ' नावाचं एक पौराणिक नाटक लिहिलं. एक नव्यानंच जन्माला येऊ घातलेल्या नाटक मंडळीनं ते तालमीत घेतलं. पडदे रंगवून घेण्यापर्यंत तयारी झाली. पण कुठतरी अडचण शिंकली ती उभी रहाणारी मंडळी कोसळली. त्या वाताहतीमध्ये प्रबोधनकारांच्या नाटकाच बाड कुठ भरभकट गेलं, कळलं नाही. ' ध्रुवाचं अढळपद ' कुठं आढळत नाही. त्याबद्दल काही लिहिता येत नाही ! ह्याच सुमारास प्रबोधनकारांनी एक ' काळाचा काळ ' नावाचं ऐतिहासिक नाटक लिहिलं. तो जमाना संगीत नाटकाप्रमाणे ऐतिहासिक नाटकांचाही होता. प्रबोधनकारांनी या नाटकासाठी चितोडची पार्श्वभूमी निवडली आहे. सिंहासनावर बसलेल्या आपल्या सावत्र भावाला दगाबाजीन ठार मारून त्याची गादी बळकावणाऱ्या बनबीराची आणि त्याचा सूड उगवून पुन्हा आपलं राज्य मिळविण्यासाठी धडपडणाऱ्या अजयासिंहाची ही कथा आहे. या सूडकथेत अर्थातच भुयार, चोरवाटा, वेषांतर, रहस्य, प्रेमकथा आणि तलवारीचा खणखणाट आहे आणि प्रत्येक रजपूत कथेत एखादी कमलकुमारी असते तशीच एक कमलकुमारीही आहे. हाडवैऱ्याच्याच मुलीच्या प्रेमात पडण्याचा ' रोमियो ज्युलिएटी ' थाट इथं आहे. अद्‌भुतरम्य ऐतिहासिक नाटकाच्या सर्व गरजा या नाटकात भागवल्या आहेत परंतु तरीही प्रबोधनकार झाल्यानंतरच्या ठाकऱ्यांचं हे नाटक वाटत नाही ते ' सीताशुद्धी ' कार ठाकऱ्यांच्या वळणाचं नाटक आहे. हे नाटक प्रत्यक्ष लिहिण्याचं कार्य जरी १९३० साली झालं असलं तरी त्याचा मानसजन्म खूप आधीचा असावा. हे नाटक रंगभूमीवर आलंच नाही त्याची एक टाईप केलेली प्रत १९५३-५४ मधील प्रबोधनकारांच्या जुन्या ट्रंकेत सापडली. तीच आता १९९९ मध्ये प्रसिद्ध होत आहे.

या नाटकातील प्रबोधनकारांची भाषा मात्र लक्ष वेधून घेणारी आहे. ' सीताशुद्धी ' नाटकात राजा रविवर्म्याच्या चित्रातल्या नायिकांच्या भारदस्त आणि गरती चालीनं चालणारी प्रबोधनकारांची भाषा या नाटकात नजाकतीनं थिरकताना आढळते. सुंदर सुंदर कल्पनांचा शाब्दिक सडा नाटकभर पडलेली आढळतो. अनुप्रासादि अनेक अलंकारांनी नटलेली वाक्यांच्या वाक्य या नाटकात संवादरूपानं प्रकटतात. कोल्हटकर-गडकऱ्यांप्रमाणेच प्रबोधनकारही शैलीदार भाषाप्रभु होते हेच खरं !

प्रबोधनकारांचा हा कर्जतचा मुक्काम म्हणजे त्यांचा नाटक लिहिण्याचा मोसम होता. याच मुक्कामात त्यांना नटश्रेष्ठ केशवराव दाते भेटले. त्या भेटीत प्रबोधनकारांनी अस्पृश्योद्धारावर एक नाटक लिहिण्याचा प्रस्ताव पुढे आला. संत एकनाथांच्या जीवनाची पार्श्वभूमी घेऊन नाटक रचायचं ठरलं. ते केशवराव निघून गेले. हे केशवराव

कामाला लागले. मुळातच प्रबोधकारांना अस्पृश्यांच्या लढ्याबद्दल जिव्हाळा. लहानपणापासूनच त्यांना अस्पृश्यांना बरोबरीनं वागवण्याचं बाळकडू त्यांच्या आजीपासून मिळालं होतं. तेव्हापासूनच वर्णाश्रमव्यवस्थेबद्दल आणि त्या व्यवस्थेचा फायदा घेऊन अंत्यजांना जनावरांपेक्षाही हीन वागणूक देणाऱ्या उच्च वर्णीयांबद्दल एक प्रचंड तिडीक त्यांच्या मनात निर्माण झाली होती. जाणतेपणाबरोबर प्रबोधनकारांची ही तिडीक प्रक्षुब्ध होत गेली. या शतकाच्या सुरूवातीच्या काळात महाराष्ट्रांत अस्पृश्योद्धाराच्या जेवढ्या चळवळी आणि उठाव झाले त्यात त्यांनी सक्रीय भाग घेतलाच पण आपल्या शस्त्रापेक्षाही धारदार असलेल्या लेखणीनं आणि वाणीनं भटाळलेल्या सनातन हिंदू धर्मातील चातुर्वर्ण्याविषयक कालबाह्य आणि अमानुष ढोंगीपणावर कडाडून टीका केली होती. अस्पृश्यांच्या मंदिरप्रवेशापासून समान पाणवठ्यापर्यंतच्या प्रत्येक लढ्यांत त्यांनी हिरिरीनं भाग घेतला होता. दादरच्या सार्वजनिक गणेशोत्सवात श्रीगणेशाची पूजा अस्पृश्यांच्या हातून करवण्याचा पराक्रमही त्यांनी केला होता. अस्पृश्योद्धाराबद्दल निश्चित कल्पना असणाऱ्या प्रबोधनकारांनी ' खरा ब्राम्हण ' हे नाटक त्याच धगीतून फुलवलं आहे. दक्षिणकाशी समजल्या जाणाऱ्या आणि भिक्षुकशाहीचं प्रचंड दडपण असलेल्या पैठणच्या पार्श्वभूमीवर संत एकनाथांच्या चरित्राच्या माध्यमातून त्यांनी ' खरा ब्राम्हण ' उभा केला आहे. संत ज्ञानेश्वरांची आणि त्यांच्या अश्राप भावंडांची ज्या पैठणमध्ये अहंमन्य भटाभिक्षुकांनी दारूण अवहेलना केली होती त्याच पैठणमध्ये हे नाटक आकार घेतं. ज्ञानोबांनी समतावादी भागवत धर्माची माळकरी संप्रदायाची क्रांतिकारी मुहूर्तमेढ जिथं रोवली त्याच पैठणमधील अरेराव भिक्षुक आणि बडवे, त्या अभिनव मुहूर्तमेढीचा पाया ठिसूळ करण्यात आणि श्रद्धाळू समाजाला आपल्या मुठीत ठेवण्याचा प्रयत्न करण्यात दंग होते. रामनवमीच्या दिवशी राममंदिराच्या पायऱ्यांजवळ उभा राहून आपला हार कोणीतरी सवर्णानं प्रभु रामचंद्राच्या पायावर वाहावा, अशी केविलवाणी याचना करणारा विठू वेसकर महार आपल्याला दिसतो. देव देश धर्मासाठी त्याचा एकुलता एक मुलगा रामजी लढाईत कामी आला आहे. त्याच्या सीता नावाच्या सुंदर विधवा बायकोनं हा फुलांचा हार तयार केला आहे. पैठणची देवळं मुसलमानी आक्रमणापासून वाचवण्यासाठी ज्यांनी आपले प्राण अर्पण केले, त्याच्या बापाची आणि बायकोची त्या उध्वस्त न झालेल्या देवळातील पुजारी आणि बडवे कशी संभावना करतात याचं हृदयस्पर्शी चित्रण प्रबोधनकारांनी केलं आहे. मुसलमान आक्रमकांनी आपल्या पूज्य देवदवता छिन्नविच्छिन्न करून आमच्या मंदिरांच्या मशिदी बनवल्या तरी त्यांचा सूड घेण्यासाठी न शिवशिवणारे आमचे षंढ हात त्याच मंदिरांचं रक्षण करण्यासाठी रक्त सांडणाऱ्या अस्पृश्यांना, त्याच मंदिरात प्रवेश करताना कसे ताठरपणान अडवतात हे बघण्यासारखं आहे. महाराची सावलीसुद्धा अस्पर्श मानणारे आमचे धर्ममार्तंड, सुंदर महारणींकडून स्पर्शसुखाची जिभल्या चाटीत अपेक्षा करतात हा विरोधाभास फक्त

आमच्याच ढोंगी सनातन धर्मात दिसतो. अस्पृश्यांना जवळ घेणाऱ्या कनवाळू एकनाथांना वाळीत टाकलं जातं ते वस्तीला महारवाड्यात जातात. महारवाड्याचं विठ्ठलवाड्यात रूपांतर करतात. सवर्णांनी आणि भटाभिक्षुकांनी आणलेल्या अनेक संकटांवर आणि बालंटांवर अखेर एकनाथांच्या सोशिकपणानं आणि श्रद्धेनं मात होते. एकनाथांच्या बंदोबस्त करण्यासाठी मुद्दाम काशीहून आयात केलेले महापंडीत एकनाथांच्या शुद्धतेची ग्वाही देतातच पण देव-देश धर्मासाठी सर्वस्वाची आहुती देणाऱ्या विठू महारालाच खरा ब्राम्हण मानून त्याला प्रेमादरान आलिंगन देतात इथं नाटक संपतं.......... ब्राम्हणाची व्याख्याच या नाटकात प्रबोधनकारांनी चपखलपणे मांडली आहे. समाजपुरुषाच तोंड म्हणून तोऱ्यात वावरणाऱ्या ब्राम्हणवर्गानं उदरभरणासाठी केवळ भिक्षुकीतच समाधान मानावं आणि समाजधारणेसाठीच मलिन वृत्ती स्वीकारणाऱ्यांना अस्पृश्य समजण्यात त्यांना पिढ्यानपिढ्या गावकुसाबाहेर पशुवत जीवन जगायला लावण्यात धन्यता मानावी अशा दुटप्पी आणि ढोंगी भटाभिक्षुकांची प्रबोधनकारांनी या नाटकात यथास्थित हजेरी घेतली आहे.

प्रबोधनकारांच्या सर्वच नाटकातल सर्वात प्रभावी नाटक म्हणजे ' खरा ब्राम्हण ' त्यांचा लेखणीचा तळपता स्वैरसंचार या नाटकात आढळतो. त्यांचा सनातन हिंदू धर्माचा गाढा व्यासंग, त्या धर्माची सद्यस्थिती, त्या धर्माच भवितव्य याबद्दल प्रबोधनकारांनी या नाटकात उत्तम भाष्य केलं आहे. शतकांच्या अन्यायी हक्कामुळे उच्चवर्णीय शिरजोर बनले होते. या शिरजोरांचे अग्रणी असलेला ब्राम्हणवर्ग भिक्षुकीच्या वतनामुळे ताठर बनला होता. शतकांच्या लादलेल्या निद्रेतून अनेक कोटी अस्पृश्य खडबडून जागे होऊ लागले होते. त्यांचं जागे होणं सवर्णांना परवडण्यासारख नव्हत. माणुसकीच्या समान हक्काच्या प्रत्येक पायरीवर अस्पृश्यांना रक्तपात होईपर्यंत लढाव लागत होतं. बळजबरीचं परिवर्तन कोणालाच सुखावाह होत नसतं. आंतरिक परिवर्तन होण अगत्याच होतं. या परिवर्तनासाठी म. फुले, आंबेडकर, म. गांधी, स्वा. वीर सावरकर वगैरे सर्व धुरीण ज्या काळात कटिबद्ध झाले होते, त्याच काळात ' खरा ब्राम्हण ' नाटक सिद्ध झालं. एका संताच्या जीवनावर हे नाटक बेतलेलं असलं तरी चमत्काराच्या कोणत्याही कुबड्या प्रबोधनकार वापरीत नाहीत हे विशेष. भडाग्नी, भम्पकराव आणि चव्हाठेंच्या रूपात इथे ढोंगी ब्रम्हवृंद वावरतो. म्हादबाच्या रूपात अस्पृश्यांवर अन्याय करण्यात ' हम भी कुछ कम नही ' थाटातला मराठा इथं दिसतो. ' थरकत घोडा, भडकत निशाण ' असं पालुपद आळवीत वेडगळासारखा वावरणारा पण संभावितांचं वस्त्रहरण करणारा एक गावबा नावाचा सर्वसामान्यांचा प्रतिनिधी इथं आहे. एकनाथ आणि त्यांची पत्नी गिरजा तर माणुसकीच्या न्हाणांत न्हाऊन निघालेली माणूसपणाची गोमटी रूपं आहेत. विठू महार आणि त्याची तरूण विधवा सून सीता तर अन्याय सहन करणाऱ्या अस्पृश्यांचे प्रातिनिधिक पुतळे आहेत. परंतु प्रबोधनकारांच्या

सामाजिक अन्यायाविरूद्ध सर्वंकष आघाड्यांवर लढण्याच्या प्रवृत्तीचं प्रतिक म्हणजे या नाटकात किंचित उपरेपणानं वावरणार गोव्यातील हिरा नायकिणीचं पात्र तो गोव्यातील गायक समाजाच्या उठावणीचा काळ होता. गोव्यातील उच्चभ्रूंच्या कामवासनेला रूढीच्या नावाखाली शतकानुशतक बळी जाणाऱ्या गोमंतकीय कलावंत समाज संघटित होऊ लागला होता. या समाजाच अधिवेशन गोव्यात होणार होतं. प्रबोधनकार प्रमुख वक्ते होते. सौंदर्य आणि ललित कलांचा शाप लाभलेली ही शापित जमात धनदांडग्यांच्या आणि वर्णदांडग्यांच्या अत्याचाराला बळी पडून अपमानित चेहऱ्यान जिणं कंठित होती. विवाहाच्या राजमार्गान संसार थाटून सन्मान्य नागरिक म्हणून जगण्याचा हक्क या समाजाला हवा होता. या काळात आपल्या ' खरा ब्राम्हण ' नाटकात गोमंतकीय हिरा नायकिणीचं पात्र उभ करून प्रबोधनकारांनी जे विचार व्यक्त केले आहेत ते नुसतेच पुरोगामी नाहीत तर येणाऱ्या काळाची चाहूल व्यक्त करणारे आहेत. आज गोमंतक मराठा समाज या नावाने हा समाज केवळ कलाप्रांतातच नव्हे तर सर्वच क्षेत्रांत केवळ भारतव्यापीच नव्हे तर विश्वव्यापी यश मिळवीत आहे.

प्रबोधनकारांनी अन्य नाटकं लिहिली नसती फक्त ' खरा ब्राम्हण ' हे एकच नाटक लिहिलं असतं. तरी नाट्यात्म सामाजिक उद्रेकाचे पाईक म्हणून त्यांना कीर्ती लाभली असती. कमावत्या आणि सुशिक्षित बायकोनं हातात बॅग घेऊन नवऱ्याचं घर सोडून जाण्याच्या विलायती नाटकांच्या देशी आवृत्त्या काढण्यात ज्या काळात आमचे नाट्याचार्य आपली सुधारणावादी पाठ स्वतःच थोपटून घेत होते. त्याच काळात प्रबोधनकारांनी संपूर्ण समाजाची पाठ भाजून काढणारं ज्वालामुखीच्या उद्रेकासारखं नाटक लिहिलं आहे. त्यांचे काही संवाद तर तप्त लाव्हा रसासारखे भाजून काढणारे आहेत. उदाहरणार्थ :—

" सगळे महार, मांग, धेड, चांभार, मुसलमान तरी झाले पाहिजेत नाहीतर पेशावरी पठाणांच्या टोळ्या या भटांच्या छातीवर चढल्या पाहिजेत, त्याशिवाय अस्पृश्यांच्या उद्धाराचा तिसरा मार्ग नाही. "

" पांढरपेश्यांच्या आचारविचारांत माणूसघाणेपणाची कीड घालणारा देवसुद्धा पापी आहे"'.

" अडीचतीन कोटी अस्पृश्यांना साध्या माणुसकीनं वागवण्याची अक्कल आम्हांला नसेल तर, आमच्या मोक्षाच्या कल्पनांवर सैतानसुद्धा विश्वास ठेवणार नाही. "

" अस्पृश्यांच्या हृदयात पेटलेल्या असंतोषाची ठिणगी विझवताना वेळीच प्रयत्न झाला नाही तर तिच्या होळीत ते गुलाम आणि आपण शिरजोर दोघेही जळून खाक होऊ. "

हे विचार व्यक्त होऊन आज पाऊणशे वर्षे लोटली. नाशिकचं काळाराम मंदिर प्रवेश, महाडच्या चवदार तळ्याचा सत्याग्रह, पंढरपुरचं विठ्ठल मंदिराचा दरवाजा सर्वांसाठी खुला करणं वगैरे अनेक चळवळी झाल्या. दरम्यान हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळालं. डॉ. आंबेडकरांनी आपल्या अनुयायांसह बौद्ध धर्माची दीक्षा घेतली, दलितांना शिक्षणात आणि शासकीय नोकऱ्यात आरक्षणाचं वरदान मिळालं. दलितांना वेदनेचा हुंकार त्यांच्या साहित्यातून उमटला आणि याच काळात दलितांवर अत्याचार होतच राहिले. त्यांच्या वस्त्या अजूनही पेटवल्या जात आहेत. त्यांच्या स्त्रियांची अजूनही नग्नावस्थेत सामूहिक धिंड काढली जात आहे ! ' खरा ब्राम्हण ' नाटकातले भडाग्नी, भम्पकराव चव्हाटे अजूनही नष्ट झाले नाहीत. ' संभवामि युगे युगे ' प्रमाणेच त्या नतदृष्ट चांडाळांची अवलाद हिंदू धर्माला कलंकित करण्यासाठी पुनः पुन्हा जन्म घेतच आहे !

' खरा ब्राम्हण ' नाटकातील पदांच्या शेवटच्या ओळीत प्रबोधनकारांनी मोठ्या हौसेन स्वतःचा उल्लेख " रमाकांत " असा केला आहे. ही पदंही अभंगांच्या जातकुळीशी मिळतीजुळती आहेत. कटाव आणि हिंदी दोघेही उत्तम आहेत. प्रबोधनकारांचा मिश्किलपणा मधे मधे डोकावतो. सीता महारणीच्या सौंदर्याकडे पाहून भम्पकराव उद्गारतो " वेलांटीनं गोलांटी खाल्ली. नाहीतर महारणीची महाराणीच झाली असती " गांवबा म्हणतो, महाराचा स्पर्श झाला तर ब्राम्हणाचा महार बनतो मग ब्राम्हणाचा स्पर्श झाला तर महाराचा ब्राम्हण का बनू शकत नाही ? " असो, अशी उदाहरण द्यावी तेवढी थोडीच.

१९३३ साली रेडिओ स्टार्स या संस्थेतर्फे ' खरा ब्राम्हण ' नाटकाचा प्रयोग झाला. पहिल्या प्रयोगापासून गाजत आणि गर्जत असलेल्या या नाटकाचे अल्पावधीतच १००/१२५ प्रयोग झाले आणि प्रथेप्रमाणे ती संस्था फुटली. या नाटकाचे सर्वदूर प्रयोग व्हावेत.म्हणून स्वतः प्रबोधनकारांनी पुढाकार घेऊन " डेक्कन स्पार्क्स " या संस्थेची स्थापना केली आणि पाठीवर बिऱ्हाड असलेल्या नटांचं बिऱ्हाड पाठीवर घेऊन स्वतः मालकाची भूमिका निभावीत अनेक अडचणींना आणि चणचणींना तोंड देत या नाटकाचे अनेक प्रयोग केले. पैश्याशिवाय किराणा दुकानदार शिधा देईना आणि पैसे मिळवण्यासाठी थिएटरमालक थिएटर देईना अशा विपरित परिस्थितीत हे प्रयोग झाले. निषेध, मोर्चे, धमक्या, बंद्या, याशिवाय ' खरा ब्राम्हण ' नाटकाचा पडदा कधी उघडलाच नाही परंतु नामोहरम न होता, प्रबोधनकारांनी या नाटकाच्या प्रयोगांतून अनेक वावटळी निर्माण केल्या. नाटक मंडळीला एकाच नाटकावर आठवड्याचे सगळे वार गुजरता येत नाही. म्हणून डेक्कन स्पार्क्स साठी प्रबोधनकारांनी ' विधिनिषेध ' हे एक नाटक लिहिलं. प्रेमविवाह, पुनर्विवाह, विधवाविवाह, स्त्रीशिक्षण वगैरे तत्कालिन सामाजिक समस्या या नाटकात खास प्रबोधनकारी रोखठोकपणे उतरल्या आहेत. गर्भपात आणि घटस्फोटाचा कायदा अस्तित्वात येण्यापूर्वीच्या काळातली बालविधवांची

आणि परित्यक्ता तरूण स्त्रियांची फरफट या नाटकात चितारली आहे. याव्यतिरिक्त एकदोन नाटकं त्यांच्या ' आगामी ' या स्वरूपात जाहिरातीतून झळकताना दिसतात परंतु त्या व्यतिरिक्त काही मिळत नाही.

तर असा हा प्रबोधनकार के. सि. ठाकऱ्यांच्या नाटकांचा धांडोळा ! आयुष्यात अनेक वेळा ते नाटकमंडळीच्या छावणीत वावरले. गायकांच्या मैफिलीत जाणकारीनं रमले. स्वतः उत्तम सतार वाजवीत. नटांच्या आणि तालीममास्तरांच्या जवळीकीमुळे त्यांची नाट्यविषयक जाण प्रगल्भ बनली. साहित्यकांच्या काव्य शास्त्र विनोदाच्या बैठकीत सन्मानाने बसले परंतु तरीही त्यांचा पिंड समाजकारण्याचाच होता. त्या आघाड्यांवर त्यांनी लक्षणीय कार्य केलं. विपुल ग्रंथ संपदा निर्माण केली. या प्रचंड कार्याच्या झपाट्यात त्यांचं नाटककार असणं झाकोळून गेलं असलं तरी दुर्लक्ष करण्याइतपत त्यांचं नाट्यकर्तृत्व उपेक्षणीय नाही. आज काळाच्या ओघात त्यांची नाटकं कालबाह्य झाली असतीलही कदाचित पण त्या नाटकांमधून मांडलेले विचार कालबाह्य झालेले नाहीत आणि म्हणूनच व्यावसायिकतेच्या तराजूत यशाच्या मापट्यानं नाटककार प्रबोधनकारांचं नाट्यकर्तृत्व न जोखता जबरदस्त वैचारिक आंदोलन निर्माण करणारा एक निर्भीड नाटककार म्हणूनच त्यांच्या नाट्यप्रपंचाकडे पाहिलं पाहिजे. माझाही प्रयत्न तसाच आहे.

झोपेच सोंग घेतलेल्या आपल्या ढोंगी समाजाला जागं करण्याचा अहर्निश प्रयत्न करणाऱ्या प्रबोधनकारांच्या कृतार्थ जीवनाची या निमित्ताने त्यांच्याच शब्दातून ओळख करून घेता आली हे माझ भाग्य. ही संधी मला उपलब्ध करून दिल्याबद्दल महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाचा तसेच या प्रकल्पाच्या संपादक समितीचा आणि विशेषतः समितीचे निमंत्रक श्री. पंढरीनाथ सावंत यांचा मनापासून आभारी आहे. श्री. सावंतांनी मला प्रबोधनकारांच्या नाटकांबरोबर त्यांचे अनेक ग्रंथ अवलोकनार्थ उपलब्ध करून दिले. लेखनकामाठी हा माझा व्यवसाय नाही हे जाणून श्री. सावंतांनी मला भरपूर वेळ दिला. मी लिहिलेलं वाचून मला उपयुक्त सूचना केल्या, मला प्रोत्साहन दिलं त्याबद्दल मी त्यांचे आभार न मानता त्यांच्या ऋणांतच राहू इच्छितो.

माझ्या या नव्या भूमिकेचं माझ्या अन्य भूमिकांप्रमाणेच रसिकांकडून चाहत्यांकडून जाणत्यांकडून स्वागत होईल अशी अपेक्षा आहे !

**—प्रभाकर पणशीकर**

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

सीताराम—पुस्तक-माला. पुष्प १ ले.

केशव सीताराम ठाकरे कृत—

[illegible] संगीत.

# सीताशुद्धी नाटक.

[ रंगावृत्ति अंक १ ते ५. ]



" चिरंजीव त्या अंजनी बालका । नसे भीति कालत्रयी आयका ॥ प्रतिकार त्या जो मदाने करी । अरी तो पडे सत्वरी [illegible] ॥ [illegible] ध्वजा शोभते ज्या करी । यशवंत येईल तो लवकरी ॥ "



प्रकाशक.

धी इंडिया पब्लिशिंग कं. लि.

५ कावसजी पटेल रोड.

फोर्ट—मुंबई.

---

सन १९०९ इसवी.

# प्रस्तावना.



पौराणिक कालांतील कथाभाग नाटकरचनेस घेतला असतां, त्यांत नीतिदर्शक अशीं अनेक स्थळें सांपडतात आणि मनोरंजनाच्या बरोबरच नीतिचाहि बोध होण्याला तशीं नाटकें वाचकांनां व प्रेक्षकांना दोघांनांहि पसंत पडतात ; म्हणून माझ्या अल्पमतीनें प्रस्तुतचें सीताशुद्धी नाटक तयार करून तें मीं आज माझ्या सर्व रसिक देशबंधूंच्या पुढें ठेवीत आहे. रामायणांतील मूळ आख्यान नाटक-रचनेच्या दृष्टीनें बरेंच नियमित व आकुंचित करावें लागलें खरें, तथापि ठिकठिकाणी होतां होईल तों संदर्भ मात्र सोडला नाहीं. कांहीं प्रवेश काल्पनिक परंतु त्या काळाला अनुसरून घातले आहेत. नाटक लिहिण्याचा हा माझा प्रथमचाच यत्न आहे; तो कितपत साधला आहें हें पाहण्याचें काम मी रसिकांवर आणि टीकाकारांवरच सोंपवितों. त्यांत कांहीं गुणलेश आढळल्यास त्याचें श्रेय सर्वस्वीं माझे गुरुवर्य श्रीयुत कृ. ना. आठल्ये एडीटर ' केरळकोकिळ ' व श्रीयुत राजाराम नारायण गडकरी वकील-देवास यानां आहे.

नाटक प्रयोगाच्या दृष्टीने सुधारून लिहीत असतां श्रीयुत रा. रा. गोपाळराव हरी काशीकर-वकील यांची मला फार मदत झाली त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. शेवटीं सर्व सहायकारी मित्रमंडळाची व पुरस्कर्त्यांची मजवरची कृपादृष्टी शुक्लेंदुवत् वाढत्या प्रमाणांवर राहो अशी त्या जगन्नियंत्या प्रभूपाशीं करुणा भाकून हा प्रस्तावना लेख पूर्ण करितों.

स्व. हि. चिं. नाटक मंडळी
छावणी–उमरावती.
ता. १ सपटंबर १९०९.

देशबंधूचा नम्र सेवक
**केशव सिताराम ठाकरे.**

# प्रकाशकांचे उद्गार



प्रस्तुत सीताशुद्धि नाटक महाराष्ट्र वाचकवर्गापुढें ठेवतांना त्यांतील गुणास्वाद हंसक्षीर न्यायानें त्यांनीं स्वीकारावा अशी विनंती आहे. या नाटकाची रचना एकदोन नाटकमंडळ्यांच्या तालमी मुद्दाम घेऊन प्रयोग दृष्ट्या होतां होईल तों अव्यंग करून सुधारली आहे. त्यामुळें प्रयोगाची परवानगी मिळालेल्या व मिळविणाऱ्या नाटक मंडळ्यांनां रंगभूमीवर प्रयोग करतांना अडचण पडणार नाहीं अशी आशा आहे. या पुस्तकासंबंधीं (प्रयोगाच्या परवानगीखेरींज) सर्व प्रकारचे हक्क आमच्या स्वाधीन आहेत. प्रयोगाची परवानगी मागणें झाल्यास केशव सिताराम ठाकरे—पनवेल, जि. कुलाबा या पत्त्यावर नाटकमंडळ्यांनीं पत्रव्यवहार करावा.

नजरचुकीनें राहिलेल्या मुद्रणदोषाबद्दल क्षमा मागून, ज्या जगदीश्वर प्रिंटिंग् प्रेसनें छापण्याचें काम त्वरित करून दिलें त्यांतील सर्व कार्यकारी मंडळीचे आम्ही अत्यंत आभारी आहोंत.

**धी इंडिया पब्लिशिंग् कंपनी लिमिटेड**
**५ कावसजी रोड, फोर्ट—मुंबई.**

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

केशव सिताराम ठाकरे कृत

[illegible] संगीत

# सीता—शुद्धी.



## अंक पहिला.



**स्थळ :** लंकेंतील विरुपाक्षाचें मंदीर.

[बिभीषण परिचारकांसह प्रार्थना करीत आहे.]

पद. ( श्री नटनायक० )

मंगलदायक विश्वपतीला सद्भावें स्तवितो ॥
ईशचरणिंचा प्रसादरज तो कार्य सुलभ करितो ॥ धृ० ॥
विरुपाक्षा विषधरा नटविशी वसुंधरा सारी ॥
कमलापति तूं दैवत आम्हां संसारीं तारी ॥
बलवंतचि तूं कविवर तूंची कुजनताप वारी ॥
मनुज-जन्म हा प्रसाद ज्याचा तोची पूर्ण करितो ॥ १ ॥

पद. ( वंदी त्या त्रिगुणाला० )

ध्यातों त्या जगपाला ॥ प्रभुला, आदिजननिच्या त्या
रमणाला ॥ धृ० ॥ मत्स्यस्वरुपा धारण करुनी ॥
चतुर्वेद-संरक्षणिं धांउनि ॥ कच्छ वराहचि नृसिंह होउनि ॥
सत्या सद्धर्माला उचली करिं धरि अवताराला ॥ १ ॥

**बिभीषण०**—एकाग्र चित्तानं परमेश्वराचं भजन केल्यामुळं मनाची स्थिती पहा कशी झाली ती—

**पद.** ( राधाधर मधु० )

**चित्त शांतिला वरी । मनाचा ताप सहज हो दुरी ।। धृ० ।।**
**प्रभुभजनें मन पुनितचि होतां ।। ईशस्तवनिं ये मुक्ती हातां ।।**
**षड्रिपुछलना हरी ।। १ ।। धैर्य-पिता त्या क्षमा-जननिला ।।**
**शांति-गेहिनी सत्य-सुताला ।। परमेश्वर चिर करी ।। २ ।।**

**१ परिचारक०**—बिभीषण महाराज, ईशभजनाचा महिमा फार थोर आहे. सत्य तारण्याकरितां आणि असत्याचा नायनाट करण्यासाठीं ईश्वरानें मत्स्य, कच्छ, वराह, नारसिंह, वामन आणि परशुराम असे सहा अवतार आजपर्यंत धारण केले खरें. पण बिभीषण महाराज, सांप्रत भूतलावर सुरूं असलेलीं अनाचारी व पापी कृत्यें पाहून ईश्वराला त्या श्रेष्ठ सत्यतत्त्वाची करुणा अझून कां येत नाहीं कोण जाणें ?

**बिभीषण०**—परिचारका ! अनंतकाळ अबाधित सुरू असलेला सृष्टीक्रम कधींहि चुकायचा नाहीं. तो मनुष्यांनीं मदांध होऊन जर उल्लंघन केला तर परमेश्वर ती शिस्त हाणून पाडल्याशिवाय मात्र राहणार नाहीं, हें खूप ध्यानांत ठेवा. कारण—

**साकी.**

**सत्याधारें सृष्टि तरे त्या ईश रक्षणा करितो ।।**
**धर्मक्रान्ति होतांच पाप तें छेदाया अवतरतो ।।**
**वचनहि त्या प्रभुचें ।। वारी संकट या भूचें ।। १ ।।**

[ ' जय जय राम रघुवीर समर्थ ' शब्द ऐकूं येतो. ]

**२ परिचारक०**—रघुवीराच्या नामाचा हा जयघोष कुठून बरं ऐकूं येत आहे ?

**बिभीषण०**—काय ? राम रघुवीराचा जयघोष ? या राक्षसी लंकेंत रामाचा ध्यास करणारे प्राणी मुळींच नाहींत. तेव्हां हा नुसता आपल्याला भास झाला. कारण असं पहा—

**पद.** (यमन कल्याण—चौताल.)

**सतत मनन मन रामीं करितां । समर्थ जय रघुवीर शब्द हा**
**कर्णिं पडे, कां विस्मय करितां ।। धृ० ।। दशदिग्भागीं राम**
**दिसतसे । स्थिरचर व्यापी राम गमतसे ।। मन हें रामीं रंगुनि**
**जातां राम राम ध्वनि उमटे आतां ।। १ ।।**

—चला आपण आपल्या कार्याला जाऊं.

**परिचारक०**—जशी आज्ञा. असं चलावं बिभीषण महाराज.

[ जातात ]

---

अंक ‾ **प्रवेश १ ला.** ‾ पहिला.

लंका नगरींतील राजरस्ता.

[ मारुती प्रवेश करितो. ]

मारुती :—

**झंपा.**

**धडधड झंजावात सुटतां । कडड कडकड तरुहि उमलति ॥धृ० ॥**
**अंबरांतचि चपल चपला । चमकतां भयभीत होती ।**
**हिंस्त्र पशु वसतिस्थलातें । त्यजुनि गिरिगुहरांत लपती ॥ १ ॥**
**गगनिं दिसतां दिव्य दिनकर । दीवाभीतहि तसें तस्कर ।**
**कृष्णवदना झांकिती खल । दडुनि तिमिरीं तेचि बसति ॥ २ ॥**
**गर्जितां रघुवीर नामा काळ कल्पांतास धडकी ।**
**भरुनि ह्रदयीं पळत सुटती । तीं पिशाच्चें चपल गतिनें ॥ ३ ॥**

—अहाहा ! माझ्या रामाचं नांव तरि किति गोड !

**पद.** (भारती जडा०)

**माधुरी तया अतीहि । अमृतीं नसे ॥ कल्पवृक्षसे । सुराऽसुरां**
**न प्राप्त तेंचि इष्ट देतसे ॥धृ॥ प्रभुस्मरणिं गुंग मति सहज**
**भंगवी अघ पंथें । करि परीससम-कृति त्वरीत स्पर्शुनि प्रभू पदें ॥१॥**

—रविकुलभूषण श्रीमद्रामचंद्राच्या पवित्र नामाचा जयघोष करून, या लंकानगरीकडे मी रामसेवकानें जों उड्डाण केलें, तो माझ्या भू:भू:कारानं हा भूगोल डळमळूं लागला; गगनांत नक्षत्रें जागच्याजागीं वितळून मेघांची दांतखिळी बसतांच प्रत्यक्ष कृतांत काळाचाहि महाभयानें थरथराट झाला ; माझ्या चपल गतीच्या उड्डाणामुळं उत्पन्न झालेल्या वायूनं महासागराचें खवळलेलं पाणी आकाशास भिडविलं, त्यामुळे सप्तपाताळांत एकच हाहा:कार उडाला. शेष गर्भगळित होऊन कूर्म आपल्या कवचाखालीं दडून बसला. दिग्गज चळचळा कांपला. मंदार पर्वत देखिल डळमळला. शचिपती प्रत्यक्ष इंद्र, पण तोहि धाबरला. पार्वती भयभीत होऊन शंकराच्या गळ्यांत पडली आणि कंपायमान झालेल्या कमलेचं शांतवन करतांना विष्णूची त्रेधाच त्रेधा उडाली. अशा रितीनं मनोवेगावरहि ताण करून मी या लंका नगरीत प्राप्त झालो. परंतु—

**पद.** (जठरानल शम०)

**परमार्थी जन ज्ञान मिळवितां । विघ्न तयाला विरोध करितें ॥ धृ० ॥**
**सुजनकृतीला रिपु निपजावा ॥ अमृतनिधि जहरें व्यापावा ॥**
**साधूं जातां निधान अथवा । विवशि निश्चयें घाता करिते ॥ १ ॥**

—या नियमानुसार रंभा राक्षसी आपले अक्राळविक्राळ तोंड पसरून माझ्या मार्गांत येतांच माझी उडी त्यांतच पडली. पण रामनामानं अमर झालेल्या, सनातन धर्माभिमानानं स्फुरण पावलेल्या आणि आमच्या राजलक्ष्मीच्या शोधार्थ आपलें सर्वस्व अर्पण करणाऱ्या या वज्रदेही मारुतीनं रामस्मरणाच्या बलावर त्या विवशीच्या कानांतून पार निसटून जाऊन आपली मुक्तता केली. उड्डाणास पुन्हा सुरवात होतांच मैनाक पर्वत, सिंहिका, यांचा यथास्थित समाचार घेऊन लंकादेवीस मुष्टीप्रहाराचा प्रसाद तर दिलाच. पुढें भेटलेल्या क्रौंचा नामक रावणाच्या भगिनीचा व इतर राक्षसिणींचा फन्ना उडवून नुकताच या ठिकाणीं आलो. अरे पण ! हें रत्नखचित सुंदर मंदीर कोणाच बरं ? अहाहा—

**पद.** (किती कपटि०)

**शचिपतिसम वैभव ज्याचें ॥ रमणिय स्थलिं या भोगित सौख्या**
**धन्य दैव पुरुषाचें ॥धृ०॥ उंच ध्वजा या डुलति प्रदर्शनिं वैभव**
**दाविति ज्याचें ॥१॥ स्फटिक-शिळांवर सुवर्ण-चित्रें सार्थक हो**
**नयनांचें ॥२॥ भाग्यशालि हा कोण भोगितो भोगहि सुरलोकींचे ॥३॥**

—पण नाहीं. छेः ! या लुटारू लंकेंतल्या कोणत्याही प्राण्यास ' भाग्यशाली ' ही उपमा बिलकूल शोभत नाहीं. ज्या या लंकाद्वीपस्थ राक्षसांचा बाणा केवळ अधर्माच्या व अनीतीच्या तत्त्वांवर वैभव मिळवून त्यावर चैन करण्याचाच आहे, त्यानां ' भाग्यशाली, ईश्वरावतार, परोपकारी, प्रामाणिक, ' इत्यादि विशेषणें लावणारा निदान हा रामभक्त मारुती तरी खास नाहीं. हें ऐश्वर्य चोरटें असो, नाहींतर निढळाच्या घामाचें असो, या महालांत नीट बारकाईनें तपास केला पाहिजे. त्याशिवाय सीतामातेचा शोध लागणार कसा ?

**[ इंद्रजीत सुलोचना यांचा महाल. ]**

—हें तर मूर्तिमंत पापाचरण मी पहात आहे. आर्यावर्तवासी श्रीरामाची सीता ती हीच काय ? असं असेल तर या मुष्टीचा प्रहार—पण नको. हीं दोघें काय भाषण करतात तें प्रथम ऐकलं पाहिजे.

**इंद्रजीत०**—(सुलोचनेस) खरोखर तुला निर्माण करते वेळीं चंद्र प्रसन्न झाला असावा, किंवा वसंत झाला असावा. अथवा एका श्रृंगारांतच जो नेहमीं रमतो असा साक्षात् मदनच कारागीर होऊन त्यानं तुला घडवली असावीं खास.

**मारुती०**——(स्व.) ज्या नीच मुखानं आमच्या सीता मातेबद्दल असले नीच शब्द उच्चारले त्याची जिव्हा हांसडून तिचे शतशः तुकडेच केले पाहिजेत.

**इंद्रजीत०**——प्रिये, शेषकन्ये ! मी काय म्हणतो इकडं तुझं लक्ष आहे ना ? कारण असं पहा——

**पद.** (या तव बधुनि०)

**जो नित वेदपठणिं रमला । मतिला जाड्यचि ये त्या जरठाच्या ॥ जुनाट ऋषि विधि नच शकला ॥ धृ० ॥ सस्मित वदना सिंहकटीला सडपातळ तनुवल्लीला । रतिहुनि सुंदर युवतीला या । स्वप्निं न रंगवितां शकला ॥ १ ॥**

**सुलोचना०**——एखाद्याचं वर्णन करायला इतकी कांहीं कविकल्पना लढवायला नको. मला उत्पन्न करणारा वसंत असो नाहींतर मदन असो, मला दासीला हे पुण्यचरण सेवा करण्याला प्राप्त झाले आहेत, यांतच मी आपल्या नशिबाला फार भाग्यवान समजतें.

**मारुती०**——(स्व०) त्या राम–मणिकापेक्षां हा गारगोटीचा दगड तुला आवडला काय ? आणि त्यांत तुझें पूर्ण भाग्य समजतेस ? ठीक आहे.

**इंद्रजीत०**——इंद्रादि तेहतीस कोटी देवांवर हुकमत चालविणारा चौदा चौकड्यांचा अधिपती जो त्रैलोक्याधीश रावण त्याचा मी राजपुत्र——तेव्हां तुझ्या बलवत्तर दैवाची तूं जी प्रशंसा केलीस ती योग्य आहे.

**सुलोचना०**——आतां स्वारी आनंदांत आहे म्हणून एक गोष्ट विचारतें——विचारूं का ती गोष्ट ?

**इंद्रजीत०**——खुशाल विचार.

**सुलोचना०**——आपलं म्हणतात ना, बोलण्यावरून बोलणं सुचतं. आपले वडील लंकानाथ फार अनुचित मार्गानं वर्तन करतात.

**इंद्रजीत०**——काय ? अनुचित ?

**सुलोचना०**——होय. अगदी अनुचित. हें काय बाई बरं नाहीं. कोणत्याहि प्रकारचा संबंध नसतां किंवा शत्रुत्वालाहि कांहीं कारण नसतां ती जनक राजाची मुलगी चोरून आणून व्यर्थ व्यर्थ कुलक्षयास कारण घडवलं.

**इंद्रजीत०**——यांत कुलक्षय होण्याचं कारण काय ? पराक्रमी वीरांची पराक्रमी लीला चालली असतां किंवा ते पराक्रमी वीर स्वतःच्या मनाचा कांटा संतोषाच्या आणि चैनीच्या बिंदूवर समतोल ठेवीत असतां त्यांच्या हातून प्रत्यक्ष ब्रह्महत्त्या जरि घडली तरि त्या पापाची जबाबदारी आम्हांवर मुळींच नाहीं.

**सुलोचना०**—हो. असं म्हणून चालेल तरि कसं ? महाराज—

**पद.** (तरुणीस हीं०)

**अनुचीत ही कृति करीतां जनीं ॥ धृ० ॥**
**अन्य स्त्रीस वांछिती । गुरुद्रोह दाविती ॥**
**विप्र छळित नित । नरकीं जाती । प्राणी ॥ १ ॥**
**शील भ्रष्ट होतसे । कुमति योग्य ही नसे ॥**
**मूर्तिमंत खल । अल्पायुषि ते । प्राणी ॥ २ ॥**

**इंद्रजीत०**—अल्पायुषि झाला म्हणून त्यांत काय वाईट ? त्याला जितकं आयुष्य लाभेल तितक्यांतच त्यानं आपली वैभवी सत्ता गाजवून घ्यावं.

**सुलोचना०**—महाराज—

**पद.** (दाखवि तव दिव्य.)

**अवलोकन शील करा पात्र न ही कुमती ॥**
**काढित पाखांड मतां त्या न मिळे सुगती ॥ धृ० ॥**
**हरिहर-स्तुति-उच्छेदा । गर्वबळें करि निंदा ।**
**परमेश्वर त्यास सदा । नरकीं ने अंतीं ॥ १ ॥**

—महाराज, सत्याच्या रक्षणार्थ, न्यायी प्रजापालनार्थ आणि धर्माच्या उन्नतीसाठीं त्रैलोक्यपति राजांची सिंहासनं स्थापलेली असतात.

**इंद्रजीत०**—स्थापलेलीं असतील कदाचित्, परंतु राजे लोकांनीं आपलं वर्तन कसं ठेवावं याचा निर्णय करण्याची शक्ती व इच्छा हीं नेहमीं आम्हां सत्ताधाऱ्यांवरच अवलंबून असतात.

**सुलोचना०**—अनीतिचं व पापाचं बीज एकदां कां एखाद्या भूमींत रुजलं कीं त्याचे वेल इतक्या त्वरेनं तेथील रहिवाशांच्या मानसिक मर्यादेंत जाऊन भिडतात कीं त्या भूमींत वास करणारे सर्व प्राणी अनीतीचे व पापाचे मूर्तिमंत पुतळे बनतात.

**इंद्रजीत०**—सुलोचने ! पवित्र पतिप्रेमानं आणि अर्धांगी पत्नीच्या सुखवर्धनार्थ निष्कपट अंतःकरणानं आम्ही पुरुषांनीं बायकांना हृदयाशीं कंवटाळून धरून त्यानां आनंदानं या हातावरून त्या हातावर गुलाबाच्या फुलाप्रमाणं झेललं कीं स्त्रियाना आपल्या योग्यतेच्या पात्रापात्रतेबद्दल तिळभरही भान न रहतां, केवळ विश्रांतीचं स्थान, सौख्याचं प्रतिबिंब पहाण्याचा आरसा आणि सर्व श्रमांचं परिमार्जन करणारा कल्पवृक्ष जो हा रंगमहाल, त्या ठिकाणीं शुष्क राजनीतीचा उपदेश करण्याचं धाडस करून प्रतिप्रेमाच्या निर्झर प्रवाहास कायमचा अडथळा आणतात.

**सुलोचना०**—इकडच्या प्रेमाला मी जर योग्य नव्हतें आणि सत्यभाषण करण्याइतकी माझी पात्रता जर इकडे मान्य नव्हती तर अर्धांगीचा मान देण्यांत प्राणनाथांची चूकच झाली म्हणायची. ती चूक सुधारली जाईपर्यंत मी अश्शी या पायांपासून दूर रहाणार.

[ रागानें निघून जाते. तोहि जातो. ]

**मारुती०**—एकूण ही रामपत्नी सीता नव्हे ! या जोडप्याचा हा प्रणयी संवाद ऐकण्याचा या ब्रह्मचारी वायूनंदनाचा हा पहिलाच प्रसंग. परंतु विशेष समाधानाची गोष्ट ही कीं रावणानं आर्यावर्तांत भिक्षांदेहीच्या ढोंगानं केलेलं चौर्यकर्म येथल्या रहिवाशांना विशेष डांचू लागलंय खास. असो, सीता-शुद्धीचं विस्मरण होतां कामां नये. बरं पण, हा मधुर ध्वनी न् तोहि श्रीरामनामाचा कुठून बरं येत आहे ?

[ " राम राम राम सीताराम राम राम " भजन ऐकूं येतें. ]

—अहाहा !

**' नाहीं रजतमाची वार्ता । न दिसे द्वेष हिंसा तत्त्वता ॥**
**पुराण श्रवण हरिकथा । याविण चर्चा नसेचि ' ॥**

किती प्रेमळ हें भजन ! किती गोड हें रामनाम ! [ भजन गातो. ] ज्या भूमीच्या तुकड्यावर रामनामाचा जयघोष करून भक्त नाचतो, तेथील त्याचें चरणरज कपाळीं लावावें. [ तसें करतो. ] चरणरजाचा प्रताप तरि किती अद्भूत !

**पद.** (प्रणयतरंगासवें०)

**राम कल्पतरु गमे । स्मरणिं भक्तमन रमे ॥**
**नच भ्रमे कधिं श्रमे नाम-सुरस-प्राशनें ॥ धृ० ॥**
**राम-परिस स्पर्शतां ।**
**चरण-सुरस प्राशितां ॥**
**अमर शांति लाभतां ।**
**स्पर्श करि न अघ भ्रमें ॥ १ ॥**

काय चमत्कार पहा ! हा पडला राक्षसाचा वंशज, पण भक्तराज व किती तरी सात्विक ! माझा धनी रघुनंदन जेव्हां या लंकेंत येऊन ह्या अनाचारी रावणाचे सहपरिवार कंदन करील, त्या वेळीं—

**साकी.**

**कामक्रोध मदमत्सर यानां संत पिटाळुनि देती ॥**
**साधाया निजबोध ज्यापरी त्यापरि बिभिषण—हातीं ॥**
**लंका-राज्याला । देइन विनवुनि मत्प्रभुला ॥ १ ॥**

—असो. सीता-शुद्धी, सीता-शुद्धी. बस्, दुसरी गोष्ट नको. ऊः ऊः ! अरेच्च्या, कसली ही धाण आली ? आणि मेघींच्या गडगडाटाप्रमाणं घुर्रघुर्र घोरत हा कोण पडला आहे ? अरे बापरे ! हें तर जाडीच प्रकरण ! यांच्या श्वासाबरोबर हत्ती, घोडे, म्हशी न् गाढवं पार आंत जात आहेत व उच्छ्वासाबरोबर ते सर्व धडाधड बाहेर येऊन कोंसळत आहेत.

[ " स्वस्ति श्री कुंभकर्ण महाराज " शब्द होतो. ]

—वाहवारे कुंभकर्ण ! जाऊं द्या. आपलं काम बरं कीं आपण बरे. या लंका नगरींतील घरोघरची चर्या पाहिली तर वरवर मात्र आचारविचाराचा टाकम् टिकला दिसतो; परंतु अंतःस्थिती फारच अधर्माची. घरोघरीं पूर्ण अग्निहोत्रें आहेत पण या राक्षसांच्या दृष्टीस गोब्राह्मण पडले कीं दुष्टांनीं रगडलेच आपल्या दाढेखालीं. तसंच—

**पद.** (मज गमे ऐसा०)

**युवति त्या युव ते घातकी । दुराचारी ॥ धृ० ॥**
**थोर दिसति ते कुटिल वर्तनी ॥**
**वधुनि गोधन भक्षिति विपिनीं ॥**
**वानप्रस्थ ते स्वेच्छाचरणी ॥**
**इंद्रियदमना होत पारखी ॥ १ ॥**

—अशा पापी प्रदेशांत ती जनककन्या मी अजाणत्यानं कशी बरं शोधून काढावी ? सीतेनं योगगतीनं प्राण तर दिला नसेल ? ती समुद्रांत तर बुडाली नसेल ? कदाचित् अंतरिक्षांतून खालीं पडून तिचा देह भस्मीभूत तर झाला नसेल ? छेः रावणानें पळवून आणते वेळीं तिच्या शरिराला वेदना लागून तिनं प्राण सोडला खास. नाहीं तर रावणाच्या इतर स्त्रियांनीं सवतिमत्सरानं पाश घालून ठार मारली असेल ! हर हर ! माते जानकी, काय तुझी ही दुःस्थिती ! हें माझें उड्डाण फुकटच होणार काय ? राम राम राम ! पण मी शोक कां करावा ? विघ्नाची काय बिशाद आहे कीं रामकार्यांत तें आडवें येईल. लाथ मारून शतचूर्ण करीन.

**पद.** (मरण गणुनि०)

**स्मरण करुनि रघुपतिचें विघ्न तुडवितों पदीं ॥**
**अग्नि प्रखर पेटतसे । प्रबळ निधी शमवितसे ।**
**त्यापरि मम रामनाम तारिल मज संकटीं ॥ धृ० ॥**
**रूप सूक्ष्म गुप्त धरुनि । लंका उध्वस्थ करुनी ।**
**रावणवध-संधि सुलभ करिन स्फूर्ति ही हृदीं ॥ १ ॥**

[ जातो. ]

---

## अंक प्रवेश २ रा. पहिला.

लंकेचा राजरस्ता.

विप्रभक्षक राक्षस धाब-या धाब-या धांवत येतो.

**विप्र०**—पळा पळा पळा. बस्. दुसरी गोष्ट नाहीं. आपले जीव वांचवा पळा. काय म्हणतां ? अँः ! पळतांना मस्तकांत शिळा येऊन पडताहेत ? मोठाच चमत्कार ! काय झालं असेल ते होवो, कालपासून या लंकेंत प्रळयांचा अगदीं सुळसुळाट उडाला आहे. देवळांचीं मोठमोठीं शिखरं, राजवाड्याचे मजले, ध्वजा आणि पताकांचे स्तंभ धडाधड कोंसळून खालीं पडत आहेत. राक्षसिणींचीं पोरं धरून आकाशांत गरगरा फेंकलीं जात आहेत; आणि तीं खालीं पडून त्यांचा चक्काचूर होतानां राक्षसिणींचा आकांत काय विचारायचा ? स्त्रीपुरुषांनीं एकत्र शयन केलेले पलंग राजरोस कोणी रस्त्यावर आणून ठेवीत आहे. भांडारगृहें फुटलीं जाऊन त्यांतील चीज वस्तूंची एकसारखी नासधूस होत आहे. होत आहे, पण ती कोण करीत आहे, कांहीं कळत नाहीं. तो-तो माझा मित्र सर्वभक्षी राक्षस इकडंच येत आहे. पाहूं त्याला कांहीं कळलं असल्यास. कां ? मित्रा सर्वभक्षे, क्षेम आहे ना ?

**सर्वभक्षी०**—[ रडत प्र. क. ] असेल बाबा असलें तर. इकडे पाठीवर फटकारे खाऊन जीव जाईल तर बरं असं झालंय नि तुमचं आपलं चाललंय " क्षेम आहे ना ? "

**विप्रभक्षक०**—चुकलों बाबा. ही घ्या थोबाडींत मारून घेतली. पण हा प्रळय करतो तरि कोण ? कांहीं कळलं कां ?

**सर्वभक्षी०**—अहो विप्रभक्षक, मी नुसतांच राजद्वाराजवळ पहा-याला होतों. तेथें राजवाड्यावरून एक भलं मोठं माकड आलं नि टिवल्याबावल्या करीत द्वारावर उंच ठिकाणीं बसलं. इतक्यांत ब-याच स्त्रियांचा घोळका डोक्यांवर पाण्याच्या घागरी भरून घेऊन येत होता. त्या माकडानं आपल्या शेंपटीच्या फटका-यांनीं त्यांचे सर्व कुंभ फोडले आणि त्या स्त्रियांच्या नांकाकानांतूनही तो आपलें शेंपूट वळवळऊं लागला. त्यासरसें त्या सर्व स्त्रिया फटाफट् शिंकावर शिंका देत आपला जीव घेऊन पळाल्या. याचा कांहीं बंदोबस्त करावा म्हणून आमची स्वारी जरा पुढें सरसावली तों फटका-यांचा आमच्या पाठीवर एकसारखा वर्षाव होऊन त्याचं हे पहा—पहा तर खरं कसं अगदीं धिरडं झालं तें ?

**विप्रभक्षक०**——खरंच हो खरंच. अगदीं धिरडंच धिरडं झालं कीं हो ! काय करावं बुवा या प्रळयाला. सर्वभक्षे ! या प्रळयांनीं तुमच्या आमच्या सारख्या हलक्यासलक्या राक्षसांवरच कां बुवा हत्यार धरलं आहे ? कांहीं कळत नाहीं.

**सर्वभक्षी०**——आणि मोठ्या प्रस्थांना काय प्रसाद मिळाल्याशिवाय राहिला आहे वाटतं ? नुकतेच आपले प्रहस्थ प्रधानजी पालखींत बसून राजदरबारांत चालले होते. इतक्यांत त्या टवाळखोर व बंडखोर माकडानं शेंपटीचं टोंक भोयांच्या कानांत खुपसलं. भोई जे म्हणतां दचकले, त्यानीं पालखी दिली धाडकन् जमिनीवर टाकून. प्रधानजी जे म्हणतां आपटले ते काय विचारूंच नका. रागारागाने उठले नि लागले त्या भोयांना धोपटायला. भोई पण कसले बेटे खमंग. ते लागलेच म्हणाले ' रावण महाराजांनी जानकी आणली पळवून, तिनं हें भूत उत्पन्न केलं, त्या भूतांनीं केली थट्टा मग उगीच आम्हाला कां देतां रट्टा ?

**विप्रभक्षक०**——पण कायहो, आतां याला उपाय काय ? हीं तर सर्व अपशकुनांची माळका लागली आहे. नगरद्वारीं लक्षानुलक्ष घागरी फुटणं; गोपुरं, कळस, राजवाडे कांहीं कारण नसतां कोसळणं; मंदिर जागच्याजागी जमीनदोस्त होणं, हीं चिन्हं कांहीं ब-यांतलीं नव्हंत.

**सर्वभक्षी०**——आणि नापित रावणाची श्मश्रू करीत असतां त्याची एक मिशी त्याच्या हातून उतरली जाणं हा काय शुभ शकून वाटतं ?

**विप्रभक्षक०**——छेः हो अपशकुनच हा. पण याला आतां उपाय ?

**सर्वभक्षी०**——आतां याला एकच उपाय; आन् तोहि——अयोध्यावासी रामाची बायको ती जानकी त्याला ताबडतोब परत नेऊन द्यावी हाच.

**विप्रभक्षक०**——पण असल्या प्रकारचा उपदेश करणाऱ्या दूताची काय त्रेधा रावणानीं केली ? त्याचे नाक कान कापून गाढवावर धिंड काढली. असो काय होईल तें होवो. चला. आज अस्मादिकाच्या घरीं मेजवानी आहे. अनमान न करतां तुम्हीं पण हं :! या झालं. मी तर केवळ विप्रमांस भक्षण करणारा–पण तुम्ही तर सर्वभक्षी आहांत.

**सर्वभक्षी०**——मात्र लवकर सुटका करा. कारण रावण महाराजांची स्वारी आज मंदोदरी बाईसाहेबांच्या महालांत येणार असून तिथें आज आमचा पहारा आहे. चला. अयाई ! पाठीला कळा लागल्या हो.

**विप्रभक्षक०**——विप्रमांस भक्षण करा कीं ताबडतोब गूण येईल. अरे बापरे, आपले प्रहस्थ प्रधानजी, तो क्रूरवदन आणि तो अधोमुख इकडंच येत आहेत. चला आपण दुसऱ्या वाटेनं जाऊं.

[ जातात. ]

[ प्रहस्थ प्रधान, क्रूरवदन, अधोमूख प्र.क. ]

**प्रधान०**——ते व्हायचं नाहीं. याचा शोध लागलाच पाहिजे. अशा महत्त्वाच्या गोष्टींत जर आम्ही लक्ष पुरविलं नाहीं, तर राज्यकारभाराचा गाडा सुरळीत चालायचा नाहीं. तुम्ही त्या माकडाचा नीट तपास केलाच पाहिजे.

**क्रूरवदन०**——महाराज, याची सर्व माहिती या अधोमुखाला असलीच पाहिजे. कारण हा आर्यावर्ताला राहणारा आणि तो माकडहि म्हणे त्याच प्रदेशांतला.

**प्रधान०**——कायरे अधोमुखा, अशी खालीं मान घालून काय उभा राहिलास ?

**अधोमुख०**——(स्व.) मी अधोमुख आहे म्हणून.

**प्रधान०**——तुलाच त्या बंडखोराचा नीट तपास लावला पाहिजे. तुमच्यावर सोंपविलेली दूतवृत्ती अशीच बजावीत असतां वाटतं ? दुसऱ्या एका विश्वसनीय दूतानं आम्हाला अशी बातमी दिली आहे कीं काल एका अग्निहोत्री ब्राह्मणाकडे अग्नीपूजन प्रसंगीं तो हजर होता; इतकंच नव्हे तर आमच्या सम्राटाच्या वृद्धिंगत साम्राज्यशक्तींच्या विरूद्ध कांहीं शब्द उच्चारल्याचें आम्हांला माहीत झालं आहे. तर तूं–अधोमुखा ! या क्रुरवदनाच्या सहाय्यानं त्या माकडाचा तपास करून त्याला आमच्यासमोर हजर करा.

**अधोमुख०**——तो माकड उत्सवाला जरि आला असेल——

**प्रधान०**——असेल म्हणजे ? तो आलाच होता.

**अधोमुख०**——बरं आला होता. परंतु त्याला उत्सवाचें आमंत्रण नव्हतं. सर्व लंका नगरींत प्रळय करतांना तो सर्वत्र संचार करीत होताच. त्यांत तो घटकाभर तिथं कोणाला दृष्टीस पडला असेल.

**क्रूरवदन०**——कां ? त्याची फारशी तरफदारी चालविली आहे ? प्रदेशाच्या वळणावर जातां वाटतं ? महाराज, हें साफ खोटं आहे. त्या टवाळखोर माकडाचा पत्ता या अधोमुखाला लागला नाहीं, तर त्या अग्निहोत्री ब्राह्मणाला सुळीं चढवावा; नाहींतर हिंसक क्रूर पशूकडून त्याचें शरीर फाडवावें. हा अधोमुख आपल्या प्रांताच्या लोकांची तरफदारी करतो.

**प्रधान०**——खरं कां रे अधोमुखा ? याद राखून ठेव. दूताची पत्करलेली वृत्ती जर नीट बजावली नाहींस तर त्या अग्निहोत्री ब्राह्मणाच्या ऐवजीं आम्ही तुलाच फांशी देऊं.

[ जातो. ]

**अधोमुख०**—(स्व.) धिःकार असो या अधोमुखाच्या जीविताला ! पोट जळत नव्हतं म्हणून ही दूतगिरी पत्करली. या आत्मघातकी सुरीनं कोणकोणाचे गळे कापण्याचा प्रसंग मजवर येतो कोण जाणे ? वेदांचा, विप्रांचा, आणि गायित्रीचा अमानुष छळ पहातांच, इतक्या दिवस या दूतवृत्तीवर टिकण्याइतका कृतघ्न व निष्ठूर अंतःकरणाचा मी बनलों कसा, याचंच मला फार आश्चर्य वाटतं. (उघड) क्रूरवदना, प्रधानजीजवळ माझी नालस्ती करून तुलारे काय मिळालं ?

**क्रूरवदन०**—काय मिळालं ? वाः ! किती तरि मिळालं ? माझ्या वृत्तीच्या वरच्या दर्जाच्या वृत्तिमर्यादेंत एक पाऊल पुढं पडलं. हें काय कमी झालं वाटतं ? अरे बाबा, वरचे दर्जे मिळविण्यासाठीं वरिष्ठ सत्ताधाऱ्यांची हांजी हांजी करणं किंवा तुझ्या सारख्यांची निंदा करून त्यांचीं मनं कलुषित करणं यापेक्षां तिसरा मार्गच नाहीं.

**अधोमुख०**—तुला माझा दर्जा पटकावण्याची इच्छा आहे कां ?

**क्रूरवदन०**—तो दर्जा मी तुझ्यापासून दान नाहीं घेणार. तो मी आपल्या मनगटाच्या जोरावर घेणार.

**अधोमुख०**—मलाहि या दूतगिरीचा आतां कंटाळा आला बुवा.

**क्रूरवदन०**—कांरे बुवा ? आर्यावर्ताच्या अरण्यांत कंद मुळं खात, रानटी व अज्ञानी स्थितींत पडून होतास, त्या तुला या लंकाद्वीपांत उच्च स्थिती प्राप्त झाली—

**अधोमुख०**—पण ती स्थिती फार उंच वाढून तिच्यावरून खालीं कडेलोट करून घेण्यापेक्षा, आहे एवढ्याच उच्चतेवरून खुशीनं खालीं उतरावं हें बरं. त्यांतून प्रधानजीचं मन तूं आतांच कलुषित केलंस. तेव्हां दूतगिरीचं हें वैभव आतां बस्स झालं. पोटांत कांटे भरण्याची वेळ आली तरि पत्करली पण दूतगिरीच्या कठोर व आत्मघातकी सुरीनं एकमेकाचे गळे कापण्याचा प्रसंग नको.

[ जातो ]

**क्रूरवदन०**—ह्यः ह्यः ह्यः ! वृत्ति सुटली कीं हा उपाशी मरणार. उपास सुरू झाले कीं भीक मागणार. भीक मागायला अस्मादिकांच्या वाड्यावर येणार आणि आम्ही त्या वेळीं या हुरळ्याला आमच्या वृत्तीवर कमावलेल्या अगणित संपत्तीचा खजिना दाखवून वृत्तिवैभवाच्या दृष्टांतानें पुराच खजील करणार.

[ जातो. ]

अंक **प्रवेश ३ रा.** पहिला.

मारुती प्रवेश करतो.

मारुती० :—

**झंपा.**

**घोर प्रळयिं उध्वस्त लंका ।। धाडिले अमित खल**
**काळलोका ।। धृ० ।।**
**गुप्तरूपें कधीं प्रगट कधि होउनी ।। मर्दिलें राक्षसां मुष्टिघातें ।।**
**हाणितां लाथ हृदिं कुजनमुख छेदितां ।। हर्ष अति जाहला मज न**
**शंका ।। १ ।।**

—भावी युद्धप्रसंगी शिल्लक राहिलेल्या राक्षसांना असंच ठोंकून जमीनदोस्त करण्याची परवानगी श्रीरामानीं मला एकट्यालाच जर दिली तर अत्यानंद ब्रह्मानंद म्हणतात त्यापेक्षां वरीष्ठ प्रतीचा आनंद या मारुतीला होईल. आपल्या शत्रूचा कंठ चरचरा चिरून त्याच्या रुधिराचं आकंठ प्राशन करण्यात जीवित साफल्याची खरी मौज आहे. लंकाद्वीपस्थ राक्षसांनो, तुमच्याहि कंठाची तीच स्थिती असल्याचे भावी काळ मला स्पष्ट सांगत आहे. असो, जनकी मातेचा कुठं शोध लागेल या आशेनं मी घरोघरचं गुप्त भाषणहि ऐकतो, पण निश्चित स्थळासंबंधी कोणीच काही बोलत नाही. कामशांतीसाठी राखून ठेवलेल्या रावणाच्या ऐंशी हजार स्त्रियांची शयनमंदिरे मी तपाशीत तर आलोच. परंतु हा महाल मात्र पहाण्याचा राहिला आहे. ही कोण बरं स्त्री असावी ? या स्त्रियेच्या कांतीवरूनरून जनकन्या ती हीच असावी, असा माझा तर्क आहे. संशयच नको—

**साकी**

**शय्येवरती निद्रीत सीता परमपुरुष-चिच्छक्ती ।।**
**राजलक्ष्मी हीच जानकी शोधिलि म्यां मद्भक्ती- ।।**
**सफलहि रामपदीं ।। जनना मोक्षचि मी साधीं ।।**

—या पहा, काही स्त्रिया सीतेची करमणूक करण्याकरिता नृत्य गायन करीत आहेत. या ठिकाणी-विशेषतः रावणाच्या बंदीत-सीतेला इतक्या ऐश्वर्यात कस ठेवलं आहे कोण जाणे ? या गौप्याचा नीट तपास केला पाहिजे.

(देखावा :—मंडोदरीचा महाल. मंडोदरी बसली आहे. दासींचा नाच सुरू आहे.)

नृत्याचें पद.

नाचूं गाऊं चला या ।। विहारि शशी अंबरांत
नाचे । प्रणयानें मन मोही ।।धृ।।
घेउनिया संगतीस तारागणाला ।। फेंकितसे
रंगा विहारी ।। हे धवल किरण पाडी त्रिलोकिं
छान ।। स्वकरिं रतिपतिसम धनु-किरण।
प्रणयिजनां । देत मना । मोदास भारी ।।१।।

**मंडोदरी**—क्रुद्धभाषणी, पुरे करा तुमचं हे नृत्य गायन.

**क्रुद्ध**—आज सकाळपासनं राणी सरकारच्या जिवाला चैन नाहीसं दिसतं.

**मंडोदरी**—सकाळपासनं काय झालं असेल ते होवो, जिवाला एकसारखी हुरहुर लागून राहिली आहे.

**मत्सरनयनी**—मला वाटतं राणीसाहेब या पुढच्या स्फटिकगच्चीवर येतील तर ही चांदण्याची शोभा पाहून त्यांच्या मनाला जरा बरं वाटेल.

**मंडोदरी**—बरं तसंच का होईना ?

**कुद्ध**—बाईसाहेब, किती तरी शुभ्र चांदणं पडलयं हे ?

**मत्सरनयनी**—राणीसाहेब, हे पाहिलंत कां आणखी ?

पद. (दिल्दार यार)

गगनांत निशाकांत दिसे रम्याकृती ।।धृ।।
इंदु सुमन वाटे । तारातति दाटे ।
मधुर मधूसेवनिं हो लोलुप मधुपाकृति ।।१।।
नवरदेव किंवा । मिरवीतचि न्यावा ।
तारकागणीं रजनिनाथ शोभतो किति ।।२।।
नटलि रजनि-कांता । ग्रह-पुष्पहार हातां ।
घेऊनि ये मंद मंद लज्जायुत संप्रति ।।३।।

**मंडोदरी**—छे: बाई, यांत काही मला गोडी वाटत नाही. मी जरा निजतेच. माझ्या अंगावर हा शेला घाल न् स्वारीचं येणं झालं की मला जागी कर. (निजते)

**क्रुद्ध**—(मत्सरनयनीस उद्देशून) भलत्याच ठिकाणी आपली छाप बसवायला गेलं की अशीच खोड मोडली पाहिजे. ' राणी साहेब, राणी साहेब ' करून वशिले लागले मग काय ? पण जित्याची खोड मेल्याशिवाय जाते कशी ?

**मत्सर**——क्रुद्धभाषणी, तुझ्या टोमण्याचा भावार्थ न कळण्याइतकी मी काही दुधखुळी नाही बरं. रावण महाराजांची आवडती दासी असलीस म्हणून आमच्यावर काही इतकी सत्ता मिरवायला नको. समजलीस ?

**क्रुद्ध**——मत्सरनगनी नावांप्रमाणंच तुझी कृती असायची. मी नेहमी रावण महाराजांच्या खास महालांत सेवेला असते म्हणून माझ्यावर मत्सराचा इतका काही पाऊस पाडायला नको. समजलीस ?

**मत्सर**——बोलूनचालून तूं पडलीस क्रुद्धभाषणी तेव्हा तुझ्याकडून गोड भाषणांची अपेक्षा करणं म्हणजे मूर्खपणाच आहे. कारण——

**पद.** (तूं श्रीमंतिण)
**पाहिल वंध्या स्त्री सुतवदना ।**
**दिसेल शुष्कचि सागर अथवा पर्वतचलना ।।**
**भूवरिं येइल रवि दिननृपती ।।**
**अग्नी त्यागिल दाहकता जल स्वभावस्थिति ती ।।**
**चुकेल दिनकर नियमित उदया ।**
**परि भाषण तव क्रुद्ध सदोदित चुके न समया ।।१।।**

**क्रुद्ध**——कविकल्पनांचं नुसतं पेंव फुटलंय.

**मत्सर**——पण कवींची योग्यताहि तशीच असते.

**क्रुद्ध**——काय पण मेली योग्यता ? चोर आणि कवी अगदी एका माळेचे मणी.

**मत्सर**——ते कस ? हा नवीन शोध दिसतो.

**क्रुद्ध**——नवीन नाही बरं ! जुनाच आहे. ऐक——

**पद.** (मजा देता है)
**कुणि उच्च नीचही नाहीं । कवि तस्कर सम हे पाही ।।धृ।।**
**एकांत पसंतचि त्यांना ।।**
**सावधशी मृदु पदरचना ।।**
**कौशल्य अलंकारांनां ।।**
**वांछिती करि कृति समहि ।।१।।**

(" राजाधिराज रावण महाराज " शब्द ऐकू येतो.)

**क्रुद्ध**——बस झालं आपलं पांडित्य.

**मत्सर**——तुझं का माझं ?

**मारुती**——(स्व) सीता रावणाला वश झाली की काय ? हा नीच रावणहि इकडंच येत आहे.

**रावण**——(प्र. क.) राज्यकारभाराचं काम कितितरी बिकट आहे !

पद. (केदार-दीपचंदी) किंवा (मालकंस)
शिरीं किरिट ज्याच्या तया सौख्य नाहीं ॥
वधाया अरी मन सदा दंग राही ॥धृ॥
प्रजाद्वैत कोठें वसे त्या हराया ॥
रक्षावया विभव मति सज्ज राही ॥१॥
प्रभूच्या कृपें पात्र सिंहासना मी ॥
चिरास्तित्व कैसें तया ? काळजी ही ॥२॥

—असो. आता प्रियेच्या महालांकडं जावं झालं. अहाहा ! या नुसत्या महालाचें दर्शनच मला किती आनंद देत आहे. (महालात जाऊन) काय ? ही आज अशी म्लान का दिसते ?

**कुब्ध**—बाईसाहेबांची प्रकृति आज सकाळपासनं अगदी उदास झाली आहे.

**रावण**—याचं कारण काय बरं ?

**मंडोदरी**—(झोपेत) अयाई ! घात झाला !

**रावण**—(जवळ जाऊन) अरे ! ही आज अशी का करते ? मंडोदरी ?

**मारुती**—एकीकडे) एकूण ही रामपत्नी सीता नव्हे.

**मंडोदरी**—(ओरडत जागी होते) धावा हो धावा. अयाई घात झाला !

**रावण**—(तिला सावरीत) प्रिये मंडोदरी, काय झालं ? अशी घाबरलीस का ? निद्रेतून एकदम जागृत होऊन अशी शोक का करू लागलीस ? क्षणभर माझ्याकडं पहा. पंचमहाभूतादि सर्व तत्वें ज्याच्या सेवेला हजर आहेत असा लंकापति रावण-तुझा पती-प्रियकरणी तुझ्याजवळ असता थरथरा कापतेस का ? बोलत का नाहीस ? तुला कोणी स्वप्नात त्रास का दिला ? सांग पाहू ? असं गुप्त कारण तरी काय घडलं ? मंडोदरी, प्राणविसावे ! बोल बोल काय झालं ते ?

**मंडोदरी**—महाराज, काय सांगू न् सांगू तरी कसं ? प्राणनाथ, माझी सौभाग्यदर्शक शळसरी-अगबाई पण ही तर माझ्या शळ्यात आहे-हो पण, ती जळून गेलेली मी स्वप्नात पाहिली. एक मोठा बलवान वानरयोद्धा या लंकेत येऊन त्याने आपल्या लाडक्या अखयाला ठार मारून इंद्रजिताचा समरांगणांत नाही नाही तो छळ केला. जनकराजाचा जामात शुभ मुहूर्तानं समुद्रावर शिलापंथ करून अद्भुतदळांसह या लंकानगरीवर चाल करून आला.

**रावण**—बरं मग ? पुढं आणखी काय ? सांग सांग तर खरी अशी स्फुंदू नकोस.

**मंडोदरी**—प्राणनाथ, कसे हो ते अपशब्द मी उच्चारूं ! प्रियकरा, मला चांडाळणीला—हायहाय ! ते दुःस्वप्न मला बोलवले तरी कसं ? आणि सांगू तरी कसं ?

**रावण**——प्रिये मंडोदरी ! त्रैलोक्यांतील दैदीप्यमान, प्रबळ आणि अजिक्य म्हणून आपल्या साम्राज्यशक्तीच्या मर्दुमकीबद्दल शेखी मिरविणाऱ्या देवदानवांच्या सर्व राष्ट्रांना एका क्षणात धुळीला मिळविण्याची ज्या या लंकापतीची शक्ती श्रेष्ठ आहे ; क्रोधायमान होऊन भूतलावर माझा त्रैलोक्यपतित्वाचा लत्ताप्रहार आपटतांच ज्या या प्रचंड भूगोलाचे खडपेच खडपे उडतील ; अपमानाची क्षुल्लक झुळूक लागतांच ज्या या लंकाधीशानं आपले खदिरांगारासारखे लालबुंद डोळे वटारतांच या विश्वाची निमिषार्धात राखरांगोळी होईल त्या रावणाच्या पट्टराणीला कोण ताप देत आहे त्याचा नुसता नामनिर्देश कर, त्याला युद्धाचे आव्हान करून भर समरांगणांत लाथ मारून जमीनदोस्त् करितो. माझ्या मंडोदरीचा जो अपमान तोच माझा अपमान. तू काय स्वप्नात पाहिलंस ते सर्व सांग ?

**मंडोदरी**——प्राणनाथ, कुंभकर्ण इंद्रजीतसह आपला—या माझ्या सौभाग्य तिलकाचा—वध करून तो विजयी झाला. लंकेचं संपूर्ण राजय बिभीषण भाऊजीना देऊन तो दाशरथी सीतेला घेऊन दरबारासह अयोध्येला परत गेला.

**रावण**——हेचं का ते स्वप्न ? मला वाटलं की आणखी काही चमत्कारिक व भयंकर प्रकार तू स्वप्नात पाहिलास. अँः ! त्यातं ग काय अर्थ ? ही स्वप्न म्हटली म्हणजे अगदी क्षुल्लक किंमतीची ! त्यांतील गोष्टी खऱ्या मानून त्यासाठी आपलं मन व्यर्थ दुखविणं तुझ्यासारख्या त्रैलोक्यापतिपट्टराणीला बिलकुल शोभत नाही, असं पहा——

**पद.** (अधर वारुणी)

**चपल मानसीं चंचल प्रगती ।**
**भ्रम हा सारा शुष्कचि त्या गणुनी ।**
**सुजन ते त्यातें त्यागिती ।।धृ।।**
**चंचल मन हें रिक्तचि असतां ।**
**विफल तरंगी ने मनसमता ।**
**व्यर्थ असे स्थिती ती ।।१।।**
**सार्वभौमदिं वित्तहीन तो ।**
**स्वप्नी आरुढ वैभविं होतो ।**
**सत्य न त्या वदती ।।२।।**

**मंडोदरी**——प्राणेश्वरा, हे स्वप्न क्षुल्लक नाही बरं ? हे केवळ ब्रम्हवचन समजा. महाराज, मी पदर पसरून मागणं मागते की त्या मंगलदायक रघुनंदनाला त्याची सीता परत नेऊन द्या आणि त्याला शरण जा हेच सध्या इष्ट दिसतं.

**रावण**——काय शरण ? छेः हा तुझा सल्ला मला बिलकूल पसंत नाही. या रावणावर प्रत्यक्ष कल्पांतरुद्र जरी कोपला, जगातील सर्व ज्वालामुखीचा स्फोट होऊन त्यांनी

या माझ्या मस्तकावर प्रखर अग्नीचा जरि वर्षाव केला, किंवा हिमालयापेक्षा प्रचंड पर्वतांनी एकवटून या माझ्या मस्तकाचे चूर्ण केले तरी पण उदात्त राजकीय कल्पनांनी आणि वीरश्रीनं स्फुरण पावलेलं हे माझं थोर मस्तक तशाहि स्थितीत कोणाच्याहि पुढं एक केसभरसुद्धा वाकणार नाही, हे पूर्ण ध्यानात ठेव. मग शरण जाण्याची गोष्ट तर दूरच राहिली.

**मंडोदरी**——पण महाराज, परस्त्रीचा अभिलाष धरून कोणाचं बरं चांगलं झालं आहे ? त्यातून हा पुराणपुरुषाचा अवतार आहे बरं ? गळ्यात धोंडा बांधून कोणी कधी महासागर तरल्याचं पाहिलं आहे काय ? मूर्तिमंत विषाचं प्राशन केल्यावर त्याचं कल्याण तरी कसं होणार ? म्हणून म्हणते, कसंहि करा पण या मंडोदरीची एवढी विनंती मान्य करून येत असलेलं भावी संकट दूर करा. नाही तर मीच रघुनंदनाला त्याची पत्नी अर्पण करून शरण जाईन नि मला चुडेदान मागून घेईन. पण श्रीरामचंद्रापुढं ही मात्रा नाही बरं चालायची. हा कोणी मानव नसून भक्तजनाला व सत्याला तारण्यासाठी हे पूर्णब्रह्म अवतरलं आहे.

**मारुती**——(एकीकडे) धन्य धन्य मंडोदरी, तूं ज्ञानाची कामधेनू आहेस.

**रावण**——(स्व.) आता हिची समजूत कशीतरी करून वेळ मारून नेली पाहिजे. स्वयंवरसमयी भरसभेत एवढा अपमान सहन केला ; अकटोविकट प्रयत्न करून, हजारो मसलती लढवून, अनेक वेषांतर करून लाखो प्रण्यांचे बळी घेऊन आणि सत्यासत्याचीही पर्वा न करिता ज्या सीतेला या रावणानं दंडकारण्यांतून येथे आणली आणि वशप्राप्तीसाठी पाच कोटी कडव्याराक्षसींच्या कडक बंदोबस्ताखाली अशोकवनात ठेवली त्याच सीता सुंदरीला या मंडोदरीच्या प्रलापानं वितळून जाऊन मेषपात्राप्रमाणे त्या मानवी दशरथपुत्राकडे परत पाठविण्यासाठी काय ? छे: मुळीच नाही. एकदा तरी त्या सुंदरीचा तारुण्स्वाद चाखून मी आपलीमहत्त्वाकांक्षा पुरी करून घेणार.

**मंडोदरी**——प्राणनाथ, एवढा विचार तो कसला ? या दासीच्या शब्दांवरील आपला भाव अगदीच उडाला ना ?

**रावण०**——असं होईल तरि कसं लाडके? अर्धांगीच्या शब्दाला मुळींच मान न देण्याइतका हा रावण अविचारी नाहीं. कारण असं पहा——

**पद०** (स्फटिकाचे तें०)

**दैवकरीं जें सुख लाभतसे ।**
**श्रेष्ठ तयांतिल कांता विलसे ॥**
**श्रांत मना करि शांतचि ललना ।**
**मधुर वचें हरवी हृच्छलना ॥**
**प्रियकर दर्शन अर्धांगीचें ।**
**रमवित नित मन हें पुरुषांचें ॥ १ ॥**

**मंडोदरी०**—पण नुसत्या या शास्त्रार्थावरच माझी समजूत नाहीं बरं व्हायची ?

**रावण०**—समजूत व्हावी असं कोण म्हणतो ? तुझ्या म्हणण्याप्रमाणें जानकीची उदईक मुक्तता करतों मग तर झालं ना ?

**मंडोदरी०**—होय गडे. त्यातच आपलं कल्याण आहे.

**रावण०**—बरं तर. कोण आहे तिकडं ?

**दासी०**—(प्र. क.) काय आज्ञा सरकार ?

**रावण०**—अशीच अशोकवनांत जा. आणि तेथें बंदीत ठेवलेल्या सीतेचा काय समाचार आहे तो घेऊन ये. जा.

**दासी०**—सरकारची आज्ञा शिरसावंद्य. [जाते.]

**मारुती०**—(स्व.) भला शोध लागला. आतां या दासीच्या मागोमागच जावं झालं. जय जय रघुवीर समर्थ. [जातो.]

**रावण०**—लाडके मंडोदरी, त्या स्फटिक गच्चीवर क्षणभर विश्रांती घेऊ चल. ही पाहिलीस कां मध्यान्ह रात्रीची शोभा ?—

**पद०** (रजनीनाथ हा—)

**गगनसागरीं शशि हा रमला ॥ उडुगणयूथीं जलक्रीडेला ॥ धृ० ॥**
**अंबर-उपवन फुललें खासे । तारागण-सुमनांच्या श्वासें ॥**
**मन्मथ-शशि हा विहार भासे । सज्ज करुनियां किरण-धनूला ॥ १ ॥**
**सौंदर्ये नटली रति-रजनी । उत्कंठित ती पतिमूखमिलनीं ॥**
**धन्वाकर्षणि लाजुनि स्वमनीं । दृढालिंगनीं सुखवित पतिला ॥ २ ॥**

## अंक पहिला समाप्त.

# अंक दुसरा.



## प्रवेश १ ला.

**स्थळ** :– अशोकवन – लंका.

[सीता ध्यानस्थ बसली आहे; जवळ त्रिजटा आहे; अधोमुख, शतमूर्ख, क्रूरवदन प्रहारा करीत आहेत. मारुती येतो.]

**मारुती०**—अहाहा ! हीच ती माझी माता जानकी, आज माझ्या जन्माचं व रामभक्तीचं खरंखरं सार्थक झालं. येथे काय चमत्कार आहे पहा– वृक्ष, पंचभूतें, पक्षी वगैरे एकसारखीं रामस्मरण करीत आहेत. एवंच या लंकाद्वीपांतसुद्धां अयोध्यावासी रामाचा ध्यास करणारे प्राणी जन्मले आहेत. बाबानों ! तुमचा हा ध्यास त्या मदांध रावणाला सध्या जरि मानवत नसेल तरि पण रामभक्तांनो धीर सोडूं नका. श्रीराम तुम्हांला अंती यशश्री दिल्यावाचून खास रहाणार नाही. हंः! हे तीन राक्षस माझ्या मुष्टीप्रहराला बळी पडण्यायोग्य आहेत खास. मुष्टीनो, जरा थांबा उतावीळ होऊं नका. वेळ भरतांच हे तिघेही तुमच्या तडाख्यात सापडल्याशिवाय राहणार नाहीत. अहाहा! पुराणपुरुष श्रीरामचंद्राची पत्नी सती सीता ती हीच होय. कारण कर्पुराची दीप्ती, हिच्या शरीराचा मृगमदापेक्षां श्रेष्ठ सुवास इतर कोणत्याही स्त्रियेपासून निर्माण होणं शक्य नाहीं. तसंच राघवाच्या चरणीं एकनिष्ठतेनं भक्ती करणाऱ्या बिभीषणाची कन्या त्रिजटा जवळच उभी आहे. हा सर्व देखावा पाहून असं वाटतं–

**पद.** (विराटवदनापासुनि०)
**ध्यानस्थचि ही जनककन्यका अचल शांत मननी गढली ।**
**वाटे रविच्या आगमनीं जणुं तेजोत्सुक प्राची वसली ॥**
**किंवा पीडित तिमिरें रजनी शशिसाठीं उत्सुक झाली ।**
**राष्ट्रोन्नति वा धर्मोन्नतिची विश्वशक्ति ही तपिं रमली ॥**
**राघवरमणी मनीं विचारी पारतंत्र्यबंधनकालीं ।**
**स्वातंत्र्याचा भास्कर रघुपति कधीं उगवतो याच स्थलीं ॥ १ ॥**

—आतां आपण गुप्तरूपानं जवळ जाऊन मातेच्या चरणांचं वंदन करावं.

[तसें करून जवळ मुद्रिका ठेवतो व आपण उडी मारून एका झाडावर बसतो.]

**क्रूरवदन०**—(मध्येंच थांबून) प्रख्यात शूरवीर रावणसैनिकहो ! बंदोबस्त तर नीट आहे ना ?

**शतमूर्ख०**——क्रूरवदना, आपली बंदोबस्त ठेवण्याची शिस्त त्रिभुवनांतील कोणत्याही देवदानवांना आजपर्यंत साधली नाही. तेव्हां काळजी करण्याचं काहीं कारण नाही. का ? अधोमुखा, तुझी बाजू कशी काय आहे ?

**अधोमुख०**——अगदीं चोख. आपल्याला पहाऱ्यावरचा आता कंटाळा आला बुवा.

**क्रूरवदन०**——ठीक. दूताची कामगिरी नको, म्हणून या पहाऱ्यावरच्या कामावर प्रहस्त प्रधानजीनी तुझी नेमणूक केली. आतां याहि कामाचा तुला कंटाळा आला वाटतं ? मग काय दे माय जोगवा करण्यांत तुला सुख मिळणारसं दिसतं ?

**अधोमुख०**——तो जोगवा पत्करला पण –

**शतमूर्ख०**——पण ? पण काय ? अधोमुखा, सेवकांची वृत्ती पाहून त्यांच्या श्रमाचं खरं चीज याच लंकाराज्यांत होत असतं, हें पक्कं ध्यानात ठेव. [सीतेकडे पाहून] ही बया आपल्या समाधीतून उतरत आहे वाटतं ?

**क्रूरवदन०**——समाधी उतरल्यावर रडायला सुरवात होणार. हिला रावण महाराज बलोत्कारानं वश करून कां घेत नाहींत कोण जाणे ?

**सीता०**——(ध्यानस्थ)——

**पद०** (कोन गली गयो०)
**हरुनी बंध ललना । मुक्त करा ॥ धृ० ॥**
**काय दशा ही तनुची झाली मद्विरहें रमणा ! । रघुकुलजा ॥ १ ॥**
**श्रमतां फिरुनी शोधित मजला कोण चुरील चरणा ॥ २ ॥**
**संतत मज जो आश्रय घडला तो कर– ॥ ३ ॥**

—— अगंबाई ! [जागृत होऊन] करांगुलीवर आज ती दिव्य अवतार मुद्रिका कां बरं दिसत नाहीं ? [पुढे मुद्रिका पाहून] अगंबाई ! हीच ती मुद्रिका. हा काय चमत्कार ? मुद्रिके——

**पद०** (प्रियकर माझे०)
**जिवलग सखये सांगे झडकरी त्यागुनि कां**
**रमणा स्थलिं या ॥ रघुतिलकांचें कुशल**
**वदे गे वसत प्रभू कवण्या ठाया ॥ धृ ॥**
**नाथा वनिं विरहाची । ज्वाला तापद किति**
**जाची ॥ सौमित्राते त्यागुनिया अशी अरसिक**
**तूं येशी वनिं या ॥ १ ॥**

**क्रूरवदन०**——कां ए बया ? रडायला काय झालं ? सांगतें ते नीट ऐक नाहींतर जन्मभर रडं लागलंच आहे नशिबाला.

**अधोमुख०**——रडत रडतच कां होईना, परंतु त्या महात्म्या रावणाची कामेच्छा तृप्त कर. (स्व.) धिःकार असो मला ! काय कुशब्द मी बोललों.

**शतमूर्ख०**---खबरदार रडण्याचें जर बंद न केलंस तर या शस्त्रानीं तुझ्या शरीराचे तिळ तिळ तुकडे करूं. त्या नीच रामाचा नाद सोडून रावणाच्या गळ्यात माळ घालायला काय झालं ? [शस्त्र उगारतो.]

**त्रिजटा०**---चुप रहा मेल्या. मी इथं आहें हें दिसत नाहीं वाटतं ? डोळे फुटले ? माझ्या देखत असला अत्याचार कराल तर प्राणास मुकाल. मेल्यांना लहान थोर काहीच कळत नाही. चांडाळ, पापी ! सीताबाई, चला आपण दुसरीकडे जाऊं. [दोघी जातात.]

**क्रूरवदन०**---थांब, शतमूर्खा थांब. हिला प्रथम या खड्गाचा प्रताप दाखवितों. ही पोरटी त्रिजटा जवळ आहे, नाहीं तर-- [अंगावर धांवून जातो तोंच मारुती समोरून येऊन त्याला खालीं पाडून त्याच्या उरावर बसतो.]

**मारुती०**---नाहींतर काय ? त्रैलोक्यातील सर्व देवदानवांवर वचक ठेवणारे प्रबळ सैनिक हो ! नाहींतर काय ? बोल ? मशका, तुझ्या नरड्यावर हा ठोसा अस्सा मारून-- [ठोसा मारून, क्रूरवदनास ठार करतो.] या अधोमुखाची टांग धरून त्याला आकाशांत--

**अधोमुख०**---मी गरीब आहे. निरपराधी आहे. मी आर्यावर्तवासी आहे.

**मारुती०**---कोण ? आर्यावर्तवासी ? मग या अधर्मी राक्षसांची वृत्ती पत्करून पतिव्रतेचा असा अपमान करतोस ? धिक्कार असो तुझ्या जन्माला ! ते काही नाही. तुला या क्रूरवदनाप्रमाणेंच यमाच्या घरची वाट धरलीच पाहिजे. बोल श्री राम-- [ठार करतो. शतमूर्खास उद्देशून]-- ए हरामखोरा--

**शतमुर्ख०**---(स्व.) आमची भरली. (उ.) मी शतमूर्ख नावाचा गरीब---

**मारुती०**---तोंडांतून शब्द काढ किंवा काढूं नकोस, तूही ठार झाला पाहिजेस. अयोध्येचा नायक श्रीराम यांच्याविरुद्ध तुमच्या तोंडांतून एक शब्द मला ऐकूं आला पुरे कीं, तुमची सर्वांची नरडी या माझ्या हातांनी बळकट आंवळून पलिकडच्या या भयंकर तुफानी महासागरांत जलसमाध दिल्याशिवाय हा रामभक्त मारुती कधीही राहणार नाहीं.

**शतमुर्ख०**---बाबा मारुतीराया, मी तुझ्या त्या श्रीरामाला शरण आहें. मला मारूं नकोस. मी मेल्यावर माझी बायको फार रडेल आणि एखाद्या राक्षसाबरोबर पुनर्विवाह करील. मग मी मेल्यावर हें कृत्य कांहीं मला पाहवणार नाहीं. मी तुलाहि शरण आहें. कृपा कर. हात जोडतो. पायां पडतो. नांक घासतों.

**मारुती०**---जा तुला जीवदान देतों. चल जा चालता हो येथून. [तो जातो.] पुन्हां आपण आपल्या वृक्षस्थानीं जाऊन बसावं हे बरं. [तसे करतो.]

**त्रिजटा०**---(प्र.क.) अगबाई ! इतक्यांतच या पहारेक-यांनां मरून पडायला काय झालं. ?

**शतमूर्ख०**——(प्र.क.) ते काही आपखुषीनं मेले नाहींत बरं. [विप्र भक्षकाला खूण करून बोलावतो.तो भीत भीत येतो. दोघे क्रूरवदनास ओढीत नेतात. परत येतात.]
—— स्वतःच्या खुषीवर मरण असतं, मग जगांत एवढा शंखध्वनि कोणीच करता ना. [मारुती दरडावतो.] जातोरे बाबा. यमराया ! मोठे उपकार केलेस. [अधोमुखास नेत असता] चला हो अधोमुख महाराज. जातों बरं कपिराज. पुन्हा मेलो तरि अशोकवनात पाऊल ठेवणार नाही. [जातो.]

**त्रिजटा०**——कुबुद्धीचं फळ कधीहि चांगलं मिळायचं नाहीं. पापाचरणाची मसलत द्यायला लाज नाही वाटली मेल्यांना !

**सीता०**——(प्र.क) बाई मुद्रिके, सरयूतीरविहारी रघुवंशाचा नायक सांप्रत कोणत्या स्थलीं आहे बरं ? सर्व सृष्टीचं नियमन करणाऱ्या आरक्त भास्करा ! या प्रचंड भूगोलावर तूं आपली दृष्टी फेंकित आहेस, तेव्हां तूं तरी मला माझ्या श्रीरामाचं वास्तव्यस्थळ सांग. गगनमंडळांत स्वैर गतीनं उड्डाण करणाऱ्या खगगणानों ! शौर्याबद्दल व ऐश्वर्याबद्दल ज्या रघुकुळाची कीर्तिदुंदुभी या त्रैलोक्यांत एके वेळीं मोठ्या धडाक्यानं गाजली असून, जिचा प्रतिध्वनी आमच्या शत्रूंच्या कर्णांत शिरून त्यांच्या राक्षसी हृदयांनां अजूनहि भीतीनं थरथरा कांपायला लावीत आहे, त्याच कुळाचे नायक वीर या मेल्या मदोन्मत्त रावणाला उलथापालथा करून माझ्या मुक्ततेसाठीं काही प्रयत्न करतांना तुम्हांला कुठं तरी दिसत आहेत का ? चराचर स्थावर जंगमाला स्पर्श करून या प्रचंड ब्रह्मांडांत तीव्र वेगानं संचार करणाऱ्या वायुराजा, माझा प्राणविसावा धनुर्धर राम कोणत्या स्थलीं आहे याची वार्ता तूं मला सांगशील काय ? काय ? नाहीं सांगणार ? नका सांगूं. तुम्ही सारे देवादिदेव, नवग्रह, पंचमहाभूतं सर्व शक्तिमान असतांनाही या मेल्या रावणाचे दास झालात, तेव्हां मी विचारतें त्या प्रश्नांची उत्तरं तुम्ही कशाला द्याल ! आपल्या पूर्वपराक्रमाची आठवण होतांच ज्यांच्या रक्ताला क्रोधाची उकळी फुटत नाहीं, धिःकार असो त्यांच्या जन्माला !

**त्रिजटा०**—— (स्व.) यांच्या या शोकाची आतां अगदीं परमावधी झाली बाई ! आपण तरि काय करावं ? (उ.) सीताबाई——

**पद०** (वारी जाऊं रे.)
**वारी ताप मनाचा सारा सोडी शोकछाया ॥ धृ ०॥**
**म्लान वदन तव मन्मन दुखवी ।**
**सतत रुदन सत्पंथ न सुचवी ।**
**थोर मनें झणि धरी आंवरुनी संकटा या ॥ १ ॥**
**निटिल—लेखे तो टळे न कांही ।**
**कर्मगतीचा प्रवाह वाही— ।**
**निर्झर जलसम परि मन आपुलें शांतवाया ॥ २ ॥**

**सीता०**——त्रिजटे, मी मनाचं शांतवन तरि कसं करून घेऊं ? जेव्हां पहावं तेव्हां—

**पद०** (सुध बिसर गई.)
**नित स्मरण मनिं होत आमुच्या सुगतिचेही ॥ धृ० ॥**
**गत वैभवांधार । तापदचि कांतार । करुनी छळी फार ।**
**मम पतिस तो विरहिं ॥ १ ॥**
**श्रेष्ठ जे बहुगुणी । वैभवाते त्यजुनि । राजसुत येति वनिं ।**
**क्रांति मन जाचितहि ॥२॥ योध्द्या कुणी कधीं न ।**
**नगरी विभवपूर्ण । गाजे जगति जाण । ऐश्वर्य साचेहि ॥३॥**

**त्रिजटा०**——तें सारं खरं सीताबाई. पण सांप्रतची परिस्थिती किती उलट झाली आहे, पहातां ना ? तेव्हां अशा वेळीं आपल्यासारख्या माणसानं धीरच धरला पाहिजे म्हणजे अनुकूल काळ येतांच सर्व मनोदय पूर्ण होतील.

**सीता०**——त्रिजटे, मी धीर तरी धरूं कसा ? आणि तो कोणत्या आशेवर धरावा ?

**पद०** (तव मानस कैसें.)
**नव संकट निपजे हाय । दिवसेंदिवस कसें ॥**
**वनी छळिती अवघे नीच जन हे विरहीं असे ॥**
**व्यथित हृदय हें प्रखर वन्हिचा साहिल कैसा ताप हा ॥**
**बलात्कार तो रावण करि मग नष्टचि आपोआप ॥**
**तारक कोणी नसे ॥ १ ॥**

**त्रिजटा०**——सीताबाई, पण आशेला एक मार्ग आहे, नाहीं असं नाहीं, आणि तो मात्र सर्वसिद्ध असून त्यावर कोणत्याही मदांध सत्ताधीशाची सत्ता चालूं शकणार नाहीं. पहा——

**पद०** (धीमा धीमा चालो.)
**सत्य तत्त्वास पाळितो । प्रभू धर्मा**
**सत्कर्मास राखितो ॥ अती तापद खल-कुमति**
**पदीं तोच तुडवितो । न्याय दावितो ॥ धृ० ॥**
॥ चाल ॥ **रावण खल तो, अधर्म वरुनी सुजन गांजितो ॥**
**धर्मा वाली आशेलागीं तारक कोणि न तो ॥**
**धर्मग्लानीस हानीस रक्षणा करी । सत्यतेजास—**
**अरुणास क्षितिजावरी । पसरि तिमिरारि ईशरवी**
**पूर्वगिरिवरी ॥ तिमिर लोपतो ॥ १ ॥**

—— श्रीरामचंद्रजी तुमच्या मुक्ततेसाठीं कांहीं तरी प्रयत्न करीत असतीलच.

**मारुती०**——(स्व.) त्रिजटा अगदीं खरं बोलली.

**सीता०**——मग ही मुद्रिका—

**त्रिजटा०**——ही कुठली ?

**सीता०**——चंद्राच्या शीतल किरणांना आणि अरुणाच्या आरक्त तेजाला दिपवून टाकणारा शामवर्ण जो माझा राम, त्या भाग्यवानाच्या करांगुलीवर ही नित्य झळकत असे. आज मानसिक पूजनाच्या वेळीं करांगुलीवर मला दिसली नाहीं. डोळे उघडून पहाते ती की इथं.

**त्रिजटा०**——ही मुद्रिका इथं कशी आली ?

**सीता०**——कोण जाणे ! हिला या ठिकाणीं येण्याइतकी चेतना जर प्राप्त झाली तर मी विचारते त्याचें उत्तर तिला कां बरं देतां येऊ नये ? मुद्रिके, तूं कां बोलत नाहीस ? तुझ्या आगमनानं मी शुभाची कल्पना करूं कीं अशुभाची ! पण तूं ज्याअर्थी मुळींच बोलत नाहीस त्याअर्थी माझ्या जिवलग रामानं विरहामुळें प्राण दिला हेंच खास. आणि तसं जर नसेल तर नाथा रामचंद्रा इथवर येऊन——

**पद०** (माझ्या मनींचें०)
**भार्या वधुनी निजकरिं रामा मुक्तचि करि तिजला ॥**
**कैसे विपिनी नाथाविण मी साहूं प्राणाला ॥ धृ ॥**
**पंकजनेत्रा ! अभिषेकाची स्मृति जाळी हृदया ॥**
**स्वयंवराचें शौर्य तसे मखरक्षण या समया ॥**
**दीनोद्धारा ! झडकरि तारा नत मी तव पायां ॥**
**विरहवह्निने जाळुं नको मज विनवित ही अबला ॥ १ ॥**

—— दशकंठरिपु रामा ! ही मुद्रिका तूं काय कारणानं पाठविलीस बरं ? मृगत्वचेची कांचोळी मला पाहिजे असा माझा हट्ट हाच मुळीं अन्याय. त्यासाठी केलेलं सौमित्राचं छलन माझ्या हृदयात आतां एकसारखं डांचत आहे. जे साधूंचा छळ करतील ते माझ्याप्रमाणं राक्षसांच्या हाती सापडून विरहानं तडफडत अधोगतीला जातील. राम—— (शोकाकूल होते.)

**मारुती०**——(एकीकडे) आतां शोकाची परमावधि पहाण्यात अर्थ नाहीं. आता गायनाला आरंभ करून आपलं आगमन मातेला सूचित करावं झालं०——

**पद०** (कृष्णा मुरारी०)
**राम विहारी मम दैवत धरणिवरि ॥ परम पुरुष**
**प्रगटुनि निज प्रखर स्वरूप कायधारी ॥**
**जनन मरण स्वकरिं धरुनि स्वपदि शरण**
**दास तारि ॥ धृ० ॥ सूर्यकुलज दयाब्धि पद्म-**
**संभवधारि प्रभु सतत भक्तभजनिं नित्य**
**समिप राहि । रामहृदयकुमुदसुरसस्वादभुक्त**
**प्रभुचरणरजिं नित नत सेवक वनिं येइं पाहि ॥ १ ॥**

**सीता०**—(शोक आंवरुन) अगबाई, कुठं आहे तो माझ्या रामाचा सेवक? [वृक्षाजवळ जाऊन] हे वृक्षा—

**पद०** (सोच समज०)
**जनन तुझें धन्य तें। विटपारे ॥ रामभजन**
**तव वदनीं मधु तें ॥धृ.॥ मनें करुनि जो**
**रामा भजतो । संकट कधिंही न स्पर्शित त्यातें ॥१॥**
**हे रघुभक्ता पुनित जनन तव । धन्य त्रिलोकी**
**वंद्य चरण ते ॥२॥ दाखिव मजला भक्त असा**
**तो । वसत तुझ्यांतचि गात भजन तें ॥३॥**

— [कोणी उत्तर देत नाहींसें पाहून] अगबाई ! कोणीच कांहीं बोलत नाहीं ? ही तर सारी कपटी राक्षसी माया दिसते. हे रामस्मरण करणाऱ्या भक्ता, तूं प्रगट होऊन मला जर आतां भेट दिली नाहींस तर मी आपला प्राण कांहीं ठेवणार नाहीं. अयोध्यापति रामचंद्रा ! तुझी भेट मला आतां नाहींच ना ?

**पद०** (आन बान जीयाम०)
**प्राणनाथ विरहिं त्यागी । अबला सति मी ।**
**न तारक मज । पालक नच ॥धृ०॥ त्वदिय**
**योगभजनिं रमति । भक्त तारण्यास रमसि ॥**
**शशिविण जशि कुमुदिनी तशि झुरत मनिं**
**अभागी ॥१॥**

—आतां असंच करावं. [गळ्याला वेणीचा फांस घालते.]

**मारुती०**—(स्व.) आतां ही तर वेणीचा फांस घेऊन प्राणत्याग करणार. मग माझ्या येण्याचं सार्थक तरि काय ? छट्, ती पहा अगदीं तयार झाली. उशीर नको. [झाडावरून खाली उतरतो.]

**त्रिजटा०**—अहो सीताबाई हे काय करतां ?

**सीता०**—जानकीरमणा रामा ! अंतीं तुझं स्मरण तरि पावन करो—

**मारुती०**—[पुढें येऊन नमस्कार करतो.] जयजय रघुवीर समर्थ.

**सीता०**—[फांस काढून स्वगत.] अगबाई, हाच तो रामसेवक वाटतं? (उ.) वत्सा चिरायू हो.

**मारुती०**—माते जानकी, कल्याणरूप रघुवीर किष्किंधेला सुखरूप आहे. मी वायुपुत्र हनुमंत रामचंद्राचा सेवक असून तुझ्यासाठीं सर्व लंका धुंडाळीत आलों आहें.

**सीता०**—(गहिंवरून) हनुमंता या तुझ्या उपकारांनीं मी-मला-एक शब्द बोलवत नाहीं. [डोळे पुसून] श्रीराम खुशाल आहे ना ? तिकडची सारी खुशाल ?

**मारुती०**——माते जानकी, श्रीरामानं जटायूचा उद्धार करून कबंध राक्षस ठार मारला. वालीला मारुन त्याच्या जागी सुग्रीवाची स्थापना केली, आणि तुझ्या स्वातंत्र्याची उत्कट महत्वाकांक्षा धरणारी अपार वानरसेना जमवून प्रभु रामचंद्र इकडंच येण्यास सिद्ध झाले आहेत. मातोश्री तूं आमची–आमच्या आर्यावर्ताची राजलक्ष्मी आहेस. तुला या लंकाद्वीपस्थ राक्षसांच्या जाचांत ठेऊन स्वस्थ बसण्याइतके आम्ही रामभक्त आजच इतके निःसत्व झालों नाहींत. माते ! काय सांगू–

**पद०** (मज खेळविशी०)
**प्रभु साहतसे मनि विरहव्यथा ।। विरहाग्नि**
**तया करि त्रस्त सदा ।। करि आर्तरवा**
**स्मरुनी सीता ।।१।। पाषाण हृदीं धरि शोकरसें ।**
**समजूनि तुला त्या भेटतसे ।। मुळीं शांति**
**नसे प्रभुच्या हृदया ।।२।।**

—— मातोश्री तूं जे अलंकार मार्गांत टांकलेस ते मी रघुवीराला नेऊन दिले. ते पाहून त्यानीं जो आकांत केला तो या मारुतीला कांहीं सांगता यायचा नाही. श्रीरामाचा आक्रोश पाहून वनदेवतासुद्धां धाईधाई रडतात. इतकंच काय, पण माते——

**दिंडी.**
**त्यजुनी बाळातें जननि जशी जाई ।।**
**बाळ शोकाकुल वाट तिची पाही ।।**
**तसा लक्ष्मण तव चरणदर्शनातें ।।**
**होय उत्कंठित झुरत मनीं माते ! ।।१।।**

**सीता०**——माझ्या जीवलग रामाला माझ्याकरितां काय हे परिश्रम ? हनुमंता, आम्ही त्रिवर्ग अयोध्येहून इकडं येत असतां चालतां चालतां वाटेत मी जर थोडी मागं राहिलें तर प्राणनाथ लागलेच एकाद्या दाट वृक्षाच्या छायेखालीं माझ्यासाठी थांबत. आणि ' सीते, तुला किने फार श्रम होतात ग. काय बरं लाडके करूं ' असं म्हणून तोंड कुरवाळायचे——

**मारुती०**—— माते, शोकातिशयामुळे कशाला श्रमी होतेस, तुझ्या दुःखाचे व बंदिवासाचे दिवस नष्ट झालेच असें समज. इतकंच नव्हे तर या ब्रह्मचारी वायूनंदनाचं हे वचन लक्षांत ठेव की आर्यावर्ताची राजलक्ष्मी तूं सीता–इतःपर या चोरट्या राक्षसांच्या प्रदेशांत न राहतां, आम्ही तुला परत नेऊन, मोठ्या थाटामाटानं अयोध्येच्या जगप्रसिद्ध सिंहासनावर स्थापन करणार. माते, या पापी लंकेचा व मदोन्मत्त रावणाचा समूळ विध्वंस करायला श्रीराम येथें लवकरच प्राप्त होतील.

**सीता०**——लवकर म्हणजे केव्हां ? पहा——

**पद०** (अवचित गेले०)
**धैर्यचि नच तिळ मातें वनिं । या ।।**
**करिति सतत छल बहुपरि हे खल राक्षस प्रतिदिनिं ।।धृ०।।**
**रामा कळवी बंधनछळ हा या परदेशीं सोशित**
**ललना ।। सत्वर संकट-ताप हरुनी मज करि**
**पुनितचि झणिं ।।१।।**

**मारुती०**—उदयीकच श्रीराम येथें येतील. रघुवीरानं मला फक्त सीताशुद्धीचीच आज्ञा केली आहे, नाहींतर या मारुतीनें त्या अधम रावणाला त्याच्या सिंहासनावरून खाली ओढून तुझ्यासमक्ष लाथ मारून ठार केला असता.

**सीता०**—अगबाई, मारुती तूं प्रथम मला सूक्ष्मरूप दिसलास, पण आतां किती भयंकर हें तुझं स्वरूप झालं ?

**मारुती०**—हे माते ! तूं माझा पराक्रम अझून पाहिला नाहींस. आम्ही रामभक्त सूक्ष्म रूपांत कृश शरीराचे जरि दिसत असलों तरी शत्रूचा कंठ काडकन फोडतांना आणि त्याच्या गर्विष्ट छातीवर मुष्टिचे दणक्यावर दणके मारतांना या शरिरांतील सर्व नसा पार टरारून जातात.

**सीता०**—खरंच. माझा यावर विश्वास आहे. पण श्रीरामानीं तुला कांहीं अंतरखूण सांगितली आहे का ?

**मारुती०**—होय मला त्याचं अगदीं विस्मरण झालं होतं. माते, तुम्ही त्रिवर्ग वनवासाला निघाला असता रघुवीरानं कैकयीच्या महालात आपल्याला वल्कलं नेसविलीं होतीं. पटते कां ही खूण ?

**सीता०**—न पटायला काय झालं परंतु, हा माझा बंदीवास लवकर संपेल असं कांहीं तरि करा.

**मारुती०**—त्याची काळजीच करूं नका. जगन्माते, किष्किंधाभुवनांत नळ, नीळ, जांबूवंत, सुग्रीव असे प्रत्यक्ष कृतांतकाळाचे शास्ते रघुनायकाची सेवा करीत आहेत.

**सीता०**—ते सर्व महावीर विजयी होवोत. पण मारुती, तूं हा एवढा प्रचंड महासागर कसा उल्लंघन करून आलास कोण जाणे.

**मारुती०**—माते पुन्हा रामकृपेनें, तुझ्या आर्शीवादानें आणि या दिव्य अवतारी मुद्रिकेच्या सहायानं काय होणार नाहीं ? असो. मी आतां फार श्रमलों आहे. थोडी विश्रांती घेऊन पुन्हा थोड्याच वेळांत तुला येऊन भेटेन. जय जय रघुवीर समर्थ.

[जातो.]

---

## अंक प्रवेश २ रा. दुसरा.

**स्थळ :–** इंद्रजीताचा दिवाणखाना.

[विचारात गुंतलेली सुलोचना प्रवेश करते.]

**सुलोचना०––**

**पद.** (काय पुरुष.)

**हाय ! प्रळय तापद भारी । त्रस्त करित लंका नगरी ।**
**वीर सर्व हरले समरीं । काय गति कळे ना ।।१।।**
**देव दैत्य ज्यानें हरिले । चंद्र सूर्य सेवक केले ।**
**श्वशुरही सुमतिस मुकले । अंत नच बरा त्या ।।२।।**

–– काय होईल तें होवो. सध्यांची ही स्थिती कांहीं चांगली नाही. आम्हा बायकांकडे तरी काय दोष ? नि आमच्या हाती आहे तरी काय ? येऊनजाऊन पडल्याझडल्या पुरुषांच्या तोंडाकडं पाह्यचं. पण ते तरि सुधे पाहिजेत ना !

**पद०** (अंकित पदांबुजाची.)

**मानसिं तया मदांधा न सुचे । हें सत्य तत्त्व**
**ईशा रुचे । हें ।।धृ।। त्यजुनी मार्गा नीतीच्या**
**त्या । अनीतिपथ करि घात त्यांचे ।।१।। सत्या**
**ईश्वर रक्षण करितो । असत्य तिळ नच**
**त्यास सहतें ।।२।।**

–– पुरे झाले हे विचार ! नुसतं विचारच करूं लागल्यास त्यांची पायरी कुठवर जाईल नि कुठवर नाहीं ! (उ.) कोण आहे ग तिकडं ?

**दासी०––**(प्र.क.) जी सरकार. मी आहे.

**सुलोचना०––**स्वारी कुठं ग गेली इतक्या जलदीनं ? मोठ्या महाराजांनीं बोलाविलं कीं काय ?

**दासी०––**होय सरकार. आपलं मंगलस्नान चाललं असतां रावण महाराजांकडून दूत आला, त्याच्या बरोबर आपले महाराज तातडीनं निघून गेले नि नुकतेच पालखीतून परत येऊन शस्त्रागारात शिरले.

**सुलोचना०**—— काही युद्धाची गडबड आहे की काय ?

[इंद्रजीत युद्धाच्या वेषाने प्र.क.]

**इंद्रजीत०**——होय. युद्धाचीच गडबड आहे.

[सुलोचना दासीला जाण्याची खूण करून आपण दूर उभीं रहाते.]

**इंद्रजीत०**——(स्व.) हिचं मन कांहीं तरी विचारांत गढून गेल्यासारखं दिसत आहे. बहुतकरून या विचाराचे तरंग सध्यांच्या परिस्थितीबद्दल असतील. परंतु त्या बंडखोर मर्कटाला युद्धांत चिरडून टाकण्यासाठीं आजची ही माझी स्फूर्ती, युद्धसामुग्री आणि भावी विजयश्रीचं माझ्या प्रफुल्लित चेहऱ्यावर चमकणारं हे तेज पाहून हिला आनंद झाल्याशिवाय खास राहणार नाहीं. (उ.) अशी दूर उभी कां ? तू माझ्याकडे नीट न्याहाळून पहा बरं एकदां ? सुलोचनेच्या महालांत विश्रांतीसाठीं येणारा आजचा हा इंद्रजीत नव्हे. माझ्या पोषाखावरून——

**सुलोचना०**——पोषाखच कांही पाह्यला नको. माणसाचं मन शुद्ध नसलं म्हणजे कोणाच्याहि सहज लक्षांत येतं. विश्रांतीसाठी सुलोचनेचा महालच आतां काय करायचा आहे ? सध्यांच्या प्रळयांत अम्हां स्त्रियांची कितीही विटंबना चालली असता, नुसतं पोषाखाचं आणि वैभवाचं प्रदर्शन करून पुरुषांनीं आम्हां स्त्रीवर्गाबद्दल इतकं बेपर्वा रहावं यांत आपल्याला काय दोष द्यायचा ? आमचं नशीब——

**इंद्रजीत०**——पण-जरा-माझं——

**सुलोचना०**——कायग बाई कालचा तो अनर्थ——

**पद०** (लोफूल जानी०)

**कपिवीर मार्गी आला । ललनांसि छळितां झाला ॥**
**कांताविना त्या कांता । आकांता करी । भारी । आकांत**
**होय भारी ॥१॥ परि वीर सारे दडले । नरवीर**
**सारे हरले ॥ करि फार ललना-छलना । तिळ ना लाज ती।**
**पुरुषा । तिळ लाज नाही पुरुषा ॥२॥**

**इंद्रजीत०**——मी काय म्हणतों तें तर——

**सुलोचना०**——त्या अनर्थांत गांजलेली एकादी सुंदर स्त्री सत्तेच्या जोरावर धरून आणून तिला पट्टराणी, मनमोहिनी, हृदयविलासिनी, जीवनदेवता यापैकीं एखादा मान द्यायचा असेल. माझी कांहीं हरकत नाही बरं !

**इंद्रजीत०**——मला असल्या वितंडवादाची भारी चीड आहे. मी इथं आलो कोणत्या स्फूर्तीनं आणि तुझं आपलं पहातो तों शुष्क च-हाट सुरू. लंकानगरींत एवढा आकांत चालला असतां, तिकडे कानाडोळा करून ऐश्वर्यांत झुलत स्वस्थ बसण्याइतके आम्ही राज्यचालक गाजी बनलो नाही, समजलीस ?

**सुलोचना०**——[जवळ जाऊन] मग त्याबद्दल इकडं काय व्यवस्था करायचं ठरलयं !

**इंद्रजीत०**——ती व्यवस्था काय, हें माझ्या पोषाखाकडं पाहिल्यास सहज कळेल. म्हणून मघांशी मी म्हटलं ' हा माझा पोषाख पहा; तों तूं आपलं उलटंच च-हाट सुरू केलंस.

**सुलोचना०**——एकूण स्वारी त्या माकडाचा वध करायला सेना घेऊन जाणारसं दिसतं.

**इंद्रजीत०**——युद्धासाठी सज्ज असलेल्या वीरांनां असल्याच गोडगोड सस्मित हास्यशकुनांची आवश्यकता प्रथम असते.मला आतां आनंदानं निरोप दे पाहूं. म्हणजे हां हां म्हणता विजयी होऊन शत्रूच्या रुधिरानं माखलेल्या छातीनं या वीरांगनेला आलिंगन द्यायला मी लवकर परत येईन.

**सुलोचना०**——ही मी तयार आहे. आंत चलायचं म्हणजे पंचारती ओवाळतें.

[जातात]

———————

अंक प्रवेश ३ रा. दुसरा.

**स्थळ :–** रावणाचा खासगी दरबार.

**पात्रें :–** रावण, प्रहस्थ, मंत्री वगैरे.

**रावण०**—प्रत्यक्ष इंद्र देखिल ज्याच्यापुढे हार टेकून समरांगणांत शरण आला, त्या माझ्या इंद्रजीत पुत्रापुढे त्या कपीचं काय सामर्थ्य आहे. त्या बंडखोर माकडाला तो अगदी धुंगुरट्यासारखा चिरडून टाकील. माझ्या इंद्रजिताची सेना किती बलाढ्य—

**पद –** (लाल झालि कोपानें०)

**शूर अशा चतुरंग सैनिकां मम सुत तो घेऊनि गेला ॥**
**अमित आयुतें मत्त करीदळ ठार करिल सहजीं कपिला ॥धृ.॥**
**रथा न गणवे कुणा अश्व ते सबल जाणती युद्धकला ॥**
**सैनिक शौर्ये ' मारूं मरुं वा ' वदति सहज वधिती त्याला ॥१॥**

—अशा बलवंत वीरावर एका क्षुल्लक कपीनं विजय मिळवणं शक्य तरी आहे कां ? जंबुमाळी राक्षस ठार मारला मारूं द्या. आसाळी राक्षसीण पोट फाडून मारली, मारूं द्या. पण प्रधानजी, हे पक्क लक्षात ठेवा की आजच्या मोहिमेत तो माकड ठार झालाच पाहिजे.

**दरबारस्थ०**—ठार झालाच पाहिजे. झालाच पाहिजे. झालाच पाहिजे. आणि तो होणार पण.

[सर्वभक्षी धाब-या धाब-या प्र.क.]

**सर्वभक्षी०**—राजाधिराज घात झाला. अशोकवनांत इंद्रजीत युवराजांच्या प्रचंड सैन्याचा पार फडशा ऊडाली. आपले युवराज नग्न होऊन पळाले ते एका विवरांत दडून बसले घात झाला.

**रावण०**—काय ? माझ्या इंद्रजिताचा पराभव झाला ? त्या काळतोंड्या माकडानं माझ्या युवराजाचा पराजय केला ? आणि तो मी कानांनी ऐकत असतांहि स्वस्थ बसू काय ? ज्या या रावणानं खडतर तपश्चर्या करून हे लंकापद प्राप्त करून घेतलं; ज्याच्या सेवेंत पंचमहाभूतें हीचशी काय, पण इंद्रादी देवसुद्धा राहत आहेत; जो मी लंकाधीश नवग्रहांच्या उरावर पलंग ठेऊन त्यावर निद्रा करणारा आणि क्षणांत

सप्तपाताळ हालवून सोडणारा त्याच्याच युवराजाला एका क्षुल्लक माकडानं नग्न करून विवरांत पळवावं काय ? काय हा अंधाधुंदीचा प्रकार ! प्रधानजी, कुठं आहे तो सृष्टी उत्पन्न करणारा ब्रम्हदेव !

**प्रहस्थ०**——तो बसला असेल पंचंग चाळीत.

**रावण०**——त्या हरामखोराला इकडे आणा पाहू.

**प्रहस्थ०**——अरे ए ब्रह्मा–ब्रह्मा ! चल इकडे ये.

**ब्रह्मा०**——(प्र.क.) महाराजाधिराजांची काय आज्ञा आहे ? आज्ञा व्हावी की या सेवकानं बजावलीच.

**रावण०**——आणि न बजावलीत तर पाठीवर रट्टे बसल्याशिवाय राहतील वाटतं ! मुह्मी माझे सेवक–दास आहांत, आणि मी लंकाधीश रावण तुमचा धनी आहे. देव असलात म्हणून काय झालं ! कामांत कसूर झाली की उभा जाळून पोळून खाक करीन, समजलांत !

**ब्रह्मा०**——(स्व.) विनाश काले विपरीत बुद्धी. (उ.) महाराजांची काय ती आज्ञा व्हावी.

**रावण०**——आत्ताच्या आत्ता जा आणि अशोकवनाचा विध्वंस करणाऱ्या त्या कपीला बांधून आणा. नाही तर तुमची गती ठीक होणार नाही.

**ब्रह्मा०**——ठीक आहे आणतो. (स्व.) काय ही आम्हां देवादिकांची दुर्दशा ! कर्मभोग भोगल्याशिवाय सुटायचा नाहीं. आतां मारुतीचं स्मरण केलं पाहिजे. [तसे करतो. मारुती येतो.]

**मारुती०**——ब्रम्हदेवा! काय आज्ञा आहे ?

**ब्रम्हा०**——(त्याच्या कानांत कांहीं सांगून) महाराजाधिराज, हा पहावा तो कपी.

[जातो.]

**रावण०**——(स्व.) हरामखोरा, या रावणाच्या हातून तूं आता जिवंत सुटशील काय ?

**प्रहस्थ०**——कायरे ए द्वेष्ट्या माकडा बंडखोरा ! तूं कोणाचा कोण आहेस ?

**रावण०**——आणि तूं आलास कोठून हेही सांग ? सांगतोस किं नाहीं ?

**मारुती०**——या सर्व लंकेत इतका प्रळय होत असतांही मी कोण आहें हें तुम्हांला न समजण्याइतका तुमचा सत्तामद शिखराला पोहचला आहे काय ? रावणा, ज्या धनुर्धरानं जनकराजाच्या दरबारांत सीतास्वयंवरसमयीं तुझ्या गर्विष्ठ छातीवर दडपून पडलेलं भव्य शिवधनुष्य उचलून तुझा प्राण व अब्रू वाचविली आणि त्याच प्रचंड

धनुष्याचा प्रत्यंचा चढवीत असतां त्याचे काडकन् दोन तुकडे करून सर्व सभाजनांसमक्ष ज्यानें आपल्या अतुल पराक्रमाची झांक सर्वांना दाखविली त्याच वीराचा मी दास आहे. ज्यानें ताटिका सुबाहूला यमाच्या घरची वाट दाखवून विश्वामित्राच्या पवित्र यज्ञाचें रक्षण केलें त्याच वीराचा मी दूत आहें. त्रैलोक्यपतित्वाची घमेंड मारणाऱ्या रावणा, ज्या महात्म्यानं तुझ्या भगिनीचं नांक कान कांपून टाकले त्याचा मी दासानुदास तुला शिक्षा द्यायला इथं आलों आहें. चोरा, पाकशाळेत ज्याप्रमाणं श्वान शिरतो त्याप्रमाणं भिक्षेची झोळी पसरुन पंचवटींतील पर्णकुटिकेतून माझ्या मानसदैवताची राजलक्ष्मी तूं चोरून आणलीस काय? त्या रामसिंहाची वस्तु तुला जिरणं आता शक्य नाहीं. त्या सीतेच्या मुक्ततेविरूद्ध तुझ्या किंवा कोणाच्याही तोंडातून एक अक्षर जर मला ऐकूं आलं तर रावणा, लक्षांत ठेव–हे तुझे धूर्त बुद्धीचे शहाणे प्रधान, हे तुझे मंत्री आणि हे तुझे प्राणरक्षक प्रबळ सैनिक, या सर्वांच्या समक्ष तुला या टरारलेल्या मनगटाचा एकच ठोसा मारून नरकाच्या मार्गांत दूर झुगारून देईन. यांच पठ्ठ्यानं तुझा अखया राजपुत्र ठार मारून, अशोकवनाचा विध्वंस केला आणि याच रामसेवकानं त्रैलोक्यात प्रबळ म्हणून गाजलेल्या तुझ्या राक्षससैन्याचं पीठ करून इंद्रजीत म्हणून शचीपतीच्या पराजयाबद्दल शेखी मिरवीत असलेल्या तुझ्या राजपुत्राला नग्न करून एखाद्या बायकोप्रमाणं विवरात दडून बसायला लावलं.

**रावण०**——शूर राक्षसांनो, तुमच्या अजिंक्य शस्त्रांनी याच्या सर्व शरीराचें चूर्ण करा पाहूं.

**मारुती०**——हां हां रावणमहाराज, आपण इतकी तसदी घेण्याचं कांहीं कारण नाहीं. आपल्या राक्षसवंशाचा विध्वंस करायला कौसल्याकुमार सहपरिवार इकडंचं येत आहेत बरं. !

**प्रहस्त०**——मूर्खा, कोणाच्यापुढें तूं या बाष्कळ वल्गना करीत आहेस ?

**रावण०**——प्रधानजी, या माकडाच्या नादीं लागण्यांत कांहीं अर्थ नाही. पण त्यानंही पक्क लक्षात ठेवावं कीं, आमची साम्राज्यशक्ती इतकी बळकट व प्रज्वलीत आहे की सीतेच्या मुक्ततेबद्दल.

**मारुती०**——(अंगावर धांवून जातो.) रावणा, तोंडांतून शब्द पडतो न पडतो तों तूं ठार मेलास म्हणून समज.

**ब्रह्मा०**——(प्र.क. मारुतीला आवरून धरतो) हां हां हां मारुती, वाल्मिकाच्या वचनाला बाध आणूं नकोस. रामाच्या हस्ते–बस्–इतकंच शांत हो.

(जातो.)

**रावण०**——अरे जा माकडा. वैभवाबद्दल आणि सामर्थ्याबद्दल बाष्कळ वल्गना करण्यांत तुझा किष्किंधावासी मर्कटाप्रमाणं आम्हांला भूषण वाटत नाही समजलास ? दूता–कोण आहे तिकडं ? या हरामखोराच्या सर्वांगाला अग्नी पेटवून हालहाल करून याचा प्राण घ्या.

(मारुतीला दूत पकडतात.)

**मारुती०**——पण त्यांत एक भानगड आहे. अग्नीनं सर्वांग पेटवाल, पण शेपूट जरा का उघडं राहिलं तर मात्र मी आटपणार नाहीं. लाथेखालीं चिरडून टाकीन सगळ्यांना याद राखून ठेवा.

**रावण०**——बरं बरं. (दूतांस) तोंडाकडं काय पहाता ? न्या त्या माकडाला ओढीत.

(दूत मारुतीला नेतात.)

**रावण०**——(स्व.) शक्तीपेक्षां युक्ती श्रेष्ठ. आतां लवकरच अशोकवनांत जाऊन त्या मनहरणी सीतेचं मन कसं तरी वळविलंच पाहिजे. अहाहा ! त्या सीतेसारखी यौवनसंपूर्ण स्त्री या त्रैलोक्यांत मिळणं शक्य नाहीं. स्वयंवरसमयीं मी त्या शिवधनुष्याखालीं दडपून पडलों, परंतु त्या सुंदरीच्या सौंदर्यतेजाकडे पाहूनच मी तो भरदरबारातला अपमान सहन केला.

(सर्वभक्षी धाबरत प्र. क.)

**सर्वभक्षी०**——महाराज–महाराज–महाराज. वस्त्रांचा पर्वतप्राय ढिगार संपला, महासागराप्रमाणं तेल संपलं पण पुरवठा होत नाहीं. त्या माकडाचं शेपूट भसाभस वाढतंय. काय करावं ते हुजूरास–

**रावण०**——त्यांत विचार तो काय करायचा ? चल माझ्याबरोबर अशोकवनांत. सीतेला नग्न करून तिची वस्त्रं तुम्हांला देतो. चल !

(जातो.)

**प्रहस्त०**——या लंका नगरीची आतां काहीं धडगत दिसत नाहीं. या अपशकुनांचा शेवट काय होईल तो होवो. आपलें लंकाबेट सोडून आर्यावर्ताच्या दंडकारण्यांत याचकवृत्तीनं जाऊन ती सीता पळवून आणली ही गोष्ट कोणत्या थराला जाईल ती जावो. या माकडानं भावी स्थितीचा ओनामा आताच सांगितला म्हणायचा. जे जे होईल तें तें पहाणे भाग आहे.

(आंतून " आग लागली. धावा " असा ओरडा होतो.)

अरे हा गलबला कसला ? आँ ? अरे अरे अरे ! त्या माकडानं सगळ्या लंका नगरीला आग लावली. खरोखर लंकेवर कल्पांतरुद्र कोपला ! अरे धाबरू नका–धाबरू नका. हा पहा मी आलो. आग विझवा–आधीं आग विझवा.

(जातो.)

---

अंक **प्रवेश ४ था.** दुसरा.

**स्थळ :** अशोकवन.

**पात्रें :** सीता, मारुती, त्रिजटा.

**सीता०**—हनुमंता, ही त्रिजटा माझ्याजवळ आहे म्हणुनच या अशोक वनांत माझे बंदीतले दिवस कसे तरी मी कंठीत आहें. ही एक उल्हासवृत्तीची व शांतीची कामधेनू आहे. नाहींतर या राक्षसी प्रदेशांत माझ्या विरही मनाला कशानंही समाधान झालं नसतं. हेंच पहा—

**पद.** (उगिच कां०)

**मुळींच ना श्रांता मानसा शांती आतां ॥ धृ० ॥**
**प्राप्त होय शोक अशोकीं ॥**
**रम्य उपवनीं अवलोकीं ॥**
**पोळितो मला विरहीं कीं ॥**
**सृष्टि फुलुनि तापवि चित्तां ॥ १ ॥**

—खरं जर म्हणशील तर त्रिजटे, स्वतंत्रतेचा एक क्षण पारतंत्र्याच्या अनंत काळाबरोबर आहे.

**त्रिजटा०**—म्हणुनच दासांनीं दास्यत्वाचे दिवस कडक पावित्र्यानं व मनोनिग्रहानं कंठून दास्यमुक्ततेचा मार्ग शोधीत असावं. सर्व पृथ्वीवर अनर्थ करून राक्षसी अनाचारांनी निरपराध्यांना त्रस्त करायचे पापी व स्वार्थी विचार राक्षसांच्या जरी मनात असले तरि पण सीताबाई ! जगन्नियंत्या परमेश्वराची इच्छा कांही निराळी असते बरं.

**मारुती०**—त्रिजटा अगदी योग्य बोलली.

**त्रिजटा०**—हा सर्वसिद्ध नियमच आहे. कारण—

**पद०** (मम चित्त सरो०)

**प्रभू धन्य सज्जनवाली । तारक स्कंध भू सांभाळी ॥धृ.॥**
**अधर्महननी असत्यछेदनि कुबुद्धिमर्दनि स्वरूप धरुनी ॥**
**उचलित सज्जन झडकरि करताळिं ॥१॥**

**मारुती०**——बरं माते, मला आता लवकर निरोप दे. म्हणजे उदईक दोन प्रहरीं रघुवीरासह सर्व रामसैनिक मी लंकेंत घेऊन येईन.

**सीता०**——मी अंतरखूण तुला सांगितलीच आहे. पण मुद्रिकेप्रमाणं हा माझ्या वेणींतील दिव्य मणी श्रीरामास नेऊन दाखिव आणि सांग——

**पद०** (सुनी वो बालम०)
**झणिं या तारक रामा ॥धृ०॥**
**विपिनीं पडले नाहीं कुणि वाली ।**
**राक्षस छळिती त्यातें वधण्या ॥१॥**
**वरह पोळितो भारी सतिला या ।**
**सिंचुनि प्रणया ललना सुखवा ॥२॥**

## अंक दुसरा समाप्त.

# अंक तिसरा.



## प्रवेश १ ला.

**स्थळ :** पंपा सरोवराजवळील प्रदेश.

**पात्रें :** राम, लक्ष्मण, जांबुवंत.

**राम०**—प्रिये जानकी—

**पद०** (सतनु करावा०)

विगलित आंगीं भेटशि कां गे तुजसाठी विपिनीं फिरतां ॥
मूर्तिमंत तूं भेट एकदां तोषवि झणिं कांते कांता ॥१॥
सिंहकटी ती कटिस्मृति देई मृगाक्ष तव नयना दावी ॥
रंभास्तंभा पाहुनि मजला स्मृति ऊरुंची ती होई ॥२॥
वृक्षलता मन विव्हल करिती तव बाहूसम त्या दिसती ॥
ऐसे सारे एकवटुनियां विश्व विरहतापा देती ॥३॥

**लक्ष्मण०**—दादा, व्यर्थ शोक करण्यात काय बरं अर्थ ? पहा—

**पद०** (सुनइ दिल्दार०)

असे वनवास सांप्रत हा कठिण भारी ॥
धैर्य मनि थोर धरा अघ घोर हे वारी ॥
निटिल लेखापरी घडते कृती जगतीं ॥
त्यजुनि शोका विवेकातें धरा हृदयी ॥१॥

—पूर्वी आपण युवराजपदारूढ होतो. संपत्तीचा, वैभवाचा आणि राजलक्ष्मीचा पूर्ण उपभोग घेत होतो याची नुसती कल्पना करणं ह्मणजे सध्यांच्या स्थितीत एक निद्रेतील स्वप्न वाटतं !

**राम०**—आपल्या नशिबाचे खेळच कांहीं विचित्र आहेत. पहा—

**पद०** (जातसे पतिसदनि०)

आठवे दिनरजनिं मजला बंधुजन आप्तावली ॥
तनय—विरहें ग्रस्त सदनीं पुनित जननी आपुली ॥
त्यागुनी युवराजपद तें विपिनिं सहतों कष्ट हे ॥
तातवचना सार्थ करण्या व्यापिली तनु वल्कलीं ॥१॥

——तातज्ञेप्रमाणं हा वनवासही गोड मानून कंदमुळांवर निर्वाह करून रहात असतांहि हा सीतावियोगाचा प्रसंग आमच्यावर यावा यापेक्षां खडतर नशिबाची आणखीं सीमा ती कोणती ! पहा——

**पद०** (तेंडेरे कानुमेमेंडेरे०)

**विकल हृदय विरह करित हा ॥ अरि हरि**
**सहचरि प्रिय मज ॥धृ०॥ विरहीं तुटली**
**हृदय-ऐक्यता । करुनी खंड द्वय ॥ विकल० ॥१॥**
**विपिनीं पडुनी अर्ध तळमळे । झुरत दुजे**
**भलतिकडे ॥ विरह० ॥२॥**

**लक्ष्मण०**——दादा, या भावी संकटांचं मला स्वप्नच पडलं होतं नि म्हणूनच सुवर्णमृगाच्या कापट्याबद्दल मी मातोश्रींची समजूत घालण्याचा यत्न केला परंतु माझ्या दुर्दैवानें त्या समजूतीचा शेवट विपर्यासात झाला. सीता मातोश्रीला राक्षसांनं पळवून नेली असं जटायूनं सांगण्यापूर्वीच मी त्या गोष्टीबद्दल तर्क केला. कारण–

**पद०** (भेदिती गृहभेदि०)

**दावुनी खल विविध आमिष ॥ छळिति सज्जन**
**ते बहूपरि ॥धृ०॥ वांछिती परनारि लाभा ।**
**करिति ऐशा धर्मलोपा ॥ यज्ञ विध्वंसोनि ऋषिनां ।**
**ताप देती ते परोपरि ॥१॥ रूप मोहक घेति**
**कधिंकधिं । मधुर वचना बोलताती ॥ करिति**
**हतबल पाश टाकुनि । क्रौर्य वरिती सज्जनांवरि ॥२॥**

——पण त्यानींहि पक्कं लक्षांत ठेवावं कीं आमच्या नैसर्गिक सात्त्विक वृत्तीचा अयोग्य लाभ घेण्याचा सल्ला देणारीं त्यांचीं तीं कपटी शिरं आम्ही रामभक्त भरसमरांगणांत तुडवून जमीनधास्त केल्याशिवाय खास रहाणार नाहीं. या मायावी राक्षसांचा पूर्ण निःपात केल्याशिवाय आमच्या पवित्र यज्ञयागादि क्रिया सुरळीत चालायच्या नाहीत, आमच्या सनातन धर्माची प्रज्वलता प्रखर राहणार नाही नि आमच्या क्षत्रियत्वाच्या तेजाला आमचे वंशज नावें ठेवल्याशिवायहि राहणार नाहींत.

**राम०**——शाबास लक्ष्मणा शाबास !

**पद०** (जणुं गांठियली०)

**तव वचन गमे परिसचि मम या म्लान**
**मनालागीं ॥धृ०॥ ख्यात रघुकुला वीरश्री**
**ती भूषविते ॥१॥ करि अरिहनना उत्सुक**
**मज तें पियुष गमे ॥२॥**

—परंतु असं पहा, सीतेचा शोध लागल्याखेरीज आमच्या आयुधांचा व शौर्याचा काय उपयोग ?

**जांबुवंत०**——आयुधांचा व धनुष्यबाणांचा उपयोग स्वारीनां जर सध्यां करायचा नसेल आणि क्षत्रियत्वाचं तेज दाखविण्याची सवड स्वारीला जर सध्या नसेल तर तीं आयुधं व तें तेज अस्मादिकाच्या स्वाधीन करावं.

**लक्ष्मण०**——पण त्याचा उपयोग करणार कुठं ?

**जांबुवंत०**——ह्यः ह्यः ह्यः ! त्याचीहि योजना या बुड्ढक डोक्यानं करून ठेविली आहे. आपला या वनांतील वनचर स्नेही इथंच कुठं तरी एकाद्या झुडपांत असेल; तो त्यांचा नीट प्रतिपाळ करील. वनचरा–ए वनचरा–

**वनचर०**——(आंतून) ओ–ओ–ओ आजोबा. वाँईच थांबा. मी सीतासुद्धी करीत बसलोया न्हवका ?

**जांबुवंत०**——अरे शहाण्यामूर्खा–मठ्ठपंडिता, इकडं ये आधीं. म्हणे मी सीताशुद्धी करीत आहें ! तोंड पहा सीताशुद्धी करणारीचं.

**वनचर०**——(हातांत चिलीम घेऊन प्र.क.) ह्ये बघा माझं त्वांड !

**राम०**——वनचरा, दंडकारण्यापासून तूं आमच्या सहवासांत आहेस, तेव्हां तूं तरि सीतेचा पत्ता सांगतोस कां ?

**वनचर०**——ह्ये पघा ही बया लई इचित्र हांय पघा. हिच्यामंदी भवानी संकराचा ह्यो जलाल इस्तुव तिच्या टकुऱ्यावर ठेवला आन् योक सपाटून दम मारला का–यो पघा–पघा–भपकारा. आन् आता सांगू–सांगू ? सांगू ? वं भोलानाथ दिगंबर ! उत्तरच्या बाजूला त्वांड करूनशान दक्षनच्या बाजूला मुखडा फिरवला कां उगवत बाजूला मावळत समिंद्रातल्या लई लई लान बेटामंदल्या लई म्वाठ्या डबक्यामंदी सीता अशी अशी पोहत व्हती पघा !

**राम०**——वनचर आहेस झालं !

**वनचर०**——न्हाय कोण ह्मनतो ? पन् सीता ह्मंजी हाय काय, त्येची दखल हाय कोनच्या लेकाला ? सीता ह्मंजी पुरूस हाय का बाईल हाय का जनावर हाय त्ये त्या भोलानाथाला ठावं !

**जांबुवंत०**——गप् बैस मूर्खा.

**वनचर०**——मंग ह्याचं आपलं ह्येच झालं म्हनायचं !

**राम०**——मारुतीची भेट झाल्याशिवाय माझा हा विरहसंताप कांहीं कमी होणार नाहीं. प्रिये सीते !

**पद०** (कशी वद आस करूं०)

**छळि मज ताप तुझ्या विरहाचा । निराशा आटवि**
**धैर्यधि साचा ॥ धृ० ॥ कल्पतरूपरी बहुगुणी असतां**
**अंगीकृत गुण कैसा लपला ॥ कां न पुरविशी हेतू**
**आतां तुजविण राहूं कैचा ॥ १ ॥**

--लक्ष्मणा, माझ्या सीतेची व मारुतीची भेट झाली असेल काय?

**लक्ष्मण०**--दादा--

**पद०** (कपोला कपोलाचि०)

**चिरंजीव त्या अंजनीबालका । नसे भीति कालत्रयीं आयका ॥**
**प्रतिकार त्या जो मदानें करी । अरी तो पडे तो सत्वरीं यमकरीं ॥**
**यशाची ध्वजा शोभते ज्या करीं । यशवंत येईल तो लवकरीं ॥ १ ॥**

**राम०**--मग त्याला माझ्या जानकीची क्षेमकुशलता विचार बरं ?

**लक्ष्मण०**--पण दादा अझून मारुती आलाय कुठं ? तो येतांच मीच त्याला हा प्रश्न प्रथम विचारीन.

**राम०**--हरहर ! तोंपर्यंत मला धीर कुठला?

**साकी.**

**नसे शांति ही विरहि मनाला प्रिय रमणीविण कांहीं ॥**
**सृष्टिनियम हा मनुज दैवकृतिग्रंथ न मनुजा दावी ॥**
**ना तरि स्पष्ट कळे । कोठें कर्मप्रवाह ढळे ॥ १ ॥**

[" जय जय रघुवीर समर्थ " गर्जना ऐकूं येते.]

**वनचर०**--आर इचिभन ! ह्ये काय लचांड आलंया ?

आं ? ह्ये काय हाय तरि काय ? टोळधाड आली न्हवका ! आरतिच्या, तर समदी माकडं दिसत्यात.

**जांबुवंत०**--मूर्ख आहेस. निवळ गलेलठ्ठ रानटी टोणगा. मला नीट पाहू दे. (सर्व पाहूं लागतात.)

**वनचर०**--हां आजोबा, मग जरा वाँईच्च थांबा. ह्या माझ्या हिचा एक झणझणीत गरमागरम--

**जांबुवंत०**--गप् बैस.

**वनचर०**--भोलानाथाची वल्ली हाय. न्हाय म्हणूं नका.

**जांबुवंत०**--प्रसाद पाहिजे वाटतं ?

**वनचर०**——नको तर नको.

(पुन्हां गर्जना होते.)

**जांबुवंत०**——अहो तो पहा–तो पहा वानरांचा प्रचंड समुदाय आकाश मार्गानं उड्डाण करीत येत आहे.

**वनचर०**——आन् त्यो मधला हुप्या टोळभैरव कोण ?

**जांबुवंत**
**लक्ष्मण** ०——अरे तो तर आमचा हनुमान मारुती.

**जांबुवंत०**——आपला उजवा हात उभारून रामनामाचा जयघोष करीत इकडेच येत आहे.

**राम०**——यावरून कार्यांत सिद्धी मिळाली हेंच खास–

**दिंडी.**

**चिन्ह विजयाचें दर्शवी करानें ॥**
**सर्वे घेउनियां कपिगणा त्वरेनें ॥**
**वायुनंदन ये मिळवुनी यशाला ॥**
**विजयिभव हा वर सफल गमे झाला ॥१॥**

(वनचर आंगांत आल्यासारखें करतो.)

**जांबुवंत**——अरे हा बेटा वनचर असा कां करुं लागला ?

**वनचर**——(धुमत धुमत) माज्या आंगामंदी या आपल्या याचं–ईरशिरीचं–वारं आलंय न्हवका. अरे मला कोनीबी वळखत न्हवतं आँ ? पन ह्यनावं पघा आता माजा हा. अरे हरामखोरा, आतां तुझा हा माझ्या पुरा ध्येनामंदी आलाया. चोरा, आमच्या ह्याची ही तूं ही करून न्हेली व्हतीस न्हवका ? आता आमास्नी तिचा हा लागलाया. तुजा हा उगवायला ह्यो माजं ह्यो फुरफुरूं लागल्याती. अरे हे ह्या ! तुला ही ही करायला पाहिजे व्हय ? अरं मर्दा-न्हवं मुर्दाडा, तू इचिभन काय समजलास ? तुझ्या या ह्याच्यावर–मानगुटीवर ही माझी ही अशी मारूनशान तुला ठा-आ-आ-र (आरोळी मारतो.)

(मारुती, सुग्रीव, नळ, नीळ जयघोष करून प्र. क.)

**राम**——मारुती, उठ ऊठ–

**पद.** (लाविलि थंड उटी)

**भट सख्या झणिं मजसि मारुता कंवटाळूं दे विजयि तनूला ॥**
**कार्यश्रमीं तनु धर्मजलानें भिजलि चुंबुदे या काला ॥**
**अचल भक्ति ती प्रसन्न मज करी काय उपकृती करुं मी तुजला ॥**
**आनंदाश्रुजलीं करि स्नाना प्रेमवसन घे परिधानाला ॥१॥**

**लक्ष्मण**——हनुमंता, या तुझ्या कार्यसिद्धीबद्दल न् स्वामीभक्तीबद्दल तुझी स्तुती करावी तितकी थोडीच होणार आहे. पहा–

**पद.** (अर्पिलें सुमन)

**तव शीघ्रकार्य साफल्य पाहुनी ताता ॥**
**प्रभुभक्ति जननिच्या चित्ता ॥**
**देईल मोद हनुमंता ॥**
**धन्या न अन्या कुणा भक्ति साजे ॥१॥**

**जांबुवंत**——आतां हा शिष्टाचार सध्यां राहूं द्या. त्याबद्दल मारुतीला जो एक मोठा धन्यवाद द्यायचा तो मी–अस्मादिक जांबुवंत–मागाहून देतील. सध्यां इष्टकार्यसिद्धीचे वृत्त ऐकायला हे पहा आमचे कान टौकारून पहातां पाहतां लांबच लांब बनत चालले आहेत.

**वनचर**——ही चिलिम सांगते मला । ही बया बोलते मला ॥ दम मारुन सोडि भप्कारा ॥ आरडून ओरडून सांगा आतां ॥ काम झालि हो खबरबात ॥ जय बं भोलानाथ.

**राम**——सख्या मारुता–

**पद.** (गोपाल गिरिधार)

**सांगे सकल वृत्त ॥ करि शांत मम चित्त ॥**
**क्षणिं या उचंबळत ॥ परिसण्या विजय तव ॥धृ.॥**
**मेघापरी गहन । गमत मज तव वचन । वृष्टी झणीं**
**करुन । कर्णचातक सुखवि ॥१॥**

**मारुती**——रामचंद्रा, अपयशाची काय बिशाद आहे कीं तें या रामभक्ताच्या स्वामिकार्यांत प्रतिकार करील. मी इथून उड्डाण करून लंकाद्वीपांत गेलों; तिथं जो वृत्तांत घडला तो ब्रह्मदेवानं या पत्रांत साद्यंत लिहून दिला आहे. सीतामाता अशोकवनांत सुखरूप आहे–

**वनचर**---पण काय हो-

**जांबुवंत**---चुप. मध्यें बोलूं नकोस.

**वनचर**---न्हाय ह्मटलं त्या वनामंदिं गांजा मनमुराद हाय का ?

**मारुती**---चित्रकूट पर्वतावरील पर्णकुटींत आपण सीतामातोश्रींच्या कपाळीं रेंखलेला मनशिळाचा तिलक ही अंतरखूण जानकीनं आपणाला सांगितली आहे. त्याचप्रमाणं हा दिव्यमणी मातेनं आपल्या वेणींतून काढून आपल्याला दाखविण्याकरितां दिला आहे.

**राम**---(मण्याला हृदयाशीं धरून.) बा मण्या !

**साकी.**

**सीता स्पर्शसुखा अनुभवुनी धन्य जन्म तव केला ।।**
**परि हतभागी रमण तियेचा शोकीं पार बुडाला ।।**
**देइल कोण अतां । शांति संचित हृत्प्रांता ।।१।।**

**मारुती**---(स्व.) सीतेलाच झपाट्यासरशी आणली असती तर फार बरं होतं ! पण रामाची आज्ञा नाहीं.

**लक्ष्मण**---दादा-

**पद.** (नशिब फिरलें)
**धैर्यगिरि गमतां । मग उदास कां हो होता ? ।।धृ.।।**
**भास्कर नच तेजा त्यागी ।।**
**चापल्य न वायू त्यागी ।।**
**गिरि चले न स्थिर ज्या जागीं ।।**
**शौर्यनिधि असतां ।। मग.।।**

**मारुती**---खरंच-

**ऋषिमख रक्षाया शौर्य जें गाजवीले ।।**
**।।चाल।। खलजनहननीं जें तेजही दाखवीले ।।**
**गौतममुनिजाया उद्धरोनी यशाला ।।**
**अनुपम जनिं केली कीर्ति ऐशी विशाला ।।**

**लक्ष्मण**---

**परि धरा धैर्य या समया ।।**
**यशचिन्ह करा नच वांया ।।**
**सैनिकदळ विजय वराया ।।**
**सिद्धचि असतां ।। मग. ।।१।।**

**जांबुवंत**——बरं, श्रीरामा ब्रह्मदेवांनीं पाठविलेल्या त्या पत्रांत काय लिहिलं आहे ? बाकी मारुती ह्मटला ह्मणजे बाळ मोठं आहे विचित्र.

**राम**——एकंदरींत सर्व लंकाराज्य ह्मणजे अनीतीचं माहेरघर आहे असं या पत्रांत स्पष्ट लिहिलं आहे. ठीक आहे. तुमच्यासारख्या स्वामिभक्त सैनिकांच्या सहायानं मी ती लंकानगरी हां हां ह्मणतां उध्वस्थ करीन. तसंच ब्रह्मदेवांने सर्व देवादिकांच्या बंदीवासाचं वर्णन यांत फारच हृदयद्रावक लिहिलं आहे. देवादिकांची इतकी दुर्दशा ऐकून त्यांना बंधमुक्त करण्यासाठीं कोणत्या क्षत्रियांचे धनुष्यबाण आपल्या भात्यांतून बाहेर पडल्याशिवाय राहतील ? कोणत्या योध्यांचे दंड शत्रूला जमीनदोस्त करण्यासाठी फुरफुरल्या वांचून राहतील ? नि कोणता सनातन धर्माभिमानी या अधर्मी राक्षसांचा कंठनाळ काडकन् फोडण्यासाठीं सज्ज होणार नाही ? कां सेनापती कसा काय विचार ?

**सुग्रीव**——विचार तो आणखीं कसला ? आपली आज्ञा होण्याचा अवकाश कीं त्या नीच रावणाला या माझ्या शूर सैनिकांच्या सहायानं त्याच्या लंकाराज्यासह पार उध्वस्थ करीन. आतां उशीर लावण्यांत कांहीं अर्थ नाहीं. विजयादशमीचा सुमूहूर्त उद्यांच येऊन ठेपला. तेव्हां कोणत्याहि प्रकारची दिरंगाई न लावतां शत्रूवर एकदम चाल करून जावी हेंच इष्ट दिसतं.

**जांबुवंत**——रघुवीराचा मूळपुरुष रघु हा याच विजयादशमी श्रवण नक्षत्रावर दिग्विजयाला निघत असे.

**सर्व सैनिक**——हो. असंच केलं पाहिजे. शुभस्य शीघ्रम्.

**नळ**——त्या रावणाचं थोबाड फोडून सीतादेवीला मी एकटा मुक्त करणार.

**नीळ**——सीतामुक्तीचं काम मी कोणाच्याच वांटणीला येऊं देणार नाहीं. हा नीळ एकटाच त्या उन्मत्त रावणाला धोंपटून धोंपटून ठार करणार.

**वनचर**——(अंगांत आल्यासारखें करून) आर इचिभन मी इकत्या वेळ हा बसलों होतों, पन माज्या याची ही कोनालाबी येनार नाहीं. अरं मला वाँईच याची ही द्या. मारे या माज्या ह्या वर सारूनशान त्या हरामखोर या-आपल्या ह्याचा पार हा उडवूनशान टाकतो. मी पघा लइ म्वाटा हा हाय. अरं हे ह्या-थांब. तूं पळतूस कुठं ? तूं कुठंबी हे करूनशान बैस. तुला ही मारूनशान तुझा हा करीन. जय बं भोलानाथ.

**जांबुवंत**——मी जरि तुह्माला थेरडा दिसत असलों, तरी या सुरकुतलेल्या मनगटांत इतका पीळ अझून भरलाय की एका ठोशासरसा त्या रावणाला उलथापालथा लोळवीन समजलात. राजलक्ष्मीची मुक्तता या – या ठोशांत भरलेली असते बरं. यदाकदाचित् तुह्मी तरुण पोरांनीं कट करून रावणवधाचं काम माझ्या वांट्याला येऊन दिलंच नाहीं,

तर पाषाणांचा रचतो एक भला मोठा ढीग आणि बसतो जाऊन त्या रावणाच्या राजवाड्यावर. राक्षस दिसलारे दिसला की हूं : ! केला जागच्याजागी गार. आधीं राक्षस ठार मारल्याशिवाय यमलोकांत रावणाची व्यवस्था ठेवायला दुसरे प्रामाणिक सेवक कुठून मिळणार ?

**लक्ष्मण**——नळ, नीळ जांबुवंता तुमच्या शौर्याची आज आम्हाला नव्यानेंच परीक्षा पहावयाची आहे असं नाहीं.

**राम**——खरोखर–

**पद.** (कशि मदनमूर्ति)

**तुह्मि प्रखर भानु रणभूमिचे ॥**
**हो जनन सफल इह लोकिंचे ॥धृ.॥**
**स्वामिसेवनीं दक्षचि गमतां ॥**
**कृतांतसम यशस्फूर्ती वरितां ॥**
**वाटे मुक्तचि कराल सीता ॥**
**यश झणिं घ्या रणभूमिचें ॥१॥**

**सर्व**——वाटतं कां ? केलीच समजा. ती आमची वंद्य राजलक्ष्मी माता आहे. (सर्व उठतात.)

**राम**——हा तुमचा उत्साह पाहून मनाला फार आनंद होत आहे. सैनिकहो तयार व्हा. दंडकारण्यांत भिक्षुकाच्या वेषानं प्रवेश करून ज्या अधर्मी राक्षसानं तुमची राजलक्ष्मी सीता चोरून नेली, त्याला या जगांत अनीतीचा शेवट किती भयंकर असतो हें दाखविण्यासाठीं व सीतेची मुक्तता करण्यासाठीं तुह्मी सज्ज व्हा. ज्या ब्रह्मदेवानं ही सृष्टी सत्यासाठीं निर्माण केली तोच ब्रह्मदेव आज तेहतीस कोटी देवांसह त्याच राक्षसाच्या बंदींत पडला असल्यामुळें त्यांची मुक्तता करण्यासाठीं आणि त्याच पवित्र सृष्टीवर आजमितीस भडकलेला अधर्माचा व अनीतिचा प्रखर अग्नी पार नाहींसा करून टाकण्यासाठीं, तुह्मी एक दिलानं आणि एक मनानं आपले पाय इतक्या दणक्यानं आपटीत त्या शत्रूच्या छातीवर चाल करून जा कीं हा पृथ्वीचा गोल पार डळमळून जाऊन त्यानं पाताळाच्या शेषाचं मस्तक थरारून सोडलं पाहिजे. युद्धास तोंड द्या, अशी इषारत मिळतांच आपल्या हातांतील आयुधांनीं शत्रूंचीं शिरं इतक्या सफाईनं सपासप उडवा कीं तीं या भव्य गगनमंडळांत गरगर गिरक्या खात राहून राक्षसी व अनाचारी तत्त्वानं चौर्यकर्म करणाऱ्या आपमतलबी राक्षसांची भावी स्थिती पुढच्या पिढीला स्पष्ट दिसेल. ज्यांना आपल्या स्वधर्माच्या इभ्रतीची चाड असेल, ज्यानां आपल्या बायकांची अब्रू मर्दपणानं राखायची असेल आणि ज्यानां माझ्या सीतेबद्दल राजलक्ष्मीचा अभिमान असेल त्यांनीं याच वेळीं दृढनिश्चयाची ऐक्यत्वाची ढालतलवार

त्या लंकेच्या तटाला नेऊन भिडविण्यासाठीं आणि त्या उन्मत्त रावणाला सहपरिवार धडकी मारून लंकेच्या राजद्वारांत चेंदून जमीनदोस्त करण्यासाठीं माझ्याबरोबर समरांगणांत धांवत यावें,

**सर्व**––जय जय रघुवीर समर्थ.

**राम**––सैनिकगणहो ! चला तयार व्हा. उदईक विजयादशमीच्या सुमूहुर्तानं लंकानगरीवर स्वारी करून आपली राजलक्ष्मी सीता परत मिळवूं. त्या उन्मत्त रावण राक्षसाचं सहपरिवार कंदन करून आपलं नांव जगाच्या पुराणेतिहासांत अजरामर करूं. बोला ऐक्यतेचा जयजयकार.

(सर्व जयघोष करून धांवत जातात.)

---

अंक प्रवेश २ रा. तिसरा.

**स्थळ :** अरण्य रस्ता.

**पात्रें :** विप्रभक्षक, सर्वभक्षी.

(समोरासमोर येऊन भेटतात.)

**विप्र**---रावणं वन्दे.

**सर्व**---रावणं वन्दे.

**विप्र**---अहो पण-हो-हो-जरा थांबा. काय राव अगदीं घोड्यावर बसलात.

**सर्व**---छे छे ! तुमच्या ह्मणण्याप्रमाणं इथं बोलत उभा राहिलों तर मात्र खचित गाढवावर बसण्याचा प्रसंग येणार.

**विप्र**---पण जरा-थोडं. आज गडबड कसली आहे ?

**सर्व**---डोळे असून आंधळे आणि कान असून बहिरे आहांत झालं. आहो, आज सकाळपासून या लंकेंत इतकी गडबड सुरू असतांहि तुह्मी आपले कोरडे ठणठणीत.

**विप्र**---पडलोच मुळीं गावाच्याबाहेर पहाऱ्यांवर. तेव्हां कोरडा राहणं ठीकच आहे. आतां गावांतल्या गडबडीनं आम्हांला ओलं करून भिजविलं नाहीं, तिचं नशीब-प्राक्तन-दुर्दैव. तुह्मी तरि आह्माला ओलचिंब करा.

**सर्व**---माझ्यापाशीं बातम्यांचा इतका कांही हौद भरला नाहीं. आहे एक घागरभर बातमी. ओततो तुमच्या टाळक्यावर आणि करतों तुह्माला बातम्याभिषेक. भिजलात तर भिजलात. आज सकाळीं असं झालं-

**विप्र**---कसं झालं ?

**सर्व**---ती सीता धरून आणली आहे ना ? तिला सामोपचारांनीं पुष्कळ सांगून पाहिलं. पण ती कांही रावणमहाराजानां वश होत नाहीं. तेव्हां आतां शेवटचा उपाय-

**विप्र**---मेजवानीचा ?

**सर्व**---(त्याला थप्पड मारून) मेजवानीचा ! तुला दिसताहेत सदासर्वकाळ मेजवान्या. त्या माकडानं एवढ्या मेजवान्या दिल्या त्या विसरलास वाटतं ?

**विप्र**---अरे हो. तुला एक नवीन बातमी सांगतो ऐक.

**सर्व**---माझी गोष्ट तर ऐकून घे.

**विप्र**——अँः ! त्यांत कांही अर्थ दिसत नाहीं. रावण सीतेपुढें जाऊन साष्टांग नमस्कार घालणार—

**सर्व**——(त्याचा कान धरून) अरे मूर्खा पायां पडण्याचे दिवस जाऊन आतां तिच्या कानाला असं पकडून बळजबरीनं शयनशेजेला वश करण्याचा दिवस आजचा आहे.

**विप्र**——(विवळत) अरे पण मलाहि तुझ्या शयनशेजेला वश करतोस कीं काय ?

**सर्व**——वाः ! रत्नच पडलास कीं नाहीं ? तुला बायको समजून शयनशेजेला वश करणाऱ्या प्राण्याच्या दोन्हीं डोळ्यांत वडस वाढले असले पाहिजेत.

**विप्र**——पण मी इतका कां हिडीस, ओंगळ, धाणेरडा आहे ?

**सर्व**——आहांत मदनाचे अवतार. परंतु पुरुषांना पुरुषांशींच लग्न लावून जेव्हा संसार करण्याचा काळ येईल त्यादिवशीं आपली, आपल्या सौंदर्याची जरूर लागेल बरं ? आतां नाहीं. येतो आतां. (जाऊं लागतो.)

**विप्र**——अहो पण मुख्य बातमी राहिलीच.

**सर्व**——सगळ्याच बातम्या सांगून संपवितां उपयोगी नाहीं. त्याला नुकताच एक नवीन करार दरबारांत ठरला आहे, कीं रावणराज्यांत दरबारी बातम्या कुठंच बाहेर फुटतां कामां नये. त्या जो कोणी निष्कारण बाहेर फोडील त्याचें टाळकेंच फुटलें जाईल. ह्मणून त्या करारानुसार मी देखिल आज रावणाचा मोठा दरबार आहे, त्यांत सीताबलात्काराचा निर्णय व्हायचा आहे यांतील एक अक्षरहि तुझ्याजवळ बोलत नाहीं.

**विप्र**——आतां माझी बातमी ऐका. तो बंडखोर माकड आपल्याला माहीत असेल ? निदान ऐकून तरी ?

**सर्व**——पाठीवर जोंपर्यंत फटकाऱ्यांचे वळ दिसत आहेत तोपर्यंत त्याचं स्मरण जगजाहीर आहे. बरं मग त्याचं काय ?

**विप्र**——तो माकड मेला ह्मणे.

**सर्व**——(स्व.) तरिच बेटा आतांशीं कुठं दिसत नाहीं. (उ.) अहो मरायचाच. आपल्या या अजिंक्य व प्रबळ लंकाबेटांत असल्या या माकडांची काय मात्रा चालणार ? मारे झोडपून टाकला असेल कोणी ?

**विप्र**——नाहीं बुवा. तसं कांहीं झालं नाहीं, उलट त्या माकडानं तुमच्यासारख्यानां यथेच्छ झोडपतांना मात्र आम्हीं पाहिलंय-कां असंच ना ?

**सर्व**——(ओशाळून) नाहीं नाहीं. असंच कांहीं नाहीं—पण मी काय विचारीत होतों पहा हो—आठवलं आज म्हणे रामेश्वराच्या किनाऱ्यावर माकडांची सेना—

**विप्र**——किती ? (भेदरतो.)

**सर्व**—अगणित अशी येऊन धडकली. प्रत्यक्ष मी पाहिली. कां ? असे भेदरलात कां ?

**विप्र**—हो हो. आम्हीं काय भित्रे आहोंत वाटतं ? (स्व.) तो माकडाचा प्रसाद आठवला कीं पायजम्याची हूं: ! ती हकीकत या मूर्खाला कशाला सांगा ? गुप्त अपमान, गुप्त मुष्टीमोदक, गुप्त चापटपोळ्या नेहमीं गुप्त तिजोरीत गुप्तच ठेवल्या पाहिजेत.

**सर्व**—कांहो तोंड उतरलंसं ?

**विप्र**—छेः छेः तशांतला कांहीं प्रकार नाहीं. येऊं द्या त्या माकडानां तर खरं, मग पहातों त्यांचा समाचार. येतो आतां. रावणं वन्दे. (जातांना.) मी फक्त एका माकडाला भितो, लाखों माकडांना भितो कीं काय ? (जातो.)

**विप्र**—(दूर पाहून) हां ! ही चांगली शिकार आली हातांत. आतां आपली दूतगिरी चांगलीच गाजविली पाहिजे.

(मदिराक्षी वेश्या मदिरापात्र घेऊन प्र. क्र.)

**सर्व**—कायग ए गांवभवानी ? दरबारची वेळ तुला ठाऊक नाही वाटतं ? तुला बोलावण्यावर बोलावणी करायला तुझ्या बापाचा मी नोकर आहे वाटतं ?

**मदिराक्षी**—कां ? एवढं खेंकसायला काय झालं ? मेल्या माझ्या बापाचा नोकर नाहींस पण ज्याच्या नोकरीवर पोट जाळतोस त्याचा तर नोकर आहेस ना ? चल हो पुढं. ही मी दरबारांतच चालल्यें. (जाऊं लागते.)

**सर्व**—अहो-अहो तडफडाबाई-अहो मुरकाबाई-अहो मधुर नरड्याच्या लालबुंद डोळ्याच्या मदिराक्षीबाई इकडं या इकडं या आधीं.

**मदिराक्षी**—काय रे मेल्या ? काय म्हणतोस ?

**सर्व**—आतां दरबारांत जाऊन सभामंडपाच्या खांबापुढं गाणार नाचणार वाटतं ?

**मदिराक्षी**—(घाबरून) म्हणजे ?

**सर्व**—म्हणजे काय ? दरबार कधींच आटपला. तूं दरबारांत हजर नव्हतीस म्हणून प्रहस्थ प्रधानजीची तुझ्यावर अगदीं खप्पा मर्जी झाली आहे.

**मदिराक्षी**—खरंच का हें ?

**सर्व**—खोटं असेल तर मेल्यावर माझे डोळे फुटतील.

**मदिराक्षी**—मग आतां ?

**सर्व**—आतां काय ? माझ्या म्हणण्याप्रमाणें करशील जिवंत तर राहशील. नाहीं तर त्या प्रहस्थ प्रधानजीच्या शिक्षेच्या तडाक्यांतून तूं सुटायची नाहीस.

**मदिराक्षी**—सर्वभक्षे, मी तुझं काम करतें पण–

**सर्व**––आतां ' पण ' जाऊं दे. मला त्या तुझ्या यांतला एक मधुर घुटकादे. राजकीय मदिरा भारी गोड असतें ह्मणे ?

**मदिराक्षी**––ही हे. (ओतूं लागते.)

**सर्व**––ऊंः हू ! मला तशी नको. मी आतां होतो रावण नि तू आपली मदिराक्षीच रहा. (राजाचें अवसान आणून ऐटींत बसतो.) हा पहा मी दरबारच्या सिंहासनावर बसलों. (स्व.) आह्मांसारख्या हलक्या दर्जाच्या दूतांनां वाटेल त्याला वाटेल ती थांप मारून वाटेल तसा गंडा घालतां येतो तो असा. (उ.) हंः ! हा पहा मी आतां रावण झालों. आतां तूं मुरका मारून मारून, पैंजणाच्या नादावर छुम छुम नाच नाचत गात गात मद्याचे पेले दे पाहूं ?

**मदिराक्षी**––एकच पेला मिळेल.जास्त नाहीं.

**सर्व**––(तीन बोटं दाखवून) निदान दोन तरि दे. (राजाप्रमाणें मोठा आवाज काढून) हे कलावंतिणी, नृत्य गायनानं आमचं सुमन सुशांत कर.

**मदिराक्षी**––जी सरकार

**सर्व**––हे मदिराक्षी, राजकीय मद्याचा तो हंडा आमच्या नरड्यांत सगळाच्या सगळा ओतून तृषा ऊर्फ तहान शांत कर, असा आमचा हुकूम आहे.

**मदिराक्षी**––जी सरकार–(गाते व नाचते.)

**पद.** (जो पिया आयेना.)
**मधुर वारुणी ।। स्वर्ग सौख्यास देइं नरा प्राशनीं ।।**
**तरुण जाया युवा जैं प्रिया ही जनीं ।। धृ. ।।**
**निधिमंथनिंचें अमृत तया शक्ति नसे ।। सुरा मुक्ति**
**नरा देइं करा श्री भासे ।। तरुणिनयना हिची उपमा ।।**
**कवीकल्पना देतसे जनीं ।। १ ।।**

(सर्वभक्षी रंगात येऊन तिच्याबरोबर नाचूं लागतो. तोंच विप्रभक्षक येऊन त्याला लाथ मारतो. मदिराक्षी पळून जाते.)

**विप्र**––मूर्खा, तिकडं दरबार भरलाय आणि तूं इथं बसलास फाजीलपणा करीत ? चल ऊठ.

**सर्व**––गाढवा, एकदम येऊन लाथ मारलीस ? शरम नाही वाटतं ? राग आला होता तर दोन चार थोबाडींत मारायच्या होत्यास. पण लाथ मारलीस म्हणजे काय ?

**विप्र**––चल हो पुढं ?

**सर्व**––तूं हो मागं ?

(जातात)

---

## अंक प्रवेश ३ रा. तिसरा.

**स्थळ :** रावणाचा दरबार.

**पात्रें :** रावण, प्रहस्थ, मंत्री, इंद्रजीत, बिभीषण.

(कलावंतीणीचा नाच झाल्यावर दूत प्रवेश करतो.)

**दूत**——महाराजाधिराज रावण त्रैलोक्यपतीचा जयजयकार असो.

**इंद्रजीत**——कायरे दूता, काय बातमी ?

**दूत**——महाराज, अपार वानरसेना जमवून अयोध्येचा राम सागराच्या पलिकडे रामेश्वराच्या किनाऱ्यावर उतरला असून तो आपल्या लंकेवर लौकरच स्वारी करणार आहे. रावणं वन्दे.(जातो.)

**रावण**——असं आहे काय ? बरं आहे. प्रबळ लंकापतीच्या बलाढ्य शक्तीशीं विरोध करण्यात आणि अयोग्य स्थितींत आमच्या थोर खुशीच्या विरुद्ध जाण्यांत किती मूर्खपणा असतो, हें त्या मानवी रामाला आतां चांगलं कळलंच पाहिजे. दरबारस्थ मंडळी, ही बातमी तुम्ही ऐकलीच आहे. आणि जरी आमची सैन्यशक्ती अत्यंत प्रखर आहे, तथापि सर्प व अग्नी यांचा विश्वास कोणी द्यावा ? श्रीविरुपाक्षाच्या कृपेनं हें लंकापद आम्हाला प्राप्त झालं आहे आणि तें अजिंक्य आहे याबद्दल आम्हांला फार अभिमान वाटतो. त्या विघ्नसंतोषी मर्कटांचा पुढारी तो मानव राम सहपरिवार आकळला जाऊन तो या रत्नजडीत सिंहासनाला शरण आला पाहिजे असा मंत्र तुम्ही शोधून काढा. त्या मर्कटानं सर्व लंकानगरी जाळून ही वानरसेना चिथावून आणली आहे.

**प्र. प्रधान**——महाराजाधिराज, मानवी सेनापतीच्या सेनापतित्वाखालीं ती मर्कटसेना लंकाद्वीप आमच्या वर स्वारी करणार काय ? विरूपाक्षाचीच कृपा म्हणून हें भक्ष आयतेच आमच्या तोंडात येऊन पडत आहे. राजाधिराज, आपण तिळमात्रही फिकिर करूं नये. त्या माकडांना या लंकाद्वीपाच्या किनाऱ्यावर पाऊल तर ठेऊं द्या की रावणसाम्राज्यरक्षक प्रबळसैनिकांचा प्रताप त्यानां चांगलाच कळेल.

**इंद्रजीत**——यांत काय संशय ? सिंहाच्या भयंकर गर्जनेपुढें या मंडुकांच्या मंडुकध्वनींची प्रतिष्ठा ती काय ? त्रैलोक्यपती बलाढ्य लंकापती कोणीकडे आणि त्या माकडांच्या माकडचेष्टांवर विश्वास ठेऊन नसता उपद्याप करणारा मानव राम कोणीकडे ? मशकांसारखा चिरडून टाकू.

**बिभीषण**——वाः ! काय सांगावा तुमचा पराक्रम ! पराक्रमाची बढाई करताना जिव्हेला कांहीं श्रम पडत नाहींत, पण कृतीची वेळ आली की हीच वाचाळता वेळी फिक्की पडते, समजलात ? कपटी दुर्जनांनों, या दशमुखांभोंवतीं जमून नसतों वितंडवाद व कुतर्कावर कुतर्क लढवितों याची तुम्हाला शरम कशी वाटत नाही ? अयोध्येच्या त्या राजपुत्राला सर्व सेनेसह म्हणे मशकासारखा चिरडून टाकूं. इतक्या प्रबळ शक्तीचे महासागर जर तुम्हीं होतात, तर त्या कालच्या माकडानं एवढा प्रळय केला त्याचा रोमसुद्धां कां वांकडा करविला नाही ? सगळ्या लंकानगरीचा विध्वंस केला रावणाची सभा नग्न करून तिला दाही दिशा पळायला लावलं आणि असंख्य राक्षससैन्य कांडून कुटून फस्त केलं त्यावेळी आपण डोळे झांकून बसला होतात वाटतं ? आता दिमाखाच्या गोष्टी सांगण्यांत आणि पराक्रमाची थोरवी दाखविण्यांत दरबारांतमात्र मोठे पटाईत. मदांध रावणा ! तूं लंकेचा राणा आहेस, मोठा बलवंत आहेस, त्रैलोक्यपती म्हणून नित्य तुझ्या वल्गाना चालतात. पण यावेळेस तरी अपाहार बुद्धीचा त्याग करून या बिभीषणाचे चार शब्द ऐक.

**रावण**——राजकीय सत्तेचा विरोध करणा-यांना माझ्या दरबारांतील प्रज्वलीत न्यायदेवता किती कडक शासन करते, याचा तूं-बिभीषणा-प्रथम नीट विचार कर ; आणि नंतर या रावणानं कोणाचं काय अपाहार केलं आहे हे सिद्ध करून दाखविण्याची तयारी कर.

**बिभीषण**——शहाणे लोक ज्या गोष्टी लपवून ठेवतात त्या मला स्पष्ट बोलून दाखविल्या पाहिजेत आणि ज्यामुळे मोठमोठ्यांच्या मनाला विषाद वाटेल अशा ख-या ख-या हकिकती मला उघड केल्या पाहिजेत. रावणा, एवढा मोठा प्रचंड सागर उल्लंघून, पुष्पक विमानाच्या द्वारे तूं जो आर्यावर्ताच्या दंडकारण्यांत गेलास आणि केवळ कावेबाजपणाने व भिक्षुकीच्या ढोंगानं अयोध्यावासी राजपुत्राची पत्नी सीता तूं का पळवून आणलीस ? तुझ्या मदांध कामाची शांती करायला तुझ्या ऐंशी हजार बायका तुला पुरेशा नव्हत्या कीं काय ?

**रावण**——विरोधी विभीषणा ! ज्याच्या अंगांत पराक्रम आहे, ज्याच्या नसानसांतून शौर्य खेळत आहे आणि ज्याच्या हातात विजयी शस्त्र झळकत आहे तो वीर या भूलोकासच काय, परंतु त्रैलोक्यासही काबीज करील किंवा आम्हा सत्ताधारी राजकीय मनाची लहर लागल्यास हा अमर्याद विश्वविस्तार आमच्या दास्यत्वात येऊन राहिला पाहिजे. अर्थात आम्ही विजयी राजे सीतेसारख्या अनेक वनवासी दासींना सुखोपभोगाकरितां आमच्या रंगमहालांत आम्ही खेंचून आणूं. याच्या योग्यायोग्यतेबद्दल आणि पात्रापात्रतेबद्दल चर्चा करण्याचं विरोधी काम ज्याअर्थी तूं आपल्या शिरावर घेतलं आहेस त्याअर्थी त्या तुझ्या शिराचं अस्तित्व क्षणभंगुर झालचं आहे असं समज.

**बिभीषण**——सत्यासाठीं तुझ्या दरबारांत माझं शीर सुळावर लटकलं गेलं तरी मला त्यांत भूषणच वाटेल. मदांध राजा, तुला स्वतःच्या पराक्रमाची फार घमेंड आहे. सत्याचा पाठीराखा ईश्वर आहे हें उदात्त तत्त्व-दुर्मदा ! तुला कसं दिसत नाहीं ? क्षुल्लक कीटकाच्याही हक्काचं संरक्षण एका सर्व समर्थ जगन्नियंत्या प्रभूकडून केलं जातं. रावणा, कोणी एखाद्या वीरानं ही तुझी लंकानगरी जिंकून घेतली आणि त्यानं शौर्याच्या जोरावर तुझा राणीवसा बलात्कारानं भ्रष्ट केला–

**रावण**——चुप रहा. राजनीतीच्या आणि पराक्रमाच्या व्याख्या असल्या पाचकळ भाषेंत आम्हीं कधीही ऐकणार नाहीं.

**दरबारस्थ**——आमचेंही असेंच मत आहे.

**बिभीषण**——उन्मत्ता ! तूं तोंडाचा श्वान असून मनाचा हरिणाप्रमाणं भित्रा आहेस हें मी पूर्ण ओळखतों. राजाची हाजी हाजी करून आपल्या पोटाची वीतभर खळगी भरण्याच्या स्वार्थी कामांत पटाईत असलेल्या या तुझ्या तोंडपुज्या मसलतगारांच्या खुषामतीवर तूं आपल्या पराक्रमाची बळकटी आहे असं समजत असशील तर तो तुझा समज चुकीचा आहे. रावणा, एवढा मोठा बलाढ्य व पराक्रमी हिरण्यकश्यपू दैत्य. ज्याला प्रत्यक्ष विरूपाक्षाचा वर होता. आणि ज्या सूज्ञ दैत्यानं स्वतःला अमर करवून घेण्यासाठीं शंकरापाशीं एक बाणेदार व अटींचा वर मागून घेतला. त्याच दैत्याच्या पापाची रास आकंठ भरतांच, परमेश्वरानं नरसिंह अवतार धारण करून, प्रल्हाद पोराच्या भक्तीसाठीं सभामंडपाच्या खांबाला काडकन् दुभंग करून, शंकराच्या वराला कलंक न लावता, त्या हिरण्यकश्यपूचीं पापपूर्ण आंतडी कांतडी कशी लोळवली याचा कांहीं विचार कर. अधर्मानं आणि अनीतीनं वर्तन करणाऱ्यांना नेहमीं अशीच दुर्गती मिळणार.

**रावण**——बिभीषणा, त्या मूर्ख हिरण्याकश्यपूची अक्कल आणि या रावणाची योग्यता तूं एक समजतोस कीं काय ? ज्या षंढाला शंकरापासून अमर होण्याचा वर नीटपणें मागून घेतां आला नाहीं, त्याच्या बाणेदारपणाबद्दल-मूर्खा-कशाला माझ्यापुढें थोरवी गातोस ? एक इच्छामरणाचा आशिर्वाद मागितला असता तर अवेळीं अवतार घेण्याची त्या नरसिंहाची काय छाती होती ? परंतु बिभीषणा, लक्षांत ठेव. या त्रैलोक्याचा अधिपती मी आहे ; शस्त्रास्त्रांत प्राविण्य पटकविणाऱ्या शूर धनुर्धरांचा नायक मी आहे आणि या भूगोलावरील चलाचल स्थावर जंगमावर हुकमत चालविणारा राजाधिराज मीच आहे. सीता हरण करण्याला मला कोण प्रतिबंध करू शकतो ?

**बिभीषण**——कोण प्रतिबंध करणार ? दुर्मदा ! तेहतीस कोटी देवान तूं बंदींत ठेवलं आहेस म्हणून अंतकाळीं तुझा सूड घ्यायला एक विश्वशक्ती या तुझ्या लंकाद्वीपाच्या

सभोंवार मोठ्या आतुरतेंने फिरत आहे हें पक्कं ध्यानांत ठेव. राजा, तुझ्या अधर्माची व पातकांची रास दिवसेदिवस चढत्या कळेवर आहे याचा कांहीं विचार कर. नाहींतर या हांजीहांजीखोर लुब्धा मंत्र्यांच्या खुषामतीला तूं बळी पडल्याशिवाय खास राहणार नाहीस.

**इंद्रजीत**——विरोधी घरभेद्या नरपशो ? आम्हाला ज्यांत सौख्य आहेसं वाटतं तें तें आम्हीं केल्याशिवाय खास राहणार नाहीं. या आमच्या इच्छेला अगणित बळी पडले तर पडोत ; परंतु आमच्या मानसिक महत्वाकांक्षा आंवरून धरण्याची आमची खुषी होणार नाहीं.

**रावण**——या लंकानाथाच्या ऐश्वर्याचें तेज पाहून सूर्य खालीं मान घालून माझा दास झाला आहे. देवदिदेवांना नोकरासारखें राबवून नवग्रहांच्या उरावर पलंग ठेऊन त्यावर निद्रा करणारा मी रावण बलवान आहें. त्या विघ्नसंतोषी माकडांच्या वतीनं शुष्कवाद करणा-या तुझ्यासारख्या घरभेद्या वकिलाच्या वितंडवादाला आम्ही कस्पटाप्रमाणें लेखतों.

**बिभीषण**——राज, तुझ्या सा-या गर्वोक्तीचं पाणी होऊन तूं रसातळाला जाणार, हें तुझ्या भालप्रदेशी लिहिलेलं. मला स्पष्ट दिसत आहे.

**रावण**——बिभीषणा, ज्या या रावणानं एवढें चौदा चौकड्याचं राज्य कमावलं तें विचार करूनच कमावलं आहे. या रावणाच्या हातात चाप आला नाहीं तोंपर्यंत वाटेल त्यांनीं आपल्या धनुर्शक्तीची थोरवी गात रहावी. भरसमरांगणांत माझ्या सर्व सैन्याचा जरी चुराडा झाला, तरी अखेरीस हा एकटा रावण सर्वांना पूर्ण अजिक्य आहे हें तुम्हा सर्वांच्या दृष्टोत्पत्तीस आल्यावांचून राहणार नाहीं.

**बिभीषण**——रावणा, तुझं वैभव अबाधित रहावं, अशी माझी मनापासून इच्छा आहे व याबद्दल मला जितका आनंद व अभिमान वाटेल तितका दुस-या कोणत्याही गोष्टीपासून वाटणार नाही. परंतु शहाणा असशील तर तो रामवीर सागर तरून इकडं आला नाहीं, तोंच त्याची स्त्री त्याला परत नेऊन देऊन तुझा आणि तुझ्या लंकाद्वीपाचा बचाव कर. इंद्रजीता कृतघ्ना, तूं आपल्या दृष्ट मतीनं या रावणाला पूर्ण घेरलं आहेस. पण तूंही ध्यानांत धर-पूर्ण लक्षांत ठेव की चोरांनीं कपट केलं म्हणून त्याचे वाडे कधीहिं वसत नसतात.

**रावण**——अरे जा. त्या मानवी रामाची प्रतिष्ठा ती काय ? तुझ्या या दर्पोक्तीची भीती बाळगून त्या सीता सुंदरीला त्या नीच रामाकडे परत पाठविण्याइतकी या बलाढ्य रावणाची शक्ती क्षीण झाली नाही. सीतेच्या प्रफुल्ल सौंदर्यपुष्पाचा आम्ही पूर्ण स्वाद घेणार. तिच्या यौवनोपवनांत आम्ही स्वच्छंद विहार करणार. कालांतरानं त्या सीतासुंदरीचा यौवनभर पूर्ण नाहींसा होऊन ती माझ्या शिथिल आलिंगनापूसून मुक्त झाल्यावर, माझी महत्वाकांक्षा पूर्णतेस पोहचली म्हणून जो महोत्सव साजरा करण्यांत

येईल, त्यावेळी कृपादृष्टी म्हणून तिची मुक्तता झाली तर होईल. या गोष्टीसाठीं हे भव्य आकाश जरी मजवर कोसळून पडलं, तरी या माझ्या बाहुबलांत इतकी प्रचंड शक्ती भरली आहे, की एका हातानं त्या आकाशाला झेलून धरून दुसऱ्या हाताच्या मुष्टीनं रामाचं शीर शतचूर्ण करीन; आणि नंतर अनंत काळपर्यंत जानकीच्या समागमाचें सौख्य हा लंकापती भोगणार, हे सर्वांनीं पूर्ण ध्यानांत ठेवावं.

**बिभीषण**––आणि दुष्टानों, हेंहिं लक्षांत ठेवा कीं, आपल्या प्रखर तेजानं नभोमंडळाच्या मध्यभागी चमकत असलेल्या ज्या सूर्यनारायणानं या बिभीषणाचा भरदरबारांत अपमान झालेला आज पाहिला, त्याच आरक्त भास्कराला हें लंकेचें संपूर्ण राज्य केवळ अनीतीच्या व अधर्माच्या प्रवृत्तीनें लयाला गेलेलं पहाण्याचा प्रसंग खास येणार. (निघून जातो.)

**भाट**––दरबार बरखास्त

## अंक तिसरा समाप्त

# अंक चवथा.



## प्रवेश १ ला.

(अंगद प्रवेश करतो.)

**अंगद०**--

**पद.** (मन परदेशी०)

**कैवल्यदानीं रामीं रमो । मन ।। धृ० ।।**
**मृगजलवत इहलोकिं भास ती आस सुखाची**
**कां धरितां ।। सर्व सौख्य परमेशपदीं त्या**
**विस्मरणीं जन हा न भ्रमो ।। १ ।। सर्व मुक्तिचा**
**आगर सागर करुणेचा श्रीराम गमे ।। रामचिंतनीं**
**भवभय चिंता पार हरे तच्चरणिं रमो ।। २ ।।**

(रामेश्वराचा समुद्र किनारा, राम, लक्ष्मण, मारुती, जांबुवंत, सुग्रीव आणि वानरसैनिक बसले आहेत.)

**अंगद०**--जय जय रधुवीर समर्थ.

**राम०**--अंगदा ये बैस.

**अंगद०**--महाराज, त्या रावणाकडून कोणी एक राक्षस राजपुत्र आपल्या चार प्रधानांसह आला आहे. तो ह्मणतो मी रावणाचा बंधू बिभीषण असून सीतावल्लभाला शरण आलों आहें. हें त्याचं विनंतीपत्र. (पत्र देतो.)

**जांबुवंत०**--हे कार्यसाधू राक्षस पत्र पाठवितील, वेषांतरं करतील, सर्व कांहीं करतील. वेळ पडली तर एकाद्याच्या पायांवर गडबडां लोळण घेतील. पण यांचा कावा फार निराळा असतो. अंगदा, त्या राजपुत्राला जाऊन साफ सांग कीं आह्मीं तुझ्या या पत्राच्या भपक्याला भुलून हुरळे होणारें नव्हे. अरे पोरांनो, या बेट्याचा कावा तुह्मीं नाहीं ओळखलात ?

**अंगद०**——तो कोणता आजोबा ?

**जांबुवंत०**——कोणता ? अरे बाबा तो फार निराळा आहे. रामचंद्रानं, त्या वालीला मारून या सुग्रीवाला त्याच्या जागीं स्थापन केलं आणि वालीची पत्नी पतिव्रता तारा याला दिली. हें कर्णोपकर्णी ऐकून हे प्रजापती लंकेहून येथें आले आहेत. येऊन भेटून सांगायचं काय ? तर माझ्या वडील बंधूला ठार मारा आणि त्याच्या राज्यासनाबरोबर त्याची बायकोहि मला वापरायला द्या. उठले आपले सोळभोक कीं आले दर्शनाला. मी तर स्पष्ट असंच म्हणतो कीं लंकाबेटांतील या बेट्या कार्यसाधू राक्षसांना आपल्या या भूमीवर पाऊल सुद्धां ठेऊं देऊं नये.

**अंगद०**——मलासुद्धां असंच वाटतं. कारण असं पहा, आपत्कालीं प्रत्यक्ष वडील बंधूचा धाकट्या बंधूनीं त्याग करून उलट त्याच्या शत्रूलाच शरण यावं, यांतच कांहीं विशेष आहे. तशांत या लंकेंतल्या राक्षसांवर विश्वास ठेवायला आतां तिळमात्रही जागा नाहीं.

**राम०**——तें सारं खरं अंगदा. पण अशा वेळीं कोणत्या धोरणाचा स्वीकार करावा हेंच मला समजत नाहीं. कारण——

**पद.** (प्रभो अनाथ ०)

**भ्रमें मदीय मानसा । विवेक त्यागितो कसा ।। धृ० ।।**
**दर्शनोत्सुका जनांस । नच देतां दर्शनास ।।**
**ब्रीद जाइ तें लया कलंक ये कुला असा ।। १ ।।**
**दैव साध्य ज्यास नसे । प्रतिकुल त्या विश्व असे ।।**
**सुफल कार्य विफलसे यशास विमुख तो जसा ।। २ ।।**

**अंगद०**——परंतु रामचंद्रा, सांप्रतचा प्रसंग बसल्या बैठकीवर नैतिक तत्त्वांची चर्चा करण्याचा नसून, आपण सर्व युद्धाला तोंड देण्यासाठीं निघालों आहोंत. अशा वेळीं या शत्रूच्या राजपुत्रांशीं गांठ घेतांना श्रीरामानीं विशेष खबरदारी घ्यावी.

**जांबुवंत०**——त्याची गांठच घ्यायची असेल तर त्या कामीं अस्मादिकांची योजना व्हावी. अगदीं अश्शी जखडून बांधतो कीं हूं: !

**लक्ष्मण०**——मला वाटतं कीं या कामीं हनुमंताचा सल्ला विशेष ग्राह्य होईल. कारण लंकेंतली पूर्ण माहिती जर कोणाला असेल तर——

**जांबुवंत०**——तर ती या बेट्या मारुतीलाच आहे. कायरे मारुती, हा कोणरे घरभेद्या ?

**मारुती०**——तुमचे सगळ्यांचे तर्कवितर्क संपले ना ?

**जांबुवंत०**——तर्क वितर्कांचा एक कणहि शिल्लक नाहीं.

**मारुती०**——श्रीरामा, मी सर्व लंकानगरींत प्रळय करीत असतांना——

**पद.** (तों तननन वाजवि०)

**श्रीहरिहरपदिं नित नत जो ॥**
**श्री विष्णुभक्त सात्त्विक जो ॥**
**हा बिभिषण नरवर । जोडुनि द्वय कर ।**
**शरणांगत तुज । त्यागुं नये त्या ।**
**विमल प्रभूश्री गाजो ॥ १ ॥**

**राम०**——असं आहे ना ? ठीक. काहीं हरकत नाहीं. अंगदा, बिभीषणाला योग्य आदरसत्कारानं घेऊन ये. जा ? (अंगद जातो.)

**जांबुवंत०**——त्याला आदरसत्काराची व्याख्या नीट समजावून सांगा हो. नाहींतर बिभीषणाला स्वागताच्या ऐवजी मुष्टिमोदकांचा फराळ यथेच्छ लाभायचा. बाकी तो मोठा हुशार आहे बेटा.

[बिभीषण व अंगद प्रवेश क०]

**अंगद०**——हे आमचे श्रीरामचंद्र.

**बिभीषण०**——[साष्टांग नमस्कार घालून] श्रीरामचंद्रा तुझा जयजयकार असो.

**राम०**——[त्यास उठवून] बिभीषणा, सांप्रत आह्मी कोणत्या कृत्यांचे डावपेंच लढवीत आहोंत, हें जर तुह्माला कळेल तर अशा स्थितींत आह्मी तुमची—प्रत्यक्ष शत्रूच्या बंधूची—भेट घेणं फार धोक्याचं आहे. तथापि तुमची माझ्या ठिकाणीं असलेली दृढनिष्ठा न् त्याबद्दल या आमच्या विश्वासू मारुतीनं दिलेली हमी पाहूनच मी फार संतोषानं तुमची भेट घेतली.

**बिभीषण०**——श्रीरामा, भगवद्भक्त मारुतीचं दर्शन मला लंकेंतच झालेलं आहे. परंतु आतां——

**पद.** (भला जन्म हा०)

**सुरतरुसम हें दर्शन लाभे पुनित तुझें तें मला ॥**
**मोक्ष हा इहजन्मीं लाभला ॥**
**लोहसम हा देह स्पर्शितां परिसासम पाऊलां ॥**
**स्वर्णता स्वयेंचि तो पावला ॥**
॥ चाल ॥ **मग काय उणे तें भक्तजनांना जनीं ॥**
**तव मूर्ति वंद्य ही विहरत नित मन्मनीं ॥**
**भव ताप पाप तें विलया गेले झणीं ॥**
**असो शिरीं या नत भक्ताच्या प्रसादकर हा भला ॥**
**मोक्ष हा० ॥ १ ॥**

——सत्याच्या सिद्धतेकरितां आणि धर्मराज्याच्या स्थापनेकरितां मी त्या उन्मत्त व अविचारी रावणाचा पक्ष सोडून तुला शरण आलों आहें. [पायां पडतो.]

**राम०**——[त्यास उठवून] बिभीषणा ऊठ.——

**पद.** (धरजाने दे०) **कानडा.**
**तुज गणुनि बांधवासम मी । शरणांगत तुज् मरण द्यावया।**
**कुमति न उपजे रामीं ।। धृ ।। हनुमंतासम चिरायु होई ।**
**नृपती-वैभव-सौख्यहि घेई ।। कृपाकटाक्षें या मम जोंवरि**
**रविशशि अंबरधामीं ।। १ ।।**

——आंता रावणासंबंधीं म्हणाल तर पुढें ओढवणारीं सर्व भावी संकटं तो आतांहि टाळूं शकेल. परंतु ज्याच्या उन्मत्तपणाची व अधर्माची पायरी आतां कळसाला जाऊन भिडली आहे, त्याला उपदेश करण्याचें धाडस कोणीहि करूं नये. वास्तवीक पहातां लंकाद्वीप आणि आर्यावर्त यांत वैरभाव येण्याचं कांहींच कारण नव्हतं.

**जांबुवंत०**——हो कांहींच कारण नव्हतं. लंकाबेटांतले लोक लंकेंत यथेच्छ भोजन करीत होते आणि आर्यावर्तांतहि मेजवान्यांना कांहीं खंड नव्हता. पण तें व्हावं कसं ?

**लक्ष्मण०**——तसंच रावणमहाराज आपल्या जगविख्यात पुष्पक विमानाच्या द्वारें सर्व भूगोलावर संचार करीत होते. त्याचप्रमाणं आर्यावर्तालाहि त्यांची स्वारी अनेक वेळां होत असे. सीताहरणाचा अक्षम्य गुन्हा न करितां——

**जांबुवंत०**——आणि तोहि भिक्षांदेहीच्या कावेबाजपणानं.

**लक्ष्मण०**——हो न करतां आर्यावर्तांत त्यांनीं आपला संचारक्रम अव्याहत सुरू ठेवला असतां, तर त्यांस कोणीहि प्रतिबंध केला नसता. आता सीतामुक्तीच्य भावी युद्धानंतर कोणताहि रावणवंशज या रामेश्वराची मर्यादा उल्लंघूं म्हणेल तर तें कदापि होणं नाहीं.

**बिभीषण०**——त्याच्या नशिबांत असेल तसं होईल. आतां सागरोल्लंघन करून सर्व सैनिक लंकेंत पोंहचविण्याकरितां समुद्राची प्रार्थना करून मार्ग मागावा.

**राम०**——ठीक आहे. लक्ष्मणा, येथें दर्भासन तयार कर पाहूं ?

**लक्ष्मण०**——आज्ञा. [तसें करतो.]

**राम०**——[त्यावर उभे राहून].

**पद.** (श्रीरामीं मना०)
**दे सगरसुता मज मार्ग अतां ।। धृ ।।**
**सत्य सुधर्मा स्थापन करण्या ।**
**सिद्ध असे मज तारक तूं मज पालक तूं ।**
**यश देइं अतां ।। १ ।।**
**जनकसुता ती बंधनिं पडली ।**
**मानवते नच दुष्ट कृती सुजनांस कधीं ।**
**तिज मी हरितां ।। २ ।।**

(ध्यानस्थ बसतो. इतक्यांत शुकराक्षस प्रवेश करितो)

**शुक०**——अहो, येथें कोणी सुग्रीव नांवाचा सेनापती आहे का ?

**जांबुवंत०**——कांहो ? अहो कोळशांतले माणिकराज ? त्यांच्याशीं आपलं काय काम आहे ? हा बेटा लंकेंतल्या राक्षसांपैकीं दिसतो. एक सीता पळवून नेऊन आम्हांला नसत्या उपद्व्यापांत पाडलयं, आतां आणखीं एखादी सीता पळवून नेण्याचा याचा विचार आहे कीं काय ? आपापल्या सीता संभाळा रे बाबानों ! बाकी सध्यां म्हणा आपण सडेसोटच आहोंत. अरे ए सुग्रीवा, हा तुला कोण भेटायला आलाय पहा. दुरूनच भेट हो.

**शुक०**——सुग्रीवा, तुला रावणाचा एक निरोप आहे.

**सुग्रीव०**——कोणाचा ? रावणाचा ? तो रे कां बाबा ? रावणाचा माझा काय संबंध ?

**शुक०**——वाः असं कसं ह्मणतां ! रावण तर तुला प्रत्यक्ष बंधू समजतो.

**जांबुवंत०**——केव्हांपासून रे ! बिभीषण इकडं आल्यापासून कीं काय ?

**शुक०**——छेः छेः त्याच्या आधींपासून. रावणानं आग्रहानं तुला सांगितलंय कीं तुझं हें अगणित सैन्य घेऊन तूं या रिकामटेंकड्या रामाच्या नादीं कशाला लागलास ? आम्ही जानकी पळवून आणली ती कांहीं तुझी बायको नाहीं. मग त्या भानगडींत तुला पडण्याचं कांहीं कारण नाहीं.

**सर्व सैनिक०**——संधीविग्रह ? संधीविग्रह !!

**मारुती०**——या संधीविग्रहाली आतांच जमीनदोस्त केला पाहिजे. संधिविग्रहाचं विष फार भयंकर असतें. सुग्रीवा, तूं हो बाजूला. मी देतों याला याचं उत्तर. अहो दूत, लंकेंतले तडाखे विसरलात वाटतं ? प्रसाद देऊं का ?

**शुक०**——कां ? फारशी धमेंड चढली आहे ? त्या रावणाचा तडाखा विसरलास वाटतं ? गोड गोड बोलावं तर तुम्हांला कडू लागतं नाहीं का ?

**जांबुवंत०**——तोंडाची व जिभेची रुचीच बदलली आहे. ती रुची रावणाचा वध होऊन सीतामुक्तीच्या मेजवानींत पुन्हां ताळ्यावर येईल. एरवी नाहीं.

**शुक०**——अरे गप बैस थेरड्या. रावण राहिला लांब, पण त्याचा दूत हा शुकराक्षस स्वतः तुमच्या——

**सुग्रीव०**——[त्याचें नरडें पकडून] स्वतः तुमच्या उरावर बसून–[ठोसा मारून ठार करून प्रेत दूर फेंकतांना] जा आपल्या बापाच्या घरीं.

**सर्व सैनिक०**——जय जय रघुवीर समर्थ.

**राम०**——[समाधी उतरून] काय ? हा समुद्र अझूनही मार्ग देत नाहीं ?

**जांबुवंत०**——प्रसाद पाहिजे असेल.

**राम०**——आतां तीच योजना—

**पद.** (चमकताची भासते)
**सगरजा ! तव थोर पितरां जाणुनी मी मन्मनीं ॥**
**विनविलें बहु आदरें अवमानिशी धिःकारुनी ॥**
**पसरि आतां गरलसम तव क्रुद्ध जल सर्पाकृती ॥**
**गरुड-बाणा साहि आतां नीच जलधे ! दुर्मती ॥**
**जाणसी नच तूं मदांधा ! कोण तुजला प्रार्थतो ॥**
**श्रेष्ठ रघुकुलवीर राघव नष्ट करि तुज या क्षणीं ॥ १ ॥**

——[धनुष्यावर बाण लावून] हा बाणरूपीं वडवानळ तुला हां हां म्हणतां शोषून टाकील. नाहींतर हा चाप अगस्ती तुला एका आचमनानेंच गट्ट करील. बोल ? कोणता मार्ग स्वीकारतोस ? तूं इतका क्षुब्ध होऊन या रघुवीराला जो त्रास देऊं पहात आहेस, तेव्हां तुझ्या उन्मत्तपणाला योग्य तेंच शासन मी करितों. उन्मत्तपणाची नुसती छाया दिसतांच तिची ताबडतोब नांकठेंची केली पाहिजे.

[समुद्र स्त्रियांसह उत्पन्न होतो.]

**समुद्र व स्त्रिया०—पद (साग साग सागम मगरिसा०)**
**शांती शांती शांती झणि वरि । शांती शांती शांती हृदिं**
**धरि ॥ शांतवि हृदया या समया । नत तव पदिं हा**
**राया ॥ धृ ॥ होतो उसळत स्वाभाविक मम धर्मापरि**
**करि नच क्रोधा ॥ अपमानें नच निंदियलें ॥ शरणा नच**
**दे मरणा या ॥ १ ॥**

**राम०**——सागरा तुला क्षमा आहे. परंतु धनुष्यावर चढलेल्या बाणाची काय व्यवस्था करूं ?

**लक्ष्मण०**——तो कधींहि परत घेतां यावयाचा नाही.

**समुद्र०**——राघवा—

**ओवी**
**पश्चिम दिशेला मरु नामें दैत्य ॥**
**जो माझ्यांतील जलचरें भक्षित ॥**
**गोब्राह्मणा नित्य छळित ॥**
**त्यावरि सोडीं रामबाणा ॥ १ ॥**

**राम०**——दुष्टाचे पारिपत्य आधीं केलंच पाहिजे [बाण सोडतो.]

**समुद्र०**——राघवा, मी तुझें जामातासमान पूजन करितो. या रत्नालंकारांचा व वस्त्रांचा स्वीकार करून या वनवासी वल्कलांचा त्याग करावा.

**सर्वजण०**——सागरा तुझे आमच्यावर अनंत उपकार आहेत.

**समुद्र०**——आतां असं करा——

**साकी**
**सेतु बांधुनी नळकपिकरिं तो सुखरुप लंका पावा ॥**
**देवदानवा दास्यमुक्त ते करुनि सत्यजय दावा ॥**
**सीतादर्शन तें ॥ होवो झणिं मज पावन तें ॥**

**सर्व०**——तथास्तु——तथास्तु.

---

अंक चवथा.

## प्रवेश २ रा.

**स्थळ :** लंकेंतील रस्ता.

**पात्रें :** रावण, अरण्यपंडीत.

**रावण०**——(प्र० क०) माझा वैरी अयोध्येचा वनवासी राजपुत्र आपली निःशस्त्र सेना घेऊन माझा पराभव करण्याच्या कोत्या व पोकळ ईर्षेनं इथें येऊन दाखल झाला. काल सायंकाळीं चंद्रोदयाची लीला पहात मी माझ्या राजमंदिराच्या सज्जावर बसलों असतां, त्या नीच लक्ष्मण कारट्यानं बाण मारुन. माझ्या मस्तकावरचा मुकुट खालीं पाडला. परंतु त्याला हें काय माहीत——

**पद** (आजवरी जनक०)

**स्पर्शसुखा तळमळती कितिक किरिट ते ॥**
**रत्नजडित लभ्य न जे शचिपतीस ते ॥ धृ० ॥**
**विश्वपती नृपतिपदीं दासि इंदिरा ॥**
**नादिनान्त वैभव नच ज्ञात पामरा ॥**
**ईशकृपापात्र असति श्रेष्ठ नृपति ते ॥ १ ॥**

(अरण्यपंडित प्र. क.)

——कायरे अरण्यपंडीता, काय बातमी आणलीस ?

**अरण्यपंडीत०**——महाराज, आणखीं खबर ती काय असायची ? राम आपली प्रचंड सेना घेऊन या लंकाद्वीपांत येऊन दाखल झाला.

**रावण०**——अँः ! ही बातमी अगदीं शिळी सांगितलीस.

**अ० पं०**——वाटेल तर ताजी सांगतो. महाराजनां माहीत आहेच कीं माझी ज्या ज्या कामांवर आजपर्यंत नेमणूक होत गेली तीं तीं सर्व कामें मी अगदीं चोख करीत आलो आहे. त्याबद्दल मिळालेलीं सर्व प्रशंसापत्रें दरबारांत हजर करण्यासाठीं दहा हत्ती जोडलेल्या एका भल्या मोठ्या रथांत घालून आणणार आहे. आतां आपल्या नगरींतील शांततेसंबंधी म्हणाल तर तीहि अगदीं गारीगार आहे. ही रामसेना इथं आल्यापासून आपले पांच पंचवीस राजवाडे–कांही फार नाहींत, अगदींच थोडे–जमीनदोस्त झाले. हजार दोन हजार राक्षससैन्य कांडूनकुटून फस्त झालं आणि ठिकठिकाणीं आग लागणं, लुटालूट होणं वगैरे क्षुल्लक प्रकार माझ्या पाहण्यांत आले. बाकी जिकडं तिकडं शांतता आहे. महाराजांनी त्याची काळजीच करूं नये. सर्व लंकेत सर्व रहिवाशी अगदीं शांत आहेत.

**रावण०**——(स्व०) एकूण गोष्ट इतक्या थराला येऊन भिडली आं ? ठीक आहे. काही हरकत नाहीं. या सर्व प्रकारनं माझ्या दुराग्रहाच्या आगींत आतां जास्तच तेल ओतलं आहे. पाहूं आतां त्याच्या ज्वालांपुढे त्या मानवी रामाचा काय टिकाव लागतो तो ? अरण्यपंडिता ? (उ०) तो घरभेद्या बिभीषण रामाच्या पक्षाला जाऊन मिळाला हें खरंच का ?

**अ० पं०**——सूर्याच्या तेजाबद्दल आणि कोळशाच्या काळेपणाबद्दल जितकी सत्यता आहे, तितकीच या गोष्टीबद्दल आहे. महाराज, एक चार शब्द बोलतों याची माफी आपल्याकडून असेलच ?

**रावण०**——बोल काय बोलतोस ते ?

**अ० पं०**——महाराज मी आजपर्यंत खवळलेले समुद्रही पाहिलेत आणि खवळलेल्या खुनशी बायकाही पाहिल्यात, पण समुद्राच्या तुफानांत सांपडलेल्या नावाड्यापेक्षां खुनशी स्त्रियांच्या प्रेमीजनांची मला भारी कींव येते बोलूनचालून या बायका म्हणजे मूर्तिमंत पडछाया. यांना धरायला गेलं कीं त्या पळाल्याच. त्यांची मनधरणी करा की फुगल्याच त्या आणि त्यांच्याकडे कोणी ढुंकून पाहिलं नाही की त्या पुरुषांच्या मागं लागल्याच समजा गोंडा घोळवायला. त्यांतल्यात्यांत दोन बायका-एकीपेक्षां एक वरचढ-एका ठिकाणी असल्या की तेवढ्या जागेतील हवा गोठून तिचं बर्फ व्हायचंच.

**रावण०**——परंतु आज आपलं हे अरण्यपांडित्य चाललं आहे कशावर ?

**अ० पं०**——असल्या त्या सीतेसाठीं रावणमहाराज इतके उल्लू झाले असतील असं मला स्वप्नांतसुद्धां दिसलं नाही. पण आज तें प्रत्यक्ष पहाण्याचा योग आला.

**रावण०**——अरण्यपंडिता, आम्ही सत्ताधीश राजे असल्या बाष्कळ कविकल्पनांवर वाजवीपेक्षा फाजील विश्वास ठेवून आमच्या महत्वाकांक्षा पूर्ण करण्याच्या कामांत कधींही माधार घेत नसतों. या त्रैलोक्यांत जितक्या गोष्टी अशक्य भासतात तितक्या शक्य आहेत, हें सिद्ध करून दाखविण्यासाठींच या रावणाचा अवतार आहे, हें पूर्ण ध्यानांत ठेव. आमचीलहर लागल्यास–

**पद** (रामकरी जरि०)

**जंगमवस्तू स्थावरतेला ।। पर्वत त्यागिल तो जडतेला ।।**
**स्थूलत्वचि तें जनिं जलनिंधिला ।। तात्काळचि येई ।।१।।**
**सोडुनि प्रखरहि दाहकता ती ।। अग्नी सेविल बलाढ्य नृपती ।।**
**अशक्य शक्यचि क्षणांत घडती ।। नृपइच्छामात्रें ।।२।।**

——अरण्यपंडीता, मी तुझ्या कविकल्पनांचा निषेध करतो.

**अरण्यपंडीत०**——महाराज मी पूर्वी कवि होतो.

**रावण०**——पण आता तर नाहीस ना ?

**अरण्यपंडीत०**——छेः मुळीच नाहीं. तो नाद मी केंव्हाच सोडून दिला आहे. पूर्वी मला हा नाद भारी होता. एकदा असं झालं-एका बाईच्या दंतपक्तीवर कविता करण्यासाठीं आमची कविराजांची स्वारी कल्पनेचे पंख उभारून या दातांवरून त्या दातांवर वर्णन करीत उड्या मारीत चालली होती. इतक्यात काय झालं, त्या बाईचे मधलेच दोन तीन दात पडले होते. आमची कविराजांची स्वारी वर्णनाच्या आनंदात व आवेशांत बेहोष होऊन जों उड्या मारीत चालली आहे, तो स्वारीची उडी पडली धाडकन् त्या दातांच्या खिंडीत ! जेमतेम मी आपल्या पोक्तपणाच्या पुण्याईनं कसाबसा वर आलों. तीच घेतली कवित्वाची शपथ.

**रावण०**——पुरे कर तुझं हें अरण्यरुदन. सीतेची मनधरणी करण्याकरितां मी अशोकवनांत जात आहे. तूं पहा-यावरच्या सर्व राक्षसांना वर्दी दे–नाहीं सक्त हुकूम फर्माव कीं मी परत येईपर्यंत कोणालाही कोणत्याही निमित्तानं आंत सोडतां कामां नये.

**अरण्यपंडीत०**——ठीक आहे. मी आतां तिकडंच जातों. (जातो.)

**रावण०**——एक काम तर पार पडलं. विद्युज्जिह्व राक्षसाच्या मताप्रमाणं रामाचं कृत्रिम शीर हुबेहूब तयार करून सीतेला दाखवितांच, ती रामाविषयीं अगदीं निराश होऊन माझ्या प्रखर कामाग्नीची शांती करायला खात्रीनं सिद्ध होईल. अहाहा ! त्या सीतेचं नुसतं स्मरण होतांच तिची ती रम्य मूर्ती या डोळ्यांसमोर स्पष्ट दिसूं लागते. काय तिचें तें सौंदर्य ? वास्तविक पहाता—

**दिंडी.**

**मूर्ति सुंदर आनंद सतत देते ॥**
**सौख्य-तरु मंडपिं शांत झोंप देते ॥**
**मधुर स्वप्नाची मधुर सुवासाचीं ॥**
**प्राप्त निद्रा ज्या धन्य धन्य तोची ॥१॥**

—पण नाही. सीतेला निर्माण करून विधीनं आपल्या सर्वोत्कृष्ट करामतीचा कळस केला असंच म्हटलं पाहिजे. असो, याच विचारांत येथें राहतां कामां नये. त्या विचारांची आराध्यदेवता जी सीता तिला प्रथम वश केलीच पाहिजे.

(जातो.)

---

## अंक प्रवेश ३ रा. चवथा.

**स्थळ :** अशोकवन

**पात्रें :** सीता

**सीता०**—हा माझा बंदीवास कधीं संपतो कोण जाणे ! —

**पद** (होय संसार०)

**रामहृदयाब्जमधुस्वादलोलुप भ्रमरि ॥**
**वन्य ते क्रूरजन छळिति तिज बहुपरी ॥धृ॥**
**वक्षसुखसंधि पति । देत जैं सतिप्रती ॥**
**कंठहारास पति । सहन नच समयिं करि ॥१॥**
**त्याच रघुनंदना । जलधि गिरि कानना ।**
**भव्य विरहांतरा । सहत मनिं विपिनिं तरि ॥२॥**

(चपापून) अगबाई, हा नीच रावण इकडंच येत आहे कीं काय ? होय तोच तो. मेल्या, अनाथ अबलेवर आपली नीच दृष्टी फेकशील, तर चांडाळा, पपाच्या मार्गात एक पाऊल टाकतोस न टाकतोस तोच माझ्या पतिव्रत्याच्या तेजानं जळून खाक होशील. (निराश होऊन)सर्वसाक्षी परमेश्वरा, पवित्र इच्छेनं निर्माण केलेल्या भूतलावर सांप्रत सुरू असलेला अधर्म व अनीती तुला पहावतात तरि कशी ? या बंदिवासात माझी स्थिती पुढे काय होणार कोण जाणे ! सध्या तर–

**ठुंबरी.**

**प्रियाविण नाहीं मानसीं चैन । जीवनिं या नच त्राण ॥धृ॥**
**स्मरण घडे जधिं हृदयचि पोळे ।**
**विरहिं न तनुचें भान ॥१॥**
**भानुविना शशि तेज न पावे ।**
**शशिसम त्या मी म्लान ॥२॥**

—अगबाई, तो आलाच. आतां मी जाऊं तरी कुठं ? आणि आश्रय तरी कोणाचा धरू ? ती त्रिजटाहि अझून आली नाहीं. (इकडे तिकडे लपूं लागते.)

(रावण प्र०क्र०)

**रावण०**—(स्व०) हीच ती माझी आराध्यदेवता सीता. ही शोकानं इतकी ग्रस्त झाली असतांही हीचं सौंदर्य शुक्लेंदुप्रमाणें वाढत्या प्रमाणावरच आहे. अशी प्रियतमा माझ्यावर प्रसन्न झाल्यास—

**पद.** (मुला सांग०)

**स्वर्गसुख दूर तें फार नोहे ।।**
**मदन जें रतिनिकटिं घेउं पाहे ।।धृ।।**
**मस्तकीं मालती सुमनगुच्छा धरी ।।**
**चंदनाची उटी तनुसि लावी ।।**
**प्रणयपूर्णा अशी युवति वक्षस्थळीं ।।**
**घेइं जो त्यास तें प्राप्त आहे ।।१।।**

—प्रिये (उ०) मनहरणी सीते! काय तुझा हा दुराग्रह? तूं होऊन आपल्या सुवर्णकेतकीसारख्या कोमल देहाची दुर्दशा करून घेत आहेस. जानकी, तूं एकदां या रावणाला—या लंकापतीला—तुझ्या पतित्वाचा मान दिलास तर तुला कशाची कमतरता आहे? तेहतीस कोटी इंद्रादि देवदानव तूं रावणपत्नी त्रैलोक्यपट्टराणी म्हणून पायांशीं नम्र होऊन तोंडातून निघणाऱ्या शब्दांना झेलून तुझ्या धरण्यांसाठीं श्वानाप्रमाणें गडबडां लोळतील. फार काय, पण प्रत्यक्ष माझी पट्टराणी मंडोदरी तुझी थुंकी झेलणारी बटिक करून मी ठेवीन. सीते, तुला निर्वाणीची विनंती करण्यासाठींच मी या अशोकवनांत आज आलों आहे. नीट विचार करून काय तें उत्तर दे. तूं कशाचं चिंतन करीत आहेस?

**सीता०**—आणखीं कोणाचं करणार?

**पद.** (राजनके राज०)

**चिंतनिं या नाथ रघुराज । प्राणविसावा**
**तोचि राम । त्रिभुवनिं या तारक मज पावो ।।धृ।।**
**चरण तयाचें सतिला ते पावनसे ।**
**त्याविण सर्व पुरुष ते बंधू मज ।।१।।**

—मी तुला सौम्य प्रकारानं पुन्हा हेंच सांगतें कीं या बाबतींत तूं माझ्यासमोर एक अक्षरसुद्धां उच्चारूं नकोस आणि हा तुझा दुराग्रह तुला सोडायचाच नसेल, तर रावणा, मी तुला आताच बजावून ठेवतें कीं माझ्या पातिव्रत्यभंगासाठी या सृष्टींतील पंचतत्वांनीं एकवटून आपल्या प्रखर सामर्थ्यानं माझ्या देहाची जरि राखरांगोळी केली तरी तशाहि स्थितींत या सीतेच्या देहभस्माचा एक कण देखील पातिव्रत्यभंगाची संमती देणार नाहीं.

**रावण०**——ठीक आहे. या पराक्रमी बलाढ्य रावणा-या दुराग्रहापुढें तुझा दुराग्रह कितपत टिकतो तें पहातों आतां. पण सीते, तूं फक्क लक्षांत ठेव कीं ज्या बहाद्दरानं प्रत्यक्ष प्रलयाच्या क्रांतीलाहि न डगमगतां हें वैभवी थोर मस्तक कोणाच्याहि पुढं वांकविलं नाहीं ; किंवा जो मी लंकाधीश निद्रासमयीं देखील आजन्म कधीं निःशस्त्र निजलो नाहीं तोच मी रावण निःशस्त्र होऊन कामेच्छातृप्तींसाठी विनंती करीत असतां तूं यःकश्चित् अबला त्याचा अपमान करतेस काय ?

**सीता०**——आम्ही स्त्रिया अबला म्हणून सत्यासत्याची पर्वा न करितां तुम्ही सबल पुरुष आमच्यावर सत्तेच्या बलानं बलात्कार करणार काय ? पण मेल्या चांडाळा पक्क लक्षांत ठेव. की आपल्या अत्याचारानं स्त्रियांच्या सहनशील मनाला त्रस्त करशील, तर निकराच्या प्रसंगीं आम्ही अबला स्त्रिया काळसर्पिणीपेक्षां उग्र स्वरूप धारण करून समुद्रमंथनाच्या जहरापेक्षां तीव्र क्रोधानं तुझ्या सारख्या सबल पुरुषांना एका क्षणांत जाळून खाक करूं.

**रावण०**——या अशोकवनात–क्रूर राक्षसांच्या बंदीत–विशेषतः या रावण व्याघ्राच्या तडाक्यांतून तुला मुक्त करायला आणि तुझ्या पतिव्रत्याचें सत्त्व निष्कलंक राखायला कोणती विश्वशक्ती मला प्रतिबंध करते तें मला पाहूं दे. तुझ्या मुक्ततेसाठी जों जों तूं धडपडशील तों तों माझ्या दुराग्रहाच्या बंधनानं जास्तच संकटात पडशील, हें तूं पूर्ण ध्यानांत ठेव. तें कांही नाहीं, तुझी संमती असो वा नसो. आज हा रावण दशदिग्भागांतील सर्व देवतांच्या समक्ष आणि या अमर्याद विश्वविस्तारांत अस्तित्व पावलेल्या दृश्यादृश्य सर्व ग्रहांना साक्षी ठेवून–या लंकानगरीच्या भर राजरस्त्यांतून तुला खेंचित नेऊन बलात्कारानं माझ्या शयनशेजेला वश करणार ; आणि अशा रितीनं माझ्या पराक्रमाची–

**सीता०**——मेल्या, कशाला सांगतोस आपल्या पराक्रमाची बढाई ? माझ्या रामदूतानं तुझ्या कारट्याला उलथापालथा लोळवून, चांडाळा तुझ्याहि राजसभेचा विध्वंस केला, त्यावेळीं मेल्या राक्षसा, तुझं हें काळं तोंड लपवून कुठं बसला होतास ? निशाचरा, दशदिग्भागांतील देवतांना साक्ष ठेवून तूं माझ्यावर बलात्कार करणार काय ? मेल्या, सत्तेच्या जोरावर अनाथ स्त्रियांच्या पातिव्रत्याला स्पर्श करशील, तर त्याच विश्वदेवतांच्या शापांनं–मेल्या–तुझी आहुती तूंच भडकावलेल्या अधर्माच्या प्रळयाग्नींत पडून जे अनाचारी मसलतगार आज तुझ्या लंकाराज्याची थोरवी गात आहे आणि तुझ्या उन्मत्तपणाची पाठ थोंपटीत आहेत, त्यांच्यासह तुला आणि तुझ्या लकांद्विपाला माझ्या रामसैनिकांनी खेंटराखालीं तुडवून रसातळाला जातांना पाहीन तेव्हांच माझा आत्मा शांत होईल.

**रावण०**——सीते नीट विचार कर. तोंड संभाळून बोल. तूं कोणाच्या पुढं या वल्गना करीत आहेस ? माझ्या लंकाद्वीपाला आणि माझ्या मसलतगारांना तें तुझं माकडसैन्य खेंटराखाली तुडविणार काय ? उन्मत्त सीते, तुझ्या माकडांचा तो भावी पराक्रम

पहाण्यापूर्वी या रावणाचा हा पराक्रम पहा. (भयंकर आवाज होऊन रामाचे कृत्रिम शीर अधांतरी लटकूं लागते.) तें पहा तुझ्या रामाचं शीर.

**सीता०**——हाय हाय ! श्रीरामा——(मूर्छित पडते.)

**रावण०**——(स्व०) आतां आपण जरा दूर जाऊन हिच्या पश्चात्तापाच्या न् निराशेच्या ज्वाळा कशा भडकतात तें पाहिलं पाहिजे. (जातो.)

**सीता०**——(मूर्छना सांवरून) मी स्वप्न तर नाहींना पहात ? छे: हे स्वप्न नव्हे ? श्रीरामा, तुला याच स्थितीत पहाण्याकरितां का मी या बंदींत जिवंत राहिले ? आणि याच रितीनं का माझी पुनर्भेट तू घेतलीस ? प्रियकरा, या तुझ्या हास्यमुखाची व कपाळावरील कस्तुरीतिलकाची अखेरीस हीच स्थिती झाली ना ? रामा, वनवासांत चौदा वर्षे तुमच्या कोमल पायांत कंटक रुतले आणि ' सीते सीते ' म्हणून वृक्षपाषाण कंवटाळलेत ते याच अंताकरितां काय ? ज्याच्या कीर्तीला आदि अंत नाहीं, अशा विख्यात सूर्यवंशाला कसा हा डाग लागला ? मुद्रिके, तूं हेच सांगण्याकरितां मला प्रथम भेटलीस का ?——

**पद** (जाई परतोनी०)

**विफल कसें होई । बाई । कवींद्र वाल्मिक**
**महामुनीचें भाष्यहि सारें विलया जाई ।।धृ।।**
**वानरसैनिक येथें येउनि ।। शिलापंथ तो**
**निधिवरि करुनी ।। वधिल रावणा पापाचरणी ।।**
**राघव तो, या पवित्र वचनीं ।। बाध कसा येई ।।१।।**

——दैवा ! तूं काय ही माझी विटंबना मांडली आहेस ? रघुकुलवंशीय दशरथराजाची मी स्नुषा, प्रत्यक्ष ईश्वरावतार श्रीरामचंद्राची भार्या मी सीता असून तिचे हे सोहळे तू मांडले आहेस काय ? रघुवीरा, या दावाग्नींतून मला आता कोण मुक्त करणार !

**रावण०**——(प्र०क्र०) सीते, तुझ्या रामाला युद्धांत जिंकून तयाला खेंटराखालीं जमिनदोस्त करणाऱ्या या पराक्रमी लंकाधीशाकडे पहा ; आणि तुझा दुराग्रह सोडून या रावणाकडे प्रेमळ पट्टराणीच्या दृष्टीनं नजर फेंक.

**सीता०**——चांडाळा, माझ्या पतीच्या मृत्यूपेक्षां आणखीं भयंकर कल्पांत जरी माझ्यावर कोपला तरी ही सीता आपल्या सदाचरणापासून एक तिळभरसुद्धा ढळणार नाहीं हे—नीचा—तूझ्या अझूनहि लक्षांत येईल. मी अनाथ आहे असं समजून सत्तेच्या जोरावर माझ्या पवित्र देहाला पापबुद्धीनं स्पर्श करायला एक पाऊल पुढें टाक कीं ही रामपत्नी वीरांगनातुला याच—वेळीं नुसत्या क्रुद्ध डोळ्यांच्या उघडझापीनं जाळून फस्त करील. चांडाळा—राक्षसा—अधमा—

**रावण०**——चुप रहा. तुझी काय शक्ती असेल ती यावेळीं प्रज्वलीत कर. तुझ्या कुलदैवताचं स्मरण कर. तुझ्या सूर्यवंशाचं स्मरण कर. नाहीतर प्रत्यक्ष सृष्टी उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवाचं स्मरण कर. हा रावण तुझा पदर अस्सा खेंचून——

(सीतेच्या अंगावर धांवून जातो. सीता धीटपणानें उभीच राहते. इतक्यांत आकाशवाणी होते——" मदान्ध रावणा ! विरंचीच्या शापाची स्मृती ठेव.")

**रावण०**——कोण ? विरंची ? विरंची माझा दास आहे.

(आकाशवाणी०—परस्त्रीला पापबुद्धीनं स्पर्श करशील तर तुझा देह शतचूर्ण होईल, या विरंचीच्या शापाची स्मृती ठेव.)

**रावण०**——(स्व०) अरे अरे अरे ! दांत पडलेल्या सिंहाप्रमाणं माझी स्थिती झाली. (उ०) सीते, तुला आणखी विचार करण्यास फुरसुद देतो. तेवढ्या मुदतींत माझ्या रंगमहालांत तूं स्वखुषीनं पाऊल ठेवलं नाहींस तर तुझ्या रामाप्रमाणं तुझी स्थिती होईल.

**सीता०**——झाली तरी हरकरत नाहीं. पण मेल्या, या माझ्या वर्तनावरून गृहिणी स्त्रियांनीं आपलं सद्वर्तन कसं वज्रप्राय ठेवावं हे साऱ्या जगाच्या दृष्टोत्पत्तीला येईल.

**रावण०**——बरं आहे. जगाच्या दृष्टोत्पत्तीला काय येईल तें मीच पाहीन. (जातो.)

(पुन्हा भयंकर आवाज होऊन कृत्रिम शीर गुप्त होतें.)

**सीता०**——अगबाई, हा काय चमत्कार ?

[आकाश वाणी०——

**दिंडीन करि चिंता ती राम सुखी आहे ॥**
**सैनिकांसह तो शांततेंत राहे ॥**
**ईशतेजा त्या बंधुं न शके कोणी ॥**
**तत्प्रभावातें यमहि जोडि पाणी ॥ १ ॥**

**सीता०**——

**पद०** (क्या दिलपे दाग०)

**उपकार फार झाले मुखिं जे मला वदवे ना ॥ धृ० ॥**
**विरहानलीं ही बाला । पोळे, तयांतचि खल हा ।**
**करितो असह्य बाधा । कटु वचनें करि अवमाना ॥ १ ॥**
**असुनी अतनु तूं नारी । झालिस मज सहायकारी ।**
**स्त्रीसंकटा हराया । धांवेल अन्य न, ललना ॥ २ ॥**

(जाते.)

---

## अंक चवथा. प्रवेश ४ था.

**स्थळ** : लंकेतील रस्ता

**पात्रें** : अरण्यपंडीत.

**अ. पं.०**——(प्र. क.) भित्र्यापाठीं ब्रह्मराक्षस. मी नको नको म्हणतो आणि एकादं लचांड बळंच येऊन मला चिकटतं. आतां याना अशोक वनांत गचांड्या मिळाल्या त्याचा ताप या थेरड्याला काय ह्मणून ? पण नाहीं, आजकालचा मनूच निराळा, थेरडा ह्मणजे जसा कांहीं पखालीचा बैल. आज सकाळीं डोळें चोळीत उठून बसतो आणि नित्यक्रमाप्रमाणं प्रातःकाळाच्या फराळाची स्तवनं म्हणायला सुरवात करतो, तों दूत दरवाजांत हजर. डोळें उघडून ' कांरे बुवा ' ह्मणतो तों ह्मणे ' अरण्यपंडीत उठा आणि जा सगळ्या सरदारांना आज दरबारचें आमंत्रण करायला.' अरे ह्मटलं कां ? तर ह्मणे सीतेला कसं वश करावं, हें आज दरबारात ठरायचं आहे. बरं आहे म्हटलं. जो उठला तो लागला पांढरी दाढी चाचपायला ! एकंदरींत हे प्रणयीजनाचं कोडं फार घोंटाळ्याचं असतं खास. भो भो प्रणयीजनहो ! कमाल असो तुमच्या प्रणयाची, तुमच्या प्रीतिपात्रासाठीं तुह्मी हवेवर आपला उदरनिर्वाह करतां, आणि त्या हवेवरच तुह्मी आपल्या आयुष्यमंदिराचा पाया रचून त्यावर मनोराज्याचे टोलेजंग किल्ले उभारतां. प्रेमी जनहो ! वाऱ्याच्या प्रत्येक झुळकीबरोबर तुह्मी बदलत जातां. क्षणांत लठ्ठ होतां तर क्षणांत अगदीं अशक्त होऊन मुंगीच्या फुंकाऱ्यासरसे उडून जातां. आशेनं गुलाबी मत्सरानं हिरवे, निराशानं फिकट असे आपले अनेक रंग पाहून इंद्रधनुष्य देखील पूर्ण लाजल्यामुळें तें भीतभीतच कधिंमधी लोकांच्या दृष्टीस पडतं. एवंच काय ? तर अहो प्रेमळ——गाजरपारखी—प्रेमी-पिशाच्च जनहो ! या तुमच्या पिशाच्च वृत्तीला या थेरड्याचा गुडघ्यापासून अष्टांग नव्हे तर शतांग नमस्कार असो.

[नमस्कार घालतो तोंच " अधिकाऱ्या-ए अधिकाऱ्या " अशी आरोळी ऐकूं येते. अ. पं. धांदलीनें उठून पाहूं लागतो.]

**अ.पं०**——हें काय मध्येंच लचांड आलं. ? हे कोण प्रजापती इकडंच येत आहेत ? हां समजलों. हे नेहमीं पाठीकडून चालणारे विपर्यासे सरदार आपल्या अधिकाऱ्या नांवाच्या दूताला घेऊन दरबाराकडे जात आहेत. आपण जरा बाजूलाच झालं पाहिजे. नाहींतर यांच्या पाठीकडून चालण्यांत आम्हांला एखादी मसालेदार गचांडी मिळायची. [ बाजूला उभा राहतो.]

(विपर्यासे व अधिकाऱ्या प्र. क.)

**विपर्यासे०**——अधिका-या तूं कोण आहेस ? देवांत जसा ब्रह्मदेव श्रेष्ठ, दैत्यांत जसा हिरण्यकश्यपू खाष्ट, चित्रकारांत जसा विश्वकर्मा किंवा कलमबहाद्दरांत जसा चित्रगुप्त वरीष्ठ तसा तूं दूतवर्गात अधिका-या दुष्ट किंवा स्वादिष्ट आहेस.

**अ.पं०**——(स्व) आमच्या अरण्यरूदनावरहि ताण दिसते.

**विपर्यासे०**——हत्तीला जशी सोंड, बैलाला जशी शेंपूट, सिंहाला जसा पंजा तसा हा चाबूक तुझ्या हातांत शोभत आहे. अता आपण राजाधिराज रावणमहाराजीच्या दरबारांत जात आहोंत, तेव्हां चंद्र सूर्यांमध्यें जसा शुक्र, दोन डोळ्यांत जसें लांबलचक नांक तसें दोघांमध्यें कोणी तिसरा आल्यास हा तुझा चाबूक ताडकन्——

**अधिकाऱ्या०**——(विपर्यास्यानां चाबूक मारुन) ताडकन् मारतो पहा राव.

**विपर्यासे०**——अयायाई ? मेलो, ठार झालो, मृत पावलो. कायरे ए पाजी जिवंत दूता. हें रें काय कृत्य-काम केलेंस ? [तो पुन्हा मारतो.] अरे पण हा काय गहजब ?

**अधिकाऱ्या०**——चुप बसा. मी अधिका-या अधिकार गाजवीत आहें. दोघांत तिसरा आल्यास ताडकन् [पुन्हा मारतो.]

**विपर्यासे०**——ओय, ओय, आणखीं तिसरा कोण ?

**अधिकाऱ्या०**——तो पलीकडे उभा असलेला थेरडा आणि मी या दोघांत आपण तिसरे म्हणून ताडकन्——[मारतो.]

[अ. पं. ची व विपर्यास्यांची ढकलाढकल सुरू होतें. जो मध्यें येतो त्याला तडाखा बसतो.]

**अ. पं०**——अशी ढकलाढकल कां बुवा ? चाबकाचा मार खाववत नसेल तर अधिकार काढून घ्या ? पण हुकमांचा विपर्यास नको व्हायला.

**विपर्यासे०**——अधिका-या एखाद्या मोठ्या पर्वतावरुन एक मोठासा धोंडा गडगडत येऊन पर्वताच्या पायथ्याशीं बसलेल्या गुळगुळीत टकल्याच्या टाळक्यावर पडावा तसा तुझा हा चाबूक गळून खालीं पडला असं समज.

**अधिकाऱ्या०**——[फटके मारीत] चुकून अस्सा-मारला. पुन्हां अस्सा-मारला तर मलाहि तुम्ही अस्सेच-मारा-(विपर्यासे व अधिका-या जातात.)

**अ. पं०**——(आपल्या फटक्याकडे पाहून रडत)——अयाई ! केवढा पण चरचरीत फटका हा ! अगदीं हुबेहूब तसाच. तिळभरसुद्धा फरक नाहीं. हा चाबकाचा फटका पाहून, हे माझे स्वर्गवासी प्रिये ! मला तुझी आठवण होते ग. आज बारा वर्षांत असा फटक्यांचा सुयोग न आल्यामुळें-लाडके-तुझ्या अस्सल गाळीव प्रतीचा या थेरड्याला जरी विसर पडला होता तरी तुझ्या नित्य क्रमाच्या फराळापैकीं हा एक चरचरीत मासला पाहून, मला पुन्हा तुझी आज आठवण होऊन, पोटांत कसं भडभडून येतंय. उठतां लाथ आणि बसतां बुक्की देण्याइतकी तूं कितितरी प्रेमळ होतीस ग ! लाडके-प्रिये-

[जातो]

---

अंक चवथा.

## प्रवेश ५ वा.

**स्थळ :** रावणाचा दरबार.

**पात्रें :** रावण, प्रहस्थ, मंत्री, अंगद, दूत.

**अंगद०**—अहो दरबारस्थ. परस्थळाहुन आलेल्याची कांहींच विचारपूस न करतां, स्वतःच्या गर्वांत डुलत राहिला आहांत काय ? गर्विष्ठ रावणा कोणत्या धुंदीनं तूं तर्र झाला आहेस'? जरा शुद्धीवर ये आणि तुझ्या दरबारांत शिष्ठाई करण्यास आलेल्या या रामसेवक अंगदाकडे एकवार तुझी दृष्टी फेंक.

**रावण०**—प्रधानजी या किष्किंधावासी काळ्या माकडांना असल्या वाष्कळ बडबडीचं जणुं काय बाळकडूच मिळालेलं दिसतं. जेव्हां पहावं तेव्हां नुसती कोरडी बडबड.

**प्रहस्थ०**—कृतीच्या नांवानं शंखध्वनी.

**अंगद०**—(स्व.) आम्ही असेच बडबड करणारे आहोंत. योग्य वेळीं कृतीचीहि विद्युल्लता चमकल्याशिवाय राहणार नाहीं. (उ.) रावणा, मी काय म्हणतों इकडं तुझं लक्ष असूं दे. पहा—

**पद०** (जावोजी जाव०)

**व्यापुनिया राही अवधी धरणी कमलानाथ तेजें ॥**
**केवळ जो सद्गुणसिंधू । तिळ नच ज्या दोषबिंदू ।**
**अज्ञानें नच त्या निंदू ।**
**ज्ञानेंदू विहरशि, लंकानाथ सिंहासनिं श्री गाजे ॥ धृ० ॥**
**परललनेची आस जैसा जहराचा तो घातक प्याला ॥**
**तेशी ती रामजाया । छळिशी कां उपवनिं वांया ।**
**वैभव तव सिद्ध कराया ॥**
**त्यागुनि वैरा । करि सुविचारा । मित्र रघुविरा ।**
**करणें हें तुज योग्य साजे ॥ १ ॥**

—तसंच रावणा, तू ज्याची भक्ती करतोस तो विरुपाक्षसुद्धां श्रीरामाचं भजन करतो, तहा—

पद० (दिले नादानक०)

**शिव महा असे रत नित रामीं ॥ वि० ॥**
**निधिमंथनिचे विष त्या बाधे ।**
**प्रभुनामीं शीतल तनु हो स्वामी ॥ धृ० ॥**
**आदिमाया जी प्रभुजाया ती सीता ॥**
**राम मूर्तिमंत विष्णुअंश महिकर्ता ॥**
**स्वैर वर्तनिं कें धरिशि नृपा वैर वृथा ॥**
**मदा त्यागिं झणीं ज्ञानी तूं विभवार्था ॥**
**विधि स्वयेंहि रमें भजनिं नित ज्या नामीं ॥ १ ॥**

---असं असतां त्याच रामाचा द्वेष करुन तूं स्वामीद्वेतांत भर टाकावीस, हें तुझ्यासारख्या सूज्ञ राजाला शोभत नाहीं. सनक सनंदन सनत्कुमार हेचसे काय, पण प्रत्यक्ष विरंचीदेखिल ज्या कमलापति रामाची स्तुती करतात, त्याला तूं शरण जाऊन आपला मित्र करणं हेंच तुला उचित आहे. जो माझा राम---

साकी०

**प्रेम धरुनि मनिं भक्त अर्पितां ज्यास तीळ क्षुल्लक तो ॥**
**समजुनि कांचनगिरिसम त्याला रक्षितसे राघव तो ॥**
**अंतर्बाह्य तया । तुजवरि खचित करील दया ॥ ७ ॥**

**रावण०**---या रावणाचा पराक्रम सर्व त्रैलोक्यांत जगजाहीर असतां, तुझ्यासारख्या क्षुल्लक माकडाच्या पांडित्यानंन् बाष्कळ शिष्टाईनं वितळून जाण्याइतका हा ईशतेजदंडधारी राजा रावण आजच इतका निःसत्व झाला नाहीं. परंतु अंगदा, विचार कर. तुझा प्राण तुला प्यारा असेल तर वाक्पांडित्याचा डौल एक क्षणभरहि न मिरवितां या तुझ्या शत्रूच्या भूमींतून आपलं काळं कर. आम्ही त्रैलोक्यपती आहोत--या भूगोलाचे आम्ही शास्ते आहोत. अर्थात् जी वस्तू आमच्याकरितां आम्ही ठेवली आहे, आमच्या सुखोपभोगासाठीं जिची नेमणूक करण्याची आम्हाला खुषी झाली, त्याबद्दल धिटाईनं मागणी करणारास देहांत शिक्षा ठोठावण्यांत निदान हा लंकाधीश तरी कमी करणार नाहीं. परंतु तुझ्या अल्पवयाकडे पाहूनच तुला क्षमा करण्यांत येत आहे.

**अंगद०**---तुझ्या नकली दयाळू अंतःकरणाला हा रामसेवक अंगद लाथेखालीं तुडवीत आहे, समजलास ?

**प्रहस्थ०**---अरे ए मर्कटा तोंड संभाळून बोल. तुझ्या या फाजील वर्तनाबद्दल तुला तुझ्या प्राणाला मुकावं लागेल समजलास ? नृपतीचं वैभव चिरकाल. ठेवण्याची जबाबदारी त्या सर्वसमर्थ विरुपाक्षाच्या शिरावर आहे ; इतकंच काय, परंतु

परमेश्वराच्या विशिष्ठ काळजीचें दैवत जे हे त्रैलोक्यपती ते असली मानखंडना कधींच सहन करणार नाहींत. आमच्या बलाढ्य राक्षस सैनिकांच्या सहायानं भावी युद्धांत तुझ्या मानवी रामाला समरांगणांत उताणा पाडून त्याच्या छातीवर इंद्रजीत राजपुत्रानं अपमानाची लाथ मारून त्याचा प्राण घेतांनां, त्या वनवासी रामाला आमच्याशीं शत्रुत्व धरलेल्या क्षणाची आठवण होऊन त्याबद्दल तो त्या क्षणाला शाप देत यमलोकाची वाट धरील. तसंच आजपासून याच दरबारांत आम्ही सर्व त्रैलोक्याला असं जाहीर करतों कीं, सिंहासनाभिषिक्त नृपती हे फक्त ईश्वराचेच आज्ञाधारक आहेत. इतर कोणत्याहि मानवी प्राण्यांच्या शिष्ठाईनं आमची थोर मनें द्रवणार नाहींत किंवा आपल्या बाणेदारपणाचा त्याग करुन कोणाला शरण जाणार नाहींत.

**अंगद०**——नृपतीच्या सर्वसामान्य नीतीतत्त्वाचा आधार घेऊन तुमच्या अंतःकरणांत ज्याअर्थी अधर्मी उन्मत्तपणाचं जहर आपला अंमल गाजवूं लागलं आहे, त्या अर्थी रावणा——

**झंपा०**——(सुखें राज्य सांभाळ०)

**मत्त ! तव मृत्यु संनीध आला ॥**
**वैभवी नृपतिपद ग्रासण्याला ॥ धृ० ॥**
**अनथ तव जाळितो श्रेष्ठ सिंहासना ।**
**कुमति झणिं नेतसे तुज लयाला ॥**
**लंधिशी दैवता ज्यासि शिव ध्यातसे ।**
**रामकरिं अंत तुज समज आला ॥ १ ॥**

**रावण०**——अंगदा, या राज्यवैभवाच्या गोष्टी तुम्हांसारख्या झाडपालाखाऊ माकडांना काय होत. राजविलासी अजिंक्य आत्म्यांना कोणताहि सृष्टीनियम नियमन करूं शकत नाहीं ; किंवा त्यांच्यांवर कोणाचेहि मानपान आपली छाप बसवूं शकत नाहींत. आमच्या राक्षसी प्रभावापुढं आमच्यापेक्षां श्रेष्ठ धनुर्धरांनीं दिपून जाऊन आपआपलीं आयुधं खाली ठेऊन निमुटपणें आमच्या अजिंक्य सिंहासनाला शरण आलं पाहिजे. आमचे शब्द हेच सर्वमान्य करार आणि प्रत्यक्ष आम्हीं या अमर्याद विश्वविस्ताराचे अधिपती. पांडित्याचा दिमाख दाखविणाऱ्या क्षुल्लक माकडा, तुझा असला फाजीलपणा पाहून मला तुझ्या जननपावित्र्याबद्दल संशय येतो.

**अंगद०**——अरे चोरट्या रावणा, माझ्या जननपवित्र्याबद्दल तुला संशय येतो काय ? माझ्या बापाचा तडाखा विसरला तितक्यांत ? ज्या मर्दानं तुला आपल्या काखेंत दाटून धरून चतुःसमुद्राचं स्नान केलं ; ज्या वीरानं तुला अनेक अपवित्र हालअपेष्टांत कुझवून तुझ्या सांप्रतच्या वैभवी तोंडाला काळी मस फांसून तुझ्या डोक्याचे पांच पाट काढले

आणि तुझी टांग उलटी धरुन तुला या लंकानगरीकडे भिरकाऊन दिला त्या बलाढ्य वालीचा मी पुत्र आहे.

**प्रहस्थ०**––वाः । मोठ्याच पवित्रकुलांत तुझा जन्म झालाय एकूण, नपूंसका, तुझ्या बापाली त्या क्रियानष्ट रामानं ठार मारून तुझ्या आईला–अरे प्रत्यक्ष जिच्या उदरांतून तूं जन्माला आलास त्या तुझ्या तारा मातेला तुझ्या चुलत्याच्या शयनशेजेला वश करविली याची कांहींतरी लाज धरून त्या नीच रामाचा सूड घे. तो तुला घेववत नसेल तर जाऊन समुद्रांत जीव दे. नाहींतर दे त्या रामाचा पक्ष सोडून नि आमच्या सैन्यात येऊन सामील हो.

**रावण०**––या रावणाचें वैभवहि दिवसेंदिवस वृद्धींगत होत आहे. इंद्र आम्हांला पुष्पांच्या माळा देणारा माळी. रोहिणीरमण चंद्र आमचा छत्रधारी, रवी आमच्या राजवाड्यांत दीप लावणारा दिवेघासू नोकर, रसनायिक पाणी भरणारा पाणक्या, अग्नी आमचीं वस्त्रें धुणारा परीट आणि वायू केरकचरा झाडून साफ करणारा झाडू होऊन राहिला आहे.

**प्रहस्थ०**––पहा, आमच्या पक्षाला येऊन मिळत असशील तर आह्मीं त्या सुग्रीवाला व त्या नीच रामाला ठार मारून किष्किंधेच्या गादीवर तुझी स्थापना करूं. नाहींतर तुझ्या कुलकलंकाची द्वाही––

**अंगद०**––अरे माझ्या बापाच्या खेंटराची उपमा तुमच्या या सर्व राज्यवैभवाला द्यावयाची म्हणजे त्यातही तुमचा मोठा गौरव केल्याचं पातक मला लागेल. माझा बाप शक्रकुमार वाली माझ्या श्रीरामाच्या बाणानं मुक्त होऊन अक्षय सायुज्यपदावर स्थापन झाला समजलास ?

**प्रहस्थ०**––वाः मोठाच वेदांत सांगितलास.

**अंगद०**––थेरड्या मंत्र्या ! तुझ्यासारख्या आपमतलबी स्वार्थी श्वानाशीं मी एक शब्द बोलूं इच्छित नाहीं. रावणा, तूं अझून सावध हो. गर्वाचा त्याग करून सारासार बुद्धीनं विचार कर. यावरही तुझी समजूंन पडत नसेल, तर राक्षसा निशाचरा, रणमंडळाच्या धडाडलेल्या प्रचंड होमकुंडात तुझ्या सर्व राक्षसाची आहूती देण्यासाठीं व शेवटीं शांतीसाठीं तूझ्या दशमुखांची त्यांत पूर्णाहुती द्यायला, तूं या उप्पर पातकांची कमान चढवतोस न चढवतोस–तोंच एका झणांत श्रीराम पारधी आपला चाप सज्ज करून याच ठिकाणीं प्रगट होईल.

**रावण०**––प्रधानजी, या क्षुद्र बीजांकुराला आत्तांच्या आत्तां––सैनिकहो––

**अंगद०**——धुंगुरट्या रावणा, चुप रहा. तुझं काय सामर्थ्य असेल तें या वेळीं तुझ्या मदतीला बोलाव. नाहींतर हा पहा रामसेवक अंगद तुझ्या सर्व सैनिकांचे आणि दरबारस्थ श्वानांचे डोळे उघडे असतांना तुझ्या सिंहासनावरून तुला खालीं ओढून ठार करतो.

(सिंहासनावर चढतो. ' धरा पकडा ' असा ओरडा होतो.)

**अंक चवथा समाप्त.**

# अंक पाचवा.



## प्रवेश १ ला.

[ वेशीचा दरवाजा. विप्रभक्षक व सर्वभक्षी पहारा करीत आहेत.]

**विप्र०**——कां सर्वभक्षी ?

**सर्व०**——बोला माझं लक्ष आहेच.

**विप्र०**——नाहीं म्हटलं, इतका बलाढ्य शत्रू या लंकेवर आजपर्यंत कोणीच चालून आला नव्हता. आपले रावणमहाराज इतके बलीष्ठ, पण त्यांच्या——

**सर्व०**——तें कांहीं विचारूच नका. प्रहस्थ प्रधानजी हे आपल्या दरबारातील जाडी प्रकरण ; शस्त्रास्त्रांत त्यांच्यासारखा दुसरा कोणीही प्रवीण नसतां, त्या रामाच्या सैन्यानं असला तो मोहरा अगदीं मशकासारखा चिरडून टाकला. लाखो राक्षससैन्य रोज मृत्युमूखीं पडत आहे आणि केव्हांना केव्हां ही संक्रांत आपणां दोघांवर वळणार.

**विप्र०**——मग आपलं कसंहो होणार ?

**सर्व**——व्हायचं तसं होणार, त्याला कोणरे बाबा काय करणार.

**विप्र०**——आपण मरणार नि बायका रडणार.

**सर्व**——कर्मच मारणार तिथं कोण तारणार.

**विप्र०**——पण मला मोठं आश्चर्य वाटतं कीं ही वानरसेना निःशस्त्र असून त्यांच्याकडून एवढा मोठा पराक्रम कसा ? यांतलं मर्मच कळत नाहीं.

**सर्व**——मर्म कसलं नि कर्म कसलं ! आपल्याच हातांनीं घराला लावायची आग नि मग बसायचं शंख करीत ; त्यातलाच हा प्रकार. हा सगळा रावणाच्या उन्मत्तपणाचा परिणाम. व्हायचं तेंच झालं आतां ओरडून आरडून काय फायदा ? त्या रामसैन्याचे पवित्र मंत्र हीच त्याचीं शस्त्र. आपल्या राक्षससैन्याकडून बाणांचा एकसारखा वर्षाव केला जातो. तरवारीवर तरवार सारखी तुटून पडते आणि अस्त्रांवर प्रतिअस्त्रं सोडली जातात, पण त्यापैकी एकाचाहि त्या रामसैन्यांवर परिणाम दिसून येत नाहीं. तीं माकडं आपल्या भुजबलानीं प्रचंड पर्वत आणून आपल्या राक्षससैन्यांवर धडाधड फेंकून त्यांना जागच्याजागी गाडून फस्त करीत आहेत. असा कांहीं——

**विप्र०**——विपरीत प्रकार होत आहे म्हणायचा.

(आळीपाळीनें पहाऱ्यावर फिरुं लागतात.)

**विप्र०**——पण कायहो सर्वभक्षी?

**सर्व०**——लक्ष आहे. चालूंद्या पुढं.

**विप्र०**——म्हटलं इतका प्रळय होत आहे तरी रावण महाराज कसे स्तब्ध बसलेत? कांहीं समजत नाहीं.

**सर्व०**——तुम्हांलाच उमजत नाही. कालचा गोंधळ तुम्हांला माहीत नाही वाटतं?

**विप्र०**——नाही बुवा. कसला गोंधळ?

**सर्व०**——अहो, प्रहस्थप्रधानादि अनेक योध्दे ठार झाल्यावर रावण महाराजांना मोठी चिंता पडली. पण तोही कसला बहाद्दर! लागलीच त्यानं कुंभकर्णाला उठविण्याची हांक फोडली.

**विप्र०**——(आंनदाने उड्या मारीत) वाहवा! वाहवा!! खाशी! खाशी!! ठीकठाक! अहो या असंख्य वानरदळाला तो एकटा सहज अगदी दांताला दांत न लावता गिळून टाकील. भले भले! खूप योजना केली. पण तो मध्यंतरीच बरा जागा झाला.

**सर्व०**——झाला म्हणजे? तसाच ओरडाआरडा केला. रावण महाराजांची आज्ञा सुटतांच आपले सर्व राक्षस निद्रागृहाच्या दरवाज्याजवळ जाऊन आक्रोश करून ओरडूं लागला. त्या गर्जनेनं मोठमोठ्या विहीरी नि तलाव पार आटून गेले आणि हेंचसं काय पण हा महाशंखध्वनीं स्वर्गाचीं कपाटं फोडून पार गेला. त्यानं देवादिकांची जी तिरपीट उडवली ती काय विचारुंच नका. पण तो कुंभकर्ण बहाद्दर कशाला जागृत होतोय.

**विप्र०**——आपल्या राक्षसी वीरांचा प्रतापच अद्भूत! बरं मग, पुढं काय झालं?

**सर्व०**——एवढ्यानं जेव्हा कार्य भागेना, तेव्हां प्रचंड माजलेले हत्ती स्वारींच्या आंगावरून चालविले. गगनचुंबित वृक्ष घेऊन नाकांत धुसविले, एक नाकपुडी दाबून श्वास कोंडून पाहिला, मोठमोठे पाषाण आणून त्याच्या ऊरावर आपटले, कडू तीक्ष्ण औषधं आणून नाकांत ओतली. सर्व कांही केलं——

**विप्र०**——पण स्वारी कांही केल्या जागी होईना आँ? ठीक.

**सर्व०**——मग विरुपाक्षकिन्नरी आणून त्याच्या कानांशी जेव्हा वाजविली——

**विप्र०**——तेव्हा स्वारी जागी झाली म्हणायची! ठीक. आतां रामसैन्याचा चुराडा उडालाच पाहिजे.

(आंतून मारुती०—— रामसैनिकहो, पहातां काय ? या राक्षसाना ठिकच्याठिकाणीं गाडून फस्त करा.]

**विप्र०**——हं ! सर्वभक्षी पळा पळा. तो पहा मारुती आला.

**सर्व०**—अरे पण पहारा कसा सोडायचा ?

**विप्र०**—बरं पण, त्यानीं इथं आपल्याला ठार केलं तर आपलीं प्रेतं तरि कसा पहारा करणार ?

**सर्व०**—हं. ! मग पळाच आतां—[जातात.]

(मारुती, बिभीषण, सुग्रीव, जांबुवंत व सैनिक प्र. क.)

**मारुती०**—इंद्रजीताच्या कपटी होमगृहाचा मार्ग हाच असावा. कारण—

**पद०** (हा सकल देह०)

**हा धूम्रलोट कडकडाट वन्हिचा गमे ॥**
**जळत मांस तापदसा श्वास हा वमे ॥ धृ० ॥**
**थबथब हें गळत रुधिर । भूमिरूप भयद प्रखर ।**
**कपटहोम करि तस्कर । याच स्थलिं श्रमें ॥ १ ॥**

**बिभीषण०**—मारुता, तुझा तर्क अगदीं बरोबर आहे. हेंच तें त्या दुर्जनाच्या कपटी होमाचें गुप्तस्थान. परंतु आतां एवढंच लक्षांत ठेवा—

**दिंडी**

**तपा आचरि हा कुमती ज्या सुकार्या ।**
**अश्वसारथिसह इंद्ररथ वराया ॥**
**अर्धरथ तो जाहला प्राप्त आतां ।**
**पूर्ण मिळतां तो करिल विश्व-घाता ॥ १ ॥**

**सुग्रीव०**—तो पहा. त्या होमप्रदेशाचा अंतर्भाग आतां स्पष्ट दिसूं लागला. तो पापमूर्ती इंद्रजीत रक्तोदकानं स्नान करून, रक्तवर्णाचेंच वस्त्र नेसला आहे. मृत मनुष्यांची सात प्रेतं खालीं पसरून त्यावर तो दुष्ट वज्रासन घालून बसला आहे. आपल्या पिंगट जटा मोकळ्या करून डोळे मिटून विप्रदंताच्या लाह्या हळूंहळूं अग्नीत टाकीत आहे. काय अघोर हें कृत्य.

**जांबुवंत०**—तसंच ते पलिकडं काय आहे, दिसतंय कां तुह्माला ? तुमचे आहेत तरणे डोळे. मी काय बोलून चालून पडलों ह्मातारा वृद्ध कपी. ते पहा त्या नीच अघोरी इंद्रजीतानं अग्नीला आहुती देण्यासाठीं ब्राह्मणांच्या प्रेतांचे ढीगच्या ढीग ठेवलेत.

**मारुती०**—राक्षसांच्या हांतून राक्षसीच कृत्यें व्हायची. पण आजोबा मला आज मोठा आनंद होत आहे, आणि तो याचकरितां—

**पद०** (तरि बधिन काय.)

**मम रिपुसि आज मी वधितो ॥ धृ. ॥**
**तत्तनु-रुधिरा सिंचुनि मम करिं समरभूमि तोषवितों ॥ १ ॥**
**रिपुरुंडांच्या मालाद्वारें विजयस्तंभ भूषवितों ॥ २ ॥**
**रामनाम तें गर्जुनि आतां रिपुकंठा मी चिरितों ॥३॥**

—आणि याच क्षणीं बंधो बिभीषणा, आपल्याला प्रतिज्ञा करून सांगून ठेवतों कीं रामेश्वराच्या किना-यावर श्रीरामानीं तुम्हला लंकाराज्याचा जो राज्याभिषेक केला तो आम्हीं आतां खास फलद्रूप करणार.

**बिभीषण०**—आपण सर्व शक्तिमान आहांत. परंतु—

**पद०** (अबन जगावो.)

**क्षण न विसंबा वांया स्थलिं या ॥**
**होउं न द्या कधिं सफल कार्य कुजन करित**
**रिपु तव झणीं तयातें वधि ॥ धृ० ॥**
**संधि दवडितां पूर्ण रथासह ॥**
**इंद्रजीत हा त्रैलोक्यासह ॥**
**भस्म करिल सर्वां तधि ॥ १ ॥**

—चला आतां. शुभस्य शीघ्रम्. मी मात्र तेथवर येणार नाहीं.

[सर्व जयघोष करून जातात.]

अंक प्रवेश २ रा. पाचवा.

**स्थळ :** इंद्रजिताचें कपटहोमगृह

[स्थळ : इंद्रजीत यज्ञांत आहूती देत बसला आहे.]

**इंद्रजीत०—**

**पद०** (शृंगा ताडोनी)

**वंदन अमरेशा ! तुजला करि रावणसुत हा ।।**
**यश मम यज्ञाला देई अर्पुनि जयरथ हा ।। धृ० ।।**
**अश्वां सारथिला त्या रथिं पाठवी स्थापुनियां ।।**
**विनवित सविनय मी आलो शरण इंद्रजित हा ।।**
**विसरुनियां द्वैता तैसे मत्कृत अपराधा ।।**
**श्रृंगारी लंका विजयानें चिर करि रणजय हा ।। २ ।।**

—हा एवढा माझा यज्ञ शेवटाला गेला तर त्या नीच रामासारखे कोट्यावधी वीर मी हां हां म्हणतां रसातळाला नेईन. प्रत्यक्ष शेषाच्या मस्तकावर लाथ मारून हा भूगोल डळमळून सोडीन अथवा माझ्या अस्त्रांच्या सहाय्यानें आणि या विजयरथाच्या प्राप्तीनें आकाश पाताळ एक करून कल्पांताला आत्तांच आमंत्रण करीन आणि निमिषार्धांत या सर्व ब्रह्मांडाचा नायनाट करीन तरच नांवाचा रावणसुत इंद्रजीत. ताता रावणा—

**पद०** (अब तोरे वाकी०)

**मनिं धरि शांती । कार्य तव सफलहि करित मी ।।**
**खास आज विजय वरुनि ।। धृ० ।।**
**रामसैनिकां रणीं वधाया । इंद्रदत्त रथ मिळंविन क्षणिं ।। १ ।।**

—असो. आतां ध्यानस्थ बसावं. [ तसें करतो.]

[ मारुती, सुग्रीव, जांबुवंत, रामसैनिक प्र. क.]

**मारुती०—**रामभक्त हो, हं : चला आटपा. हा पहा तो नीच राक्षस. करा त्याच्या यज्ञाचा विध्वंस. मी घेतो त्या दुष्टाचा समाचार.

[रामसैनिक जयघोष करून यज्ञाचा विध्वंस करतात.]

**सुग्रीव०**——यज्ञाचा विध्वंस झाला आणि अर्धा वर आलेला विजयरथहि नष्ट झाला ; परंतु या अधमाची समाधी कांहीं उतरली नाहीं. कमाल आहे !

**जांबुवंत०**——तो आपल्या भावी वैभवांत आणि पराक्रमात गुंग राहून स्वप्नांतल्या स्वप्नांत ऐश्वर्याच्या मिटक्या मारतोय बेटा. लाथ मारा हरामखोराच्या.

**मारुती०**——[इंद्रजीताला लाथ मारून] अधमा घातक्या राक्षसा !

**इंद्रजीत०**——(क्रोधानें उभा राहून) काय ? इतक्याही गुप्त ठिकाणीं येऊन या माकडांनीं माझ्या यज्ञाचा विध्वंस केला ? मशका, काळतोंड्या माकडा ! यज्ञाचा विध्वंस करून चाललास कुठं ? तुला येथून जिवंत सोडीन तेव्हांच ना तुझ्या रामाच्या दिग्विजयाचा झेंडा फडकणार ? [त्याच्या अंगावर धांवून जातो.]

**मारुती०**——[त्याला खालीं पाडून त्याच्या उरावर बसतो.] दैत्यपुत्रा ! कोण कोणाला जिवंत ठेवतो याचं प्रत्यंतर तुला अतांच दाखवितों.

**इंद्रजीत०**——चोरा, मी बेसावध असतांनां तूं चोरट्याप्रमाणं माझ्या यज्ञविवरांत प्रवेश करून यज्ञाचा विध्वंस केलास. पण अझून तुला या इंद्रजीताचा पराक्रम पाह्याचा असेल तर क्षत्रिय धर्मानुसार माझ्याशीं धर्मयुद्ध कर. मी हां हां म्हणतां तुझें नरडें कडकडा फोडून माझ्या यज्ञांत तुझी आणि तुझ्या सर्व रामसैनिकांची आहुती देतों.

**मारुती०**——अरे जा मशका ! मोठ्या सांगतोय क्षत्रियत्वाच्या गोष्टी नि धर्मयुद्धाचा बाणा ! अशोकवनात दिलेले तडाखे विसरलास ? पतिव्रतांचा छल करतांना धर्मयुद्धाचींच पारायणं केलीं होतीं वाटतं ? तुमच्या नरड्यावर तुमचा काळ बसल्यावर तुम्हांला धर्म आठवला काय ? नीचानों ! तुमच्या सर्वांच्या रक्तांनीं लंकेच्या समरदेवतेला स्नान घालून तुमच्या पातकांचा मळ पूर्ण धुतल्याखेरीज आम्ही रामभक्त रघुवीराच्या दिग्विजयाचा झेंडा लंकेच्या तटावर कधींच उभारणार नाहीं समजलात ? म्हणे धर्मयुद्ध कर !

**इंद्रजीत०**——अरे कशाला सांगतोस त्या तुझ्या मानवी रामाची बढाई ? त्याला समरांगणांत उताणा पाडून त्याच्या छातीवर अपमानाची लाथ मारून त्याचा प्राण घेण्यासाठींच या इंद्रजीताचा अवतार आहे समजलास ?

**जांबुवंत०**——त्याला उताणा पाडशील तेव्हां पाडशील. सध्यां तुझ्या उरावर कोण बसलाय त्याचा कांहीं विचार कर.

**इंद्रजीत०**——त्यांत काय विचार करायचा. हा पहा माझा पराक्रम ! [मारुतीचें व याचें द्वंद्व होतें.]

**मारुती०**——(त्याला पुन्हा खालीं पाडून) आजोबा, या अघोरी राक्षसांशीं बोलण्यांत काय अर्थ ? राक्षसा निशाचरा, ज्या मुखानं आमच्या श्रीरामाची निंदा केलीस त्यातील—ही बघ—जीभ खेंचून तुला यमसदनाला पाठवितों.

**जांबुवंत०**——[ त्याचा हात धरून ] हां हां हां ! हनुमंता, वाल्मिक वचनाला बाध कसा आणतोस ?

**मारुती०**——म्हणजे ?

**जांबुवंत०**——[ त्याच्या कानांत सांगतो ] असं आहे.

**मारुती०**——तरी पण याला असंच सोडणं घातक आहे. [ इंद्रजिताच्या छातीवर लाथ मारतो.] याला सध्यां ही शिक्षा पुरें आहे.

(रामभक्त जयघोष करून जातात.)

**इंद्रजीत०**——[ शुद्धी आल्यावर उठून बसतो.] हर हर ! अगदीं कार्यसिद्धीच्या वेळीं काय ही माझी दुर्दशा ! माझा अक्षय विजयी रथ अगदीं पूर्ण होऊन माझ्या हातांत पडणार, तोंच या दुष्ट माकडांचा घाला एवढ्याही गुप्त जागीं येऊन पडला ना ? शिव शिव ! आमचा सर्वस्वी घात झाला. आमच्या उन्मत्तपणाच्या महासागराला आजच ओहटी लागली, आणि आमच्या अंतकाळाचें स्वप्न आह्मांला आजच पडलें. जो मी वीर छातीवर हात मारून——[ छातीवर मारलेली लाथ पाहून क्रोधानें ] काय ? माझ्या छातीवर हा लत्ताप्रहार कोणाचा ? हं: समजलों. माझें नरडें दाबून मला बेशुद्ध केल्यावर त्या काळतोंड्या माकडानं दिलेला हा लत्ताप्रहार काय ? प्रत्यक्ष बापासारखा चुलता कुंभकर्ण त्या माकडांनीं समरांगणांत हाणून पाडल्यावर कोणाचं मस्तक क्रोधानं भडकून जाणार नाहीं ? स्वतःच्या छातीवर वै-याचा लत्ताप्रहार पाहून त्याचा कंठ चरचरा चिरून सूडाची भरपाई कोण करून घेणार नाहीं ? आणि एक्या हाडांमासाचा कोणता अस्सल बीज वंशज आपल्या कुटुंबाचा उच्छेद करणा-या घरभेद्यांचा नायनाट केल्यावांचून स्वस्थ बसेल ? कांहीं हरकत नाहीं. कोण आहे रे तिकडे ? माझा रथ तयार करा. मर्कटांनो, तुम्हीं माझ्या यज्ञाचा विध्वंस केलात, पण पहा आतां य इंद्राजीताचा परीक्रम ! त्या नीच रामाच्या नरडीचा घोंट घेऊन त्याच्या अस्थी या माझ्या दांतांनीं कडकडां फोडल्याशिवाय माझा क्रोधाग्नी कधींच शांत होणार नाहीं.

[जातो.]

———

अंक पांचवा.

## प्रवेश ३ रा.

**स्थळ०**——समरभूमीचा रस्ता

[ लक्ष्मण सैनिकांसह प्रवेश करतो. ]

**लक्ष्मण०**——शाबास, बहादर रामसैनिकहो! आपण सर्वांनी विजयादशमीच्या सुमूहूर्तावर प्रारंभ केलेली सीता-शुद्धीची मोहीम आतां खास फलद्रुप होणार. कुंभकर्णासारखा बलाढ्य योद्धा प्रथम समरांगणांत येतांच त्याचा शौर्यपर्वतावरहि ज्याअर्थी आपल्या पराक्रमाचं वज्र लागूं पडून त्याचा एका निमिषार्धांत चक्काचूर झाला, त्याअर्थी दैव आपल्यालाच अनुकूळ आहे खास. तेव्हां वीरहो, ज्याप्रमाणं तुम्ही सर्व या वेळेपर्यंत रामनामाच्या आधारानं त्याच पुण्यपुरुषाची कांस धरून ऐक्यभावानं एकमेकांना धीर देऊन दृढनिश्चयानं लढलात त्याचप्रमाणं आणखी थोडा नेट धरून सीतामुक्तीचं अत्यंत पावन व्रत तडीला नेऊन पोंचवा. मृत्यूची भीती बाळगून समरांगणांत कचर खाऊं नका. कारण जन्ममरणाच्या फेऱ्यांतून कोणताही प्राणी सूटत नाहीं. शत्रूंशीं लढतां लढतां समरांगणांत मृत्यू आला तर धारातीर्थात पतन पावल्यामुळें स्वर्गलोकच्या मुक्तीच्या तेजस्वी मंदिरांत तुमचा प्रवेश मोठ्या थाटामाटानें साजरा करण्याकरितां तेथल्या अप्सरा हातांत पंचारत्या घेऊन तुम्हांला ओंवाळण्यासाठीं सज्ज राहतील आणि विजय मिळविलात तर सीतादर्शन होऊन स्वामीकार्यसाफल्यतेचं उत्तम उदाहरण जगाला दाखवाल आणि अजरामर कीर्तीध्वजाचा झेंडा यावच्चंद्रदिवाकरौ फडकत ठेवाल. एका इंद्रजीताला समरांत ठार केला की रावणासारखें कोट्यवधी वीर मी एका क्षणांत रसातळाला नेईन.

**सुग्रीव०**——आपली आज्ञा आम्हांला शिरसावंद्य आहे. आपला इषारा होतांच आम्ही एकजात रामसैनिक या लंकेच्या किल्ल्यावर हल्ला करून सीतामुक्तीचा राजमार्ग अगदीं हां हां म्हणता सुलभ करूं.

[आंतून :——**इंद्रजीत०**——

**श्लोक——**

**कोठें जाशिल थांब थांब मनुजा रामानुजा जंबुका ।।**
**तोंडीं बाष्कळ वल्गना करिशि कां गर्वे अशा या फुका ।।**
**आला काळ तुम्हांस खास गिळण्या माता पित्याला स्मरा ।।**
**वारा हें प्रखरशस्त्र घातक अती सौख्यें स्वअंता वरा ।। १ ।।]**

**लक्ष्मण०**––(क्रोधानें) उन्मत्ता, कोणाला सांगतोस तुझ्या या प्रखरास्त्राचा प्रताप? मी तुझ्या सर्व अस्त्रांना आतांच आव्हान करतों. आमच्या पुण्यशील मातापित्याचं स्मरण तर आम्ही पदोपदी करतोच. परंतु उन्मत्तानों, ज्या महाख्यात रघूनं आपल्या शौर्याच्या प्रखर तेजानं एक वेळ या सर्व पृथ्वीला थक्क करून सोडलं होतं आणि आपल्या अजिंक्य अस्त्रप्रभावानं तुमच्यासारख्या अनेक राक्षसांना जर्जर करून दे माय धरणी ठाय करायला लावलं होतं त्याच थोर रघूचा हा अस्सल वंशज तुला एकच शक्तीप्रभावानं जागच्या जागी ठार करतो. मी जर आज सतत चौदा वर्षे निराहार राहून ब्रम्हचर्यव्रतानं बंधूसेवा करीत असेन तर ही अस्त्रशक्ती तुला अखेरचाच मोक्ष देईल. जा (बाण सोडतो. **आंतूनः**––" ठार झालो, मेलों ऐकूं येतें.]–चला, सैनिकहो, श्रीरामाला हें सर्व वृत्त कळवून पुढच्या रावणवधाची सांगता करूं.

[जातात.]

—

अंक पाचवा.

## प्रवेश ४ था.

**स्थळ :** अरण्यरस्ता

[विप्रभक्षक व सर्वभक्षी समोरासमोर येऊन भेटतात.]

**विप्र०**—बाबा सर्वभक्षे—

**सर्व०**—बाबा विप्रभक्षका—

**विप्र०**—आतां आपलं कसंरे होणार ?

**सर्व०**—मी तरि त्याच काळजींत आहेरे बाबा.

**विप्र०**—आपण आतां दोघेहि मरणार.

**सर्व०**—मरतांना एकदम मेलों तर पत्करलं. परंतु एकामागून एक मेलों तर मात्र पंचाईत. कारण जो आधीं मरेल तो भूत होऊन दुसऱ्याच्या बोकांडी बसेल.

**विप्र०**—अरे बाबा, त्या भूतांच्या आणि पिशाच्चांच्या गोष्टीच काढूं नकोस. आतांशीं या लंकेंत भूताटकीचा अगदीं सुळसुळाट उडाला आहे. जेवढे राक्षस या युद्धांत मेले तितके सारे भूत होऊन आपापल्या घरांत ओरडत फिरत असतात. साऱ्या रस्त्यांवर रात्रीं अपरात्रीं रडत असतात. त्या भूतांच्या चेष्टांमुळें त्या राक्षसांची बायका पोरं भेदरली जाऊन तीं देखील अर्धीमुर्धी पिशाच्चं बनत चाललीं आहेत.

**सर्व०**—मग मी असं म्हणतों यदाकदाचित् रावण महाराजांना या मोहिमेंत विजय मिळाला तर या असल्या पिशाच्च खैसांच्या राजधानीवर राज्य चालवायला त्यांना जरा कठीणच पडेल.

**विप्र०**—यांत काय कठीण पडणार आहे त्यांना ? कारण जितके राक्षस मेले तितके सारे पिशाच्च होऊन आपआपल्या जागेवर रूजू होतील. प्रहस्थ प्रधानजी मेले तरी ते भूत होऊन प्रधानकीचीं वस्त्रें पुन्हा घेतील. इंद्रजीत युवराज, कुंभकर्ण मारे सगळी जाडीं धेंडं पूर्ववत् आपआपल्या दर्जावर खैस म्हसोबांच्या रूपानं विराजमान होतील. मग अशा रीतीनें ही लंका वेताळाचं साम्राज्य झाल्यावर सर्व प्रजा भुतं आणि रावणराजे जिवंत पिशाच्च. मग हा खैसपिशाच्च राज्याचा गाडा अगदीं सुरळीत चालेल.

**सर्व०**——अरे पण गड्या, त्यांत एक युक्ती आहे. या भूतांच्या आदलाबदलींत आणखी एक चांगली संधी साधून आपण या दूतवृत्तीला कायमचा रामराम ठोकावा आणि एखादा चांगला वरचा दर्जा पटकावावा.

**विप्र०**——अरे पण, त्यासाठीं आपण आधीं मेलं पाहिजे.

**सर्व०**——तें तर ठरलंच म्हणा. कारण मृत्यू आपली इच्छा पुरी करायला अगदीं आ पसरून बसला आहे. आपण हो म्हणायचा अवकाश कीं त्यानं गटकावलंच समज.

**विप्र०**——पण त्यानं आपल्याला गटकावलं आणि आपल्याला पुन्हा भूत होण्यासाठीं जर ओंकून बाहेर टाकलं नाहीं तर मग कसं काय करायचं ?

**सर्व०**——अंः ! त्यांत कसली अडचण ? मृत्यूनं आपल्याला गिळलं आणि आपण त्याच्या पोटांत जाऊन पडलों कीं मग आपण त्याच्या पचनीं पडायचंच नाहीं. मग तर अडचण नाहीं ना ! हंः आतां आपल्या मृत्युयात्रेची तयारी केलीच पाहिजे. आणि गड्या, आतां रावणं वन्दे——रावणं वन्दे म्हणूं नकोस. आतां मरणं वन्दे——मरणं वन्दे म्हणायची संवय ठेव.

[ आंतूनः——हा षंढानो ! लढाईला भिऊन आपलीं काळीं तोंड घेऊन इकडे पळून आलात ? आजपर्यंत ज्याचं अन्न खाल्लं त्याच्यावर प्रसंग गुजरला असता समरांगणांत कचर खाऊन मागें फिरतां ? धिःकार असो तुम्हांला. ]

**विप्र०**——हां ! ते आपले नवीन सेनापती रागावून इकडेच येत आहेत तर चल आधीं पळून जाऊं.

**सर्व०**——( त्वेषानें ) काय करूं रे ! जिवंतपणींच पिशाच्च होण्याची युक्ती जर मला माहीत असती तर मी आतांच खैस म्हसोबा होऊन या सेनापतीच्या बोकांडी बसलों असतों. मरा म्हणून फुकटचा उपदेश करायला यांच्या बापाचं काय खर्च होतं ?

**विप्र०**——पिशाच्च झाल्यावर मी आधीं याच्याच बोकांडीं बसणार. चला आतां पळा. पुढचं पुढं !

[ जातात. ]

---

अंक प्रवेश ५ वा. पाचवा.

**स्थळ :** समरांगण.

[ रावण हताश होऊन समरभूमीवर पडला आहे. ]

**रावण॰**——मी कुठं आहें ? मी शुद्धीवर आहे ना ? अरे पण ! हा काय चमत्कार ?——

**पद.** ( रघुराया सदया॰ )

**मम नयनां दिसतो रामरिपू हा भरूनि उरे**
**स्थीरचरीं आजि कसा ॥ धृ॰ ॥ भूमि राम ही**
**तरुवर अरीस्वरुपीं । अंत न या मूर्तीतें ।**
**मतिभ्रम हा जडला ॥ १ ॥**

——पण हा सारा भ्रम आहे आणि ही समरभूमी आहे. हाय ! हाय राक्षस सैनिकहो ! हा पहा तुमचा लंकानाथ रावण आज हताश होऊन लंकेच्याच समरभूमीवर पडला आहे. माझ्या अविचारानं देखतांदेखत पाठचे भाऊ, पोटचे पुत्र आणि पौत्र यांचा अगदीं थोड्या काळांत सत्यानाश करून, अखेर पत्नीवर बलात्कार झालेला दाखवीला. काय माझें नशीब ! जो मी रावण रत्नजडीत सिंहासनावर बसत होतो; ज्या माझ्यावर चंद्र छत्र धरीत होता आणि जो मी पंचमहाभूतांवर अंमल चालवीत असें; तोच मी लंकाधीश आज अनाथ व दुबळा होऊन रक्तांनीं भिजून चिंब झालेल्या समरांगणांतल्या मातीवर पडलों असतां माझे ते छत्रधारी सेवक माझ्याकडे पाहून थट्टेनं हांसत आहेत. राज काय किंवा महाराजाधीराज काय, जोंपर्यंत तो घोड्यावर आहे तोंपर्यंत हे सारे त्याच्यापुढें हांजी हांजी करतील; पण त्यांनीं एकदां घोड्यावरून खालीं पाऊल टाकलं पुरे कीं हे कृतघ्न सेवक त्याच्या तोंडावर लत्ताप्रहारहि करायला चुकायचे नाहींत. करा बाबानों करा. आतां काळ तुम्हांला अनुकूल आहे. विभीषणा, तुझ्या उपदेशाचा ज्यावेळेला मी धिःकार केला आणि तुला नाहीं नाहीं तीं दुरुत्तरं बोललों तो काळ आतां मला पूर्ण डांचत आहे. परंतु बिभीषणा, तूं असा घरभेद्येपणा करून मला काळाच्या तोंडीं द्यायचें नव्हतेस रे ! बिभीषणा ! मी रामस्वरूपाला पूर्ण ओळखतो. त्याचा पवित्र बाण माझ्या हृदयांत शिरावा यासाठींच मी विरोधभक्तीचें उदाहरण सर्व जगाला दाखवीत आहे. अरे ! पण या गृध्रादिकांनीं या समरभूमीवर अगदीं ताळच ठेवला नाहीं. अरे, माझ्या अवयवांचा इतक्यांतच बोंचबोंचून कां फन्ना उडवतां ? या रावणाच्या प्रचंड देहाची अखेरीस

तुम्हांलाच मेजवानी होणार आहे. पण बाबानों ! इतकी उतावळी कां करतां ? या रावणाचे हे पाणीदार डोळे त्यानं शत्रूंवर वटारले असतां त्याचा देह एका क्षणांत भस्मीभूत व्हायचा, त्यांतील हीं अश्रूंनीं डबडबलेलीं बुबुळं थोड्या वेळांनीं तुमचा भडकलेला जठराग्नी शांत करतील. ही माझी कसलेली वज्रप्राय छाती जिच्यावर अनेक अमूल्य रत्नजडीत हार रूळत असत, जिच्यावर या रावणानं अनेक प्रसंगी आपल्या मर्दुमकीच्या आवेशांत मी मी म्हणून हस्तप्रहार केले, ज्या याच भाग्यवान् छातीनं पट्टराणी मंडोदरीला प्रेमानं दृढालिंगन देऊन तिच्या वदनचंद्राचं अधरामृत मी प्राशन केलं आणि ज्या याच छातीला त्या जानकीच्या आलिंगनाची इतके दिवस आशा लावून ठेवली होती, तीच छाती आणखीं कांहीं वेळानं त्यांतील रक्तमांसादि खाऊन टाकून तिला हाडांचा पोंकळ पिंजरा करून ठेवाल. हाय हाय ! माझ्यामागें त्या माझ्या जिवलग मंडोदरीची आतां काय भयंकर अवस्था होईल ? प्रिये--

**पद.** ( निज मख रक्षाया. )

**अवगणूनी वांया । मंगलशा त्या । उपदेशा नीचानें ॥ धृ० ॥**
**त्रैलोक्याचें वैभव गत तें हत तव पति हो अविचारानें ॥ १ ॥**
**वैधव्याच्या पंकीं तुजला फेंकुनि दिधलें या अधमानें ॥२ ॥**
**विसरूनि विभवाला । भवाला । ध्याई तूं शिवाला ॥**
**याविण दुसरा मार्ग नसे तुज ॥ सौख्य तुला दिधलें नच पतिनें ॥ ३ ॥**

--कर्मगती कधींच चुकणार नाहीं. अंतकाळी या रावणाच्या बरोबर शुष्क मृत्तिकासुद्धां येत नाहीं ना ? माती तर राहूंद्याच पण मृत्युमुखांत पडते वेळी तोंडांत घोटभर पाणी घालायला देखिल जवळ पुत्र नसावा काय ? बरोबरच आहे--

**साकी.**

**राव रंक हा भेद भूवरीं ईशगृहीं सम सारें ॥**
**रविकिरणापरि विविध स्थलातें भूषविती क्षणमात्रें ॥**
**परतचि ते फिरतां । होते प्राप्त तया समता ॥ १ ॥**

[ आंतून " जय जय रघुवीर समर्थ " जयघोष होतो. ]

**रावण०**--काय ? माझ्या शत्रूचा जयघोष ? आणि तो या लंकेच्या समरांगणावर ? तो मी कधीच सहन करणार नाहीं. [ उठून धनुष्य बाण सांवरतो. ]

**राम०**--( आंतून ) रावणा, या ब्रह्मास्त्राची शक्ती संभाळ.

**रावण०**--तुझ्या ब्रह्मास्त्रावर--हें पहा--[ इतक्यांत शक्ती लागून रावण खालीं पडतो. ] राम राम राम [ मरतो. ]

[ रामसैनिक प्र. क. राम त्वेषानें प्रवेश करून रावणाच्या उरावर एक पाय देऊन उभा राहतो. ]

**राम०**——सेनापती, युद्ध बंद करा. कर्णे, तुताऱ्या, शिंगें फुंकून रावणवधाची निशाणी म्हणून आपल्या दिग्विजयाचा झेंडा लंकेच्या तटावर उभा करा. पळून जात असलेल्या राक्षससैनिकांवर बाणांची वृष्टी बंद करा. नि हतबल झालेल्या सैनिकांना पूर्ण जीवदान दिल्याची द्वाही सगळ्या समरांगणावर डंका वाजवून जाहीर करा.

**सुग्रीव०**——ठीक आहे. आज्ञेप्रमाणें व्यवस्था ठेवतों. [ जातो. ]

**मारुती०**——श्रीरामा, रावणाची प्राणज्योत पंचतत्वाला मिळाली.

**राम०**——होय खरेंच. [ त्याच्या प्रेतास वंदन करून ] शाबास रावणा शाबास ! तुझ्यासारखा पराक्रमी योद्धा तूंच. तुझ्या शौर्याची बरोबरी करणारा वीर मागें कधीं झाला नाहीं न् पुढें कधीं होणार नाहीं. सैनिक हो ! ——

**पद.** ( रघुवीरपदीं रमुनि० )

**हा हत पडे समरि मम धनुला ॥**
**रावण वरि अंताला ॥ धृ० ॥ इहलोकींचें वैभव**
**सारे गेलें नच संगतिला ॥ १ ॥ सत्कृति जाते मात्र**
**बरोबर कुमति चुकवि सग्दतिला ॥ २ ॥**
॥ चाल ॥ **ज्यानें दानव देव थोर अवघे कारागृहीं घातले ॥**
**वायू सूर्य विरंची इंद्र प्रबलां तत्सेवनीं योजिले ॥**
**ज्याचा धाक अगाध ऐकुनि मनीं अंबापती कांपला ॥**
**तो हा रावण संगरांत पडतां तेजोगिरी लोपला ॥**
**रणजय वरि सत्याला ॥ ३ ॥**

परंतु यानं मरतांना माझं नांव उच्चारलं, त्याअर्थी याला आतां सद्गतीच मिळेल. वास्तवि पहातां रावणा——

**पद्यार्ध**

**वाटे भक्त मदीय तूंच करूनी भक्ती विरोधी पुरी ॥**
**अंतीं अक्षय मोक्षसद्यत्पदिं स्वयें सेवी खरी माधुरी ॥**
**कोणी काय निमित्त भक्ती करतो तें सर्व मातें कळे ॥**
**अंतीं तारक मीच एक सकलां हें तत्व ज्यातें कळे ॥**
**तो जन मुक्तिस गेला ॥ ४ ॥**

असो सौमित्रा, हें धनुष्य आणि हा भाता संभाळ !

**लक्ष्मण०**——म्हणजे ?

**राम०**——रावण मुक्तीला नेऊन देवादिकांची याच्या दास्यत्वांतून मुक्तता केली. आमचें अवताराचें कृत्य येथून संपलें.

**बिभीषण०**——[ शोकाकुल प्र. क. रावणाच्या शवावर पडतो. ] बंधो रावणा, काय तुझा हा अंत !

**पद.** ( मोरे कान भनकवा० )

**मज काय जगतिं या उरले ॥**
**सारे हें जग वाटतसे शून्यचि ।**
**तुजविण लंकाधिपते ! ॥ धृ० ॥**
**बळ अद्‌भुत तें आटे सर्वहि ।**
**तप तव दारुण काय विफल तें ।**
**वेदखंड करणार चतुर तूं**
**सकल गुणनिधे ॥ १ ॥**

**राम०**——[ त्यास उठवून ] बिभीषणा, अरे तूं विवेकाचा सिंधू असून नाशिवंताचा शोक करतोस ? पहा——

**पद.** ( माझें हृदय पोळत० )

**या क्षणभंगुर जगतितलीं चिरमयसे कांहीही नसे ॥ धृ० ॥**
**जल बुद्‌बुद्वत माया मतिस व्यापिते ॥**
**कौटुंबिक सुखदुःखा सतत दाविते ॥**
**परि अंतीं सर्व निराधार सत्य तें ॥**
**मिळतें कृतकर्मांकित नित फल मात्र योग्यसें ॥ १ ॥**

**बिभीषण०**——श्रीरामा, तुझ्या अमृतमय वचनानें माझा शोक पार नाहींसा झाला.

**मारुती०**——( स्व. ) ' सीता घेऊन ये ' अशी आज्ञा श्रीराम कधीं करतात कोण जाणें ?

**राम०**——लक्ष्मणा ! तो पहा, रावणाच्या ऐंशी हजार राण्यांचा समूह शोक करीत मंडोदरीसह इकडेंच येत आहे, तर तूं या बिभीषणाकडून त्यांची नीट समजूत घाल; आणि लंकेतले सर्व रहिवाशी शांत करून बिभीषणाची लंकेच्या गादीवर स्थापना कर.

**लक्ष्मण०**——जशी आज्ञा. बंधो बिभीषणा चलावं आपण.

**बिभीषण०**——मी तर येतोंच. परंतु श्रीरामानीं कृपा करून लंकानगरींत प्रवेश करावा.

**राम०**——बिभीषणा——

**पद.** ( माई मोरे नयन० )

**मम करिं लंका दान तुम्हांला ॥ धृ० ॥**

**कन्येसम ती नगरी-बाला प्रियकर आम्हांला ॥ १ ॥**

**म्हणुनि आगमन योग्य न दिसतें कन्यासदनाला ॥ २ ॥**

**आनंदानें करि कन्येच्या पाणिग्रहणाला ॥ ३ ॥**

**बिभीषण०**—जशी आज्ञा. [ लक्ष्मणादिकांसह जातो. ]

**राम०**—मारुता, आतां तूं—

**मारुती०**—आतां सीतामातेला घेऊन येतों.

**राम०**—थांब. अशी उतावळी करूं नकोस. सांप्रत दशकंठ रावणाचा वध करून, आपण तेहतीस कोटी देवदानवांची त्याच्या बंदीशाळेंतून मुक्तता केली आहे; तथापि ज्याअर्थी लंकेचं राज्य बिभीषणाला आपणच अर्पण केलं आहे त्याअर्थी लंकापती बिभीषणाच्या सल्ल्यावांचून आपल्याला या कामांत कांहींएक करतां येत नाहीं.

[ सुग्रीव प्र. क. ]

**सुग्रीव०**—रघुवीराचा जयजयकार असो. महाराज, सांप्रतचे लंकापती बिभीषणमहाराज यांची राणी सरमा नुकत्याच अशोकवनांत सीतामातोश्रींनां मंगलस्नान घालण्याकरितां सर्व साहित्य घेऊन गेल्या आहेत. आपणहि लवकरच मंगलस्नान करून सीतेला भेटावें अशी लंकापतीनीं आपल्याला विनंती केली आहे.

**राम०**—ठीक आहे. तुम्हीं माझ्या मंगलस्नानाची तयारी करा. मी सर्व वानर-सैनिकांची विचारपूस करून लवकरच तिकडे येतो.

[ मारुती व सुग्रीव " जशी आज्ञा " म्हणून जातात. ]

**राम०**—( स्व. ) त्रिभुवनालाही जर्जर करून आपल्या बाहूबलानं इंद्रब्रह्मादिकांना जिंकणाऱ्या पराक्रमी रावणाला समरांगणांत जरि मी माझ्या वानरसैनिकांच्या सहायानं उलथापालथा लोळवला, तरीपण अशा विजयाच्या आनंदोत्सवांतही माझं मन अझून कां प्रफुल्लीत होत नाहीं कोण जाणें ! कदाचित् असें असेल—

**पद.** ( धाबरते कां अझुनी. )

**तात न माझा अवनीं विजय परिसण्यातें ॥ धृ० ॥**

**दैत्यताप सारा हरुनी । धन्य केलि अवघी धरणी ।**

**कोण धरिल हृदयीं प्रेमें रघूवंशजातें ॥ १ ॥**

**अरुणप्रभा जेंवी रविची । तातप्रीति तनयावरिची ।**

**स्वाद तिचा आतां कैचा मिळे अभाग्यातें ॥ २ ॥**

[ आंतून :--" अहो अरण्यपंडीत, जरा थांबा--जरा थांबा. असे एखाद्या नंदी-बैलाप्रमाणं हुरळून काय जातां ? लढाईत विजय कोणाला मिळाला न् तुम्ही नाचतां कोणासाठीं ? उभे रहा. " ]

**राम०**--( स्व. ) हे कोणी तरी लंकेंतले रहिवाशी प्रस्तुतच्या युद्धक्रांतीबद्दल कांही तरी बोलत येताहेत. यांचें हें भाषण आपण ऐकलंच पाहिजे. [ जातो ]

[ अरण्यपंडीत व अधिकाऱ्या प्र. क. ]

**अधिकाऱ्या०**--[ पूर्वोक्त " अहो अरण्यापंडीत " इत्यादि म्हणत प्र. क. ]

**अ० पं०**--कायरे बेट्या अधिकाऱ्या, असल्या आनंदोत्सवांत तुझीरे का माझ्या मागं टुरटुर ?

**अधिकाऱ्या०**--गळ्यांत फुलांचे हार काय घातलेत, त्या ढालीएवढ्या पागड्यांत तुरे काय खोंवलेत, हातांत गजरे काय घातलेत ! अहो थेरडोपंत, जनाची नाहीं पण मनाची तरी कांहीं लाज ? आजचा प्रसंग कोण ? काय कोण ?

**अ० पं०**--कसलारे आलाय प्रसंग ? आमच्या लंकेंत आज राज्याभिषेकाचा केवढा मोठा समारंभ चाललाय नि याला आपले आठवताहेत प्रसंग. अरे बेट्या प्रसंगाचे दिवस गेले. आतां तर मोठ्या आनंदाचे न् शांततेचे दिवस आले. समजलास का ? काय सांगू तुला अधिकाऱ्या, ही लढाई जेव्हां अगदीं जोरांत होती तेव्हां तर माझ्या जिवांत जीव मुळींच नव्हता. रावणमहाराजांनीं पोक्त विचार करून अन्नसामुग्रीच्या कोठारावर अस्मादिकाची योजना केल्यामुळं तेथल्या मिष्ट मिष्ट पदार्थांवर यथास्थित हात मारून मढ्यासारखा पडून होतों. पण आतां नाहीं हो मी तसा ! आतां काय ? जिकडंतिकडं अगदीं खाण्यापिण्याची चंगळ उडणार.

**अधिकाऱ्या०**--मी तर या बिभीषणाला मी आपला राजा कधींच समजणार नाहीं. यानीं तर घरभेद्येपणा करून आमच्या रावणमहाराजांचा समूळ विध्वंस केला. आणि तोच हा स्वार्थसाधू आपल्या भावाच्या रक्तांनीं भिजून चिंब झालेल्या सिंहासनावर मोठ्या थाटामाटानं चढत आहे. मला तर हे बिलकूल पसंत नाहीं.

**अ० पं०**--पसंत नाहीं ? पसंत नाहीं तर जीव दे. अमक्यानं घरभेद केला, तमक्यानं अमकं केलं, यानं त्याचा हा करून याचा हा नाश केला, न् ह्यानं याचें सिंहासन पटकावलं या कोरड्या उठाठेवी तुला हुजऱ्याला न् मला खुषमस्कऱ्याला कशाला रे पाहिजेत ? तुम्हां आम्हां हांजीहांजी करणाऱ्या लाळघोट्यांनां या राज्याच्या उलाढाली काय कामाच्या ? वारा वाहील तशी पाठ द्यायची न् डबोलं हातीं लागलं का डल्ला मारायचा हे आपलं काम. रावणमहाराज होते तोंपर्यंत त्यांची हांजी हांजी, आतां

बिभीषण लंकापती झाले त्यांची हांजी हांजी. आपल्याला रे काय ? रावण मेला तरी त्याचं सुतक नाहीं नि बिभीषण राज्यावर बसला तरी त्याचा आनंद नाहीं, लंकाबेट रामराज्यांत सामिल होवो नाहींतर आर्यावर्त लंकाराज्याला इनाम मिळो, त्याचं सुखही नाहीं न् दुखःही नाहीं. मग कोणीका राजा होईना. मेलेले रावणमहाराज पिशाच्च होऊन गादीवर बसले तरी आम्हां लाळघोट्यानां त्याचं काय ?

**अधिकाऱ्या०**——थेरड्या, तुझा अन्नदाता रावण त्या मानवी दशरथपुत्रानं समरांगणांत चिरडून टाकला त्याची तुला कांहींच का लाज वाटत नाहीं ?

**अ० पं०**——वाटून काय करायची ? काय कोळून प्यायची आहे ? ज्यानां लाज वाटली ते समरांगणांत मरून गेले. मी तसा मूर्ख नाहीं. समजलास ? मी आतां स्पष्टच म्हणतो. तुला राग आला तर येईना बिचारा. काय रे ? रावणराज्यांत एवढी काय नीति रडत होती ? जिकडं पहावं तिकडं तुझ्यासारखे हलक्या दर्जाचे दूतसुद्धां उर्मट व मगरूर ! त्या दिवशींचा चाबकाचा फटका हा थेरडा कांहीं विसरला नाहीं हो ? असली ही ठोकाठोकीची नीती नाहींशी झाली हेंच बरं !

**अधिकाऱ्या०**——बरं बरं. इतका शेफारून जाऊं नकोस थेरड्या. पाहूं आतां त्या रामाची न् त्या बिभीषणाची नीति काय ध्वजा लावते ती. रावणमहाराजानीं सहासात महिने आपल्या राणीवसांत ठेऊन घेतलेली आपली बायको बिनदिक्कत कोणताही संशय न घेतां पुन्हा पत्करणारा राम कितीसा नीतीचा पुतळा आहे तें दिसतंच आहे. मीतर या गोष्टीबद्दल सर्व लंकेंत–नव्हे सर्व जगभर–डंका पिटल्याशिवाय खास रहाणार नाहीं. (जातो.)

**अ० पं०**——आणि मी तरि स्वस्थ बसेन वाटतं. आतां राजदरबारांत जाऊन ही चहाडी चांगली यथास्थित फुगवून बिभीषण महाराजांना सांगतो न् प्रहस्थ प्रधानजीची खाली झालेली प्रधानकीची जागा पटकावतो. [ जातो. ]

**[ राम प्र. क. ]**

**राम०**——( स्व. ) जन त्रिविध म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. या दोघांच्या भाषणानं माझा आनंद पार मावळून गेला. दशकंठाशीं घोर युद्धप्रसंग करतांना सर्व ब्रह्मांडाचा एका क्षणांत नायनाट करणाऱ्या अनेक प्रखरास्त्रांची मला त्यावेळीं क्षिती वाटली नाहीं; अनलास्त्र, पर्जन्यास्त्र, वज्रास्त्र अशा अगणित दारुण अस्त्रांनां मी सहज लीलेनं पार उडवून देत होतो; ज्या माझ्या धनुर्शक्तीनं रावणासारखा बलाढ्य योद्धा एका निमिषार्धांत मातीला मिळविला तीच माझी युद्धलीला न् धनुर्शक्ती या जनसमुहाच्या वाक्प्रहारापुढें पार बोंथट होऊन गेली. शत्रूच्या अनलास्त्रानं जळून खाक होणं पत्करलं परंतु समाजाचं हे तीक्ष्ण दोषास्त्र पत्करणं फार कठीण. सद्धर्माच्या स्थापनेकरितां,

सत्याचा रक्षणाकरितां, न् उन्मत्त राक्षसांपासून भूमीला झालेला असह्य ताप छेदण्याकरितां मी इतका दारुण संग्राम करून लंकेच्या समरदेवतेला राक्षसांच्या रक्तांनीं भिजवून शांत केली, ती याच दोषाकरितां काय ? सहस्त्रमुखी शेषाच्याहि वर सरशी करणाऱ्या या अनंतमुखी समाजाला माझी प्रियतमा अखेरीस बळी पडणारसें दिसतें. बिभीषणाचं सत्यत्व निष्कलंक राखण्यासाठीं न् माझ्या रघुवंशाचं नीतीचं ब्रीद प्रज्वलीत ठेवण्यासाठीं—प्रिये, सीते—मला तुझा अझूनहि त्याग करावा लागणार ! हरहर !

**पद.** [ कौन रिझावन. ] असावरी—त्रिवट.

**मति कुंठित होउनि जाई ही अघटीत कर्मगति**
**सुपथ त्यजुनि मज नेत विरहिं सति त्यागुनीया ॥ धृ० ॥**
**प्रेमश्रृंखला तुटतां विरहीं सहचरिवांचुनि राहुं**
**जगतीं या केंवि श्रमाया ॥ १ ॥**

( जातो. )

---

अंक प्रवेश ६ वा. पाचवा.

**स्थळः** अशोकवन

**पात्रें :** सीता व त्रिजटा

**त्रिजटा०**——सीताबाई, तुम्हांला आज मंगलस्नात झालेली पाहून मला आनंद होत आहे. कारण असं पहा——

**पद.** (काहेकु दिने सैंया०)

**स्फूर्ति सकल स्थलिं पातली । मनिं आनंद होई ।।धृ०।।**
**खगगण उडति स्वैरचि अंबरीं ।**
**गुणगुण प्रभुगुण गाति ते ।। १ ।।**
**तरूवर डुलती विजयानंदें ।**
**सुमन–वृष्टि करितात ते ।। २ ।।**
**रघु–रवि तेजें भूषित करि मही ।**
**अधर्म–तम झणिं नाशलें ।। ३ ।।**

——आतां तुमची आणि रामाची भेट झालेली एकदां पाहिली कीं डोळ्यांचंच नव्हे तर जन्माचं सार्थक झालं असंच मी समजेनं.

**सीता०**——त्रिजटे, तूं म्हणतोस तसा मलाहि आनंद होऊन आज जिकडे तिकडे आनंदी आनंद दिसत आहे. पहा——

**पद.** (पुष्प राग०)

**मुक्त जनांस आनंदवी स्फूर्ती ही मधु विजयरवा जन**
**काढितसे ।। प्रेमळ अंतर अखिल जिवांचे प्रभुवर ।**
**लीला गातसे ।।धृ०।। बंधमुक्त त्या दानव देवा**
**पंचभुतांनां हर्ष भरे ।। विजयरंगिं ते सद्धर्माच्या**
**गुंगचि दिसती प्रेमरसें ।। १ ।।**

——परंतु श्रीरामदर्शन होऊन त्यांनी माझा स्वीकारच केला नाहीं तर माझी काय स्थिती होईल ?

**पद.** (शामरे मोरी०)

**वल्लिगे जशि तरुविना ती। पतिविना ती होय**
**युवती ॥धृ०॥ भानुविना महि तेज न पावे।**
**वसंत नच सुमनां न स्फूर्ती ॥ १ ॥**

—असेल विचार अझूनहि माझ्या मनांत घोळत आहेत.

**त्रिजटा०**—अं! त्याची आपण काळजीच करूं नये. परिसापासून आणि अमृतापासून कधीं अपाय कां होतो ? त्याप्रमाणं श्रीरामचंद्राचा स्पर्श या अशोकवनाला झाला पुरे कीं सुर्योदयाबरोबर अंधःकार जसा नष्ट होतो तसंच या दुष्ट विचारांची रक्षा झालीच समजा. अहाहा ! हा प्रातःकाळचा समय आणि हा रामदर्शनाचा शुभसमय पाहून मला असं वाटतं—

**पद.** (यह बदिमे पाया०)

**हा पवित्र प्रातःकाळ। मंगल काल। ही प्राचिदिशा**
**सुविशाल। सजलिसे कुंकुम लावुनि लाल ॥ ही**
**झांकि निचे द्वय गाल। धुक्याची शाल। तिज दूर**
**सारुनी चुंबनरत दिक्पती पाहि वधुभाल ॥**
**नभिं भास्कर उदया येतो।**
**हा प्राचिदिशापति गमतो।**
**नववधू स्वागता घेतो।**
**गुंफुनी किरणपुष्पांस। हार नाथास। अर्पि वधु छान ॥ १ ॥**

—तो पहा मारुतीच इकडं येत आहे.

**मारुती०**—(प्र० क०) माते, या हनुमंतावर तुझी कृपादृष्टी असावी. [ नमस्कार करतो. ]

**सीता०—पद.** (छब दिखला०)

**उठि झणिं बा देई दर्शन मातें रामपदांकित वायुसुता ॥धृ०॥**
**विजयध्वजा रणीं फडकवुनीया। यशवंतचि**
**तो रामसखा। मज भेटे कधीं त्वरितहि सांगे ॥**
**रामपदांकित० ॥ १ ॥**

**मारुती०**—माते, श्रीराम आपल्या भेटीकरितां इकडचं येत आहेत हें सुचविण्याकरितांच मी इकडं आलो. लक्ष्मणानं बिभीषणाला लंकेच्या गादीवर स्थापन केलं आणि त्यासंबंधानं तिकडं मोठा सोहळा चालला आहे. आतां या आमच्या त्रिजटाबाई राजकन्या झाल्या बरं.

**त्रिजटा०**—मारुती, सत्याचाच नेहमीं विजय होत असतो.

**सीता०**——तरिपण, इच्छित वस्तुलाभाचा काळ जसजसा जवळ येतो, तसतसा आनंद तर होतोच. परंतु त्या आनंदाच्या उकळ्या इतक्या कांही जोरानं वाढूं लागतात कीं त्यामुळं मनोविकारांना त्या असह्य होऊन हें हृदय कोंसळून पडतं कीं काय, असं वाटतं.

[ राम प्रवेश करतो. मारुती जातो. ]

**राम०**——सीते——

**त्रिजटा०**——अगबाई श्रीराम आले वाटतं ?

**सीता०**——प्राणनाथ—— [ त्यास मिठी मारते. ]

**राम०**——(स्व.) अरेरे ! या सहा महिन्यांत माझ्या प्रियेची काय ही दुर्दशा झाली ! बरोबरच आहे——

**पद.** (म्यां लोटिली०)

**या निटिलीं लिखित जें । टळत न तें भोगिल्याविणें**
**जगिं भोगिति दानव देव जे ।। धृ०।।**
**पराक्रमी ते नवग्रह सारे । शनि मंगल क्रौर्या**
**वरणारे । दास्यबंधनीं पडुनी बिचारे । साहति**
**तापा शूर जे ।। १ ।।**

——(उ०) प्रिये सीते ! ——अरे पण ही शुद्धींतच नाहीं वाटतं ? सीते-सीते जागृत हो.

**सीता०**——मी स्वप्नांत तर नाहीं ना ? छेः हें स्वप्नच आहे.

**राम०**——(स्व०) लोकापवादासाठीं मला अभाग्याला हिचा अझून त्याग करावा लागणार ! काय होईल तें होवो. (उ.) प्रिये जानकी, हें स्वप्न नव्हे.

**सीता०**——प्रियकरा——

**पद.** (आज मैं लढुंगी०)

**आज विरह लोपला । धन्य धन्य जनन होई ।। धृ० ।।**
**सुखसेवन दुःखांतीं हर्ष मना देई ।।**
**प्रगट करी सुखमाधुरी**
**मधुर लाभ लाभला ।। १ ।।**

——आतां तरी ही पुनर्भेट अक्षयिची असो. [ मिठी मारण्यास जाते तोंच राम रागानें तिला प्रतिकार करतो. ]

**राम०**——हां ! दूर हो. तुला फक्त एकच आलिंगनाचा अधिकार होता. तो तूं भोगलास. आतां इतःपर माझी आशा सोड.

**सीता०**——[ घाबरून ] म्हणजे ?

**राम॰**——तूं आपला पुढचा विचार तुंच पहा. मला तुझी बिलकूल जरूर नाहीं. तुला असुरांनी नेली हा अपवाद टाळण्यासाठीं मी एवढा युद्धप्रसंग करून दशकंठाला ठार मारलं.

**त्रिजटा॰**——पण रामा, त्यांत सीताबाईचा असा अपराध कोणता ?

**राम॰**——तें मला कांहींच सांगतां यायचं नाहीं.

**सीता॰**——हा फुटक्या नशिबाचे सीते, तुझं दुर्दैव तुला अझून छळणार खास !

**पद.** (मी समजुं तरी॰)

**हें अघटितचि कायघडे जनिं ॥**
**प्रियकर नाथा भेटायातें अननुभवी ये संकट**
**दिसुनी ॥ धृ॰ ॥ अमृत–कलशीं मुख लावावें ॥**
**त्क्षणिक अमृत विषमय व्हावें ॥ स्वकिय गुणा**
**परिसें त्यागावें ॥ त्यापरि मम पति सति त्यागोनी ॥ १ ॥**

——नाथा रामचंद्रा, हा काय माझ्यावर गहजब ?

**पद.** (हजारा मेरा॰)

**प्रणयि मम पारखी होता ॥ धृ॰ ॥**
**अर्धांगीला विरहीं अशि कां छळितां ॥ १ ॥**
**कृतापराधा जावें विसरूनि आतां ॥ २॥**

**राम॰**——तुझ्या पावित्र्याबद्दल माझी आणि सर्व जगाची खात्री कशी पटावी ?

**सीता॰**——हाय ! [ बेशुद्ध पडते. ]

**त्रिजटा॰**——महाराज आपण सूज्ञ, त्रिकालज्ञ आणि प्रत्यक्ष परमेश्वरांश असून काय ही आपली विपरीत कृती. सीताबाईच्या पावित्र्याबद्दल सामान्य जनांनी संशय घ्यायचा म्हटलं म्हणजे अंती नरकाचीच प्राप्ती. आतां तो संशय आपणच घेतला म्हणूनच शोभतंय. परंतु सीताबाईची योग्यता मी तरि पूर्ण जाणून आहें. अहो——

**पद.** (जरा ठाडे रहो॰)

**पावित्र्यहि यांचे लाजवी भगिरथजा जान्हवी ॥ धृ॰ ॥**
**रवि लपवितसे निजवदना । पाहुनि ही पुनितचि ललना ॥**
**तत्प्रताप पतिव्रत राखण्या चपलेला दीपवी ॥ १॥**
**तव वच नच, वन्हि गमतसे । दृढनिश्चय वज्र वधितसे ।**
**निष्कारण ही अबला सती पतिप्रणया दाखवी ॥ २ ॥**

[ सीतेला सावध करून उठवितो. ]

**राम॰**——मला या नीतिवादाची जरूर नाहीं.

**सीता०**––प्राणनाथ––

**पद.** (वहतेरा समजायोरी०) **भैरवी.**

**ललनेतें अवमानोनी या समया ॥**
**कुमतीला मनीं वरिली कां या समया ॥ धृ० ॥**
**प्रणय–भंगा या शोभत नाहीं ॥ १ ॥**
**उचित खचित नच घातक हा अंकुर त्या ॥ १ ॥**

**त्रिजटा०**––दयेची व आपली गांठ पडते कां ?

**राम०**––हिनं आपलं पावित्र्य सिद्ध करावं आणि मग माझ्या स्पर्शसुखाची अपेक्षा करावी. खरी पतिव्रता अग्नींत प्रवेश करून आपलं पावित्र्य सिद्ध करीत असते.

**त्रिजटा०**––तेंच आपण सीताबाईना करायला सांगतां कीं काय ?

**राम०**––सूज्ञाला एकच शब्द पुरे असतो.

**सीता०**––(त्वेषानें) इतकंच ना ? प्रख्यात धनुर्धराच्या पत्नीला हें कांहींच अवघड नाहीं. कारण––

**पद.** (काय तुझी निष्ठुरता०)

**धन्य वंश मम श्वशुराचा गाजतो त्रिलोकीं ॥ धृ० ॥**
**दैत्यताप सारा हरुनी अश्वमेध केले ॥**
**रामरायजाया तेजा त्यजि न कधिं विलोकी ॥ १॥**
**थोर जनक नृपतीकन्या धरणि धन्य माता ॥**
**काय सिद्ध न करी मजला वन्हि पाहूं दे कीं ॥ २ ॥**

**त्रिजटा०**––सत्याचा जय झाल्याशिवाय कधींहि राहणार नाही.

**राम०**––मग त्या गोष्टीला उशीर कशाला ? हें पहा––

**पद.** (अनुवैरी भोर की०) भैरवी–त्रिवट.

**प्रखराग्नी चेतवी क्षणीं या दाबूनि तेजा**
**अर्पण करि तव देह झणिं जगिं पावन जो त्यातें ॥ धृ० ॥**
**निंद्य न होइं पथ धिःकारुनि हा वंद्य करि जनिं**
**व्रीदा । रधूवंश जें भुषवि त्याला ॥ सांप्रत स्वीकरि त्यातें ॥ १॥**

[ अग्नी प्रदिप्त होतो. ]

**सीता०**––हे अग्निनारायणा––

**पद.** (मुक्त दिशा ज्याला०)

**अर्पितसे काया । विमला । ख्यात पुनित पाया ।। धृ० ।।**
**ज्वालोदरिं घे नत कन्येला सिद्ध करी या सतिसत्वाला ।।**
**संभ्रम करि वांया ।। १।।**

––श्रीरामा, मी येत्ये बरं. माझं स्मरण तरि करा इतकी विनंती–[ त्रिजटा मूर्छित पडते. ]

[ सीता अग्निकुंडात उडी टाकते. ]

**मारुती०**––(शोकाकुल प्र. क.) हाय हाय ! रामा हें तूं काय केलंस ? सीताशुद्धीचा शेवट असा विषमय कसा केलास ? राम राम ! काय हा घोर प्रसंग !

**पद.** (चिंति मन हें०)

**हाय ! विष हें निघत कैसें कल्पवृक्षापासुनी ।।**
**अमृतानें मृत्यु कैसा ? दिसत विपरित या जनीं ।। धृ० ।।**
**जानकी ही आदिमाया विश्वपालक राम हा ।।**
**नष्ट होतां माय तुटला विश्वस्तंभचि या क्षणीं ।। १ ।।**

––सीताबाई, या बालकालाहि आपण विसरलात ना ? विजयी झालेल्या रामसेवकांनी आपणांला पुरतें पाहिलें दिखिल नाहीं. त्यांच्या दर्शनाची इच्छा आतां कोण पुरी करणार ?

**राम०**––(स्व.) अरे पण हा काय चमत्कार !

**पद.** (मन या मोहें०)

**धरणी कांपे थरथर कां ही ? भंगोनि गेली ।। धृ० ।।**
**प्रळयकाल हा वाटे आला । सप्तजलधिगण कढूं लागला ।।**
**डळमळते हें अंबर पडती तारका खालीं ।। १ ।।**

[भयंकर आवाज होतो. श्वेत वस्त्र नेसलेली सीता अग्नीतून वर येते. त्रिजटा उठते.]

**त्रिजटा०**––महाराज, या पहा सीताबाई अग्नीतून वर आल्या. आतां तरि त्यांच्या पावित्र्याबद्दल, खात्री पटली कां ?

[ लक्ष्मण, बिभीषण वगैरे सर्व रामभक्त जयघोष करित प्र. क. राम सीतेला कुंडातून बाहेर आणतो.]

**सर्व रामभक्त०**––जय जय रघुवीर समर्थ

**राम०**––प्रिय सीते––

**साकी.**

**संभ्रम तम हे नष्ट पावले सत्वरवी उदयाला ।।**
**अग्निसिद्ध हा आता म्हणुनी मन्मन वरि हर्षाला ।।**
**न धरी रोष मनीं । स्मरुनी निष्ठुर ती वाणी ।। १ ।।**

**सीता०**——प्राणनाथा, घडून आलेल्या प्रकारांबद्दल कोणालाहि दोष देता येत नाहीं. पण रघुवंशाचं प्रज्वलीत सत्व सिद्ध करून दाखविण्याची संधी मला मिळाली याबद्दल मला फार आनंद होत आहे. त्रिजटे, आतां तुझ्या मनाप्रमाणं झालं ना ?

**त्रिजटा०**——सीताबाई, मला अत्यानंदामुळं कांहींच बोलवत नाहीं. माझ्या डोळ्यांतील हे आनंदाश्रूच तुम्हाला सर्व काहीं सांगतील.

**बिभीषण०**——हें पहा——

**पद.** (प्रिये पहा०)

**सुरेश्वरा मोद भरे म्हणुनि करिति पुष्पवृष्टिला ।। धृ० ।।**
**देव सकल गगनिं जमुनि । गाति अप्सरा सुगानिं**
**रघुकुल गुण आळवोनि । वदति वचन मंगला ।। १।।**
**बंधमुक्त देव सर्व । ऋषिजन विरंचि सूर्य ।**
**आशिर्वच वृष्टि वरुन । करिति पूर्ण मंगला ।। २ ।।**

[सर्व राम-सीतेचे दर्शन घेतात.]

**बिभीषण**——माते आम्हां सर्व रामभक्तांना तुझा पूर्ण आशीर्वाद असावा.

**सीता०**——तुम्ही माझ्या मुक्ततेसाठीं जे अश्रांत श्रम केलेत त्यांची मी उतराई कशी होणार कोण जाणे ? तरी पण——

**।। भैरवी ठुंबरी. ।।**

**राज्यासनीं चिर दिगंत या विभवा सेवा ।।**
**जनिं अनुपम ती सुविमला श्री मिळवा ।। धृ० ।।**
**रवि शशि गगनी या जोंवरि विहरति हे ।।**
**सौख्या सेवा जा तरुनीया या भवा ।। १ ।।**

**राम०**——भक्तजनहो, सीताशुद्धीचा शेवट असा गोड मंगलकारक झाल्याने केवळ तुम्हालाच नव्हे, तर पृथ्वीच्या पाठीवर सत्याचे आणि सद्धर्माचे जितके भोक्ते आणि पुरस्कर्ते आहेत, तितक्यानांहि आनंद झाल्याविना राहणार नाहीं. हें आपलं चरित्र–नाटक इतक्या अनेक नीतितत्त्वांनां परिपूरित झालं आहे कीं सात्त्विक वृत्तीनं सद्धर्माची कांस धरून जगांत वर्तन करणाऱ्यांना सद्गति कशी मिळते आणि तमोगुणाचा स्वीकार करून उन्मत्तपणानं गोब्राह्मणांचा छळ करणाऱ्या राक्षसांची दुर्दशा कशी होते हें सर्व जगाला याच सीता–शुद्धी नाटकांत पहावयास मिळेल. त्रिजटे, मी

सीतेला—इतकी निर्दयता कां दाखविली याचं तत्त्व तुझ्या लक्षांत आतां आलंना ? तूं माझ्याठायीं जी भक्ती केलीस आणि या माझ्या लाडकीचा अशोकवनांत जो सांभाळ केलास तो पाहून मी संतुष्ट झालों. तुला वाटेल तो आशीर्वाद मागून घे मी तो फार संतोषानं देईन.

त्रिजटा०——देणं असेल तर हें द्यावं.

पद.——(या विरहा०)

नृपतिमनीं नय राहो । रामा ॥ धृ० ॥<br>
प्रजापालनीं तनयजननिचें प्रेम जनीं जन पाहो ॥ १ ॥<br>
सांप्रतच्या नृपशिरीं चिरायु नृपवैभव तें राहो ॥ २ ॥

राम०——तथास्तु, भक्तजनहो, आतां माझं हें वचन पूर्ण ध्यानांत ठेवा——

पद.——(दत्त गुरु दत्त गुरु०)

संभवे युगींयुगिं धर्म तारावया साधुपरिपालनीं<br>
वचन मम सत्य हें ॥ धृ० ॥ धर्मास ये ग्लानि,<br>
सत्यास जैं हानि । साधुजन पीडनीं । तारणीं मीच ये ॥<br>
छेदावया समुळ । कुमति—तरु—मूल खल । स्थापावया<br>
अचल—। सत्य, मी अवतरे ॥ १ ॥ भक्त मज गात कुणी ।<br>
स्मरुनि मम तेज जनिं धांवुनी त्याच क्षणिं ।<br>
उद्धरिन त्या स्वयें ॥ २ ॥

## भरतवाक्य.

चाल.——बॅंडची.

उगवो विभव—रवी । भरतभूवरीं । झणिं द्वैत लया ।<br>
जाऊनिया । ऐक्य होऊनि ॥ धृ० ॥ स्वधर्म—पालनीं ।<br>
नित रति वसो जनीं । मनिं मातृभूमिभक्ति अचल<br>
सतत बाणुनि ॥ १ ॥ कधिं जनमति न चळो । निज ध्येय<br>
नच ढळो । अघसंगरिं जननायक धृति तिळ<br>
न ती पळो ॥ २ ॥ नृप न्याय देवता । समप्रेम दावितां ।<br>
जनप्रेम नृपतिवरति सतत राहुं वर्धनीं ॥ ३ ॥

## अंक पांचवा समाप्त.

## श्रीसीतारामचरणार्पणमस्तु.



**शुद्धिपत्रविषयी :**

'सीताशुद्धी' नाटकासोबत प्रबोधनकारांनी पदांचे शुद्धीपत्र जोडले आहे.

पुनर्मुद्रण करताना त्यानुसार पदे शुद्ध करून घेतल्यामुळे मूळ शुद्धिपत्र पुस्तकात घातलेले नाही.

—संपादक

# टाकलेलं पोर

( तीन अंकी पौराणिक नाटक )

— लेखक —

' प्रबोधन 'कार केशव सीताराम ठाकरे

— प्रकाशक —

बलवन्त पुस्तक भाण्डार,

गिरगांव नाका, मुंबई नं. ४



बलवन्त
प्रकाशन

क्रमांक १

आवृत्ति २ री,
१ ऑगस्ट, १९४९

[ किंमत १॥ रुपया ]

Censored and licensed
for Stage Performance
by
The Commissioner of Police.
Bombay, under License
No. 40 of 1939
20th February 1939



जोशी बिल्डिंग, रानडे रोड,
एक्स्टेशन मुंबई नं. २८

**केशव सीताराम ठाकरे**

प्रकाशक,
**त्रिंबक विष्णु परचुरे,**
बलवन्त पुस्तक भाण्डार
गिरगांव, मुंबई नं. ४

मुद्रक,
**कृष्णाजी नारायण सापळे,**
रामकृष्ण प्रि. प्रेस, जुडेक्स बिल्डिंग,
त्रिभुवनरोड, मुंबई ४

दुसऱ्या आवृत्तीचे

# प्रास्ताविक बोल

═══✻✻✻═══

माझे नाट्याभिनय–कुशल दिवंगत स्नेही **विठोबा झावबा** यांच्या जिव्हाळ्याच्या खटपटीने, त्यांच्या **चित्तरंजन नाट्य समाजाने** हे नाटक मुंबअी शहरात प्रथम **ता. ५ मार्च सन १९३९** रोजी सकाळी ९ वाजता रॉयल ऑपेरा थिएटरात रंगभूमीवर आणले.

यापूर्वी सन १९३३ साली **डेक्कन स्पार्क्स** नाट्यसंस्थेने या गद्य नाटिकेच्या दोनच अंकाचा पहिला रंगी प्रयोग खानदेशातल्या फैजपूर मुक्कामी केला होता. या प्रयोगाच्या प्रसंगी तेथे घडलेली अेक घटना नमूद करून ठेवण्यासारखी आहे. त्या वेळी यावल येथे माझे स्नेही रावसाहेब **रामचंद्र हरि मिरजकर** बी. अे., अेल्अेल्, बी. सबजज्ज असल्यामुळे तेथल्या सर्व वकीलमण्डळाचा नि अितर सरकारी अधिकाऱ्यांचा माझा स्नेह जमला, अर्थात टाकलेलं पोर नाटकाच्या पहिल्या मंगल प्रयोगाला येण्याचे मी सगळ्याना निमंत्रण दिले. मिरजकरहि सर्व अधिकारी नि वकील मंडळी अगत्याने आली. थेटरहि चिक्कार भरले, स्त्रीवर्गहि बराच आला होता. पडदा वर गेला. प्रयोग अेकसारखा रंगत गेला, प्रेक्षकानी फार वाहवा केली.

प्रयोग संपल्यानंतर निमंत्रित पाहुणे मंडळीना चहापान देण्याची गडबड चालली असताना, गावातले चारपांच लोक जमलेल्या अेक दोन वकिलाना खुणा करून बाहेर घेअून गेले. आस्ते आस्ते सगळेच वकील थेटराबाहेर कसल्यातरी गंभीर चर्चेत गुंतल्यासारखे दिसले, मामलतदार मुनसफ रजिस्ट्रार अेवढ्याच मंडळीशी मी बोलत बसलो, बाहेर काय भानगड चालली आहे, याचा आम्हाला काही अंदाजच लागे ना. तेथल्या धोळक्यात लवकरच फैजपूरचे फौजदारहि सामील झालेले दिसले, थोड्याच वेळाने ' चला चला निघा ' असा बाहेरच्या वकील मंडळींचा निरोप येतांच, मिरजकरादि अधिकारी मंडळी अुठली आणि सगळेजण लॉरीत बसून आमचा निरोप घेअून परत यावलला गेले.

दुसरे दिवशी रविवारी दुपारी २ च्या सुमाराला यावलहून मिरजकरांचे तांतडीचे पत्र घेऊन अेक अिसम मोटार घेऊन मला यावलला नेण्यासाठी आला. ' पत्रदेखत निघून यावे ' अेवढाच मजकूर त्या चिठ्ठीत होता.

यावलला पोहोचतांच अेका शृंगारलेल्या सार्वजनिक दिवाणखान्यात माझा प्रवेश झाला. अधिकारी, वकील मंडळी आणि नागरीक तेथे थाटाने बसले होते. पानसुपारीची तबके, अत्तर गुलाब, हार तुरे वगैरे थाट होता. सर्वांच्या वतीने मुनसफ मिरजकर यानी माझे स्वागत करून अेका प्रमुख ठिकाणी बसवले, शेजारीच मसूरकर महाराजांच्या संप्रदायातले अेक संन्याशी बसले होते. हे काय प्रकरण आहे, याची मला काही अटकळच होओीना !

अितक्यात अेक नवविवाहित जोडपे दिवाणखान्यात आले. '' हां, पडा आधी यांच्या पायां '' असे संन्यासीबुवानी सुचवितांच, त्या वधूवरानी माझ्या पायांवर आपापली मस्तके ठेवली. सन्यासी म्हणाले.—'' ठाकरेसाहेब, हा आपल्या टाकलेलं पोर नाटकाच्या प्रयोगाचा शुभमंगल परिणाम ; द्या वधूवराला आशीर्वाद. '' मी आशीर्वाद दिला; पण-अचंब्यात पडलो, नंतर पानसुपारी अत्तर गुलाब हार तुरे समारंभ आटोपल्यावर, जमलेल्या मंडळीनी सगळा खुलासा केला. तो असा०——

फैजपुरातल्या भावसार समाजातली अेक अविवाहित तरूणी गरोदर असल्याचे अुघडकीला आले. जमातीत चर्चा चिकित्सा चालू झाली. मुलीला धराबाहेर काढली नाही तर बापावर बहिष्कार घालण्याच्या जमात-पंचांच्या धमक्या चालू झाल्या, अेका भावसार तरूणाने धिटाअिने पुढे येअून, ' माझे तिचे जमले आहे, माझ्यापासूनच ती गर्भवति आहे, आमचे लग्न लाअून टाका नि तंटा मिटवा ' असे सगळ्याना पुकारून सांगितले. पण नाक्षर नि अडाणी जमात-पुढा-याना ते पटे ना. मुलीला आधी धराबाहेर घालवा, मग पुढचे पुढे, अेवढाच त्यांचा हट्ट; तेवढ्यात तेथला अेक तरूण मुसलमान गुंडहि पुढे झाला आणि म्हणू लागला की त्या तरूणीचा नि त्याचा संबंध आहे. ती धराबाहेर पडतांच निका लावायला तो तयार आहे. फैजपूरच्या मुसलमान मंडळीनीहि तसा जोर धरला. मुलीचा बाप गांगरून गेला, पंचाच्या कटकटीला कंटाळून त्याने अखेर त्या मुलीला धराबाहेर हाकलली. चटकन त्या भावसार तरूणाने तिला आपल्या घरी नेअून ठेवली.

' धराबाहेर घालवा ' असा निकाल देऊन पंचमंडळींतले चार पाच इसम, तापलेले डोके थंड करण्यासाठी, टाकलेलं पोर नाटकाचा प्रयोग पहायला थेटरात पिठावर बसले. नाटक पहातांच त्यांचे माथे ताळ्यावर आले. आपण केली ती मोठी धोडचूक केली. महापाप केले. आता ते निस्तरायचे कसे ? ते अगदी बेचैन झाले. थेटरात यावल तालुक्यातले सगळेच मोठमोठे वकील आयतेच आलेले पाहून, त्या पंचानी आपली भानगड त्यांना सांगितली नि हे पाप कसे निस्तरायचे, याचा सल्ला विचारला. वकिलानी प्रथम फौजदाराची मदत घेऊन त्या तरूण जोडप्याला आपल्या ताब्यांत घेतले आणि पंचासह सगळेजण मोटारलॉरीत बसून यावलला गेले. तेथे मसूरकर संन्यासी आणि इतर यावलकर शास्त्रीमंडळींचा सल्ला घेऊन त्या जोडप्याचे सार्वजनिक खर्चाने आणि थाटाने सकाळीं ९ वाजतां वैदिक विधीनें लग्न लाअून टाकले आणि नाट्यप्रयोगाच्या परिणामाचे श्रेय जाहीर रीतीने स्वीकारण्यासाठी मला तेथे

बोलावून नेले. मला केवढा आनंद झाला असेल ? माझ्या डोळ्यांतून घळघळा आसवें वाहू लागली ! ज्या मंडळींनी हे कार्य घडवून आणले, त्या सर्वांच्या पायांवर मस्तक ठेवण्याच्या निश्चयाने मी उठलो. पण मसूरकर बुवांना प्रणाम केला म्हणजे आम्हा सगळ्यांना तो मिळाला, असा पुकारा झाल्यामुळे मी त्या संन्यासी महाराजांच्या चरणांवर मस्तक ठेवले. **टाकलेलं पोर** नाटकाच्या पहिल्याच जाहीर प्रयोगाचा हा असा अितिहास घडलेला आहे.

चित्तरंजन नाट्यसमाजाने पंधरा-वीस प्रयोग केल्यानंतर, लालबाग परळचे काही हौशी क्लब मधूनमधून दामोधर हॉलमध्ये याचे प्रयोग नेहमीच करीत असतात. मागासलेल्या पण महत्वाकांक्षी समाजांतल्या नाट्यप्रेमी मंडळींना कर्णासारख्या धनुर्धराच्या चरित्राची विशेष चटक लागावी, हे साहजीकच आहे. मराठी रंगभूमीला मर्त्य पृथ्वीवरून स्वर्गीय ऐश्वर्याचे आनंदसाम्राज्य देण्यासाठी आपल्या कलावंत जीवनाचे पापड भाजणाऱ्या पांढरपेशा शहरी शहाण्यांनी काय म्हणून या नाटकाची दखल घ्यावी ? त्यात पाश्चिमात्य इबसनी तंत्र नाही किंवा शॉचे मंत्रहि नाहीत. परशरामपंती वेणीसंहार नाटकाच्या धाटणीवर लिहिलेले जुन्या दिखामाचे हे नाटक ! तशात ते ठाकऱ्यांचे ! असणार काय त्यात शिव्यांशिवाय आणखी ? शुद्ध सात्विक पवित्र ओव्यांचेच आमरण सुस्कारे सोडीत जगणाऱ्या शहरी नि संभावीत नाट्योत्कर्ष-साधकांना या नाटकात काही राम दिसला नाही, तरी गिरण गावातल्या बहुजनसमाजातल्या भगिनी बांधवांना माझ्या टाकलेल्या पोराने चांगलीच चटक लावली आहे, यातच मी धन्यता मानतो. त्यांच्याच विचार-क्रांतीसाठी मूळ मी हे लिहिले.

**बलवन्त ग्रंथ भाण्डाराचे** मालक स्नेही महाशय **परचुरे** यांनी स्वयंस्फूर्तीने या दुसऱ्या प्रकाशनाचे कार्य आंगावर घेतले, याबद्दल मी त्यांचा खरोखरच फार आभारी आहे.

जोशी बिल्डिंग, रानडे रोड अेक्सटेन्शन,
मुंबअी २८.
ता. १ ऑगस्ट सन १९४९.

महाराष्ट्राचा नम्र सेवक,
**केशव सीताराम ठाकरे**

# पहिल्या आवृत्तीचे प्रस्तावना



महाभारत महाकाव्याचा चिकित्सक स्वाध्याय करीत असताना, त्यातल्या कर्णाच्या भूमिकेने मला चटका लावला होता. तशातच सन १९३० सालीं कर्जत (जि. कुलाबा) मुक्कामी महाराष्ट्र नाटक मण्डळीचा कै. शिवरामपंत परांजपेकृत **पहिला पांडव** नामक नाटकाचा प्रयोग पहाण्याची संधि लाभली. कर्णासारख्या उदारचरित पुरुषोत्तमाचे कथानक आणि शिवरामपंत परांजप्यासारखा तर्ककुशल रसाळ लेखक ! फार मौज अनुभवायला मिळाले, अशा आशेने मी नाटकाला गेलो, पण--

निराशेने नि संतापाने घरी परत आलो. इतक्या अर्कट ' भटो ' वृत्तीने कर्णचरित्राची विटंबना शिवरामपंतासारख्या स्वाभिमानी नि स्वदेशाभिमानी माणसाला करवली तरी कशी ? याचा अजूनहि मला अचंबाच वाटत आहे. **' मला कोणीतरी क्षत्रिय म्हणा हो '** असे प्रत्येकाला आळवीत रडणारा आणि अभिमन्यूचे भूत पाहताच भेदरून बोबडी वळलेला कर्ण महाभारतात तरी खास आढळणार नाही. मग असला रडका भेदरट कर्ण कल्पनेच्या कुंचल्याने रंगवण्यात, लेखकाला कोणत्या चळवळीवर काळ्या शाईचे शिन्तोडे उडवायचे होते, हे महाराष्ट्र नाटक मण्डळीच्या धांदरट बावळट चालकांना जरी समजले नाही, तरी जाणत्यानी त्या टिंगलीचा वा बदनामीचा ठाव तेव्हाच घेतला होता. या बदनामीच्या निषेधार्थ प्रस्तुत नाटकात कर्णाच्या तोण्डी मी घातलेले उद्‌गार, खुद्द नाटकात योग्य स्थळ न मिळाल्यामुळे, मी बाजूला काढून ठेवलं होते. ते याच ठिकाणी उमटून ठेवण्याची संधि मी साधीत आहे.

**कर्ण**-- मला पहिला पाण्डव ठरविण्याचा उपद्याप करणारे काही पण्डित माझ्या बीजशुद्धीचं संशोधन करण्याच्या दिमाखानं, मी माझ्या हीन कुलाबद्दल फार खंति करीत असतो, लाजेनं व्याकूळ होत असतो, मनातल्या मनात झुरत असतो, रात्रन् दिवस एकांती रडत असतो, अशा बदनामीची नाटकं रंगवण्यात दंग असल्याचं माझ्या कानी आलं आहे. पाण्डवपक्षपाती भाटांचा हा कट मी ओळखून आहे. असल्या मतिमन्दांना या कर्णाच्या चारित्र्याचा नि आत्मविश्वासाच्या कमावणीचा रतिमात्र ठाव उमगलेला नाही, इतकंच मानून मीं तिकडं दुर्लक्ष करीत असतो. डबक्यांतल्या बेडकानी महासागरातल्या देवमाशाच्या चारित्र्याची कहाणी सांगण्याचं धाडस करू नये आणि परोपजीवी बांडगुळानी स्वयंप्रभावी पुरुषाच्या पौरूषत्वाचा ठाव घेण्याचा दिमाख मिरवू नये. "

" पहिला पाण्डव ' नाटकाची भाषा नि रचना नीट पाहिली तर मात्र असे स्पष्ट दिसते की काळकर्ते परांजपे यांच्या नावाचा दुरुपयोग करून अनेक अलबत्या गलबत्या

लेखकांनी हे भारूड महाराष्ट्र नाटक मण्डळीच्या गळ्यात बांधले आणि त्या वेंधळ्यांनी कै. शिवरामपंताची ही ढोबळ बदनामी दिनदिक्कत रंगभूमीवर नाचवली.

**टाकलेलं पोर** या नाटकात अपत्यहत्त्येचा प्रश्न तर प्रधान आहेच आहे. पण त्याहिपेक्षा, मागासलेल्या नि पददलित समाजातील स्वाभिमानी उद्धारकांना आत्मोन्नतीचे शिखर गाठण्यासाठी कसकसल्या सामाजिक विकल्पांना नि अडचणींना तोंड देऊन आपला मार्ग आक्रमावा लागतो, याचे दृश्य रंगवण्याचा कर्णाच्या मूळ कथेनुसार मी प्रामाणिक प्रयत्न केला आहे.

हिन्दुजनांची सामाजिक आचारविचारक्रान्ति आज विसाव्या शतकाच्या मैदानावर येऊन थडकली, तरी अपत्यहत्त्येच्या पापाला बसावा तसा आळा अजून बसत नाही. कुमारी नि विधवा यांना फुसलावून फशी पाडणारे, इतकेच नव्हे तर इं. पि. कोडाच्या ३१२ कलमान्वयें त्यांना फासावरहि लटकवायला कारण होणारे नराधम बिनशर्त बिनबोभाट मोकळे नि नामानिराळेच राहतात आणि त्या अभागणी जन्मठेपीची किंवा मुदतबन्द सक्तमजुरीच्या शिक्षेला जाऊन माणसांतून उठतात. या अन्यायाविरूद्ध **विधीनिषेध** नाटिकेने मी हिन्दुमत जागृत करण्याचा अट्टहास केलेला आहेच. प्रस्तुत नाटकाने अपत्यहत्त्येच्या पापाबद्दल खुद्द स्त्रियांचीच विचारक्रांति करण्याचा यत्न केला आहे. तो कितपत साधला आहे, हे रसिकांनीच ठरवलेले बरे.

पहिल्या अंकाचा पहिलाच प्रवेश कै. परशुरामपंत गोडबोले यांच्या सुप्रसिद्ध मऱ्हाठी 'वेणीसंहार' नाटकांतल्या एका उत्तम प्रवेशाची सुधारलेली आवृत्तीच असल्यामुळे त्यांचे काही श्लोक नि आर्या मी जशाच्या तशाच नकलल्या आहेत, हे कृतज्ञपणे सांगणे अगत्याचे आहे. वेणीसंहारासारखी जुनी नाटके आता रंगभूमीला कायमची मुकल्यामुळे, जुने ते सारे सोने न मानणाऱ्या आधुनिकांना जुन्यातहि काही सोने असते, एवढेच या प्रवेशाने मला दाखवायचे आहे.

मुंबई
ता. ५ मार्च १९३९

सर्वांचा नम्र सेवक,
**केशव सीताराम ठाकरे.**

# टाकलेलं पोर



अंक १ ला ] [ प्रवेश १ ला

[ **स्थळ, स्थिति व पात्रें :** सम्राट दुर्योधनाचे शिबीर, द्रोणाचार्यांचा वध झालेला आहे. नवीन सेनापतीच्या निवडणुकीचा प्रश्न. दुर्योधन व शल्य बोलत प्रवेश करतात .]

**शल्य :** जयघोष चालले आहेत ! पाण्डवांच्या छावणीत जयघोष चालले आहेत ! द्रोणाचार्यांच्या अधर्म वधाची शरम वाटण्याऐवजी, याना जयघोष सुचतात अं ? राजा, भीष्माचार्य आणि द्रोणाचार्य यांच्यासारखे, त्रैलोक्याला भारी, असे आपले दोन सेनापति पाण्डवांच्या कपटनीतीला बळी पडले. आम्ही युद्धधर्माचे नियम कडकडीत पाळावे आणि या पाण्डवांनी मात्र हवी ती कपटयोजना करावी ?

**दुर्योधन :** शल्या, श्रीकृष्ण यादवासारखा मसलती मुत्सद्दी, पाण्डवांच्या भल्याबुऱ्या वर्तनाचा जोंवर पुरस्कार आहे तोंवर त्यांच्याकडून धर्मयुद्धाची अपेक्षा करणं चुकीचं आहे.

**शल्य० :** युधिष्ठिरासारख्या सत्यव्रत महात्म्यानंसुद्धा, धडधडीत खोटं बोलून आपल्या शीलावर रखरखीत निखारे ओतावे ? छे ! आता वाकड्या दाराला वाकडी मेढ ठोकल्याशिवाय गत्यन्तरच नाही.

**दुर्यो० :** शल्या, तूं पाण्डवांचा मामा ; तेव्हा क्षात्रधर्माच्या तोण्डाला कोळसे फासणाऱ्या तुझ्या भाच्यांची ही दगलबाजी पाहून, कौरवांचा पुरस्कार केल्याबद्दल तुला थोडेतरी समाधान वाटत असेल खास !

**शल्य :** राजा, या घडीचा प्रश्न हा नव्हे. प्रश्न इतकाच आहे कीं श्रीकृष्ण यादवाच्या मसलतीनं कपटी डावपेच लढवणाऱ्या पाण्डवांशी आम्ही सरळ धर्मयुद्धाचा सामना द्यावा, का शठ्यप्रति शाठ्यम्‌चे टोले लगावून, खोट्याच्या कपाळी कुऱ्हाडीचा घाव घालावा ?

**दुर्यो० :** शल्या, कपटनीतीनं मिळणारा विजय या दुर्योधनाला मुळींच नको, युद्धाला तोंड लागलं कीं यशापयशाच्या प्रश्नाला काही महत्त्वच उरत नाही. क्षात्रधर्मानुसार

कोण कसा न् किती कसोशीनं लढला, यांतच श्रेयाचं सारं महत्त्व आहे. साऱ्या कौरवांचा संहार झाला, तरी या श्रेयाला पारखे होण्याची माझी मुळींच इच्छा नाही. आधींच व्यासासारख्या पोटाळ पंडितांना हाताशीं धरून, यादव कृष्णानं कौरवांविरुद्ध लोकमताची आग चांगलीच भडकावून ठेवली आहे.

**शल्य :** या सगळ्या क्षत्रिय-संहाराला हाच नाटक्या कारण आहे. दाणे टाकून कोम्बडे झुंजवायची याला फार खोड ; पुन्हा आपण मात्र नामानिराळा ! पाण्डवांनी देव देव म्हणून याचा उदोउदो करावा आणि या पाताळयंत्री डोम्बाऱ्याने, लोकमताच्या भुलभुलावणीवर, स्वतःचं माहात्म्य थाटून घ्यावं, असा हा साट्यालोट्याचा कारखाना आहे.

**दुर्यो० :** पाण्डवानी आणि लोकांनी माजवलेलं कृष्णाचं हे स्तोम, आम्ही कौरवांनी कधीच मान्य केलं नाही ; म्हणून आमच्यावर त्यानी लोकमताची कुत्रीं भुंकायला सोडली. सत्याच्या न् धर्माच्या वल्गना थकल्यावर, '' स्वराज्य आमचा जन्मसिद्ध हक्क ; त्यासाठी हे महायुद्ध '' अशी नवीन हाकाटी आता चालली आहे. वास्तविक शल्या, पाण्डव जन्मापूर्वीच पण्डुराजानं राज्यसंन्यास करून वनवास पत्करला. हे कुन्तिपुत्र पाण्डव नियोगाची सन्तति. यांना राज्यावर हक्क सांगतांच येतो कसा ? तरीही आमच्या विरोधांना न जुमानतां, धृतराष्ट्र महाराजांनी यांना खाण्डवप्रस्थाच्या राज्याची देणगी देऊन, आपलं बन्धुप्रेम व्यक्त केलं आणि यांच्या खऱ्याखोट्या जन्मसिद्ध स्वराज्याची तक्रार मिटवली. यादव कृष्णाच्या भगतांकडून याबद्दल चुकूनसुद्धा आम्हाला दुवा मिळाला नाही. आमच्या मेहरबानीची ही देणगी, त्यांनी हक्काच्या सदरात खेचली, चोर तर चोर आणि वर शिरजोर !

**शल्य :** फुकटाफाकट मिळालेलं ते स्वराज्य त्या जुगारी धर्मानं जुगारांत पणाला लावून दोनदां गमावलं.

**दुर्यो० :** तरीहि पुन्हा तोण्ड वर करून आमच्याशी तण्टा आहेच, या भेकडांना जुगार खेळण्याची तर मोठी आग, पण प्रतिपक्षावर मात करण्याच्या अकलेचा पुरा खडखडाट ! स्वराज्य आणि सर्वस्व जुगारीत पणाला लावणाऱ्या माथेफिरू जुगाऱ्यांच्या धर्मनिष्ठेची आणि राजकारणी अकलेची फक्त कृष्णपंथी मूढांनीच तारीफ करावी !

**शल्य :** स्वतःच्या व्यसनापायीं राज्याचा न् प्रजेचा, खाजगी मालमत्तेसारखा विक्री करणाऱ्या पाण्डवांचा हा जुगार भारतीय नृपनीतीच्या कल्पनेला कीड लावल्याशिवाय राहणार नाही. पण राजा, हव्या त्या वाममार्गांनी तुझे दोन सेनापति पाण्डवांनी ठार केले. तरी सैतानावर सैतान सोडण्याची बुद्धि तुला होत नाही, तुझं धोरण चुकत आहे.

**दुर्यो० :** ते कसं काय ?

**शल्य :** बापाच्या अधर्म वधानं नखशिखान्त खवळलेल्या अश्वत्थाम्याला डावलून, कर्णासारख्या सूतपुत्राला कौरवांचा सेनानी करण्याचा तुझा विचारस्पष्टोक्तीची क्षमा कर—मला चतुराईचा दिसत नाही.

**दुर्यो० :** चतुराईचा दिसत नाही ?

**शल्य :** मुळींच नाहीं, पाण्डवांनीं द्रोणाचार्यांचा कपटानं घात करतांच त्या खवळलेल्या अश्वत्थाम्यानं नारायणास्त्र सोडून, पांचाळांची केवढी दाणादाण उडवून दिली, ते तू प्रत्यक्ष पाहिलंस ना ? पाण्डववधाच्या तिरमिरीनं भडकलेल्या त्याच्या त्वेषाग्नीत, सेनानिपदाच्या उत्तेजनाचं तेल ओतण्याचा धोरणीपणा अजूनही दाखवशील, तर उद्याचा सूर्य अस्ताला जाण्यापूर्वीच, ही वसुन्धरा निःपाण्डवी झालेली पाहाशील.

**दुर्यो० :** शल्या, स्वार्थी जिव्हाळ्याच्या चकमकीनं चेतलेला क्रोधाग्नि, नवपरिणत दाम्पत्याच्या कामाग्नीसारखाच अल्पप्रभावी असतो. अस्त्रसागर द्रोणाचार्यांचा पुत्र—वीरमणि अश्वत्थामा—कितीहि पराक्रमी असला, तरी त्याची आजची सन्ताप—सौदामिनी पितृवधाच्या स्वार्थी तिडकेनं कडाडली असल्यामुळं तिच्या या तात्पुरत्या न् तात्कालीक कडकडाटावर भाळून आपलं भागणार नाही. शिवाय शल्य, आणखीहि थोडा विचार करशील, तर सेनानीपदासाठीं केलेल्या कर्णाच्या योजनेचं महत्त्व तुला तेव्हाच पटेल.

**शल्य :** राजा, भीष्मद्रोणाच्या पाण्डव-पक्षपाताबद्दल तुला काही शंका आली की काय ?

**दुर्यो० :** तशी शंका तर मला आलीच आहे ; पण विशेषतः द्रोणाचार्य झाले काय, किंवा अश्वत्थामा झाला काय. त्यांनीं बाह्यात्कारी जरी क्षत्रियांचा पेषा पत्करला असला, तरी त्याच्या आवरणाखाली त्यांची ब्राह्मणी पिण्डप्रकृति धमधमत आहे, ही गोष्ट नजरेआड करून मला भागणार नाही. मूळचा स्वभाव सुटत नाही म्हणतात, ते अक्षरशः खरं आहे, पुत्रवधाच्या नुसत्या बातमीनं आचार्यांचं अंतःकरण शोकमोहानं व्याकूळ होतांच, तात्काळ त्यानी कडव्या क्षात्रधर्माचा न् शस्त्राचा संन्यास करून. ब्राह्मणस्वभावाला शोभेसा मनाचा मवाळपणाच अखेर स्वीकारला ना ?

**शल्य :** होय. ही गोष्ट मला पटली. पण अश्वत्थाम्यानं मात्र आपला क्रोधाग्नी भडकवून क्षात्रतेजाची बूज राखली ना ? मग त्याच्या त्या तेजस्वी संतापाचा फायदा तू घेऊ नयेस ?

**दुर्यो० :** संताप ? मद्रराज, ब्राह्मणाचा सन्ताप नेहमी स्वार्थी न् बहिर्मुख असतो; क्षत्रियांप्रमाणं व्यापक न् अन्तर्मुख नसतो. त्यांच्या स्वार्थाची भूक भागली की सन्तापाची आग शमलीच ! मग त्यांना कोणत्याहि कार्याचं महत्त्वच वाटत नाही. अशा वृत्तीच्या अश्वत्थाम्यापेक्षा आज सतत तेरा वर्षं कौरवांशी बिनतोड निष्ठेनं वागणाऱ्या महारथी कर्णाची सेनानीपदासाठीं मी केलेली योजनाच दूरदर्शीपणाची आहे, असं नाही का तुला वाटत? शल्या—

**हा प्राकृत पुरुष नव्हे सांगावें काय म्या तुला कविला ।**
**कर्णाच्या तेजें बहु वीरांकरवीं स्वगर्व टाकविला ॥१॥**

[खवळलेला अश्वत्थामा प्रवेश करतो.]

**अश्वत्थामा :** राजा, कर्णासारख्या सूतपुत्राला राजनिष्ठेचं प्रशंसापत्र देऊन तू केवळ माझाच नव्हे, तर माझ्या स्वर्गवासी पित्याचाहि घोर अपमान व्यक्त करीत आहेस. अरेरे ! कौरवांच्या मिठाला जागून, गेल्या पांच दिवसात, माझ्या पित्यानं पांचालसेनेला दे माय धरणी ठाय केलं आणि अखेर-अखेर-कृतघ्न राजा, श्रीकृष्णाच्या कपटनीतीनं त्यांचा अधर्मवध सुद्धा झाला, तरीही आमच्या राजनिष्ठेची तुला शंकाच अं ? धिःकार असो या कौरवांच्या क्षुद्र मनोवृत्तीला !

**दुर्यो० :** अश्वत्थामन् परमपूज्य द्रोणाचार्यांच्या अधर्म वधानं माझ्या हृदयांत पाण्डव-निःपाताचा केवढा ज्वालामुखी भडकलेला आहे, याची तुला कल्पना करून देण्यासाठीं, मला माझं हृदयच फाडून दाखवावं लागेल ! गुरुपुत्राच्या सेनानिपदाच्या लायकीची या दर्योधनाला स्वप्नातसुद्धा कधी शंका आलेली नाही आणि यापुढं ती कधीं येणारहि नाही. कौरवेश्वराच्या सार्वभौम सामर्थ्याच्या प्रभावळींत, कर्ण, शल्य. अश्वत्थाम्यासारखे अनेक रथी महारथी आपल्या देदिप्यमान् तेजानं चमकत आहेत, या एकाच आत्मविश्वासाच्या जोरावर मी या भारतीय महायुद्धाच्या समुद्र-मन्थनाला हात घातला आहे. गुरुबन्धो, पितृवधाच्या सन्तापानंच कौरवांवर क्षुद्र मनोवृत्तीचा आरोप करायला तुझी विवेकबुद्धी या घडीला धजली म्हणायला काही हरकत नाहीं.

**अश्व० :** कां धजूं नये ? राजा, कां धजूं नये ? अरे—

**प्रायोपविष्ट गुरु द्रोण । असतां केलें मौलिखण्डण ।**
**कोण्ही न केलें त्याचें वारण । धिःकार धिःकार सर्वांतें ।।१।।**
**सर्वांसमक्ष क्रूर हिंसन । करूनि चालिला धृष्टद्युम्न ।**
**सुखें करितसा शिबिरा गमन । कैसें तुम्हां पाहावलें ॥ २ ॥**

कौरवेश्वरा, तुझ्या डोळ्यासमोर हा प्रकार घडावा ? छान-छान, फार छान गुरुभक्ति दाखवलीस ?

[ कर्ण प्रवेश करतो ]

**कर्ण :** यांत गुरुभक्तीचा प्रश्नच कुठं आला ? भारतीय महायुद्धाचा सेनापतीच जिथं शस्त्रसंन्यासाला प्रवृत्त झाला तिथं इतरांनीं काय करावं ?

**अश्व० :** काय करावं ? लाज वाटत नाही हा प्रश्न विचारायला ?

**कर्ण :** खऱ्या गोष्टी उघड बोलायला लाज कसली ? गुरूनं आपलं क्षात्रधर्माचं गुरुत्त्व लाथाडून, साध्यासुध्या संसाऱ्यालाच शोभेल, अशा ब्राह्मणी हृदयाचं लघुत्त्व ऐनप्रसंगीं प्रगट केलं, तर त्या अवसानघाताबद्दल जबाबदार कोण ? अर्थात् ज्याचा तो ! भारतीय महायुद्धाचे मुकाबले, मोहाच्या किंचित् झळीनं वितळणाऱ्या सात्त्विक ब्राह्मणी पिण्डासाठीं खास नव्हत !

**अश्व० :** ब्राह्मण मनोवृत्तीची निन्दा ? राजा ही मला क्षणभरसुद्धां सहन होणार नाही.

**कर्ण :** क्षात्रधर्माचं भाडोत्री कवच फेकून देऊन हातीं दर्भसमिधा घे, म्हणजे तुझ्या जन्मजोत ब्राह्मण्याकडे ढुंकून पाहाण्याचीसुद्धां आम्हांला जरूर पडणार नाही. पण मिजास क्षत्रियाची आणि करणी ब्राह्मणाची, या सरडेशाहीनं महायुद्धाचा झाला इतका विचका आतां पुरे झाला.

**अश्व :** काय ? महायुद्धाचा विचका आम्हीं केला ?

**कर्ण :** तूं नाही तुझ्या बापानं केला, पांच दिवस झुंजला, पण एक पाण्डवसुद्धां ठार मारता आला नाहीं ! म्हणे शापादपि शरादपि !

**अश्व० :** हरामखोरा, माझ्या बापाची निन्दा ? कल्पान्त करीन. राजा, या कर्णाच्या टकळीला लगाम घाल.

**दुर्यो० :** अंगराज, भूतकाळाच्या गोष्टींचा नसता वितण्डवाद कशाला ? भविष्यकाळाकडे नजर देऊनच वर्तमानकाळाचें कर्तव्य आपल्याला चोख बजावलं पाहिजे.

**शल्य० :** म्हणूनच मी म्हणतो, राजा, तातवधानं असो किंवा कशानंहि असो, अश्वत्थाम्याच्या या प्रक्षुब्ध शौर्यसागराचा आत्तांच सदुपयोग करून घे. यांतच तुझ्या संगरकुशलतेची सिद्धी आहे. द्रोणाचार्यांच्या मागं कौरव सैन्याचं आधिपत्य आपल्या शिरावर घ्यायला, अश्वत्थामाच सर्वतोपरी योग्य आहे. निःपाण्डवी पृथ्वी करायला या योजनेसारखं दुसरं अस्त्र नाही.

**अश्व० :** अलबत्, राजा या महासंग्रामाचा भार तूं माझ्यावर टाक, म्हणजे—

**राजा आजचि अ—केशव । त्रिभुवन करीन अपाण्डव ।**
**सोमक पांचाळांचं नांव । शेषमात्र राहील ॥ १ ॥**
**दाऊनिया शौर्यधाटी । महावीरांचीया थाटी ।**
**संपवीन संग्राम गोष्टी । आजि सर्वांसमक्ष ॥ २ ॥**

पाळी पाण्डवांनो—

**ज्या ज्या शस्त्रधरीं तुम्ही नृपशुंनीं दुष्कर्म आरंभिलें ।**
**केलें वा अनुमोदिलें दुरुनियां दोषास या पाहिलें ।**
**त्यांचीं भीम-किरीटि-कृष्ण-सकटां काढोनि मांसें पहा ।**
**देतों मी सकळां दिशांस बळि हें मत्कर्म आतां सहा ॥ १ ॥**

**कर्ण :** वाहवा-वाहवा ! केवढा हा ब्राह्मणी वल्गनांचा गडगडाट! ब्राह्मणांचं सारं शौर्य त्यांच्या जिभलीच्या पट्ट्यांत सांठवलेलं असतं म्हणतात ते काही खोटे नाही!

बापाला जे पांच दिवसात साधलं नाही ते हे चिरंजीव एका दिवसात करून दाखवणार! ब्राह्मणी धर्मानं असले मुकाबले पार पडते तर क्षात्रधर्माचा जन्मच कशाला झाला असता?

**शल्य :** नीच कुलोत्पन्ना कर्णा, स्वतःच्या पायांखाली काय जळत आहे तें पहा न् मग ब्राह्मणांच्या शौर्यवीर्याची चिकित्सा कर.

**कर्ण :** नादान क्षत्रियच काय ते बोलभाण्ड ब्राह्मणांच्या आशीर्वादावर क्षात्र पेषाचा डौल मिरवतात आणि क्षात्रवृत्तीचा रंग चोपडलेले भटजी अखेर ऐन अवसानांत, भर समरांगणावर, समाधीचा सोहळा साजरा करतात.

**अश्व० :** नीच सूतपुत्रा, अधमाधमा, तुझ्यासारख्या रथकार कुलोत्पन्नाला तरी क्षात्रवृत्रीची एवढी मिजास कशानं आली?

**कर्ण :** स्वभावजन्य गुणकर्माच्या पुण्याईनं समजालास?

**अश्व० :** शुद्रातिशूद्र रथकाराला कसली आली गुणकर्माची पुण्याई?

**दुर्यो० :** आचार्यपुत्राला असलं विधान मुळींच शोभत नाही. त्रैवर्णिकांच्या गुणकर्माच्या सनदा ब्राह्मणांकडून घ्यायच्या नसतात; त्या स्वभावजन्यच असतात. म्हणूनच आचार्य जन्मानं ब्राह्मण होते तरी कर्मानं क्षत्रिय म्हणूनच धारातीर्थी मोक्षाला गेले ना? अंगराज कर्णाच्या क्षात्र पराक्रमाचा जिवन्त इतिहास साऱ्या जगाचे डोळे दिपवित असतां, त्याला सूतपुत्र म्हणून हिणवण्यात अर्थ काय?

**कर्ण :** राजा, अश्वत्थाम्यानं सूतपुत्र म्हणून माझा मोठा सन्मान केला, असं मी समजतों.

**सूत किंवा सूतपुत्र कोणी तरी असेन मी ॥**
**दैवाधीन कुलीं जन्म, मनगटाधीन पौरुष ॥ १ ॥**

**दुर्यो० :** सत्य आहे. मनुष्याचा पराक्रम त्याच्या जन्मावर, जातपातीवर किंवा कुळाच्या लौकिकी उच्च-नीचपणावर मुळीच अवलंबून नसतो.

**कर्ण :** राजा, वंशकुलाची बेगडी पुण्याई नामर्द षण्ढांना न् बोलभाण्ड ब्राह्मणांना ; मला नाहीं. जन्म न् कुल या अपघाताच्या गोष्टी. असल्या अपघातांची महति, अश्वत्थाम्या, तुझ्यासारख्या जन्माभिमानी ब्राह्मणाला आणि असल्या भटाब्राह्मणांच्या पोकळ स्तुतिपाठानं फुगणाऱ्या नामधारी क्षत्रियाना, मला नाही. या कर्णाचा पराक्रम न् त्याच्या क्षात्रचारित्र्याची थोरवी, या-या टरारलेल्या मनगटांत सांठवलेली आहे. क्षत्रियत्वाची लटकी घमेण्ड मारणाऱ्या ब्राह्मणपुत्रा, सूतपुत्र असा तूं माझा कितीही उपहास केलास, तरी माझ्या सूतकुलाचा मला मोठा अभिमान वाटत असतो, हे नीट ध्यानांत ठेव.

**शल्य० :** गर्दभाला उकीरड्याचाच मोठा अभिमान !

**अश्व० :** तसा या सूतपुत्राला आपल्या सूतकुलाचा वाटत आहे.

**कर्ण :** कां वाटूं नये ? कुलाचा अभिमान नाही, त्या माणसानं जन्मून तरी काय केलं ? शिन्दळीच्या पोटी यदृच्छेनं जन्माला येणाऱ्या पुरुषानं सुद्धां,आपल्या कुळाचा अभिमान धरून, त्याच्या उद्धारासाठी आत्मतेजाच्या पराक्रमाने साऱ्या दुनियेचे डोळे दिपवून टाकले पाहिजेत. दगलबाजीने व्यवहारांत वरचढ बनलेल्या तुमच्यासारख्या सत्ताबाजांनीच कुलांचा उच्चनीचपणा ठरविण्याचें कारस्थान केल्यामुळे, लक्षावधि समाजांच्या माणुसकीचा उकीरडा होऊन बसला आहे आणि या उकीरड्यावर आपल्या जन्मदत्त आत्मस्तोमाचा बाजार थाटणारे गब्रूच वास्तवीक " गाढव " संज्ञेला विशेष पात्र समजले पाहिजेत.

**अश्व० :** जाती तशी पुती न् खाण तशी माती, हा सनातन सिद्धान्त, उर्मट कर्णा, विसरूं नकोस.

**कर्ण :** जन्मप्राप्त थोरवीवर जगणाऱ्या बड्या बापांच्या बड्या बेट्यांसाठींच हा सिद्धान्त निघालेला आहे ; मनगटाच्या जोरावर स्वतःचा न् स्वकुलाचा उद्धार करणाऱ्या आत्मतेजस्वी वीरांसाठी मुळींच नाही, हें तूं पण विसरूं नकोस. या अधिरथ–राधा–पुत्राला अंगाधिपति बनवून, कौरवेश्वरानं प्याद्याचा फर्जी करण्यापूर्वीच, स्वभावजन्य क्षात्रतेजाच्या जोरावर, दुर्योधनाच्या विश्वासाचा किल्ला, या सूतपुत्र कर्णानं आधींच काबीज केला होता, ही गोष्ट नजरेआड करूं नकोस. सूतकुलाच्या गारगोटीत जन्मलेल्या या हिऱ्याला उत्तेजनाचे पैलू पाडून, पारखी दुर्योधनानं आत्मतेजाचा उजाळा दिला. जन्मप्राप्त श्रेष्ठपणाच्या भाण्डवलावर जगणाऱ्या ब्राह्मण क्षत्रियांनी, असल्या हिऱ्याच्या तेजापुढे. आपल्या आत्मस्तोमाची निशाणं आता बिनशर्त खालीं वाकवली पाहिजेत.

**अश्व० :** सूर्याच्या प्रकाशावर चमकणाऱ्या परप्रकाशी चंद्रानं आत्मतेजाच्या वल्गाना करूं नये. अशा वल्गानांना बाचकण्याइतकं ब्राह्मणांचं ब्रह्मतेज आजच काही हिणकस झालेलं नाही.

**शल्य :** आणि क्षत्रियांचं क्षात्रतेज सुद्धा निस्सत्त्व झालेलं नाही.

**दुर्यो० :** कोणाचंच तेज हिणकस नाही आणि कोणी कोणाच्या तेजाला हिणकस ठरवण्यांत शहाणपणा नाही. स्वयंभू पराक्रम आणि लौकिकी समजुती यांचा झगडा मानवी इतिहासाइतकाच जुनाट दिसतो. कर्णासारखे वीरच कांय ते या झगड्याला दाबांत ठेवून, धोरणी आत्मविश्वासानं स्वकुलाचा न् स्वराष्ट्राचा उद्धार करतात.

उच्चनीचत्वाच्या लौकिकी कल्पना स्वयंभू पराक्रमाच्या विकासाला दडपून टाकतात. केवळ लोकोत्तर मनस्सामर्थ्याचे धीरवीरच त्या दडपणाला प्रतिकाराची टक्कर मारून, लौकिकी कल्पनांचा खोडसाळपणा सिद्ध करतात. असं करताना समर्थाशीं अहंता करण्याचा प्रसंग त्यांच्यावर पुष्कळदां येतो, नाही असं नाही. पण आत्मविश्वासाच्या जोरावर जगांत ते आणखी कशाचीच पर्वा ठेवीत नाहीत.

**कर्ण :** मानीव नीच कुळांत स्वपराक्रमी पुरुष जन्माला येऊन, या असल्या वरचढ लोकांच्या मगरुरपणाला, त्यांनी आपल्या स्वयंभू कर्तबगारीचे पायबन्ध वरचेवर ठोकले नसते, तर या घमेण्डानन्दनानीं मागासलेल्या सर्व समाजांना कृमिकीटकापेक्षांहि अत्यन्त नीच दशेला नेऊन चिरडले असते ! अश्वत्थाम्या, पोट भरण्यासाठी क्षत्रियाचा पेषा आणि जनतेवर वजन पाडण्यासाठीं ब्राह्मणाची दीक्षा, असली दुतोण्डी वृत्ति या कर्णाजवळ नाही. मी सूतपुत्र आहे आणि स्वयंभू क्षात्रतेजानं मी साऱ्या सूतकुलांचा उद्धारक आहे.

**अश्व० :** खेचराला पुष्कळ शृंगारसाज चढविला म्हणून त्याला काही पंचकल्याणी अबलक घोड्याची पात्रता येत नसते.

**शल्य :** स्वयमेव मृगेन्द्रता कांहीं निराळीच असते !

**कर्ण :** तर–तर ! तें काय विचारायचं ! दोन सेनापतींनीं गेल्या पंधरा दिवसांत आपली स्वयमेव मृगेन्द्रता किती ठणठणीत वठवली, ती सर्वांनी पाहिलीच आहे. पहिले भीष्माचार्य! उघड उघड पाण्डवांचे पुरस्कर्ते. पण करतात काय बिचारे ! अर्थस्य पुरुषो दासः न्यायानं, नाइलाज म्हणून, कौरवांच्या मिठाला कसेबसे जागले आणि अखेर वेदान्ती सबबीवर शरपंजरी पडले. दुसरे आमचे द्रोणाचार्य ! त्यांचा थाट काय विचारता! शापादपि शरादपि ! पण अखेर शापहि उपयोगी पडले नाहीत आणि शरहि कामाला आले नाहीत ! वृत्ती ब्राह्मणाची न् कृति क्षत्रियाची ! सांसारिक मोहाचा एक फटका येतांच, क्षात्रधर्म गडबडला आणि पोटासाठीं धनुर्धारी बनलेला ब्राह्मण अखेर दर्भदारी बनून हकनाहक कुत्र्याच्या मोतानं प्राणाला मुकला !

**अश्व० :** राजा, माझ्या स्वर्गस्थ पित्याची इतकी बेलगाम निंदा मला आतां मुळींच सहन होणार नाही. या तुझ्या पाळीव लाडक्या कुत्र्याच्या तोण्डाला तोण्डबेडी घाल, नाही तर—

**कर्ण :** नाही तर काय ?

**अश्व० :** नाहीतर लाथेच्या टोकरीनं टाळक्याची कवची उखडून हातांत देईन.

**कर्ण :** कर्णाच्या मस्तकावर लाथ ?

**अश्व० :** हो हो. कर्णाच्या मस्तकावर लाथ.

**कर्ण :** (तलवार उपसतो) ब्राह्मणाधमा, तंगडी छाटून टाकीन. जातीचा ब्राह्मण पडलास, म्हणूनच जिवंन्त राहिलास, नाहीतर उभा खापलून ठार केला असता.

**अश्व० :** मूर्खा, केवळ जातीमुळें मी तुला अवध्य झालों काय ? तर मग हें घे. ही पहा मी माझी जात टाकली. [गळ्यांतले जानवे ताडकन् तोडतो.] जातीच्या सबबीवर प्राणदान मिळविण्याची मला मुळीच इच्छा नाही. चल, सामर्थ्य असेल तर शस्त्र घेऊन हो सामन्याला तयार. [तरवार उपसतो.].

**कर्ण :** जातिधर्माचा संन्यास करणाऱ्या सोंगाड्या क्षत्रिया, युद्धाच्या आवाहनाला पाठ दाखविणारा हा कर्ण नव्हे. चल, ही घे पहिली सलामी.

[दोघेही तलवारी सरसावून पवित्रे धरतात. दुर्योधन अश्वथाम्याला आणि शल्य कर्णाला आवरून धरतात.]

**दुर्यो० :** हात आटोपा. आचार्यपुत्रा—कर्णा, काय हा अविचार ! दोघेहि आपापलीं शस्त्रे आवरा. कौरवेश्वराच्या शिबिरांत तरी असली दांडगाई तुम्हाला शोभत नाही.

**अश्व० :** राजा, या पापाधम गुरुनिन्दकाला पाठीशी घालून, तूं आपल्या ऐश्वर्याची नि कौरवसाम्राज्याची हानी करून घेत आहेस. सोड तूं मला. या सूताधमाचीं खाण्डोळीं केल्याशिवाय भारतीय महायुद्धाची यशश्री तुझ्यावर खास भाळणार नाही.

**कर्ण :** भटी बुद्धीलाच असले तोडगे छान सुचतात. शल्या, यावेळी तरी मला आडवू नकोस, या नाटकी क्षत्रियाचा शस्त्रास्त्राचा दिमाख किती फोलकट आहे, याचं प्रत्यन्तर मी आत्तांच दाखवतों.

**अश्व० :** अश्वत्थामा नाटकी क्षत्रिय ? राजा, सोड माझा हात. या नीचकुलीन सूताधमाला नाटकी क्षात्रतेजाचा तडाका मला दाखवलाच पाहिजे.

**दुर्यो० :** अश्वत्थामन् कर्णा, आपापली शस्त्रे आवरून धरा, अशी हा कौरवेश्वर तुम्हाला आज्ञा करीत आहे.

**कर्ण :** [तरवार म्यानांत घालून] कौरवेश्वराची आज्ञा शिरसावन्द्य. [अश्वत्थाम्यास] राजाच्या इच्छेनेंच तुला जीवदान मिळाले !

**अश्व० :** असलें जीवदान मला साफ नको आहे. राजा, कर्णवध झाल्याशिवाय हा अश्वत्थामा या खड्गाला मुळीच आवरणार नाही. नीच कुलोत्पन्नांना कशाहि अवस्थेत मारलें तरी पाप नाही. सूतपुत्रा हो मरणाला तयार ! [कर्णाच्या अंगावर धावून जातो.]

**शल्य :** [अश्वत्थाम्याला उद्देशून] आचार्यपुत्रा, काय ही दाण्डगाई ? राजाज्ञेचा अपमान ?

**अश्व०** : या सूतपुत्रानं माझ्या पित्याचा केलेला अपमान राजाला खपतो.

**शल्य** : म्हणून तूं राजाज्ञेचा अपमान करणार ? महापाप. राजाज्ञेला कःपदार्थ मानणाऱ्यावर तरी सेनानिपदाचा विश्वास राजानं कसा टाकावा ?

**अश्व०** : विश्वास टाकून तर पहा. राजा—

**अतिनीच पापकर्मा हीनकुलोत्पन्न सूतज साहाय ।**
**शशिवंश भूषणाला तुज गुणवंतास योग्य हा काय ।।**

मला सेनानिपदाचा अधिकार दे म्हणजे—

**मारीन अर्जुनातें मी राजा काळजी नको वाहूं ।**
**क्रोधें अकर्ण विजया पृथ्वी करितोचि बोल बापा हूं ।।**

**दुर्यो०** : अश्वत्थामन् मला कर्णार्जुनशून्य पृथ्वी पाहण्याची इच्छा नाही. मला निःपाण्डवी पृथ्वी करायची आहे. अर्थात् आपल्या पक्षांतल्या प्रधान वीरांनी एकमेकांशीं विरोध करण्याचा हा समय नव्हे.

**शल्य** : असल्या विरोधानं राजमण्डळावर आणि सैन्यावर केवढा विपरीत परिणाम होईल, याचा नको का काही विचार करायला ? शिवाय उद्यांचा सूर्य माध्यान्हीला येतांच, दुःशासनाच्या रक्तानं माखलेल्या हातानी, द्रौपदीची मोकळी वेणी मी बांधीन, अशी भीमानं आज प्रतिज्ञा केली आहे.

**अश्व०** : हा आचार्यपुत्र जिवन्त असेपर्यंत, युवराजाच्या केसाला स्पर्श करायची त्या वृकोदराची छाती नाही.

**कर्ण** : राजा, सेनानिपदाचे अधिकार मला तू दे अथवा देऊ नकोस. उद्या मी अर्जुनाशी द्वैरथ युद्ध करून, त्याला ठार मारीन किंवा मी मरेन, हीच माझी प्रतिज्ञा.

**अश्व०** : राजा, सेनानिपदाच्या अधिकाराशिवाय कर्ण जर अर्जुनवधाची प्रतिज्ञा करीत आहे, तर मला तूं आपला सेनापति कर. उद्यां सूर्यास्तापूर्वी निःपाण्डवी पृथ्वी करून, पितृवधाचा मी कसा कचकचीत सूड उगवतो, तो पाहून घे.

**दुर्यो०** : गुरुबन्धो, व्यक्तीपेक्षां कार्याचं महत्त्व मला अधिक आहे. भीष्माचार्य शरतल्पी पडल्यावर, कर्णाच्या आग्रहावरूनच द्रोणाचार्यांना मी सेनापतिपद दिलें. आतां कर्णालाच मी सेनापति करण्याचं ठरवलं आहे आणि धारातीर्थांत पतन पावलेल्या त्या प्रधान वीरांनींसुद्धां कर्णाच्या पराक्रमाची आधीच प्रशंसा केलेली आहे.

**शल्य** : कौरवेश्वराच्या योजनेला राजमण्डळाच्या वतीनं प्रणिपातपूर्वक मी अनुमति देतों.

**दुर्यो० :** कोण आहे तिकडे ? आण ते साहित्य. [बेहडा आणतो] अंगराज, कौरव सैन्याचं अधिपत्य या किरिटाच्या चिन्हानं आपल्या पराक्रमी मस्तकावर मी स्थापन करीत आहे. [कर्णाला किरीट, खड्ग व पुष्पहार अर्पितो.]

**कर्ण :** कौरवेश्वरा, मी माझं कर्तव्य चोख बजावीन.

**दुर्यो० :** यांत मला तिळमात्र शंका वाटत नाही.

**अश्व० :** राजा, माझ्यासारख्या उच्चकुलीन वीराला डावलून, या सूतपुत्राला तू सेनापती केलास ? मर्जी तुझी. सत्तेपुढं शहाणपण चालत नसलं, तरी माझ्या पित्याच्या नि माझ्या अपमानाबद्दल, आता माझी हीच प्रतिज्ञा, ' हा सूताधम कर्ण शत्रूच्या हातून ठार मारला जाईपर्यंत, हा आचार्यपुत्र अश्वत्थामा शस्त्रसंन्यास करीत आहे. [शस्त्र फेंकून देतो.]

**कर्ण :** वडलांचच बाळबोध वळण गिरवलंस. यात विशेष काय केलंस ?

**अश्व० :** विशेष काय ?

**कर्ण :** तुझ्यासारख्यानं शस्त्र हातांत ठेवलं काय न् टाकलं काय. दोहींची किंमत एकच ?

**अश्व० :** आणखी आगीत तेल ओतूं नकोस, पाण्डवांच्या हातून जेव्हा हा नराधम मारला जाईल तेव्हा राजा, तुला या अश्वत्थाम्याचीच आठवण होईल. [जातो.]

**दुर्यो० :** त्यावेळी मी तुला सेनापति करीन.

□ □ □

## अंक १ ला] [प्रवेश २ रा

[हातांत फुलांची परडी घेऊन एका बाजूनें आवळकटी झपझप पावलें टाकीत येते, तोंच समोरुन हिरडा ताना मारीत प्र.क.]

**हिरडा :** तुजविण मी हैराऽऽण !–याचं नांव प्रेमाचा झटका. झटक्यासरशी भेट आणि भेटीसरसा झटका. माझ्या जिवाला तुझाच चटका !

**आवळकटी :** तुझी नाही का अझून भरली घटका ? हिरड्या, सगळीकडे लढाईची धामधूम. आपल्या राजासाठी लढाईवर जाण्याऐवजीं, माझ्यामागं कशाला भटकतोस ?

**हिरडा :** मी ताना मारणारा गवई, मीना मारणारा मारेकरी थोडाच आहे.

**आवळ० :** तुला राजकारणाची तरी काही चाड ?

**हिरडा :** राजकारण ? या लढाईत कसलं आलं आहे राजकारण ? हव्या त्या गावगुण्डाला आपली गुण्डगिरी झाकायला, राजकारणाची गोधडी आजकाल छान सांपडली आहे ! आवळकटी, या कौरव-पाण्डव-युद्धांत राजकारणापेक्षा, स्त्रियश्चरित्रं पुरुषस्य भाग्यम्‌चा मामला मुळाशीं आहे, हें तुला समजावून सांगितलं तरी उमजणार नाही.

**आवळ० :** का उमजणार नाही ?

**हिरडा :** कारण तूं बाई आहेस, बुवा नाहीस.

**आवळ० :** बायांच्यापेक्षां बुवांना अक्कल जास्त असते कीं काय ?

**हिरडा :** हें तर ब्रह्मदेव बोलला.

**आवळ० :** तो तरी मेला बुवाच ! बायका जर बेअक्कल, तर अकलेबुवा बायांच्या मागं कशाला लाळ घोटीत फिरतात ?

**हिरडा :** तेंच कोडं सोडविण्यासाठीं ही लढाई आहे. एकापेक्षां एक वरचढ, असे पांच नवरे करूनसुद्धां, कर्ण महाराजावर डोळा मारणारी महापतिव्रता द्रौपती, आतां जर कर्णाला कवटाळण्याचा जाहीरनामा काढील, तर एका क्षणांत ही लढाईची धामधूम थण्डगार पडेल.

**आवळ० :** द्रौपदीमुळं ही लढाई चालू झाली म्हणतोस ?

**हिरडा :** ओदतन देर्ना तान्, तुंदिर धित्तां तेरे दान् ! पांच नवऱ्यांचा उघडा बाजार थाटणाऱ्या द्रौपदीसाठी आज किती तरी वीर महावीर जिभल्या चाटीत आहेत. निःपाण्डवी पृथ्वीच्या अश्वत्थाम्याच्या वल्गाना द्रौपदीसाठीं आणि कर्ण महाराजांची अर्जुनवधाची प्रतिज्ञा तिच्याच प्राप्तीसाठीं. अर्जुन मेला कीं पांच नवऱ्यांच्या सरावाची

ती रसाळ पतिव्रता अर्जुनाच्या रिकाम्या जागेवर कर्णाचीच नेमणूक करणार. हवेला पोकळी खपत नाही, तर द्रौपदीला एका नव-याची कशी खपणार ? द्रौपदीच्या डोळेमारणीत कर्णाचा कान अडकला की लढाई खलास. दुर्योधन महाराजांच्या सा-या उड्या कर्णाच्या जिवावर. तोच जीव द्रौपदीनं घेतला कीं कौरवपक्ष आटोपला. हे सगळं लुगड्याचं राजकारण आहे. लुब-याशिवाय यांत कोण भाग घेणार ? आवळकटी, मला तूं हवीस. लढाई नको, द्रौपदी नको, काही नको.—तूं माझी पूर्वी, मी तुझा यमन. तूं माझी रामकळी, मी तुझा हिण्डोल. तूं माझी भैरवी, मी तुझा भैरव. [बेहडा प्र. क.]

**बेहडा :** अहो भैरव, वेताळ, म्हसोबा, खैसोबा बस करा आपलं एरंडाचं गु-हाळ.

**आवळ० :** [स्व.] गजकर्ण नायट्याची ही जोडी छान जमली.

**हिरडा :** हा दुष्टा भरतकुलाधमा, आवळकटीशी मी एकान्त करीत असतां, मध्येच येऊन आकान्त करण्याची तुला लाज कशी रे वाटली नाही.

**बेहडा :** आवळकटीशी लघळपणा करणाराचा एकाच मुरदंगी थापेत धात्रक धिन्ना कडान् धा केल्याशिवाय हा बेहडा रहाणार नाही. आवळकटीवर माझं प्रेम आहे.

**आवळ० :** प्रेम असेल ! पण तूं काही माझा नवरा नव्हस !

**बेहडा :** मी तुझ्यासाठीं जीव देईन.

**हिरडा :** तुझ्यासाठी मी या बेहड्याचा जीव घेईन.

**बेहडा :** अरे जा सोनामुखीच्या. ताकिट धाकिट तक् तक्धिग धुनुनुनु नकधिग धुनुनुनु, धिलांग धुमकिट, किटतक गदिगन धा. आस्ताईच्या एकाच थपडीत तुझा अंत्रा उखडून टाकीन.

**हिरडा :** अरे जा गुलाबकळीच्या. नादिर्दिर्दिर तुंदिर्दिर्दिर तुंदिर्दिर्दिर तननन तननन तदारें तुंद्रे दानी, तूं मला मारणार ? कुरुक्षेत्रावर जमलेल्या एकाहि रथीमहारथीची माझ्या तम्बो-याला हात लावण्याची छाती झाली नाही, तो तूं चामडकुट्या मृदंग्या मला मारणार ? " कोण येतो तो पाहातो मजसी माराया—याया—अधि त्याचा प्राण घेतो कोप शमवाया. " महायुद्धाची जयश्री पाण्डवांवर भाळते का कौरवांवर फिदा होते. याचा निकाल लागेल तेव्हां लागो, आवळकटी, भीमपलासाची शपथ घेऊन मी आज हमिरी प्रतिज्ञा करीत आहें कीं तुझ्या गांधारी पाणिग्रहणासाठीं हा हिरडा या बेहड्याच्या झुंब-याचा दादरा केल्याविना राहाणार नाहीं.

[दोघे अस्तन्या सारून एकमेकांवर धांवतात.]

**आवळ० :** चला व्हा दूर मेल्यानो. द्रौपदीमुळं कौरव—पाण्डव युद्धाच्या वर्दळीवर आले. आवळकटीमुळं हिरड्या बेहड्याचं पीठ पडून त्यांचं त्रिफळाचूर्ण झालं, हा बदलौकिक मला साफ नको.

**हिरडा :** बदकर्मानं बदलौकिक होतो. या हिरड्याच्या प्रेमाचं पीठ करून त्याची तीटं तूं कपाळीं लावशील तर बदाचा प्रश्न तेव्हांच बाद होईल.

**बेहडा :** आवळकटी, काय तूं या निरेधसा धसाड्याचं ऐकतेस ! गवयी लोक मुळचेच बदफैली. या हिरड्यानं शेकडो वेळा रंगाचा बदरंग केलेला मी पाहिला आहे. मृदंग्यापुढं गवयाची मिजास ? दुग्गण चौगणीत देईन कुठच्या कुठं भिरकावून.— आवळकटी, तूं मलाच आपलं प्रेमदान कर.

**हिरडा :** अग, मृदंगी म्हणजे थापाडे. तूं काय लागतेस या थापाड्याच्या नादी. मृदंगाच्या वाद्या आवळून आवळून याच्या साऱ्या नाड्या आखडल्या आहेत.

**बेहडा :** रात्रंदिवस घसा फोडफोडून याच्या आळ्याचा घाम मळ्याला गेला आहे.

**हिरडा :** म्हणूनच माझ्या प्रेमाचा मळा फुरफुरला आहे. आवळकटी, तू याच्याशी लग्न लावशील तर एका वर्षात मेल्या नवऱ्याची जिवन्त विधवा होशील.

**बेहडा :** आणि तूं या सुरावट्याची बायको होशील तर तारवट नवऱ्याचं लोढणं गळ्यात अडकवून कुमारीच्या कुमारीच राहशील. खरं सांग, तुझं कुणावर प्रेम आहे ?

**हिरडा :** तुझ्या कौमार्याची तुला शपथ. माझ्यावर तुझं प्रेम आहे ना ? माझ्या नावानं तूं कुंकू लावशील ना ?

**आवळ० :** बोलून चालून मी दासी, त्यातून कुमारी, भेटेल तो तरूण मला आवडतो. सगळ्यांच्याच नांवानी कुंकवाचे टिकले लावीत सुटले, तर मळवटाखालीच माझं कपाळ बेपत्ता व्हायचं !

**हिरडा :** मळवटासारखी दुसरी राजरोस पळवाट नाही. लाब रूंद मळवटाच्या फरफाट्यामागं गोन्दले नोन्दलेले, लागले लावलेले, सगळे काळे डाग बेमालूम छपले जातात.

**आवळ० :** मळवटाचा पट्टा ओढून, त्रेकम् टिकली बनण्यापेक्षा, एकच छान बारीकशी टिकली लाऊन—

**बेहडा :** दोघांची बायको होत असशील तर हिरड्याशी एकतालाची सम दाखवून, तुला अर्धी अर्धी वाटून घ्यायला मी तयार आहे. कायरे हिरड्या, सूचनेला सम देतोस, का कालात लय करतोस ?

**आवळ० :** म्हणजे ? मेल्यानो, टरबुजासारखी मला उभी चिरणार की काय ?

**हिरडा :** उभी चिरून कुणाला काय मिळणार'? अग, पांच पाण्डवानी नाही का एक द्रौपदी वाटून घेतली ?

**बेहडा :** त्यानी काय तिच्या चिरफळ्या केल्या थोड्याच ?

**आवळ०** : तुम्हा दोघांची एकदम बायको होऊन द्रौपदीसारखं पांच नव-यांचं उघडं दुकान नाही मला थाटायचं.

**हिरडा** : द्रौपदीसारखं उघडं दुकान थाटायचं नसेल, तर कुन्तीसारखा झाकल्या प्रेमाचा व्यापार कर.

**आवळ०** : तो कसा काय ?

**हिरडा** : पण्डु राजाच्या, नांवानं कुंकू लावून, तिनं नाही का तीन निरनिराळ्या देवांकडून—

**बेहडा** : किंवा देवमाणसांकडून—

**हिरडा** : तीन पोरांची कमाई केली आणि आपल्या सवतीला—माद्रीला सुद्धा—दोन जुळ्या पोरांसाठीं या भारतीय पातिव्रत्याचा ओनामा शिकवला ?

**बेहडा** : गुपचुप प्रेमाची गोडी काही और असते बुवा.

**हिरडा** : पण सासूपेक्षा सून निधड्या छातीची.

**आवळ०** : एका बाईला एकच नवरा असं शास्त्र असता, द्रौपदीचा नि कुन्तीचा हा उघड गुप्त नव-यांचा बाजार लोकांना कसा मान्य झाला ?.

**हिरडा** : मोठ्यानी शेण खाल्लं तर ते औषधासाठी आणि गरिबानं चुकून चाटलं—

**बेहडा** : अगदी श्रावणीच्या गोमूत्राबरोबर—

**हिरडा** : तर तें पोटासाठीं, अशी या जगाची फार विचित्र त-हा आहे.

**आवळ०** : अब्रूबेअब्रूची सारी भुताटकी गोरगरीबांच्याच मागं म्हणायची ?

**बेहडा** : धागिन्ना धातुन्ना तागिन्ना तातुन्ना ! कधिकाळीं बेण्ड बाहेर फुटण्याची वेळ आलीच, तर मंत्रतंत्राचा दाखला पुढं केला कीं लोकांची तोण्डं बन्द. तेवढ्यानं भागलं नाही तर अखेरचं अस्त्र म्हणजे आकाशवाणी ! आकाशवाणीवर फेरतपासणीची सवलत नाही.

**आवळ०** : हिरड्या, तुझी लग्नाची बायको सोनामुखी घरात असता, तूं माझ्या प्रेमाच्या नादी कशालारे लागतोस ?

**हिरडा** : अग, ती घरातली बायको आहे, दारातली नाही. म्हणून तर तुझ्या प्रेमासाठीं मी माझ्या जीवाचा आरोहावरोह ताणीत आहे.

**बेहडा** : बाहेरख्यालीचा नाद न् घरात बायकोची ब्याद !

**हिरडा** : तुला कोणी सांगितला हा नसता वाद ?

**आवळ०** : माझ्याच प्रश्नाचा आहे हा पडसाद.

**बेहडा** : त्याची याला कुठं आहे दाद, चोर तर चोर आणि वर शिरजोर, गवयांचा धन्दाच सारा चोराचोरीचा ! याची तान चोर, त्याची मेण्ड चोर, याची फिरक् चोर, त्याची भिरक् चोर ! सारा जुनापुराणा चोरबाजार !

**हिरडा :** अरे हो चामडंकुटीच्या ! घरात तुझी बायको गुलाबकळी असताना, आवळकटीच्या मागं तू रे कशाला गोण्डा घोळतोस थापबाजीच्या ?

**आवळा० :** म्हणजे ? बेहड्याला पण लग्नाची बायको आहे ?

**बेहडा :** अग, ती लग्नाची बायको आहे.

**आवळा० :** मग तुला आता विघ्नाची बायको पाहिजे वाटतं ?

**बेहडा :** लग्नाची बायको म्हणजे बासनातली पैठणी ! षटीसामासी लोकांना दाखविण्यासाठी बाहेर काढायची. अंगवस्त्राची गोष्ट तशी नाही. सदा नि कदा खान्द्यावर. दुमडले मुरडले तरी पंचायतीचा प्रश्न नाही. धुणावळीत परटाने दोन दिवस डोळ्याआड आड केलं, तरी परत आल्यावर चोख ईस्तरीची परीट घडी !

**हिरडा :** हा म्हसोबा असा, पण ती बिचारी गुलाबकळी महासाध्वी.

**बेहडा :** आणि तुझी सोनामुखी काय गावभवानी आहे ?

**हिरडा :** ए झपतालीच्या, माझ्या बायकोचं नांव घेशील तर तानेच्या एका फिरकीत तुझ्या मुरदंगाची ढोलकी करीन्.

**बेहडा :** अरे जा सोहनीच्या ! धमाराच्या एकाच आवर्तनांत तुझ्या कानड्याचे कान उपटून नरड्यात कोंबीन.

**आवळा० :** हां, असे कौरव पाण्डवांसारखे वेताळी वर्दळीवर येऊ नका. प्रश्न माझ्या लग्नाचा आहे. एकाच पुरुषाला दोन बायकांवर प्रेम करता येईल कसे ?

**हिरडा :** न यायला काय झालं ?

**आवळा० :** एका म्यानांत दोन तलवारी ?

**हिरडा :** प्रश्न तलवारीचा नाही, म्यानांचा आहे. दोन म्यानांत एक तलवार आळीपाळीने बिनबोभाट राहील. प्रेम आधळं असतं.

**बेहडा :** आंधळ्या प्रेमाची शर्यत आन्धळाच छान जिंकतो. उगाच नाही मृदंग्यांच्या संप्रदायात आंधळ्या सूरदासांची एवढी गोचीड गर्दी !

**आवळा० :** आंधळ्या प्रेमाच्या शिकारीसाठी तुमही दोघेही आंधळे बनला आहात, हे कोणीहि धडसा माणूस डोळे मिटून सांगेल. तुम्हा दोघांच्या बायका जिवन्त आहेत ; तेव्हा डोळे मिटून कुणाचंहि पाणिग्रहण मला करता यायचं नाही.

**बेहडा :** पाणिग्रहणाशिवाय प्रेमाची मण्डई थाटता येत नाही, असं थोडंच आहे ?

**हिरडा :** लग्नाची फळी नवराबायकोच्या दुफळीनं तेव्हाच खिळखिळी होते ; म्हणून भवसागर तरून जायला बाजारचा भोपळा संग्रही ठेवावा लागतो.

**आवळा० :** बाजारी भोपळा ? खेटर आडलाय माझा ! दोघांपैकी एकाशी लग्न लावणार आणि दुसऱ्यावर प्रेम करणार ? पत्करतंय् ? बोला.

**बेहडा :** ही तर द्रौपदीवर ताण झाली ! हिरडा जर पत्करीत असेल तुझ्या लग्नाचा मान, तर मी पत्करतो तुझ्या प्रेमाचं दान.

**हिरडा :** लग्न ? पटकी पत्करली ! एकाच लग्नाची मी इतकी हैबत घेतली आहे, की मेलो तरी लग्नाच्या फन्दात मी पुन्हा पडणार नाही. पुनर्विवाहाच्या मी अगदी विरूद्ध आहे. आम्बराई जोपासण्याचा खटाटोप करण्यापेक्षा, आजुबाजूच्या झाडावरचे चार दोन आम्बे सहज जाता येता मटकावलेले फार बरे ! लग्नाच्या सुक्या खोकल्यापेक्षा प्रेमाची ओली खरूज बरी ! चिघळेल तशी पचरत जाईल !

**बेहडा :** आवळकटी, तुझ्या प्रेमासाठी हा बेहडा आपल्या जिवाचा धिरकिट् तक् धा, किडान् किडतक् गदिगन धा करायला तयार आहे.

**आवळ० :** उगाच आपल्या जिवाची पातळभाजी करू नका. दोघांवर मला प्रेम करता येणार नाही, आणिं दोघांशी मला लग्नहि लावता येणार नाही.

**हिरडा :** आवळकटीशिवाय हिरड्याला जगता येणार नाही.

**बेहडा :** आणि बेहड्याला मरता येणार नाही.

**आवळ० :** कुणी मरू नका आणि जगूहि नका. माझं ऐका. हिरड्या, तू आहेस तानदार गवयी—

**हिरडा :** [ तान मारून ] ते काय सांगावं ऽ ऽ ऽ !

**आवळ० :** आणि बेहड्या, तू आहेस—

**बेहडा :** पल्लेदार थापेचा कल्लेदार मृदंग्या—धीं धीं धागेत्रक तूना कत्ता धागेत्रक धीना.

**आवळ० :** अर्जुनवधासाठी कर्णमहाराजांची स्वारी बाहेर पडण्यापूर्वी आपापल्या कलेनं जो कोणी माझं मनपसंत प्रेमाराधन करील, त्याला मिळेल प्रेमाचा मान. उरेल त्याचा लग्नांत अडकवीन कान. का ? आहे की नाही युगत छान ?

**हिरडा :** ठीक ठीक, अशी घेतो संगीताची जीवतोडी तान, की आवळकटीचं मलाच हटकून प्रेमदान. [ जातो. ]

**बेहडा :** मृदंगावर अशी कडाडवतो कडान् धा थाप, की आवळकटीवर बेहड्याची छातिठोक छाप. [ जातो. ]

**आवळ० :** दोघांची अश्शी घेते संगीत कानपिचकी, की झटकन् उतरेल यांच्या प्रेमाची उचकी. [ जाते. ]

□ □ □

अंक १ ला] [प्रवेश ३ रा

[ कर्णाचे शिबिर. विचारमग्न कर्ण शतपावली करीत आहे तोच बेहडा येऊन प्रणाम करतो. ]

**कर्ण :** बेहड्या, काय बातमी आहे ?

**बेहडा :** बातमी नाही, विनन्ती आहे सरकार. एवढं महायुद्ध चालू आहे. माझ्यासारख्या गरिबाच्या कर्तबगारीला थोडी संधि द्याल, तर जिवाचं सोनं होईल.

**कर्ण :** संधि कां नाही ? या वेळी तर प्रत्येकाने आपल्या राजासाठी जिवावर तुळशीपत्र ठेवलं पाहिजे.

**बेहडा :** नुसतं तुळशीपत्रावर जीव ठेवून काय फायदा सरकार ? या बेहड्यानं तब्बल दोन तपं मृदंगाचं चामडं कुटून या तळहाताचा कातळ केला आहे. मृदंग्याची थाप वैऱ्यावर पडू नये म्हणतात. इंद्राच्या वज्राचं पीठ पडायचं ! आपल्यासारख्यानी नुसतं बोट दाखवताच, पराक्रमाचा असा धिरकीड तक धा किडाऽन किडतक गदिगन धा करतो की ज्याचं नाव ते ! सरकारनी अर्जुनवधाची कामगिरी माझ्यावर सोपवावी--

**कर्ण :** तुझ्यावर सोपवावी ? मूर्खा, तू मृदंग्या. सारी हयात मृदंग बडवण्यात गेली. तू अर्जुन-वध करणार ?

**बेहडा :** हेच हेच ! गरीबाच्या कर्तबगारीला वालीच नाही. परमेश्वरा, गंधर्व तुंबरा, अरसिकेषु मृदंगवादनम् शिरसि मा लिख मा लिख मा लिख !

**कर्ण :** बेहड्या, गरीब श्रीमन्तीच्या मापानं बुद्धीचं किंवा कर्तबगारीचं माप मापणारा हा कर्ण नव्हे. पण मृदंग्या अर्जुनवध करणार, ही त्या प्रश्नाची निवळ थट्टा आहे.

**बेहडा :** थट्टा ! मर्जी आपली. मृदंग्या म्हणजे माणूस नव्हे, पुरुष नव्हे, का मर्द नव्हे ? शिखण्डीसारखा धड ना नारी धड ना नरसुद्धा भीष्मासारखा महान् योद्धा पालथा घालतो, तर अर्जुनवध मला काय कठीण आहे ?

**कर्ण :** तू अर्जुनवध कसा करणार ?

**बेहडा :** सेनापतीनी उद्या तहनाम्याची हुलकावणी दाखवून, पाण्डवांच्या समोर आमचा संगीत जलसा उभा करावा. हिरडा गाणार, आवळकटी अशी झम्पक थै थै झम्पक थै थै नाचणार आणि मी भम्पक कडधुम् भम्पक कडधुम् मृदंग वाजवणार. नाचाच्या रिंगणात फिरतां फिरतां, समेच्या अवसानात अर्जुनाला ऐऽसी एक पोलादी चपराक लगावतो का एकाच कडान् धात् मामला खलास.

[**आंत**--'' दानशूर कर्णा, मला भेट देतोस, का जाऊ परत ? किती वेळ मी ताटकळत उभा राहाणार.'']

**बेहडा :** (दचकून) धीं धीं धागेत्रक तूना कत्ता झाला ! सरकार, बाहेर एक भटजी आला आहे आणि तो सेनापतींची भेट घेऊ इच्छितो. हे सांगायला मी विसरलो.

**कर्ण :** मूर्खा, जा त्याला आत पाठवून दे. [बेहडा जाऊ लागतो] अरे थांब. त्यानं आपलं नांवगाव काही सांगितलं का ?

**बेहडा :** सांगितलं तर ! काय बरं ते नाव ! मृदंगाच्या बोलानी डोक्यात गर्दी केल्यामुळे, या नावागावाच्या संस्कृत भानगडी इथं टिकतच नाहीत.––हो, आठवलं,–– वासुदेव भटजी, आणि तो पाण्डवांच्या छावणीतून आला आहे.

**कर्ण :** पाण्डवांच्या छावणीतून ?––दे त्याला आत पाठवून. [बेहडा जातो.] (स्व.) पाण्डवांच्या छावणीचं नाव स्पष्ट सांगतो. तेव्हा माझी शंकाच अखेर खरी ठरणार. [वासुदेव भटजी प्र. क.]

**वासुदेव :** अंगराजा, तुझं स्वस्तिक्षेम असो.

**कर्ण :** यावं भूदेव, तुमचं स्वागत असो. आमच्या शत्रूच्या छावणीतून, इतक्या अपरात्री इकडं येण्याची आपण कां कृपा केली ?

**वासु० :** राजा, धर्माच्या नावाखाली अधर्म मातला, तर त्याला योग्य वेळी पायबन्ध ठोकण्यासाठीच ब्राम्हणांचा जन्म आहे.

**कर्ण :** तर मग, अश्वत्थाम्याच्या मृत्यूची कंडी उठवून, अधर्म करणाऱ्या धर्मराजाचं योग्य ते पारिपत्य करूनच भूदेवानी इकडं येणं केलं असेल ?

**वासु० :** राजा, अधर्म हा केव्हाही अधर्म. मग तो धर्मानं केलेला असो तो अगर कोणीहि केलेला असो. आचार्यपुत्र अश्वत्थाम्यानं सूतपुत्र सूतपुत्र म्हणून केलेला तुझा उपहास, त्याच्या वृत्तीला आणि ब्रीदाला कितीहि साजला शोभला, तरी माझ्यासारख्या सत्यशोधक ब्राम्हणाला तो मुळींच रुचला नाही.

**कर्ण :** अश्वत्थामा निर्भेळ सत्यच बोलला. त्यानं माझ्या सूतकुलाचा केलेला निर्देश उपहासाची भाषा बाद केली तर, सत्याला धरूनच होता. त्यात तुम्हाला वाईट वाटण्याचं कारण नाही. भटजीमहाराज, मी तुम्हाला पुन्हा बजाऊन सांगतो की हा कर्ण सूतपुत्र आहे, आणि त्याला आपल्या शूद्रातिशूद्र सूत कुलाचा अपरिमित अभिमान वाटत असतो. साऱ्या पृथ्वीच्या साम्राज्यदानानं सुद्धा या वाजवी अभिमानाचा अणुरेणुसुद्धा कर्णाच्या हृदयातून आमरण चळणार ढळणार नाही, ही खात्री ठेवा.

**वासु० :** केसरीचा छावा दुर्दैवानं मेंढरांच्या कळपात वाढावा आणि त्यामुळे मेण्ढकुलाचाच त्याला अभिमान वाटावा, अशासारखी तुझी स्थिती झालेली आहे. हा सत्यशोधक ब्राम्हण या यज्ञोपविताची शपथ घेऊन तुला सांगत आहे, की तू अधिरथ–राधा–पुत्र सूत नसून, क्षात्रकुळभास्कर पण्डु–कुन्ति–पुत्र पहिला पाण्डव आहेस.

**कर्ण :** वासुदेव भटजी, तुमच्या या लोकोत्तर शोधाची तारीफ करण्याइतकी काव्यरसिकता या कर्णाला नाही, याचं मला फार वाईट वाटतं. कोणी मला पाण्डव

ठरवलं, माझ्या क्षात्रबीजाचा बिनतोड दाखला दिला, किंवा मला परमेश्वराच्या सिंहासनावर नेऊन बसवलं, तरी या अधिरथ–राधा–पुत्र कर्णाचा सूतकुलिनत्त्वाचा अभिमान रेसभर सुद्धा कमी होणार नाही. वासुदेव भटजी, कुलांचे अभिमान विकत घ्यायचे नसतात. निसर्गप्रेमानं ते कमावले जातात.

**वासु० :** अंगराजाचा बोल फोल कोण ठरवणार ? तुझ्या गुणकर्माचं क्षात्रतेज आज साऱ्या दुनियेचे डोळे दिपवीत आहेच. तुझ्यासारख्या देवपुत्राला सूतकुलीन कोण म्हणेल ? राधेनं तुला वाढविलं असलं तरी ती काही तुझी जन्माची माता नव्हे. हरिणीच्या पोटी कधी वाघाचा जन्म होणं शक्य आहे काय ? हे तुला सप्रमाण पटवून देण्यासाठीच, इतक्या अपरात्री भगवान श्रीकृष्णाच्या आज्ञेने—

**कर्ण :** भगवान् श्रीकृष्ण ? या दगलबाजाला तुम्ही ' भगवान ' सुद्धा बनवलात का ? धन्य आहे तुमच्या सुपीक डोक्याची ! तुम्ही तोण्डपुजे लोक केव्हा कोणाला भगवान् महात्मा न् महाराज बनवाल, याचा काही नेम नाही. मी सूतपुत्र असलो काय, किंवा राजपुत्र असलो काय, विहित कर्तव्य पार पाडण्याच्या कामी या दाखल्यांची मला काही जरूरी भासत नाही. जन्माच्या काकतालीय कळकट पुण्याईपेक्षा, दणकट मनगटाच्या पौरुषावरच या कर्णाला आपलं नांव इतिहासात चिरंजीव करून ठेवण्याची इच्छा आहे.

**वासु० :** अंगराजा, तुझ्या निस्पृह वाणीचा कण न् कण हिरेमाणकासारखा सत्याच्या तेजानं चमकत आहे. पण राजा, एकाच आईच्या उदरातून जन्मलेल्या भावांचा आणि त्यांच्या बरोबर लक्षावधि भारतीय क्षत्रियांचा निष्कारण नाश करण्याचं पाप जर तुझ्या माथी बसत असेल, तर ते टाळण्या इतका मनाचा उदारपणा दानशूर कर्णाजवळ आढळणार नाही का ? राजा, गैरसमजुतीचा हट्ट आता सोडून दे. खरोखरच तू कुन्तीच्या पोटी जन्मलेला पहिला पाण्डव आहेस. म्हणूनच तुझ्या हातून अर्जुनाचा, तुझ्या सारख्या पाठच्या भावाचा, वध होता कामा नये. भ्रातृवधासारख्या महत्पापानं आजवरच्या दिगन्त किर्तीला काळीमा फासू नकोस, अशी भगवान् श्रीकृष्णानं तुला आज्ञा केली आहे.

**कर्ण :** तो नाटक्या चेटक्या या कर्णाला आज्ञा करणार ? आमच्या शत्रूचा सारथी या कौरव सेनापतीला हुकूम फर्मावणार ? असला अपमान कौरव क्षणभरसुद्धां सहन करणार नाहीत. दगलबाजांचा वेदान्त मला चांगला कळतो.

**वासु० :** कर्णा, तू विवेकाचा मूर्तिमंत अवतार असता, त्या भगवान् श्रीकृष्णाची निन्दा करतोस ? आतापर्यंत मी तुझ्याशी सामोपचारानं बोललो. पण माझ्यापुढं त्या अवतारी महात्म्याची निन्दा करशील, तर माझा राग अनावर होईल.

**कर्ण :** सत्यशोधक ब्राम्हणालाही राग येतो म्हणायचा ! भटजीबुवा, यादव कृष्ण तुमचा भगवान् असेल, अवतारी महात्मा असेल, तर त्याला अर्जुनाच्या खटाऱ्यावरून उतरा आणि घरच्या देव्हाऱ्यांत थापून, त्याची त्रिकाळ पूजा करा. पण त्या तुमच्या आंधळ्या भक्तीची सक्ती या कर्णावर काय म्हणून ? शिवाय, मी कुन्तीचा राजपुत्र आहे, का राधेचा सूतपुत्र आहे, का एखाद्या गावभवानीचा वेश्यापुत्र आहे, हे ठरविण्याची

उठाठेव गवळ्याच्या त्या दगलबाज पोराला कोणी सांगितली ? अर्जुनाला पाठीशी घालून, कर्णाच्या शस्त्रास्त्रापासून त्याचं रक्षण करण्याची यादवी अक्कल पालथी पडली असेल, तर कौरवेश्वराला बिनशर्थ शरण येऊन आपलं मरण वाचवा. उकरून काढलेल्या जुन्यापुराण्या नात्यागोत्याच्या सबबीवर कर्णाचा बुद्धिभेद करण्याची कारवायी फुकट आहे.

**वासु० :** उन्मत्त कर्णा, अरे जे निर्गुण निराकार परात्पर चैतन्य श्रीकृष्णाच्या रूपानं या भूतलावर अवतरलं आहे, त्याची निन्दा तुला शोभत नाही.

**कर्ण :** भटजीबुवा, या अवताराच्या कल्पना भोळ्याभाबड्या नामर्द निराशावाद्याना शिकवा. त्यानी त्या लवकर पचतील.

**वासु० :** मदान्धा, तुझ्या गर्वाची परिसीमा झाली.

**कर्ण :** भटजीबुवा, वरच्यानी तेजोभंगाच्या लाथा मार मारून खाली दडपलेल्या सूतादि शूद्रांना कसला आला आहे गर्व ? आत्मविश्वासाच्या मळ्यातच गर्वाचा दवणा दरवळतो. मी आपल्या गर्वाची फेक गगनाला भिडे इतकी उंच भिरकावीन, तेव्हा माझ्या गरीब न कष्टाळू जातभाईना थोडासा धीर देऊन, ते आपल्या माणुकसीच्या हक्कासाठी धडपडू लागतील. आजपर्यंत गर्वाचा सारा खजिना तुम्ही वरिष्ठांनी वापरला. आता थोडासा तरी आपच्या हाती लागू द्या की ! धनुर्धर कर्णानं गर्व करू नये, तर काय त्या आसूडधारी काळ्या कपट्यानं करावा ?

**वासु० :** कृष्णाच्या पाठीमागं हवी तशी निन्दा करणारी तुझी जीभ, तो समोर येऊन उभा ठाकला, तर चटकन् कायमची टाळ्याला चिकटेल.

**कर्ण :** कुणाची जीभ टाळ्याला चिकटणार, ते उद्याच्या संग्रामात दिसून येईल. वासुदेवभटजी, कृष्णाचा दरारा तुमच्यासारख्या भेकड भक्तांना आणि 'भगवान्, भगवान्' म्हणून त्याच्या आरत्या करणाऱ्या भराडी भोप्याना. या कर्णाला काळाची दरकार नाही तर त्या सोंगाड्या धोडेहाक्याची काय किंमत ?

**वासु० :** कृष्णासमोर असली भाषा वापरण्याची तुला छातीच होणार नाही.

**कर्ण :** पण या कौरव–सेनापतीपुढं येऊन उभं राहायला कृष्णाला तोण्डच नाही.

**वासु० :** अरे, तो अनन्त–ब्रह्माण्ड–नायक—

**कर्ण :** अनन्त गोपी नायक.

**वासु० :** माया सूत्र चालक—

**कर्ण :** चेटकी कपटी नाटकी.

**वासु० :** इच्छामात्रे करून हवा तिथं प्रगट होईल.

**कर्ण :** फक्त कर्णाच्या शिबिराखेरीज, सर्वत्र.

**वासु० :** कां ? कर्णाच्या शिबिरांत सुद्धा—

[मोठा आवाज होतो, प्रकाश पडतो, भटाचा वेष टाकून श्रीकृष्ण प्रगट होतो.]

**वासु० :** हा पहा कर्णाच्या समोर कृष्ण.

**कर्ण :** आणि कृष्णासमोर हा पहा धनुर्धर कर्ण. माझीच शंका खरी ठरली. मला वाटलचं होतं की अर्जुनवधाची माझी प्रतीज्ञा ऐकतांच, माझी एकान्ती भेट घ्यायला तू धावत येशील. कृष्णा, नाटक तर छान रंगवलंस रे !

**कृष्ण :** कर्णा, अरे मी मूळचाच नाटकी. पण माझ्या नाटकांत अर्थ असतो, अनर्थ नसतो. निष्कारण अनर्थ टाळण्यासाठीच मला अनेक नाटकं नटवावी लागतात.

**कर्ण :** आता कोणता अनर्थ टाळण्यासाठी हे वासुदेवभटजीचं नाटक केलंस ? अजुर्नाचा जीव बचावण्यासाठीच ना मला पहिला पाण्डव बनवण्याची धडपड ?

**कृष्ण :** अर्जुन माझा शिष्यच तेव्हा त्याच्यावर माझं प्रेम केव्हाहि असणारच. पण तू पडलास माझा मित्र. तुझ्यासारखा धनुर्धर तूच. दानशूर, सत्यनिष्ठ आणि स्पष्टवक्ता या सद्‌गुणानी आधीच तू साऱ्या जगाच्या प्रेमाचं आणि आदराचं केंद्र होऊन राहिला आहेस. तेव्हा मला तुझ्याबद्दल साहजिकच विशेष प्रेमादर वाटतो. भीष्मद्रोणांची आम्ही कधीच पर्वा पाळगली नाही. कारण त्यांची भूमिका " मोले घातले रडाया ! नाही आसू आणि माया " अशी होती. पण तुझी भूमिका सत्याच्या कडकडीत निष्ठेची असल्यामुळं, तुझ्यासारख्या कर्तव्यदक्ष महारथीच्या हातून सत्याचा यत्किंचितहि लोप होऊ नये, ही माझी विवंचनाच मला इथं घेऊन आली आहे कर्णा.

**कर्ण :** अर्जुनवधाच्या प्रतिज्ञेनं सत्याचा लोप कसा काय होतो कृष्णा ? धर्मयुद्धाच्या कडक शिस्तीनं पाण्डव माझ्याशी सामना देतील, तर अर्जुनाचीच गोष्ट कशाला, तुझ्यासकट सर्व पाण्डवाना उद्याच्या उद्या धारातीर्थी मोक्षाची वाट दाखवीन.

**कृष्ण :** ही आमची बालंबाल खात्री आहे कर्णा.

**कर्ण :** पण तू पडलास ना जातीचा दगलबाज मुत्सद्दी ! तुझ्या पाताळ यंत्रापुढं मात्र माझ्यासारख्या सरळ न साध्या शिपायीगड्याची मात्रा चालणार नाही. पण त्याच वेळी हेहि लक्षांत ठेव की, कर्णाच्या शरवृष्टीनं नामोहरम होण्याची वेळ आल्यावर, शेवटचा ठराविक तोडगा म्हणून, पाण्डवानी कपटनीतीचा अवलंब केला, तरी आम्ही कौरव, विशेषतः हा राधापुत्र कर्ण, प्राणान्तीहि शठेप्रति शाठ्यम्‌ची कास धरणार नाही, ही मात्र खात्री असूं दे. अधर्मयुद्धानं मिळणारा जय पाण्डवानाच लखलाभ असो. आता तर नाही ना सत्यलोपाची तुला धास्ती ?

**कृष्ण :** कर्णार्जुन–युद्ध हीच मुळी आधी सत्यची मोठी हानी होत आहे. कर्णा, खरोखरच तू कुन्तीपुत्र ज्येष्ठ पाणडव आहेत, हे गुह्य वेळीच प्रगट करून, तुझ्यासारख्या नीतिमंताच्या हातून नेणतेपणानं होणारी भ्रातृहत्या वाचविण्याची मी धडपड करीत आहे. यात राजकारण नाही, मुत्सद्देगिरीचा डाव नाही, काही नाही. सरळ मनाची सरळ विवंचना आहे. तू कुन्तीचा कानीन पुत्र आहेस. विवाहापूर्वी कुमारीदशेतच प्रत्यक्ष सुर्यापासून तिला तुझा गर्भसम्भव झाला—

**कर्ण :** आकाशातल्या चन्द्र सूर्यादि ग्रहांकडून पृथ्वीवर मानवी प्रजोत्पादन होऊ शकते, ही कल्पना कवीच्या काव्यातच छान शोभून दिसेल.

**कृष्ण :** पुढं तुझा जन्म होताच, सूर्याच्या सांगण्यावरून, तिनं तुझा गंगेच्या जलांत त्याग केला.

**कर्ण :** सूर्याच्या सांगण्यावरून, का लोकमताला भिऊन ?

**कृष्ण :** त्याग केला, ही गोष्ट खरी.

**कर्ण :** झालं तर मग. मी उपजताच कुन्तीनं माझा असा निर्दय त्याग केल्यानं मी तिला मेलो न् ती मला मेली. मी परक्यांचा झालो. हे टाकलेलं पोर परक्यांचं झालं. कुन्तीला मातृप्रेमाचा आणि तुम्हा यादव पाण्डवाना बंधु-प्रेमाचा आत्ताच एवढा उमाळा येण्याचं काय रे कारण ? कृष्णा, मला असल्या नाटकी प्रेमाची फार चीड आहे. उघड्या माथ्याच्या शत्रूपेक्षां तुमच्या सारखे असले नाटकी आप्तमित्रच फार घातकी.

**कृष्ण :** पण कर्णा, सुन्दर फुललेला गुलाब तेरड्याच्या ताटव्यांत डुलताना रसिकाना पाहवत नाही. कौरवांचा सेनापती होऊन, एकाच आईच्या उदरातून आलेल्या भावण्डांची कत्तल करण्याचं महत्पातक जोडण्यापेक्षा, आत्ता तू माझ्या बरोबर चल, पहिला पाण्डव म्हणून आम्ही सर्व तुलाच आमचा चक्रवर्ति करतो. धर्मादि पाच पाण्डव आणि त्यांच्या बाजूचे सर्व राजे महाराजे तुझे पाय धरतील ; आणि एक नाजूकच गोष्ट सांगायची, तर तू सहावा ज्येष्ठ पाण्डव, म्हणून द्रौपदीसारखी त्रिभुवन सुन्दरी हिशोबाप्रमाणं वर्षातून दोन महिने तुझ्या वाट्याला येईल.

**कर्ण :** कृष्णा, ही बायकांची मोहिनी तुलाच छान शोभते. असल्या मोहाला भाळणारा हा कर्ण नव्हे. जन्माच्या अपघातामुळं कुन्ति माझी जननी, आणि म्हणून मी पाण्डव, हे कितीहि खरं असलं, तरी त्या जन्माच्या आईपेक्षा, माझ्या कर्माच आई राधा माउली, हीच माझ्या जीवनाचं निधान होऊन राहिली आहे, त्याची वाट काय ? मुलाला केवळ प्रसवली, एवढ्याच सबबीवर कोणत्याहि स्त्रीला मातेचे अधिकार प्राप्त होत नसतात. त्यासाठी मातेचं कर्तव्य चोख बजावावं लागतं. कुन्तीनं ते बजावलं का ? उलट या मांसाच्या गोळ्याचा तात्काळ नाश करण्याच्या हेतूनं, केरकचऱ्या प्रमाणं, किंवा अधिकच स्पष्ट बोलायचं तर, विष्टेच्या गोळ्या प्रमाणं, बिनदिक्कत तो नदीत फेकून दिला. माझं नशीब आणि सूतकुलाचं भाग्य, म्हणून तो मांसाचा गोळा नदीतून वाहात जात असता, अधिरथाच्या नजरेला पडला. भूतदयेनं उचलून त्या साधु पुरुषांनं तो घरी आणला, आणि आपल्या साध्वी पत्नीच्या-राधेच्या-ओटीत घातला. राधा अप्रसूता होती. तरी मातृत्वात्सल्याच्या प्रेमोद्रेकानं-कृष्ण-त्या सच्छील मावलीला चट्‌दिशी पान्हा फुटला आणि तिनं तट्‌दिशी त्याला उराशी लावलं. मातृहृदयाचं ते अमृतपान, आऽहाऽ

कृष्णा, मरेपर्यंत माझ्या डोळ्यांत अश्रूंच्या हिरकण्या या अशा चमकावीत राहील ! अरे, कुठं माझ्या राधा मावलीचं ते निर्व्याज प्रेम, आणि कुठं त्या पाषाणहृदयी कुन्तीनं केलेलं पोटच्या गोळ्याचं बलिदान ! कृष्णा, राधामातेनं आणि अधिरथ पित्यानं कसलीहि खन्ति न बाळगतां माझं मलमूत्र रे काढलं. बालपणाचे अनेक हट्ट नि लाड पुरवले, जातकर्म-संस्कारानी दगडाचा देव केला आणि या पदवीला आणून ठेवला. त्यांच्या निर्व्याज प्रेमाशी मी दगलबाजी करूं ? घातक कुन्तीचा पाण्डव बनून, या माझ्या साधू मातापित्याचा पिण्डलोप करू ? नाही नाही. कर्णाच्या हातून हे दुष्कर्म घडणार नाही, आता कोणी मला कसलीहि जबरदस्ती भीति, घातली, शाप दिले किंवा पृथ्वीदानाची लालूच दाखविली, तरी या प्रेमबन्धनाला एक जन्म तरी मला खोटं पाडता येणं शक्य नाही.

**कृष्णा :** आहाहा कर्णा, तुझ्या उदार दिल्दार स्वभावावरून जीव ओवाळून टाकावा असं वाटतं, महायुद्धाच्या श्रीगणेशालाच गर्भगळीत न् हतबुद्ध झालेल्या अर्जुनाला गीतोपदेशाचा हेमगर्भ देऊन, मला संगरप्रवण करावा लागला. पण तू तर स्वयंभू ज्ञानी. शस्त्रास्त्रसम्पन्न धनुर्धर. विवेक तुझ्यापासूनच शिकावा अति तेजाळ सत्यनिष्ठेचे धडे तुझ्याच कित्त्यावरून गिरवावे. कुन्तीच्या बालबुद्धीने तुझा त्याग न होता, पहिला पाण्डव म्हणून, तू पाण्डवांतच वाढला असतास, तर कौरव पाण्डवांच्या इतिहासाला काही निराळंच वळण लागून या भारतखंण्डाच्या भाग्यानं हिमालयाला ठेंगणं केलं असतं. पण घडली चूक सुधारता येत नाही, असं थोडंच आहे ? आईची चूक पुत्रानं सुधारण्यातच, कर्णा, तुझ्या कीर्तिदुदुंभी त्रैलोक्यांत दुमदुमणार आहे.

**कर्ण :** कृष्णा, तुझ्यासारखा त्रिकाळज्ञाता पुरुषोत्तम आज दुसरा कोण आहे ? चुकीची दुरूस्ती व्हायला काळाचाहि काही विवेक पाहिला पाहिजे का नको ?

**कृष्णा :** माझ्यावर तुझा विश्वास आहे ना ?

**कर्ण :** फक्त स्वतःच्या विवेकबुद्धीवरच कर्ण नेहमी विश्वास ठेवतो.

**कृष्णा :** काही हरकत नाही. तुझ्या विवेकालाच विचार, तो खात्रीनं असं उत्तर देईल, कीं चुकीची दुरूस्ती करण्याची हीच वेळ आहे, हीच वेळ आहे, हीच वेळ आहे. तू पाण्डव आहेस, म्हणूनच पाण्डवाना धन्य करण्यासाठी माझा हात धरून, जननी कुन्तीच्या दर्शनाला तू आलं पाहिजेस. हाच तुझा धर्म आणि हीच तुझी सत्यनिष्ठा.

**कर्ण :** पुरुषोत्तमा, काय म्हणतोस हे ?

**कृष्णा :** वाजवी तेच म्हणतो. मित्रा कर्णा, कौटुंबिक समाजकारणाइतकं कौरवनिष्ठेच्या राजकारणाला महत्त्व देण्यात अर्थ नाही.

**कर्ण :** कृष्णा, हा तुझा बुद्धिवाद कुणी ऐकला, तर गीतेसारखं सनातन उपनिषत्सार जगाला देणारा श्रीकृष्ण तो तुच काय, अशी शंका घेतील रे. कर्तव्य कोणतं न् अकर्तव्य

कोणतं याची विविकशुद्ध प्रचिती अर्जुनाला पटवून देणारा श्रीकृष्ण या कर्णासमोर येताच, अर्जुनासारखाच हतबुद्ध व्हावा ? सारसार विचारांत सुद्धा त्याचा विवेक बुळाबावळा बनावा ? मोठं आश्चर्य आहे ! कृष्णा, तुझ्यासारख्या योगेश्वराला उपदेश करण्याची या कर्णाची पात्रता नाही. पण केवळ पाण्डव-पक्षपाताच्या आणि कौरव-घाताच्या लौकिकी मोहानं, तू माझा बुद्धीभेद करू पाहात असशील तर इतकंच तुला स्पष्ट सांगतो, की कर्णाला कर्तव्यच्युत करण्याचा अच्युताचा प्रयत्न फुकट आहे. कृष्णा, समाजकारण आणि राजकारण या एकाच मोहरेच्या दोन बाजू आहेत. त्यांना निराळं लेखताच यायचं नाही. मातृपितृद्रोहाची शिकवण फसल्यावर, आता तू मला राजद्रोहाचा मोह घालू पहातोस काय ?

**कृष्ण :** तुझ्या एकट्याच्या राजद्रोहानं कोट्यावधि भारतीय क्षत्रियांचा संहार थांबत असेल——

**कर्ण :** तरीहि मी राजद्रोह करणार नाही. कृष्णा, कौरवेश्वर दुर्योधनानं या कर्णाला आश्रय दिला नसता, तर तुम्ही यादव पाण्डवानी मला न् माझ्या सूतकुलाला पशुवृत्ती-पेक्षा फारसं वर डोकंच काढू दिलं नसतं. दुर्योधनाच्या पक्षाला मी निष्ठेनं चिकटून राहिलो, म्हणूनच पाण्डव—निःपाताच्या संगर यज्ञाला त्यानं हिमतीनं हात घातला. कौरव पक्षाकडून सव्यसाची अर्जुनाशी द्वैरथ युद्धात भिडण्यासाठी प्रथमपासूनच त्यानं माझी योजना करून ठेवली आहे. युद्धाच्या ऐन भरात कौरव—विश्वासाचा सेनानी—किरीट माझ्या मस्तकावर चढला असता, अचानक पाण्डवाना सामील होऊन, कौरवेश्वराच्या राजद्रोहाची मसलत स्वीकारण्याइतकं या कर्णाचं बीज न् ब्रीद खास हिणकस नाही.

**कृष्ण :** माझी जिव्हाळ्याची मसलत तू झुगारून देत आहेस, तेव्हा भावी विनाशकाळ कुणाला टाळता येत नाही, हेच खरं !

**कर्ण :** कृष्णा, तुला हे सगळं समजत आहे, तर मला भूल घालण्याची एवढी खटपट कशाला केलीस ? भारतीय क्षत्रियसंहाराला आम्ही कौरव कारण आहोत, हा आक्षेप एकतर्फी पक्षपाताचा आहे. न्यायान्यायाची चिकित्सा भविष्यकाळ करील. त्याचा वाद आत्ताच कशाला ? सध्या मात्र लोकांना अपयशाचं खापर फोडायला आम्ही एक जागा झालो आहोत, इतकंच. विनाशकाळाच्या वावटळीत क्षत्रिय संहार झाला, आणि त्यात सारे कौरव मरून, पाण्डव जगले, तरिही त्यात वाईट काय ? क्षत्रियांचा मोक्ष धारातीर्थी मरणांतच असतो. केवळ मरणाच्या भयानं मी कर्तव्यच्युत होईन, ही कल्पनाच मुळी अस्थानी आहे. बोलून चालून मी शिपाई गडी ! मला मरणाची काय पर्वा ? जगावं सुखांत जगावं, म्हणूनच शिपाई गडी मरणाला मिठी मारतो. तेच त्याचं व्रत, तोच त्याचा धर्म नि तोच त्याचा मोक्ष.

**कृष्ण :** कर्णा, तू आपल्या सात्त्विक तेजानं या कृष्णाला अगदी दिङ्मूढ केलंस.

**कर्ण :** पुरुषोत्तमा, दिङ्मूढ होऊ नकोस. तूंच दिङ्मूढ झालास तर या महायुद्धाचं सारं चैतन्यच नष्ट होणार ! पाया पडतो, कृष्णा, असं करू नकोस. तू पाण्डव-पक्षाचा प्राण आणि अर्जुनाच्या पराक्रमाचा दिव्यात्मा. त्याला नीट धीर देऊन, त्याच्या वीरश्रीला उत्साहाच्या चैतन्यानं थरारवून सोड. प्रणीपातपूर्वक त्या धनंजयाला माझा निरोप सांग, की उद्या तुझ्या शक्तियुक्तीची कमाल करून, शुद्ध धर्मयुद्धानं या कर्णाशी चांगला ठाकठिकीचा सामना दे.—

**मी जिष्णुतें न वधितां उद्या न मागें फिरेन ही वाचा ।**
**साची असो असावा निश्चयचि तुझा मनुष्य—देवाचा ।।**

—कर्णार्जुन–युद्ध हा भारतीय इतिहासात न भूतो न भविष्यति असा क्षात्रकर्माचा पहिला आणि अखेरचाच सामना होणार असल्यामुळं, अर्जुनाला सांग, द्वैरथ युद्धांत स्थितप्रज्ञ बुद्धीनं या कर्णाला तूं सामोरा ये.

**यदुकुलनाथा कृष्णा पार्थाशी संगरांगणामाजी ।**
**घालीन गाठि त्यातें मी कीं मारील तो मला आजी ।।**

—श्रीकृष्णा, धारातीर्थात मानवी जीवनाचं सोनं करायला निघालेल्या या शिपायी गड्याला एकदा कडकडून जिव्हाळ्याची शेवटची भेट दे.

**कृष्णा :** कर्णा—(मिठी मारतो.)

**कर्ण :** कृष्णा—

**कृष्णा :** आता पुढची भेट ?

**कर्ण :** स्वर्गलोकात !

**पहिला अंक समाप्त.**

## अंक २ रा] [प्रवेश १ ला

( हिरडा व आवळकटी बोलत येतात. )

**हिरडा :** हे पहा आवळकटी, संगीतशास्त्रासारखं नियमबद्ध शास्त्र दुसरं नाहीच. बापाला बाप न मानणाऱ्या राजकारणालासुद्धा वारांगनेची उपमा देतात. कारण, एकदा त्याला रंगढंग-बदलाची हुक्की आली, का सरडासुद्धा शरमेनं कुम्पणाची मजल गाठतो. पण गायनशास्त्रासारखं प्रेमळ शास्त्र, आहा ! काय त्याची तारीफ करावी !——त्याचं तेच. म्हणून वारांगनाचशा काय, मोठमोठ्या संभावीत धरांगनासुद्धा गवयाचं अंगवस्त्र बनण्याची धडपड करतात.

**बेहडा :** ( प्र. क. ) माहीत आहे, गायनशास्त्राची मिजास ! संगीताच्या तानदारीत पागल गवयी सुरावटीला धाब्यावर बसवतात. पण तालदार मृदंग्या " किडान् किडतक कटितक गदिगन धा " च्या एकाच चकरभेण्ड चफराकीत त्या धाब्याचे धाबे दणाणून सोडतो. गवयी बकाल न् बेताल बनला तरी समेच्या अवसानासाठी काळ कोपला तरी मृदंग्या कालात लय घेणार नाही. धुमकिट किटतक ताकिट धाकट——

**हिरडा :** हलकट छाकट, बस कर कटकट. असल्या आडदाण्ड धसळा मुसळीनं प्रेमाची धुसळणी साधत नसते, समजलास !

**बेहडा :** ॲ हॅ ! नाहीतर नादिर्दिर्दिर तुन्दिर्दिर्दिर, उंदीर धर्धर्, मांजर धर्धर करून आवळकटीच्या प्रेमाच्या धुसळणीचं लोणी मटकवणार वाटतं !

**हिरडा :** अरे शहाण्या, प्रेमाचा मामला सोमलासारखा हळुहळू पचनी पाडावा लागतो. आवळकटी, तुझ्या प्रेमासाठी सांगशील तेवढी नाजूक रागदारीची कसरत करायला या हिरड्याचं नरडं तयार आहे. [तान मारतो.]

**बेहडा :** कशाला मारतोस लेका माझ्या मुरदंगी थापेपुढे तुझ्या नरड्याची बढाई !

**आवळ० :** बन्द करा ही थोबाड-पंचविशीची लढाई. एकाशी लग्न न् दुसऱ्याशी प्रेम करण्यापूर्वी मला तुमची जात समजली पाहिजे.

**हिरडा :** जात ? ही कसली नवी अडचण बुवा ? प्रेमाच्या बाजारात सुद्धा जातीची धासाधीस आहेच का !

**आवळ० :** मला प्रत्येकाची जात चांगली कसाला लावायची आहे. नवऱ्यावरून बायकोची जात उच्चनीच ठरत असते. मला उच्च जातवाल्याची बायको व्हायचं आहे.

**बेहडा :** (स्व.) जातीचा कस आणि कसाची जात, यात होणार अखेर माझा घात.

**आवळ०** : बोल हिरड्या, तुझी जात कोणती?

**हिरडा** : माझी ? माझी जात——माणूस.

**आवळकटी** : आणि तुझी रे बेहड्या ?

**बेहडा** : माझी ? माझी आवळकटी——नाही नाही, माझी जात नाही का ? माझी जात—पुरुष.

**आवळ०** : पुरुष ही काय जात आहे ?

**बेहडा** : आणि माणूस ही काय जात आहे ?

**हिरडा** : माणूस पुरुष नसतो की काय ?

**आवळ०** : आणि स्त्री ही माणूस नसते की काय ?

**बेहडा** : मग आपण तिघेही जण माणूस जातीची माणसंच आहोत.

**हिरडा** : पण हे सिद्ध झालं पाहिजे, कसाला लागलं पाहिजे.

**बेहडा** : हिरडा माणूस असेल, पण पुरुष आहे याला पुरावा काय ?

**हिरडा** : आणि तू पुरुष असलास तरी माणूस आहेस याला पुरावा काय ? मी माझा पुरुषपणा कोणालाही रोखठोक पटवून देईन. पण लेका, तुझी माणुसकी पटवायला लग्नाच्या बायकोची सुद्धा छाती धजणार नाही.

**आवळ०** : पुरुष हा माणूस असतो आणि माणसांतही बायकाप्रमाणं पुरुष असतात. मग त्यांची जात कोणती ?

**हिरडा** : बायकाप्रमाणं असणाऱ्या पुरुषांनी " शिखण्डी " अशी जात सांगावी.

**बेहडा** : आणि पुरुषी थाटाच्या बायकांनी " बृहन्नडा " जात पैदा करून अर्जुनाच्या अज्ञातवासाचं सार्वजनिक स्मारक करावं.

**हिरडा** : आपल्या देशात ब्राम्हणक्षत्रियादि जातींचा सुळसुळाट ढेकणा-चिलटा इतका आहे. पण कसोटीच्या मुशीत कोणालाहि टाका, फड्या निवडुंगाच्या बोण्डाशिवाय दुसरं काही हाताला लागणार नाही.

**आवळ०** : धन्द्यावरून जात, का जातीवरून धन्दा ?

**हिरडा** : कुठं लागला आहे याचा नीटसा निकाल अजून ? जातीवरून धन्दा ठरवू म्हटलं, तर ब्राम्हण द्रोणाचार्यांनी क्षत्रियाचे धनुष्यबाण हाती घेतल्याबद्दल त्यांना शिरच्छेदाचीच शिक्षा ठोठवावी लागेल.

**आवळ०** : द्रोणाचार्यांचा अखेर शिरच्छेदच झाला.

**हिरडा** : आणि अश्वत्थाम्याला अश्वत्थ वृक्षाला धनुष्याच्या दोरीनं आवळून बांधून, हत्तीच्या ऐवजी अश्वांच्या टापांखाली तुडवला पाहिजे.

**बेहडा :** काल संध्याकाळी अश्वत्थाम्यानं जानवं तोडून म्हणे आपली जात टाकली ?

**हिरडा :** कात टाकली म्हणून सापाला कुणी बाप म्हणत नाही.

**आवळा० :** जानव्याबरोबर त्यानं धनुष्यबाणहि फेकून दिलेले मी पाहिले.

**बेहडा :** म्हणजे, अश्वत्थामा आता ब्राम्हणहि नाही आणि क्षत्रियहि पण नाही.

**आवळा० :** त्यानी आता जर हातात तागडी धरली, तर त्याला वैश्य म्हणायला काय हरकत ?

**हिरडा :** धन्द्यावरून जात ठरवायची, तरी सगळा पातळ झुणकाच.

**बेहडा :** आवळकटी, ही जातीची माती कुटण्याचं काम बेकार कुम्भार सुद्धा पत्करणार नाही. विनाकारण तू या फन्दात पडलीस नि आम्हाला पाडलंस. कपाळावरच्या जातीच्या चिठ्या पाहाण्यापेक्षा, चिट्या टाकून तू आमची निवड करशील, तर त्याला मी आपली एकताली सम द्यायला एका पायावर उभा आहे.

**हिरडा :** बेहडाच्या सभेला मी यमनकल्याणी टेकू देतो.

**आवळा० :** लग्नाचा जुगार खेळण्यापेक्षा धडधडीत जुगाऱ्याशी लग्न लावलेलं काय वाईट ? डोळे उघडे ठेवून प्राण सोडलेला बरा, पण डोळे मिटून लावलेलं लग्न कोणत्याहि तरुणीला सुखाचं होत नाही.

**हिरडा :** पण त्यासाठी जातीची माती कशाला चिवडली पाहिजे ? जाती-जातीतल्या लग्नाचं आपोआप पोटपाणी पिकतं, आणि बाकीच्या लग्नात, खटपट करून सुद्धा वठून जातं, असं थोडंच आहे ! प्रयत्ने वाळूचे कण रगडितां—काय होतं तुला माहीत आहे ! सुज्ञास अधिक सांगणं नलगे. कळावे लोभ असावा हे विनन्ति.

**आवळा० :** गुणकर्माची सुद्धा चौकशी नको ? कर्ण महाराजांचा तर गुणकर्मावर मोठा कटाक्ष ?

**बेहडा :** ते सुद्धा बिनफोडणीचं आम्बट वरणच आहे. गुणकर्माची टिमकी पुष्कळ पिटतात. पण व्यवहारात तिची किंमत फुटकी कवडी ! आजच्या घडीला विदुराइतका साधु पुरूष न् ज्ञानी पंडित उभ्या भरतखण्डात दुसरा कोण आहे ? मोठमोठे ऋषी त्याला मान देतात आणि धर्म विचारतात. पण त्याला कोणी ब्राह्मण म्हणत नाही. तो म्हणे शूद्र ! बिचारा शूद्राचंहि कर्म करीत नाही. पण त्याचा जन्म आडवा आला ना ?

**आवळा० :** जन्म आडवा आला ? जन्मावरून सुद्धा जात ठरत नाही ?

**हिरडा :** तिथं सुद्धा फड्या निवडुंगाची कुंपण आहेच. बेटा, आडवा जन्माला आला असता तरी पत्करता, पण लेकाचा जन्म आडवा आला ना ! खरं पाहिलं तर धृतराष्ट्र पण्डू आणि विदूर यांचा बाप एकच.

**आवळ०** : तो कोण ?

**हिरडा** : भारतीय सुप्रजाजनन-शास्त्राचे आद्य उत्पादक महर्षि व्यास. धर्मशास्त्र म्हणते, बापावरून अपत्याची जात ठरवावी. पण इथं पाहावं तर सगळा प्रकार निराळा ! धृतराष्ट्र आणि पण्डू हे दोघे म्हणे क्षत्रिय आणि विदूर तेवढा शूद्र !

**आवळ०** : जुलूमच आहे म्हणायचा हा !

**बेहडा** : जात हाच मुळी मोठा जुलूम आहे. जातीचा जुलूम नि जुलमाची जात, भरतखण्डाशिवाय जगाच्या पाठीवर दुसरीकडे नाही आढळणार.

**हिरडा** : पण सारा जुलूम मोठ्या लोकांपेक्षा खालच्या लोकांवरच जास्त होतो. जातीच्या उच्चनीचपणाची कसोटी सारी गोरगरीबांसाठी. एवढे मोठ्ठे भीष्माचार्य, द्रोणाचार्य, कृपाचार्य ! त्यांच्या तोण्डाकडे पाहण्याची पंचाईत, मग तोण्डाला तोण्ड देण्याची गोष्ट कशाला ? पण त्यांच्या जन्माच्या भानगडी साऱ्या फड्यानिवडुंगी.

**आवळ०** : म्हणजे ? आईची भानगड, का बापाची भानगड ?

**हिरडा** : सगळीच भानगड ! आईबापाच्या विवाह संस्काराशिवाय अपत्यांची बीजक्षेत्रशुद्धी समाजात कोणी मानीत नाही. पण इथं तर एकाच्याहि आईचा न् बापाचा पत्ता नाही, तर कसला विवाह न् कसला संस्कार !

**बेहडा** : तशात स्वर्गपृथ्वीवर येरझारा घालणाऱ्या देवांगना आणि अप्सरा यानी तर अगदी भंडावून सोडलं आहे. जरा कुठं कोणी डोळे मिटून गोमुखीत हात घातला रे घातला की चिकटल्याच या त्यांच्या पाठीला नाहीतर पोटाला ?

**हिरडा** : राण्डेच्या पृथ्वीवर पोरं टाकतात आणि स्वर्गाला पळतात !

**बेहडा** : झुम्बरीच्याना प्रेमाचा वेताळ चाळा, पण पोरांची बाळन्तपणं निस्तरायचा कण्टाळा ! यानी पोरं टाकावी नि पशु पक्ष्यानी त्यांची बाळन्तपणं न् बारशी करावी. विश्वमित्र मेनकेच्या पोरीचं शकुन्त पक्ष्यानी नाळवार करून, शेवपवणी पाजलं आणि बारशाला तिचं नांव शकुन्तला ठेवलं.

**आवळ०** : माणसापेक्षा आपल्या देशातले पशुपक्षी सुईण कामात चांगले प्रविण दिसतात.

**हिरडा** : टाकलेल्या पोरांचं नाळवार कोणीतरी करतोच ! आई पळाली स्वर्गाला, बाप गेला तपाला आणि पोरगी चिकटली कण्वाच्या झोळीला.

**बेहडा** : अमृत पिणाऱ्या देवाना बगल मारून, सोमरस ढोसणाऱ्या माणसांची या अप्सराना काय चटक लागली असेल ती असो. राण्डेच्या वाटेल त्याला आधी चटक लावतात आणि लव्हाळं भर रंगात आलं का चटकन् चटका लावून झटकन फरारी होतात !

**हिरडा :** पोर तेवढं फायद्यात !

**आवळ० :** या पेक्षा त्या मेल्या अप्सरा देवांगना एकाच यजमानाला चिकटून कां राहात नाहीत ?

**बेहडा :** याचा खुलासा काढायला इथं मरून स्वर्गात इंद्राची गाठ घेतली पाहिजे. पुरूषांची मनधरणी कितीही सरस असली, तरी या चंचल चिचुंद्र्या त्यांचा नेहमीच विरस करतात.

**आवळ० :** यात त्या देवांगनापेक्षा तुम्हा पुरूषांचाच गाढवपणा नाही का दिसून येत ?

**बेहडा :** तो कसा काय ? आम्हा गाढवांची लाळघोटणी करायला येतात कशाला या गाढविणी ?

**आवळ० :** लग्नाच्या गाठीत चांगल्या कचकचीत आवळल्याशिवाय, कशाला करता तुम्ही त्यांची प्रेमचाटणी ?

**हिरडा :** धडधडीत लग्नं लावली, तरी या अप्सरांचा चौण्ढाळपणा कुठं जातो ? मागं कोण एक गंगाभागीरथी आली. तिनं शन्तनू राजाशी लग्न लावलं. कोणी झाला तरी वंशवेलाच्या विस्तारासाठीच लग्नाच्या फन्दात पडतो.

**बेहडा :** नुसता हळदीचाच सोहळा उरकायचा, तर सोमरसाच्या चार पात्रांत कुठंहि भरगच्च उरकता येईल.

**हिरडा :** त्या बाईनं होईल ते पोर नदीत बुडवण्याचा सारखा सपाटा चालवला. झालं पोर का टाक नदीत, झालं पोर का टाक नदीत.

**आवळ० :** उघड नवऱ्याच्या उघड बायकोला अशीं पोरं मारण्याचं कारण काय ?

**बेहडा :** लहरी बायकांची लहर. दुसरं काय ?

**हिरडा :** बिचारा शन्तनू अगदी काकावून गेला. प्रामाणिक मेहनत अशी पाण्यात जाऊ लागली, तर कोणाला रडू कोसळणार नाही ? त्या महामायेनं एकामागून एक सात पोरांचा असा निकाल लावल्यावर, शन्तनू अगदी ढोपरफुटीवर आला आणि आठवं पोर ती गंगाबाई नदीवर घेऊन जात असता, त्यानं तिचा हात धरला आणि शिव्यागाळी हिसकाहिसक करून ते पोर वाचवलं. ते हे आमचे शरतल्पी पडलेले भीष्माचार्य ! शन्तनूनं हात धरून पोर वाचवलं, पण ती गंगाभागिरथी त्याच्या हातावर तुरी देऊन जी निसटली, ती आजपर्यंत बेपत्ता !

**बेहडा :** बायकांची जातच पळपुटी.

**आवळ० :** बेहड्या, बघ तू आमच्या जातीवर घसरलास.

**बेहडा :** मी पुरुष आहे नि पुरुषांच्या पराक्रमाला सध्या एवढाच राजमार्ग खुला आहे.

**आवळ० :** मेल्या पुरुषाना बायकांचा इतका तिटकारा वाटतो तर ते बायकांसाठी एवढे कां जीव टाकतात ?

**हिरडा :** जीव नकोसा झाला म्हणजे कुठंतरी टाकायचा, तो बायकासाठी देतात. यापेक्षा विशेष गाढवपणा काही नाही. बायकांमुळेच पुरूष गाढव बनतात.

**आवळ० :** दोन नमुने माझ्यापुढं आहेतच.

**बेहडा :** बायकांच्या पोटी बायका, आणि पुरूषांच्या पोटी पुरुष जन्माला येऊ लागले, तर पुरुषी पुरुष बायकी बायकांचं तोंडसुद्धा पाहाणार नाहीत. सध्या बायकां प्रमाणं पुरूषसुद्धा बायकांच्याच पोटी जन्मत असल्यामुळं, खाण तशी माती नियमानं, त्यांचा ओढा बायकांकडं लागतो. बायकोच्यापोटी जन्मण्यापेक्षा, फड्यानिवडुंगाच्या झुडपात, केरकचऱ्याच्या उकिरड्यांत, किंवा नदीनाल्यांच्या खबदाडात जन्म झालेला परवडला !

**आवळ० :** त्यासाठी सुद्धा पुरूषाना बायकांचीच पायधरणी करावी लागते. पुरूष स्वतःला कितीहि मोठे समजत असले, तरी बायकांच्या मध्यस्थीशिवाय त्याना जन्मताच यायचं नाही.

**बेहडा :** बायकांच्या ऐवजीं पुरूषांच्या पोटी पुरुष जन्माला येते, तर सध्या पुरुषात जो थोडासा बायलेपणा दिसून येतो, तो खास दिसला नसता. पुरूषांत बायकीपणा घुसल्यामुळंच, बायकांच्या लाथा शिव्या खाण्यात त्याना धन्यता वाटते. त्यानी त्याना गाढव म्हटले तरी या गाढवाना त्याचं काही वाटत नाही. त्या पेक्षा मरण पत्करलं !

**आवळ० :** मरणासाठी पुरूष स्वतंत्र असले, तरी जन्मासाठी त्याना बायकांचीच कास धरावी लागते.

**हिरडा :** लागतेच असा काही नियम नाही. आई बापांच्या भेटीशिवाय जन्माला आलेली कन्यापुत्ररत्ने सध्या किती तरी आहेत.

**आवळ० :** काय ! स्त्री पुरूषांच्या भेटीशिवाय मुलं होतात ? नवलच मेलं !

**हिरडा :** स्त्री पुरूषांच्या भेटचशी काय, पण कित्येक मोठमोठ्या पुरुषाना नऊ महिन्याची बात तर सोडून द्या,—नऊ क्षणसुद्धा आईच्या उदराचा स्पर्श झालेला नाही. आई आणि बाप नुसते नेत्रकटाक्षापुरते जबाबदार. आपल्या द्रोणाचार्यांची उत्पत्ति अशीच चमत्कारीक आहे.

**बेहडा :** हा बेटा द्रोणाचार्य आईच्या ऐवजी बापाच्या पोटी जन्माला आला असावा, असं मला नेहमी वाटंत होतं.

**हिरडा :** छे छे ! आईला तर त्याच्या जन्माची काहीच दाद नाही, पण बापाला सुद्धा याच्या जन्माची काही कल्पना नव्हती.

**आवळ० :** द्रोणाचार्यांचा बाप कोण ?

**हिरडा :** भरद्वाज. मोठ्ठा तपोनिष्ठ कर्मठ ऋषी. दशेन्द्रियांचं दमन करून आत्म्याला ब्रम्हाण्डाच्या कपाटात अडकवून ठेवण्यात प्रवीण ! पण मानवी विकारांच्या झपाटणीपुढं करतो काय लण्डी ! त्यानं धृताची नांवाची तुझ्यासारखी एक आवळकटी अप्सरा नदीवर स्नानविहार करीत असतांना नुसती पाहिली. तिचं तर या गाढवाकडे मुळीं लक्षच नव्हतं. यानं तिला तशी पाहिली मात्र आणि हूं ! ––केली अर्ध्यप्रदानाला सुरवात. तपोनिष्ठ ऋषीचं अर्ध्यप्रदान ते ! फुकट गेलं असतं तर माणसांची गाढवं बनून शहरांचे उकिरडे झाले असते ! म्हणून त्या भरद्वाजानं आपल्या तपश्चर्येची ती फलश्रुति चटकन् द्रोणांत धरली आणि जेहत्ते काय सांगावी मात, कँ कँ करीत हे आचार्य जन्मले द्रोणांत.

**बेहडा :** आहे यात आईचा संबंध ? बापाचा तरी ? कशाचाच नाही, तर स्त्रीपुरूषांचा तरी कशाला ? बस् ! बस् ! जन्म व्हावा तर असा ना पुरूषाची खटपट, ना बायकांची लटपट. तरीच बेटा द्रोणाचार्य पुरूषासारखा जगला न् बाईसारखा मेला. ना जन्माची गडबड, ना मरणाची धडपड.

**हिरडा :** द्रोणांतून द्रोणाचार्य निपजल्यामुळं, पत्रावळीवर जेवताना माझ्या पोटांत धस्स होऊन, घास घशात घोटाळतो. कुणी सांगावं ? पत्रावळीच्या पानागणिक पोरटी होऊन पाठीशी लागली तर ती ब्याद पत्करायची कोणी ?

**बेहडा :** आम्ही माता, सृष्टीच्या खाणी, आमच्या शिवाय सृष्टि चालायची नाही, म्हणून या बायकाना केवढी घमेण्ड ! घ्या आता हा पुरावा. किटतक गदिगन किटतक गदिगन धा धा धा, जा मरा, आसावरीत जीव द्या. बायाशिवाय पोरं होऊं लागली. बाप सुद्धा नांवाला–निमित्ताला–कारण. द्रोणाचार्यांनी बायकांच्या आईपणाच्या गर्वाचा चांगला गर्भपात केला. जय द्रोणाचार्यकी जय ! ठार मेलास तरी जिते रहो पट्ठे !

**हिरडा :** हेचसं काय, पण स्त्री पुरूषांच्या नुसत्या नजरानजरी शिवाय हव्या त्या जड वस्तूतूनही माणसं आता पैदा होऊ लागली आहेत.

**आवळ० :** हव्या त्या वस्तूंतून ! दगड धोण्ड्यांतून ?

**हिरडा :** हो, हो, बाणातून, भात्यातून, कोयत्यातून––

**बेहडा :** पायातल्या पायतणातून, मसणातून सुद्धा.

**हिरडा :** कृपाचार्यांचा बाप एका बाणातून जन्मला, आणि त्याच्या पुण्याईपासून कृप आणि कृपी ही जुळी भावंडं बाणांच्या जुडग्यात निपजली.

**बेहडा :** पुरुष जातीचा जयजयकार ! पुरुषांचा विजय असो ! आवळकटी, पुरुषाना गाढवं म्हणतोस ? पाहून घे या गाढवांचा पराक्रम ! बाणांच्या जुडग्यात जुळ्या पोरांची पैदास ! आई बेपत्ता, बापाची अर्ध्यप्रदानापुरती सत्ता, आणि अखेर पोरांवर आल्यागेल्याची मत्ता. बायकांचा गर्व जिरला.

**हिरडा :** बाई बुवाशिवाय मुलं होण्याची साथ भरतखण्डांत बोकाळल्यामुळं सहज नुसतं शिकण्याचीहि पंचाईत झाली आहे. न जाणो शिंकेच्या झटक्या सरशी चारपाच कारटी फटकन् निपजायची. रस्त्यांनंसुद्धा सावधगिरीनं, डोळे मिटून, कान बांधून चालावं लागतं. फड्या निवडुंगाच्या झुडपांत, कोणाची कमायी कोणाच्या गळ्यांत पडायची, त्याचा नेम नाही.

**आवळ० :** आग लागो मेल्या जातीना ! जातींचा उच्चनीचपणा ही तरी मेली गुण्डांची गुण्डगिरीच म्हणायची !

**हिरडा :** अग, कौरव पाण्डवांची राजघराणी म्हणजे अनाथ बालकाश्रमांचे लोकमान्य राजमान्य नमुनेच आहेत. भारतीय जातींचा इतिहास म्हणजे छप्पन् मसाल्याचा चिवडा ! त्यांत सगळं आहे न् काहीच नाही. डोळे मिटून फक्की मारली तर रुचकर लागते. उघडे ठेवून चिकित्सा करा कीं सारे कुझक्या भुईमुगाचे खोमट दाणे ! फड्या निवडुंगाच्या बोण्डाशिवाय हाती काही लागायचं नाही. सगळ्यांनी आपली जात ' माणूस ' अशी सांगितली, तर काय आमच्या माणुसकीचे कोळसे होतील ?

**बेहडा :** त्यापेक्षा " पुरुष " अशी जात सांगण्यात माणूसकी दिसून येईल.

**आवळ० :** पण मेल्या, बायकांनी " पुरुष " म्हणून कशी आपली जात सांगावी ?

**बेहडा :** तर मग बायकांनी " बाई " जात सांगावी आणि पुरुषानी " बुवा " जात सांगावी. सध्याच्या चार जातींच्या चार कोट चिवड्यापेक्षा, बाई बुवांच्या या दोन ठळक जाती, गजकर्णाऐवजी नायटा म्हणून पत्करायला काही हरकत नाही.

**हिरडा :** मग उच्चनीचपणाची कोम्बडझुंज खेळायची कशी ! जातींची कोम्बडझुंज म्हणजे भरतखण्डाचा प्राण. प्राण गेला तर मढ्याला काय जाळायचे ?

**आवळ० :** नाही तर काय लोणी चोपडून त्याचं लोणचं घालायचं ? ज्याचा पराक्रम थोर, तोच माणूस थोर, अशी कसोटी ठरवायला काय हरकत आहे ? जातीनं थोर असलेल्या धेण्डापेक्षा, थोर असलेल्या गावगुण्डालाच मी प्रेमदान करीन.

**बेहडा :** माझ्या गावगुण्डीचा पराक्रम दाखवायला, ही पहा, माझी कंबर मी कसली.

**हिरडा :** मी पण आवळकटीसाठी माझी कटी आवळली.

**आवळ०** : कंबर बान्धण्यापेक्षां तुम्ही आपले डोळे रुमालाने घट्ट बान्धून घेतले पाहिजेत.

**हिरडा** : डोळे घट्ट बान्धून घेतले पाहिजेत ?

**बेहडा** : ते कशाला ? हा काय बुवा आंधळ्या कोशिम्बिरीचा खेळ ?

**आवळ०** : आंधळ्या प्रेमाची शिकार डोळे मिटून करावी लागते, समजलात ? तुम्ही दोघे दोन बाजूला–हां, असे चिकटून नाही–लांब दूर उभे रहा. मी अशी मधोमध उभी राहीन. मी इषारा देतांच प्रत्येकानं माझी प्रेमयाचना इतक्या उच्च अलंकारिक काव्यमय वाणीनं केली पाहिजे कीं, उपमा अलंकारासाठी भावी कवीनी रानोमाळ भीकच मागितली पाहिजे. प्रेमयाचनेच्या अवसानांत येता येता, बडे बापके बेटे नाटकी गोण्डस पोऱ्यावर जसे हुरळून पडतात, तसा जो कोणी आस्ते कदम मला नेमका स्पर्श करील, त्याला मिळेल माझ्या प्रेमाचा मान, उरल्या गाढवाची मी लग्नात अडकवीन मान. आहे कबूल ?

**दोघे** : कबूल, कबूल, कबूल.

**आवळ०** : चला मी आता तुमचे डोळे बांधते. (तसे करते) याला म्हणतात तेल्याच्या बैलाची अंधारी.

**बेहडा** : हिरड्या, संभाळ लेका. एका धाण्याभोवती दोन बैलांची भिंगरी.

**हिरडा** : बेहड्या, धुसळखांब संभाळ. नाहीतर व्हायची दोघांची चेंगराचेंगरी.

**आवळ०** : हां, असे नीट उभे रहा. हां, करा प्रेमयाचनेच्या पुराणाला सुरवात. [टाळी वाजवून] एक, दोन, तीन. [जाते.]

**हिरडा** : हे नादब्रह्म–सुन्दरी, तुझ्या जिवाच्या षड्जासाठी माझ्या पंचप्राणाचा पंचम पणाला लावून यमन कल्याणांत नरडे ताणायाला मी तयार आहे.

**बेहडा** : गुडुम कुडबुड् गुडूम गुडबुड् डमरूप्रमाणे आवळकटी असणाऱ्या झम्पक थै थै देवते, माझ्या मृदंग–जीवनाच्या नाड्या करकचून आवळणारी तू रंगीत खुण्टी आहेस.

**हिरडा** : हे सप्तस्वर–निनादिनी आसावरी, तुझ्या प्रेमाच्या कोमल स्वरांच्या पट्ट्या सतारीच्या पडद्यांसारख्या दिलपसंत दाबून तीव्र मध्यमावरच कोमल धैवताला मी उमटवीन.

[जटा दाढी मिशी इ. भटाचा वेष घेतलेली आवळकटी गुपचुप प्र. क.]

**बेहडा :** प्रेमाच्या रिंगणात बेताल बनणाऱ्या हे त्रिताल सुंदरी, तुझ्या प्रेमाच्या " किटतक गदिगन धा " साठी माझ्या मुरदंगी मुरडीचा घोडा, ध्रुपद अस्ताईच्या सुरफाक्ता मैदानावर चौताल सोडायला, हा झपताल्या बेहडा एकताल तयार आहे.

**हिरडा :** (स्व.) जवळ आलीशी वाटते. आता मारावीच मिठी.

**बेहडा :** (स्व.) आली वाटतं जवळ. हूं बेहड्या आवळ.

[ दोघेजण एकमेकांना ' आवळली रे आवळली ' म्हणून मिठी मारतात ]

**आवळ० :** (पुरुषी आवाजात) धिःकार धिःकार तुम्हा प्रेमवेड्यांना.

[त्यांच्या डोळ्यांचे रुमाल सोडते.]

**बेहडा :** अरेच्चा ! हिरडाच बेहड्याला चिकटला.

**हिरडा :** हा कोण पाण्ढरा बोकड मधि घुसला ?

**आवळ० :** व्यास महर्षींचा पट्टशिष्य.

**बेहडा :** आवळकटी कुठं गेली ?

**आवळ० :** अरे ती देवांगना, तिने नाकीं गमन केलें.

**हिरडा :** मधाशी नाकात काहीतरी वळवळलं खरं.

**आवळ० :** मूर्खा, नाकीं म्हणजे स्वर्गी. अहल्या, द्रौपदी, सीता, तारा, मन्दोदरी, या पाच महासतींच्या आळीला राहाणारी ती अप्सरा आवळकटी, तुम्हा मानवांच्या कारट्यांना तपश्चर्येशिवाय प्राप्त होणार नाही. मिटा डोळे. [दोघे डोळे मिटतात. आवळकटी पळून जाते.]

**बेहडा :** डोळे उघडू का बुवाजी ?

**हिरडा :** (डोळे उघडून) बुवाजी पण गुप्त ! बेहड्या, आवळकटीशिवाय हिरड्या बेहड्याची काय किंमत ?

**बेहडा :** भरतखण्डाला त्रिफळाचूर्णाचे भाग्य देण्यासाठी, तुला नि मला आता अरण्यवासच पत्करला पाहिजे.

**हिरडा :** चला. आले आवळकटीच्या मना, हिरड्या बेहड्याचे चालेना !

(दोघे जातात.)

□ □ □

अंक २ रा] [प्रवेश २ रा

**स्थळ—स्थिती व पात्रें :—** उगवत्या सूर्याला **कर्ण** अर्घ्य देत आहे. हातात पंचारति व पुष्पहार घेऊन **आवळकटी** समोर उभी आहे. कर्णाच्या पाठीमागे **कुन्ति** दूर येऊन उभी राहते. पण तिच्याकडे कर्णाचे किंवा आवळकटीचे लक्ष नसते.]

**कर्ण :** आहा ! सूर्योपासना होताच समोर पंचारति ! मंगल दिव्य तेजा, तुला प्रणाम असो.

**आवळ० :** वसुन्धरा राणीसाहेबांनी महाराजाना हा शकुनाचा पुष्पहार न् पंचारति पाठवली आहे.

**कर्ण :** माझ्या वसुण्धरेनं पुष्पहार न् पंचारति पाठविली ? आहा ! आज मी खास अर्जुनवध करून दुर्योधनाला धन्य करणार.

**आवळ० :** अर्जुनवधाच्या यशानं धन्य होणाऱ्या अंगराजाचं स्वागत करायला महाराणीसाहेब उत्सुक होऊन बसल्या आहेत. [पंचारति ओवाळून पुष्पहार घालते.]

**कर्ण :** आवळकटी, या युद्धोन्मुख वीराचा त्या वीरप्रसू, वीरांगनेला प्रणाम सांग. आणि म्हणावं, द्वैरथ युद्धांत अर्जुनाशी भिडण्यापूर्वी, आपण पाठवलेल्या या तेजाळ पंचारतीनं माझ्या उत्साहाला तेज चढलं आणि या टवटवीत सुवासिक फुलांच्या पुष्पहारानं माझ्या वीरश्रीला वासन्तिक बहराचं चैतन्य दिलं, राणीला आणखी सांग, आज या कर्णाच्या जीवनसाफल्याचा सोक्षमोक्ष लागणार आहे. प्रतिज्ञेप्रमाणं युद्धात मी अर्जुनाला ठार मारलं किंवा मारतां मारतां मर्दाच्या मरणानं धारातीर्थी मी मोक्षाला गेलो, तरीही माझ्या राजघराण्यानं आणि विशेषतः माझ्या प्रिय सूतादिक शूद्र समाजांनी त्या मंगल सोहाळ्याचा उत्सव करावा. बरं, युवराजाची तयारी कुठवर झाली ?

**आवळ० :** बाईबाई बाईबाई ! सारी रात्र तयारी न् तयारीच चालली होती. आत्ता मोठ्या पहाटेला वृषसेन महाराजांनी मंगलस्नान केलं आणि मातोश्रीचं दर्शन घेऊन स्वारी रथांत बसून पथकासह समरांगणाकडे गेली.

**कर्ण :** आमच्या भेटीची धाकट्या सरकाराना आठवणच झाली नाही की काय ?

**आवळ० :** आठवण कशी होणार नाही सरकार ! आजच्या युद्धांत हुजूरकडून अर्जुनवध होण्यापूर्वीच, नकुळ सहदेवाला ठार मारून महाराजाना मुजरा करीन, नाहीतर धारातीर्थी देह ठेवून देव दानव मानवांचे मुजरे घेईन, अशी युवराजानी वसुन्धरा मासाहेबापाशी प्रतिज्ञा केली आहे.

**कर्ण** : शाबास वृषसेना शाबास ! एकूण आज पाण्डवांपैकी तिघेजण तरी ठार मरणार, किंवा कर्ण सुपुत्र धारातीर्थी देह ठेवणार !

**कुन्ति** : इडापिडा टळो, अमंगल पळो !

**आवळ०** : अगबाई ! मागं कुणी तरी उभं आहे.

**कर्ण** : (तोण्ड न फिरवता) कोण आहे ? कोणी याचक आहे काय ?

**कुन्ति** : होय. याचक आहे.

**कर्ण** : याचक आहे. याचकाची काय याचना आहे ?

**कुन्ति** : आधी आश्वासन पाहिजे.

**कर्ण** : कर्णापाशी आश्वासन ? आजवर कोणीहि भलाबुरा अतिथी या कर्णानं विन्मुख परत पाठवलेला नाही. याचका, तुझी याचना या कर्णानं पुरी केली असं समज. बोल, काय तुझी याचना आहे ती.

**कुन्ति** : कुन्तीचे पांचही पाण्डव जिवंत रहावे.

**कर्ण** : कुन्तीचे पांचही पाण्डव चिरंजीव राहावे ! (उठून कुन्तीकडे पहातो.)

(आवळ. जाते)

कोण ? ओ हो ? पाण्डवमाता कुन्ती ? या, हा अधिरथ राधापुत्र कर्ण आपल्याला वन्दन करीत आहे. पाण्डवमातेने या सूतपुत्र कर्णाला दर्शन देण्याची आज कां बरं मेहेरबानी केली ?

**कुन्ति** : बाळा कर्णा, तू राधापुत्र नाहीस, या कुन्तीच्या उदरातून जन्मलेला कुन्तिपुत्र आहेस. तू सूतपुत्र नाहीस. पांचहि पांडवांच्या पूर्वी या कुन्तीचा कुसवा धन्य करणारा पहिला पाण्डव आहेस.

**कर्ण** : कृष्णानं मला ही कहाणी नुकतीच सांगितली.

**कुन्ति** : पण ती आता मी तुला स्वतः सांगायला आले आहे. ती ऐकल्यावर तुझ्या आजच्या प्रतिज्ञेचा फोलपणा तुला पटून, तिचा तू त्याग करशील.

**कर्ण** : प्रतिज्ञेचा उच्चार झाल्यावर तिच्या पापपुण्याचा विचार धनुर्धर कर्ण करीत नसतो.

**कुन्ति** : म्हणून काय, सख्ख्या पाठच्या भावाच्या वधानं तू आपल्या बीजाशी बेइमान होणार ?

**कर्ण** : बीजापेक्षा ब्रीदाची किंमत मला विशेष वाटते. बीजाची चौकशी करण्याची मला कधी गरजच पडली नाही आणि मला तिचं महत्त्वही वाटत नाही.

**कुन्ति** : बीजाशी बेइमानी कुन्तिपुत्र कर्णाला तरी शोभणार नाही.

**कर्ण** : ' कुन्तिपुत्र कर्ण ' हा प्रेमाचा नवीन जिव्हाळा मला तर राजकारणी डावपेचाचा नवीन हंगामी शोध दिसतो.

**कुन्ति** : नाही, बाळा कर्णा, मुळीच नाही. लहानपणीं दुर्वासमुनींनी प्रसन्न होऊन मला वशिकरणाचा एक दिव्य मंत्र दिला. हा मंत्र खरा का खोटा, याची पडताळा पाहावा, म्हणून निव्वळ मौजेनं पण अल्लडपणानं, एक दिवस मी त्याचा जप केला. मंत्र जपण्याबरोबर सूर्यदेवाची मला प्राप्ति होऊन, कुमारी असताच विवाहापूर्वी, बाळ, मला तुझा गर्भसम्भव झाला.

**कर्ण** : कुन्ति, किती चमत्कारीक तुझं हे बोलणं ! कुमारी अवस्थेत विवाहापूर्वीच तुझ्या पोटी माझा गर्भसम्भव झाला, ही गोष्ट मी डोळे मिटून खरी मानली, तरी मंत्र तंत्र जपून, आकाशांतल्या चन्द्रसूर्याकडून मानवी प्राण्यांना गर्भसम्भव होतो, यावर माझा कधीच विश्वास बसणार नाही. यापेक्षा विवाहाला उशीर झाल्यामुळं, सूर्यासारख्या तेजस्वी तरुणापासून तुझ्या उदरी माझी गर्भधारणा झाली, असं स्पष्ट सांगितलंस, तरीही त्यात मला विशाद बाळगण्याचं काहीच कारण नाही.

**कुन्ति** : बाळ, खरोखरच त्यावेळी मी अगदी अल्लड बालिका होते. मला धडपणी काही समजतसुद्धा नव्हतं रे.

**कर्ण** : अल्लड अल्पवयी बालिकांना गर्भधारणा कधी सम्भवते काय ? उगाच हवं ते बोलण्यांत, अर्थ काय ? काही ठराविक मर्यादेपर्यंत स्त्रियांची शारिरीक वाढ झाल्याशिवाय कामविकार, संभोगेच्छा आणि गर्भधारणा ही सम्भवतील तरी कशी ?

**कुन्ति** : पण हा चमत्कार झाला खरा. बाळा, मी तुला खोटं कशाला सांगू ?

**कर्ण** : चमत्कार ? निसर्गाविरुद्ध चमत्कार ? कोण यावर विश्वास ठेवील ? पण मीच मुळी तुझ्या तारुण्यसहज कामेच्छेबद्दल यत्किंचितही तुला दोष देत नाही, तिथं तू तरी आडपडद्यानं कशाला वाद घालतेस ? समाज बंधनाना तू भीत असलीस, तरी या कर्णापुढं तुला पूर्ण अभय आहे. संकोच न बाळगता काय सांगायचं ते सत्य न् स्पष्ट सांग.

**कुन्ति** : बाळ, माझा निर्वंश होण्याची वेळ येऊन ठेपली. आता कसला नि कशाचा मी संकोच धरु ? वशिकरणाचा मन्त्र जपण्यात, जिज्ञासा तर तृप्त व्हावी, पण दुर्लौकिक तर होऊ नये, एवढीच माझी विवंचना होती.

**कर्ण** : निसर्गानं निर्माण केलेली जिज्ञासा पुरविण्यात दुर्लौकिक कसला ? आणि लौकिकाचीच चाड बाळगायची, तर निसर्गाची तरी पर्वा कशाला ? मातोश्री, निसर्ग प्रत्ययी असतो आणि लौकिक परिपाठी असतो. प्रत्यय पहावा तर परिपाठ साधत नाही आणि परिपाठाची पाठ धरावी तर प्रत्यय घेता येत नाही.

**कुन्ति** : मी दोन्हीही साधण्याची धडपड केली, आणि त्यांत बाळा कर्णा, मी तुला जन्माची मुकले ! नांवलौकिकवान् कुन्तिभोजाची मी राजकन्या. माझ्या मूर्खपणामुळं बापाच्या नावाला कलंक लागू नये आणि मलाही लोकांनी नांवं ठेवू नयेत, म्हणून बाळ, तुझा जन्म होतांच नाळ भरला, तुला मी गंगेच्या ओघांत सोडून दिलं !

**कर्ण** : मातोश्री, स्वतःच्या न् थोर बापाच्या सामाजिक लौकिकासाठी आपण माझी गर्भहत्या केली असती तरी परवडली असती. पण तुझ्या भाग्यवान् उदरीचा संपूर्ण गर्भवास भोगून जन्माला आल्यावर, तू या तुझ्या पुत्राचा गंगेच्या ओघात निर्दय त्याग करावा ? कुन्ति माणसाच्या भयानं माणूसकीला बेभान बनलीस, तरी भूतदयेचा चटका सुद्धा त्यावेळी तुझ्या काळजाला बसू नये आ ?

**कुन्ति** : त्या वेळची माझ्या काळजाची कालवाकालव मी कोणत्या शब्दांनी तुला सांगूं ?

**कर्ण** : आई, कामविकार आणि संभोगेच्छा हे जर पाप नाही, तर त्याचा निसर्गसिद्ध परिपाक जो कन्यापुत्र-जन्म तोच तुम्हाला पापी कसा वाटतो ?

**कुन्ति** : पण बाळ समाजबन्धनापुढं भूतदयेलासुद्धा दगडाच्या काळजावर आपली धार बोथट पाडून नाही का घ्यावी लागंत ?

**कर्ण** : निसर्गाला पाठ दाखवणाऱ्या भूतदयेचा परमेश्वरसुद्धा धिःकारच करील. परमेश्वराहून निसर्ग काही निराळाच असतो की काय ! मातोश्री, निसर्ग हाच परमेश्वर आणि त्याच्या प्रेरणा याच ईश्वरी प्रेरणा. सनातन सिद्धान्त मानवांच्या गळी उतरेल, हा तर ही वसुन्धरा सौख्याची न् सौभाग्याची दिवाळी अखण्ड साजरी करीत राहील.

**कुन्ति** : निसर्गधर्माप्रमाणं माणसाचं वर्तन कितीहि निर्दोष असलं, तरी त्याला समाजधर्म म्हणून नको का काही पाह्यला ? तुझ्या जन्माच्या वेळी माझा विवाहसुद्धा झालेला नव्हता.

**कर्ण** : नसला म्हणून काय अपत्यहत्या करायची ? तरूण तरूणींच्या निसर्गसहज प्रेमानं, विवेकाच्या मर्यादेतच आपल्या निसर्गसुंदर चारूशीलाचा विकास करावा, एवढ्यासाठींच समाजानं विवाहाचा प्रधात सुरू केला. ही मर्यादा जाणून अगर नेणून लाथाडली गेली, तर त्याचं प्रायश्चित त्या निष्पाप बालकानं कां म्हणून भोगावं ? मातोश्री, कामेच्छा ही अन्नपाण्याइतकीच निसर्गसिद्ध जरूरीची बाब आहे, आणि तिला प्रतिबन्ध करण्याचा कोणालाहि अधिकार नाही. ही इच्छा पूर्ण करून घेतांना स्त्रीपुरूष जर निसर्गधर्मानंच वागतात, तर अपत्यपालनाच्या वेळीच त्यांना लौकिकी समजुतीचं एवढं भय का वाटावं ? अविवाहित तरूण कुमारिका किंवा तरूण विधवा-कोणीहि असो-निसर्गप्रेरणेच्या कोणत्याहि कृत्याबद्दल त्यांनीं लोकमताला बाचकणं, हा परमेश्वराविरूद्ध भयंकर गुन्हा आहे.

**कुन्ति :** पण अब्रूची चाड न बाळगून कसं चालेल ? त्या माणसाला समाज सळो का पळो करून नाही का सोडणार ?

**कर्ण :** करील. अगत्य करील. हवी ती निन्दा, बेसुमार उपहास आणि अमानुष छळ करील. पण निसर्गाचा धर्म हे पाप नाही, इतक्या आत्मविश्वासानं त्या निन्देला, उपहासाला नि छळाला निमूटपणं तोण्ड देऊन, जी अपत्यसंगोपन करील, तिलाच निसर्गधर्माचं पावित्र्य उमगलं आहे, असं मी मानतो. जिवन्त नवऱ्याच्या नांवानं कपाळभर मळवट फांसून, कन्यापुत्रांच्या टोळ्या जगापुढं मिरवणाऱ्या सधवेपेक्षां, पुनर्विवाहाचा प्रतिबन्ध करणाऱ्या जुलमी समाजापुढं, त्यांचा हवा तो राक्षसी रोष सहन करून, आपल्या पोटचा गोळा धिटाईनं नाचवणाऱ्या विधवेच्या मनोधैर्याची मी तारीफच करीन. तीच खरी माता न् तिलाच जगात जगण्याचा वास्तविक खरा अधिकार. बालहत्येसारखं अक्षम्य पाप करून आपल्या पापावर पांघरूण घालण्यापेक्षा, सामाजिक छळाला धैर्यानं तोण्ड देऊन, आपल्या पोटच्या गोळ्याचं प्राणापलीकडं संगोपन करण्यांतच स्त्रियांच्या मातृहृदयाची थोरवी आहे.

**कुन्ति :** पण लोकमताला धुडकाऊन कुमारिकांनीं आणि विधवानी आपापलीं मुलं कडेवर घेऊन कशी खेळवावी ?

**कर्ण :** कां खेळऊ नयेत ?

**कुन्ति :** लोक काय बोलतील ?

**कर्ण :** झक मारतात लोक ! लोकांना भिऊन निष्पाप बालकाची प्राणहत्या किंवा भ्रुणहत्या ? त्यापेक्षा लोकमान्यतेची हत्या झाली तरी बेहत्तर ! निसर्गाशी विसंगत असणाऱ्या समाजनियमांना लाथेखाली तुडविण्यांतच माणसाची खरी माणुसकी सिद्ध होत असते. मातोश्री, सामाजिक नियमांची मातब्बरी ती काय ! ते हवेसारखे हवे तेव्हा नेहमी बदलतच असतात. पण निसर्गाचे नियम अखण्ड सनातनच असतात. या सनातनधर्माची पर्वा न बाळगतां, क्षणभंगुर अशा सामाजिक बन्धनांच्या खोडसाळ मुर्वतींसाठी, पोटच्या गोळ्याचा घात करणाऱ्या बायकाच समाजस्वास्थाला कीड लावणाऱ्या अवदसा समजल्या पाहिजेत.

**कुन्ति :** बायकांच्या बुद्धीला इतका खोल विचारांचा पोच कुठून असणार बरें बाळ !

**कर्ण :** मातोश्री, हा विचाराचा न् विद्वतेचा प्रश्न नाही. काळजाचा प्रश्न आहे. पशूपक्षीचसे काय किडीमुंग्यासुद्धा उपजत बुद्धीनं अपत्य-संगोपन करीत असतात. पण मनुष्यांत ही उपजत बुद्धी असून, शिवाय त्यांत विवेकाची भर पडलेली आहे. अशा विवेकप्रधान मानवांनी सामाजिक धास्तीच्या सबबीवर बालहत्या करावी ? हरहर ! पशूंनींसुद्धां कींव करण्यासारखा माणुसकीचा हा ऱ्हास, वेळीं पाशवी पुरूषांना परवडला, तरी तो तुम्हा मातृहृदयी स्त्रियांना सहन तरी कसा होतो ?

**कुन्ति :** आधींच आमचं सारं जिणं पुरुषांच्या आधीन आणि समाजनियम ठरवण्याचं कामहि त्यांच्याच स्वाधीन. म्हणून म्हणते, अडलेल्या नि नाडलेल्या बायका जर बालहत्या करीत असतील, तर त्याची जबाबदारी पुरुषांवरच नाहीं का पडत ?

**कर्ण :** मातोश्री, खरं पाहिलं तर मानवी संसारांत पुरुषांना असं काय महत्त्व आहे ! स्त्रिया याच मानवी सृष्टीच्या संगोपन करणाऱ्या जीवन-देवता माता आहेत. त्यांच्या मातृहृदयाच्या अस्मानफाट व्यापकतेला नि दिलदार श्रीमन्तीला कशाची जोड नाही नि तोडहि नाही. स्त्रियांच्या बिनमोल सहकार्यामुळंच जगांतल्या जीवनकलहांत पुरुष आजवर टिकाव धरून जगला आहे. ज्या घटकेला स्त्रिया आपल्या मातृहृदयाला पारख्या होतील, त्या घटकेला—मातोश्री लक्ष्यांत घ्या-सारी मानवजाती बीबियासकट या पृथ्वीवरून कायमची नष्ट होईल. निसर्गाच्या साम्राज्यात स्त्रियांना जे इतकं महत्त्व आलेलं आहे, ते त्या केवळ वंशवृद्धीच्या खाणी आहेत म्हणून नव्हे; तर परमेश्वरानं त्यांना ' मातृहृदय ' ही अनन्यसामान्य देणगी दिलेली आहे म्हणून. माता म्हणूनच स्त्रिया जगाच्या आदराला पात्र होऊन राहिल्या आहेत. पण कुन्ति, ते दिव्य मातृहृदय नेमकं तूं गमावलंस आणि म्हणूनच या मांसाच्या गोळ्याला तू डोळे उघडे ठेवून गंगेच्या ओघांत फेकून दिलास ! मातोश्री, आपल्या उदरीं माझा जन्म, यांत मी आपला काय गुन्हा केला ? त्या सूर्याला-किंवा सूर्यासारख्या तेजस्वी तरुणाला—तारुण्याच्या मुसमुसत्या शुद्ध प्रेमाच्या ज्या उमाळ्यानं तू प्रथम भेटलीस; ते तुझं प्रेम या अभाग्याच्या जन्माच्या वेळींच कसं एकदम आटलं ? पतिप्रेमापेक्षा अपत्यप्रेम शतपट अधिक, असं म्हणतात. पण तुझा मामला मात्र जगावेगळा खरा !

**कुन्ति :** पटलं, पटलं, माझं पाप मला पटलं. लोकनिन्देच्या दरा-यापुढं माझ्या बालबुद्धीनं कच खाल्ल्यामुळंच माझ्या हातून हे पाप घडलं.

**कर्ण :** कर्णाची भेट होईपर्यंत मात्र याची तुला जाणीवहि झाली नाही ना ? कुन्ति तुला स्त्री-हृदय तरी आहे का नाही, याचीच मला शंका येत आहे.

**कुन्ति :** अशी कशी शंका येते तुला बाळ ! आधीच दुःखानं गांजलेल्या आणि पश्चातापानं होरपळलेल्या या अभागणीवर आणखी आग पाखडू नकोस. मी तुझा जन्मतःच त्याग केला—

**कर्ण :** त्याग ? त्याग कसला ! माझी बालहत्या केलीस. माझ्या दैवानं मी वाचलो न् तुझा प्रयत्न फसला. पण तुझा हेतू बालहत्येचाच की नाही ? बोल. आता कशाला हा शोक न् हे विलाप ! ज्यावेळी करायचे तेव्हा केले नाहीस. उलट तुझ्या पापाचं माप माझ्या पदरांत बांधून मला तू जलसमाधि दिलीस. तेव्हा तुला किती हायसं वाटलं ! साऱ्या नऊ महिन्याचं पाप गुपचूप गंगेत निपटून धुऊन टाकल्याचं समाधान तुला झालं, नाही का ? बोल, आता बोल.

**कुन्ति :** बाळ बाळ, काय बोलू !

**कुन्ति :** हवं ते बोल, कुन्ति, सगळी पापं पचतात, पण निसर्गधर्माविरूद्ध केलेली पापं अखेर सापासारखी नरड्याला डसतात. आला ना अनुभव ?

**कुन्ति :** पोटच्या गोळ्याची हत्या ! करूं नये, पण बाळ, मी के-ली ! मला आता क्षमा कर.

**कर्ण :** मातोश्री, पोटच्या गोळ्याची हत्या हे इतकं भयंकर पाप आहे की त्याची क्षमा करायला परमेश्वर सुद्धा समर्थ नाही. त्यांतल्यात्यात लोकमताला किंवा रूढीला भिऊन आपल्या अपत्याचा जीव घेणं, यासारखं दुसरं बदकर्म नाही. अपत्य म्हणजे आईच्या मांसाचं मांस, हाडाचं हाड, रक्ताचं रक्त आणि जिवाचा जीव. त्याच्या रक्षणासाठी, त्याच्या पालनपोषणासाठी, त्याच्या वाढीसाठी, जी आपल्या जिवाचं रान करील, डोळ्यांत त्याच्या पंचप्राणाला साठवील नि अखेर त्याच्या जिवासाठी स्वतःच्या जिवावर रखरखीत निखारे ओतून घेईल, ती खरी स्त्री, ती खरी माता आणि ती खरी मानव-देवता. मातोश्री, नवरा मेल्यावर त्याच्या सरणावर उडी घेणाऱ्या स्त्रीचा सती सती म्हणून कोणी कितीहि गौरव केला, तरी त्या तिच्या कृत्यात थोडा तरी स्वार्थ असतोच असतो. म्हणून असल्या सतींचा मला बिलकूल आदर वाटत नाही. मातेच्या अपत्यविषयक प्रेमात स्वार्थाचा लवलेशहि नसतो. पण तू तर केवळ लौकिकाच्या स्वार्थासाठी हा जीता जीव नदीत फेकून दिलास !

**कुन्ति :** बाळ, बाळ, मी तुझी सर्वस्वी अपराधी आहे, ही जाणीव मरेपर्यन्त माझ्या काळजाचे तुकडे तुकडे करीत राहील. लौकिकासाठी तुला मी टाकले, पण लौकिक तरी कुठं माझ्या पदरात पडला ! म्हणजे सगळीकडूनच मी नागावले. पण खरं म्हणशील तर बाळ, स्वतःच्या लौकिकापेक्षा मी माझ्या बाबांच्या थोर राजघराण्याच्या लौकिकाला भिऊनच, या पापाच्या वाटेत पाऊल टाकलं.

**कर्ण :** आणि म्हणूनच तुझ्या पापाचं स्वरूप विशेष घातकी, राक्षसी न समाजविध्वंसक ठरत आहे. थोर कुळातल्या थोर बापाची थोर लौकिकवान् मुलगी, म्हणून ही गोष्ट तुला मुळीच शोभली नाही. ज्या थोरलोकांकडं पाहून बहुजनसमाज सामाजिक नीतीचे धडे गिरवीत असतो, त्या श्रेष्ठांनीच जर असली घातकी बालहत्त्यांची परंपरा चालू ठेवली, तर साऱ्या समाजांचा बुद्धिभ्रंश होऊन, समाजस्वास्थ्याच्या चिन्धड्या चिन्धड्या उडतील, इकडं तुझं लक्ष जायला हवं होतं. कोनाकोपऱ्यातल्या एकाद्या क्षुद्र बाईनं बालहत्त्या केली तर लोक तिला अडाणी, मूर्ख समजून तिची कीव तरी करतील, किंवा थोडासा धिःकार करून, त्या गोष्टीला विसरून जातील. पण तू तर महाराज़ कुन्तिभोजाची राजकन्या ! तुझ्या हातून घडलेलं हे महापातक, भारतीय स्त्रियांच्या मातृहृदयाला रक्तपितीप्रमाणं भोवल्याशिवाय खास राहाणार नाही.

**कुन्ति :** बालहत्त्येच्या नादानं नादानं स्वतःचा, संसाराचा—

**कर्ण :** स्वराज्याचा न् अखेर सगळ्या राष्ट्राचा—

**कुन्ति :** केवढा भयंकर विध्वंस होऊं शकतो, याचा दाखला जगाला पटवण्यासाठीच, परमेश्वरानं या अभागी कुन्तीला जन्माला घातली खास ! बाळा, जाणून किंवा नेणून मी जरी मातृहृदयाला पारखी झाले, तरी तू या कुन्तीच्या पोटी जन्मलेला ज्येष्ठ पाण्डव आहेस, ही गोष्ट कालत्रयी खोटी पडणारी नाही.

**कर्ण :** होय, कुन्ति, मी पाण्डव आहे, ज्येष्ठ पाण्डव आहे, तुझा पुत्र आहे. पण या कुळकथेचा आता उपयोग काय ? आजच्या संग्रमात कर्णार्जुनाचा मारीन मरेनचा झगडा सुरू होण्यापूर्वी तू मला दर्शन दिलंस, हे एकपरी चांगलंच झालं.

**कुन्ति :** तुझं शुभ कल्याण व्हावं, हीच या कर्णमातेची इच्छा आहे.

**कर्ण :** तथास्तु, तुझा मंगल आशीर्वाद मी शिरसावन्द्य मानतो.

**कुन्ति :** पाण्डवांचंहि या वडील भावानं शुभ मंगल करावं, अशी मी प्रार्थना केली, तर बाळ ती अनाठायी होईल का ? बाळा, तुझ्या हातून अर्जुनाचा वध होऊ नये, या एकाच आशेनं मी तुझ्या भेटीला आले खरी; पण–पण–पण–

**कर्ण :** पण कसला ? कुन्ति, स्पष्ट बोल, भिऊ नकोस.

**कुन्ति :** शौर्यवीर्यादि पराक्रमाप्रमाणंच तुझ्या बुद्धिवैभवाच्या तेजानं या कुन्तीला तू इतकी कुण्ठित न् मोहित केलीस, की माझी कर्णार्जुनाची जोडी अभंग चिरंजीव राहिलीच पाहिजे, या आशेनं माझ्या काळजात आता पोखरण घातली आहे.

**कर्ण :** मातोश्री, ही आशा आता फोल आहे. कर्ण किंवा अर्जुन यापैकी कोणी तरी एकानं धारातीर्थी आज देह ठेवल्याशिवाय, या महायुद्धाचा शेवट लागणं शक्य नाही.

**कुन्ति :** कां शक्य नाही ? तूच मनावर घेशील तर कर्णार्जुन युद्धाशिवाय या महायुद्धाची समाप्ति होईल.

**कर्ण :** ती कशी ?

**कुन्ति :** सख्ख्या ज्येष्ठ बन्धूच्या शुद्ध प्रेमानं तू अर्जुनाला मिठी मारलीस तर किती तरी शुभ गोष्टींनी या भरतखण्डाचं भाग्य उजळ होणार आहे. एवढं श्रेय, बाळ, आज तू घेतलच पाहिजेस.

**कर्ण :** कर्णार्जुन-सन्धीवर भरतखण्डाचं भाग्य कसं काय उजळ होणार ?

**कुन्ति :** कौरवांचा सारा पीळ तुझ्या हिमतीवर—

**कर्ण :** आणि तो वाजवी आहे.

**कुन्ति :** ज्येष्ठ पाण्डव म्हणून तू पाण्डवांना सामील झालास, की या मेल्या कौरवांच्या नाड्या तेव्हाच आखडतील आणि महायुद्ध बंद पडून भारतीय क्षत्रियांचा संहार तेव्हाच थांबेल. क्षत्रियांचा संहार ही केवढी भयंकर हानि आहे हे तुझ्यासारख्या राष्ट्रपुरुषाला मी सांगावं असं नाही. ती वाचवून भारताचं भाग्य राखण्याची पुण्याई माझा बाळ नाही का पदरात घेणार ?

**कर्ण :** भारतीय क्षत्रियांची हानि टाळण्याची जबाबदारी माझ्या गळयात ? कां म्हणून ? कौरवांच्या बाजूनं मी पाण्डव-निःपाताला सिद्ध झालो, याला वास्तविक कारण कोण ? –तूच. हेच नव्हे, पण कौरव पाण्डवांच्या वैराला आणि महायुद्धालाहि कारण तूच–तुझी बालहत्या. तू माझा त्याग केल्यामुळं, कीर्तिला नि यशाला एक जन्म तरी मी कायमचा नाही का मुकलो ! क्षत्रियांच्या सर्व संस्कारांना पारखा झालो आणि सूतकुलाच्या वातावरणात येऊन पडलो. या एकाच पापामुळं मला पदोपदी किती मानहानी, उपहास आणि त्रास सहन करावे लागले नि लागतात ! स्वयंवर प्रसंगीं तुझ्या त्या पांच नवऱ्यांच्या द्रौपदी सुनेनं भर भारतीय राजमण्डळा समक्ष ' सूताधम सूताधम ' म्हणून या कर्णाचा केलेला उपहास, कुन्ति, तुझ्या कानावर आला असेलच. अशा शेकडो हजारो तेजोभंगाना तोण्ड देण्यातच माझी अर्धीअधिक हिम्मत या जन्मी खर्ची पडली. याला कारण कोण ? तूच. हा विचार मनात आला म्हणजे माझा सात जन्माचा कडवा वैरीसुद्धा यापेक्षां अधिक माझं काय नुकसान करू शकेल ? तूच सांग, ज्यावेळीं आपले पंचप्राण पणाला लावून तू माझं संगोपन आणि क्षात्रसंस्कार करायचे, त्याच वेळी तू मला उकीरड्यावर फेकून दिलंस, आणि तो काळ निघून गेल्यावर आता तुझ्या पुत्रवात्सल्याला भरती आली !

[दुर्योधन दूर गुपचूप मागें येऊन उभा राहतो.]

**कुन्ति :** बाळा, बाळा, माझ्या काळजाच्या चिंधड्या चिंधड्या केल्यास ! तुझ्या निर्मळ अंतःकरणाच्या आरशात मला माझं चरित्र स्पष्ट दिसलं ! कर्णा–बाळा, सारं विश्व मला पेटल्यासारखं दिसतं आहे !

**कर्ण :** आई, रडू नकोस, घाबरू नकोस. विश्वरूपदर्शनाची कृष्णाची जादुगिरी या कोणाजवळ नाहीं ! कदरबाज व्यवहाराचा रोकठोक मामला मी तुला पटवून दिला. आई मला क्षमा कर. अधिक उण्या शब्दांबद्दल मी तुझ्या पाया पडतो.

**कुंन्ति :** ऊठ बाळा ऊठ, माझ्या पातकाबद्दल तू मला हवे ते शाप दे. वाटेल तितकी निर्भत्सना कर, पाहिजे तर तुझ्या खड्गानं माझी मान तोड––

**कर्ण :** मला तू मातृहत्यारी परशुराम समजू नकोस.

**कुन्ति :** बाळ, किती झालं तरी पाण्यापेक्षा रक्त केव्हाहि घट्टच असतं. तू माझ्या जिवाचा जीव, प्राणाचा प्राण. बाळ, या तुझ्या मातेच्या रक्ताशी नको तू बेईमान होऊंस.

धर्मार्जुन भीमाच्या आंगांत कुन्तीचं जे रक्त खेळत आहे, तेच या माझ्या लाडक्या जिवाच्या नसात नाही का सळसळत ? [कर्णाला मिठी मारते. तो ' आई ' म्हणून कवटाळतो] माझं बाळ ते ! बाळ, बाळ, बाळ ! (दोघेहि किंचित् मूर्च्छित.)

**दुर्यो० :** (स्व.) हा पेच मात्र मोठा बिकट दिसतो. कृष्णाला यानं वाटाण्याच्या अक्षतावर वाटेला लावलं, पण हा मातृप्रेमाचा उमाळा अखेर काय करतो कोण जाणे !

**कृष्णा :** (किंचित् डोकावून स्व.) ही पकड आता छान बसली. (जातो.)

**कर्ण :** आई आई ! आऽहाऽ ! जन्मदात्या मातेच्या स्पर्शात खरोखरच काही तरी जादू आहे. हिच्या अंकावरच्या माझ्या या भाग्यवान् शयनाचा शेषशायी भगवन्तानं हेवा करावा !

**कृष्णा :** (पूर्ववत्) यात मुळीच संशय नाही. (जातो.)

**कुन्ति :** देवा, आज किती किती वर्षांनी माझ्या बाळाच्या अंगस्पर्शानं मी धन्य होत आहे. लोकलज्जेसाठी पोटच्या गोळ्याची हत्त्या करणाऱ्या अभागणीनो, या असल्या सौभाग्यासाठी तरी तुमच्या जिवाच्या जिवाला जपा. देवाघरच्या त्या हिऱ्यामाणकाला प्राणाच्या कोन्दणात ठेवा. माझं बाळ ! आहा ! सारी माया फुलली न् काया रोमांचानी डवरली ! बाळ, तुझ्या या मिठीत मला मरण आलं, तरच रे मी पापीण उद्धरून जाईन.

**कर्ण :** आई–आई !

**कुन्ति :** बोल, बोल. ते गोड शब्द पुन्हा बोल.

**कर्ण :** आई, तुझ्या अंकावर असा मी डोकं ठेऊन पडलो असता, मरणाची भाषा कशाला बोलतेस ? आतां सारं मंगल–मंगल–मंगलच होणार.

**कृष्णा :** (पूर्ववत्) तथास्तु. (जातो.)

**कर्ण :** आजच्या संग्रामाच्या मंगल दंगलीत कर्णार्जुनापैकी कोणी तरी एक धरणीमातेच्या अंकावर, अस्साच मंगल शयन करणार. माझ्या आईचा कुसवा धन्य होणार.

**कुन्ति :** नको नको, बाळ, असं अभद्र काही बोलू नकोस. माझ्यावर रागावलास होय तू ? माझ्या पाडसाला उटणं लावून भुडभुड गंगा आंघूळ घातली नाही, माझ्या सोनुकल्याच्या गाली 'कपाळीं तीट लावली नाही, तुला बाळलेणं चढवलं नाही, गझनीच्या गोण्डेदार कुंचीत गुरफाटून कडी खान्द्यावर खेळवलं नाही, ' लुच्चा रे लुच्चा ' म्हणून दाटुमाटुचा गालगुच्चा घेतला नाही, म्हणून का माझा राजा माझ्यावर रुसला आहे ? आल्या गेल्याची, वाटच्या वाटसराची, घरातली दारातली दृष्ट माझ्या

छबड्याला लागेल, म्हणून तुला मी पदराखाली झांकलं नाही, मीठ मोहऱ्यांनीं तुझी दृष्ट काढली नाही, म्हणून का माझा राजहंस माझ्यावर रागावला आहे ? बाळ, लौकिकाला भ्याले, माझ्या पाडसाला मुकले, पण तुझ्या प्रेमाला नाही बरं पारखी झाले. पोटांतलं प्रेम ओठांना उमटत नाही, ते या डोळ्यांतून टपटपा गळत आहे. कुन्तीच्या मानस–सूर्या, या अर्घ्यदानानं तरी संतुष्ट होऊन, या अभागिणीवर पुत्रप्रेमाची पाखर घाल.

**कृष्ण :** (पूर्ववत्) पेचावर सरकगांठ तर छान बसली ! (जातो.)

**कर्ण :** आई, पडू दे, पडू दे, तुझ्या डोळ्यातले ते दिव्य दवकणाचे थेम्ब या कर्णाच्या मस्तकावर सारखे टपटप पडू दे. त्या तेजाळ थेम्बांच्या किरिटापुढं पृथ्वीच्या साम्राज्याचा किरिटसुद्धां मी तुच्छ लेखतो.

**दुर्यो० :** [स्व.] मातृप्रेमाच्या मोहनीनं कौरवांचा सेनानि–किरिट सुद्धा तुच्छच लेखला म्हणायचा ! कर्णा, अखेर तू सुद्धा भीष्म द्रोणाच्याच वळणावर जाणार आं !

**कर्ण :** आई, तुझ्या हातची कुरवाळणी म्हणजे या कर्णाला त्रिभुवनाची ओवाळणी आहे. तुझ्या या पाझरत्या डोळ्यांची पिलपिलती नजर, अमरत्वाच्या अमृतानं मला सचैल स्नान घालीत आहेशी वाटते. बालपणींच्या सर्व आठवणींची आंगडीं कुंचलीं घालून, तुझ्या हृदयाच्या पाळण्यांत जो जो गाई करणाऱ्या या तुझ्या कर्णाला, त्याच्या जीवनाच्या अखेरीला, दे दे, एकसारखे झोके दे, म्हणजे तुझ्या उष्ण श्वासाबरोबर आपोआप उमटणारीं प्रेमाच्या हुन्दक्याची मुकी गाणीं ऐकत ऐकत लागणाऱ्या गाढ झोपेपुढे, मला मोक्षाची सुद्धा पर्वा वाटणार नाही.

**कृष्ण :** [पूर्ववत्] मन्त्र बरोब्बर लागू पडला. पुंगीच्या आलापात नागोबा छान डुलू लागला ! बन्सिबहाद्दर कृष्णाच्या बासरीची तान फुकट जायची नाही. [जातो]

**दुर्योधन :** [स्व.] अखेर कर्णसुद्धा माझी निराशा करणारसा दिसतो !

**कुन्ति :** बाळ, तू पाण्डव ना ? या कुन्तीचा कुसवा धन्य करणारा ज्येष्ठ पाण्डव ना ?

**कर्ण :** आई, हा कर्ण नखशिखान्त पाण्डव आहे, पाण्डव आहे, असं शतवार म्हणतो. मग तर झालं ना माझ्या आईचं समाधान ?

**कुन्ति :** [मिठी सोडून दोघे उठतात.] आहा, आज मी धन्य झाले !

**कृष्ण :** [पूर्ववत्] माझ्या श्रमांचं सार्थक झालं [जातो.]

**कुन्ति :** बाळा कर्णा, तू पाण्डव आहेस. माझी–आईची–आज्ञा म्हणून, आत्ता माझ्याबरोबर आपल्या धाकट्या भावंडांच्या भेटीला चल. पाण्डव पक्षाचा सम्राट म्हणून श्रीकृष्णासकट धर्मभीमादि पाचहि पाण्डव मी तुझ्या पायावर घालते. या मेल्या

कौरवांच्या भाडोत्री अभिमानापेक्षां, रक्ताच्या अस्सल जिव्हाळ्यानं तुम्ही सहाहि पाण्डव या कुन्तीचं जीवन धन्य करा.

**कर्ण :** हां, एवढं मात्र घडणार नाही. आई, हा तुझा आग्रह फुकट आहे. तुझ्या प्रेमानं वितळून, अगदी सद्‌भावनेनं आणि तुझ्या आज्ञेनं, कौरवांचा त्याग करून मी पाण्डवांना मिळालो, तर सारे भारतीय क्षत्रिय या कर्णाच्या बीजाची न् ब्रीदाची किती बेसुमार निन्दा करतील, याची तुला जाणीव आहे काय ?

**कुन्ति :** रक्तानं रक्ताला ओळखलं, यांत त्याना निन्दा करण्याचं काय कारण ?

**कर्ण :** कारण काय ? आई, तू प्रसंगाचा नीट विचार केला नाहीस. या घटकेला हा कर्ण कौरव सैनाचा अधिपति आहे. कौरवांची भाग्यश्री दुर्योधनानं विश्वासानं माझ्या हाती दिलेली आहे. अशा वेळीं नुसत्या जन्माच्या सबबीवर पाण्डवाना मी सामील झालो, तर सारे क्षत्रिय म्हणतील की, ' पहा हो, आतापर्यंत पाण्डवांचं भाऊपण याला माहीत नव्हतं. पण त्यांच्याकडं कृष्णार्जुनाची जोडी दण्ड थोपटून सामन्याला उभी राहिलेली पाहाताच, स्वारी भेदरली, आणि भाऊपणाचं नातं उकरून, भ्याडासारखी पाण्डवांच्या आसऱ्याला पळाली.' आई, असला आरोप या कर्णाला क्षणभर सुद्धा सहन होणार नाही. माझं असेल नसेल ते शरीरबल आणि बुद्धिबल एकवट खर्ची घालून आज मी तुझ्या पाचहि पुत्रांशी लढायला कमी करणार नाही. तुझा उपदेश कितीहि कल्याणाचा असला, तरी कौरवांच्या मिठाला न् इमानाला हा कर्ण प्राण गेला तरी बेइमान होणार नाही.

**दुर्योधन :** [स्व.] शाबास, कर्णा शाबास !

**कृष्ण :** [पूर्ववत्] वेताळ पूर्वस्थळावर आला ! [जातो.]

**कर्ण :** तुझे पाच पुत्र या कर्णाला संग्रामात भारी आहेत, असं मुळीच नाही. यादव कृष्णाच्या कपट नीतीची कास न धरता, क्षत्रियोचित युद्धधर्मानं ते जर मला सामना देतील, तर आई, पुरती खूणगाठ बांधून ठेव, त्याना ढेकणासारखा सहज लीलेनं चिरडून टाकायला हा कर्ण समर्थ आहे.

**कुन्ति :** ही माझी बालंबाल खात्री आहे. म्हणूनच बाळ, माझा निर्वंश टाळण्यासाठी मी तुझ्या भेटीसाठी इतकी घडपडत आले. पूर्वी लौकिकासाठी मी तुझ्या जिवावर तुळशीपत्र ठेवले, आता तुझ्या सकट पाचहि पाण्डवांच्या जिवासाठी मी माझ्या लौकिकावर निखारे ठेवायला तयार आहे. एवीतेवी लौकिकाला भीत असतानाहि जर माझा दुर्लौकिकच झाला आहे तर कर्ण माझा कानीन पुत्र आहे, असा मीच जाहीर डंका पिटून, तुझा अस्सल पाण्डवपणा सिद्ध करते. मग नाही ना तुझी हरकत ?

**कर्ण :** मातोश्री, वेळीं भारतीय क्षत्रिय ब्राम्हणांचे हवे ते आरोप मी निमूट सहन करीन. पण रक्ताच्या नात्यागोत्याच्या किंवा मातापित्याच्या प्रेमाच्या सबबीवर, दुर्योधनाच्या विश्वासाला बेइमान होणार नाही.

**दुर्यो० :** [स्व.] कर्णा, तुझ्या धन्यतेच्या थोरवीपुढं सूर्याचं तेज सुद्धा फिकं पडेल.

**कर्ण :** धृतराष्ट्र–पुत्रांनी आजवर माझं क्षेम केलं. माझ्या स्वभावजन्य गुणकर्माची बूज राखून मला प्याद्याचा फर्जी केला आणि अखेर माझ्या आत्मविश्वासावर विसंबून सेनानिपदाचा किरीट माझ्या मस्तकावर ठेवला. त्यांचा मी ऐन धटकेला मनोभंग करू ? नाही नाही, आई, यावेळी आकाश कडाडून कोसळलं तरी आपल्या कौरवनिष्ठेपासून हा कर्ण रतिमात्र ढळणार नाही. आजपर्यंत ज्यानी ज्यानी दुर्योधनाचे तान्दुळ महाग केले, त्यांच्या परीक्षेची वेळ आता आली आहे. अर्थात् प्राणाची तमा न बाळगता, कौरवांच्या उपकारांची फेड घनघोर रणसंग्रामानं आज मला केलीच पाहिजे.

**दुर्यो० :** [स्व.] कर्णा, तुझ्यावरून हा जीव ओवाळून टाकावा ! तू माझा परमेश्वर आहेस.

[आत **आकाशवाणीः**—'' दानशूर कर्णा, देवी कुन्ति तुझी जननी आहे आणि तिच्या आज्ञेप्रमाणं वागलास तर त्यात तुझं कल्याण आहे.]

**कुन्ति :** ऐक ऐक बाळा ऐक. प्रत्यक्ष सूर्यदेवाची–तुझ्या पित्याची–ही आकाशवाणी ऐक.

**कर्ण :** मातोश्री, ही आकाशवाणी नाही. त्या नाटकी कृष्णाची चेटकी वाणी आहे.

**कृष्ण :** [प्र. क.] नाही नाही कर्णा, खरोखरच ही आकाशवाणी झाली. किती गंभीर ! किती स्पष्ट !

**कर्ण :** हे तूच सांगायला आलास म्हणून ठीक झालं.

**कृष्ण :** आकाशवाणी म्हणजे देववाणी. तिचा अनादर कोण करील ?

**कर्ण :** आकाशवाणीनं डळमळणारा आणि कृतनिश्चयापासून ढळणारा नामर्द हा कर्ण नव्हे, हे तुम्हा सगळ्या गारोड्यांना आजच्या संग्रमानं मी सिद्ध करून देईन.

**कृष्ण :** आत्याबाई, कर्णाचे बालपणचे कसलेहि हट्ट तुम्ही पुरवलेले नाहीत. खरं ना ? म्हणून त्यानं लाडुकपणाची ही टोलवाटोलव चालवली आहे. बाकी, कर्ण म्हणजे देववाणीचा अवमान करणारा नाही बरं ! अगदी खात्री ठेवा. पण मुलानं आपल्या आईजवळ हट्ट धरू नये, तर कोणाजवळ धरावा ? असला काही हट्ट, तर पुरवा. मी राहतो जामीन,–न् चला हात धरून घेऊन आपल्या शिबिरात. मुलाचा हट्ट आईनी नाही पुरवायचा, तर कोणी ? मी ?

**कुन्ति :** माझ्या बाळाचा हवा तो हट्ट पुरवायला मी माझ्या जिवाची कुरवण्डी करीन.

**कर्ण :** कृष्ण असला की हव्या त्या नाटकाला रंग भरलाच ! पण आई, या नाटकाच्या पचनी मी पडेन, ही गोष्ट मात्र दोघेहि विसरा.

**कृष्णा :** आत्याबाई, हट्ट जरा धट्टच दिसतो. पण मायेच्या उबाऱ्यानं वितळेल.

**कर्ण :** कृष्णा, दंगलबाजी करून तुझ्यासारखे लोकमान्य बनण्याचं दुकान नाही मी थाटलं. प्रतिपक्षाला धर्मप्रेमाचं अवसान दाखवून, हवा तो मतलब साधण्याची तुझी ठकविद्या मला पुरी माहीत आहे.

**कृष्णा :** गरीबावर हा काय गहजब बुवा ! मी काय कुणाचं नुकसान केलं ? नेहमी जुळतं मिळतं घेऊन तण्टे मिटवणारा गरीब मध्यस्थ मी. मायलेकाची दिलजमाई होत असेल तर पोटभर दुध पिणारा मी गवळी. माझ्यापाशी कशाची ठकविद्या ?

**कर्ण :** ठकविद्या ? तुझ्यासारखा महाठक पूर्वी झाला नाही नि पुढे होणार नाही. कौरवपाण्डवांचा कलहाग्नि या कुन्तीनं पेटवला आणि कारस्थानांचे फुंकर घालून घालून तू त्याचा हा प्रचण्ड होम भडकवलास. आता या होमात कौरवांचे कोळसे होऊन, विधवा बाया न पोरक्या पोरानी गजबजलेल्या भारताचे पाण्डव जरी स्वामी झाले, तरी तू नि तुझी लोकमान्यता शीरसलामत !

**कृष्णा :** आत्याबाई, पाहिलंत ना ? मध्यस्थाला इकडून थप्पड तिकडूनहि थप्पड ! तरी मी होऊन कधी कुणाच्या भानगडीत पडत नाही. नको रे बुवा ! पुढल्या जन्मी मेलो तरी कुणाची मध्यस्थि म्हणून करायची नाही.

**कुन्ति :** कृष्णानं दुर्योधनाचं तरी काय वाईट केलं बाळ ? महायुद्ध टाळण्यासाठी शेवटपर्यंत त्यानं नाही का जिवापाड खटपटी केल्या ?

**कृष्णा :** पण लक्षात कोण घेतो ? जग हे असं आहे. काय केलं न् काय नाही, हे माझ्या जिवाला माहीत—

**कर्ण :** का आम्हा कौरवाना माहीत. कृष्णा, तुझ्या दगलबाजीचे न् दगाबाजीचे दाखलेच देऊ लागलो, तर त्याचा एक महाभारत ग्रन्थ तयार होईल.

**कृष्णा :** सारी दुनिया तो भक्तिभावानं वाचील.

**कर्ण :** तेवढी छाप लोकावर तू बसवली आहेस खास. असं नसतं तर द्रौपदीवस्त्रहरणाची भाकडकथा कोणा शहाण्यानं खरी मानली असती ? द्यूतात जिंकलेली दासी म्हणून हट्टी द्रौपदीला दुःशासनानं दरबारात खेचून आणली. त्या खेचाखेचीत साहजिकच तिचा पदर इकडं तिकडं उडाला असेल. मी म्हणतो उडाला. पण या साध्या गोष्टीवर, कृष्णा, तुझ्या बडव्या भगतानी कल्पनेची भली मोठी इमारत रचून, तुझ्या देवबाजीचं केवढं रे प्रस्थ वाढवलं ? काय म्हणे, दुःशासनानं द्रौपदीचं एक लुगडं फेडताच आत दुसरं तयार. दुसरं फेडताच तिसरं तयार. तिसरं फेडताच चवथं, पांचवं, सहावं–असा हजारो लुगड्यांचा ढिगार पडला आणि शंभर हत्तींचं बळ असलेला दुःशासन म्हणे लुगडी फेडता फेडता थकला. अरे तुमची द्रौपदी म्हणजे काय

लुगड्या पातळांचं चालतं बोलतं जिवन्त दुकान होती, का द्रौपदी समजून लुगड्यांच्या लट्ठ गठ्ठ्याशीच पाच भावांनी लग्न लावलं होतं ? चमत्कारांच्या बाजारगप्पांवर तुला लोकमान्य देव बनविताना, कृष्णा, शक्याशक्यतेचाहि तोल तुझ्या बडव्यांना सावरता येऊ नये ?

**कृष्णा :** अरे पण भक्तांच्या पापाचं प्रायश्चित मला काय म्हणून ? छे बुवा, मोठेपणा हे मोठ्ठं पाप आहे. कर्णा, मी का त्या मूर्खांना असं सांगायला गेलो होतो ? राण्डलेक हव्या त्या गप्पा उठवतात नि मला प्रायश्चित ! होतो उद्यापासून मी लहान. त्रास आला या मोठेपणाचा.

**कर्ण :** पण तुझ्या कर्माचं तरी प्रायश्चित तू घेशील का ?

**कृष्णा :** मी नेहमी निष्काम कर्मच करतो. फळाची आशा करीत नाही, तर प्रायश्चित कां ?

**कर्ण :** महायुद्धापूर्वी दुर्योधन आधी आणि त्याच्यामागून अर्जुन, तुझ्या मदतीची याचना करायला गेले. त्यावेळी उशा पायतराच्या बैठकीच्या सबबीवर कौरवांना बाजारबुणग्या यादव सैन्याची आणि पाण्डवाना स्वतः एकट्याची मदत देऊन, तू केवढी दगाबाजी केलीस ? सेनापति पाण्डवाकडं आणि सैन्य कौरवांकडं ! शिराशिवाय धडाचीच देणगी !

**कृष्णा :** अरे पण, '' न धरी शस्त्र करीं मी, गोष्टी सांगेन युक्तीच्या चार '' या अटीवरच ना मी गेलो ?

**कर्ण :** मग, भीष्मानं अर्जुनाला शरविद्ध मूर्छित करतांच, हातात चक्र घेऊन कशाला धावलास त्यांच्या अंगावर ? कृष्णा, मला असली साजिंदे बाजिंदेगिरी साधणार नाही. मी साधासीधा सरळ मनाचा शिपाई गडी. कौरवांचा सेनापति म्हणून आजच्या संग्रामात अर्जुनाला मी ठार मारीन, किंवा मी मरेन. कल्पान्त झाला तरी या निश्चयाचा अणुरेणू आता चळणार ढळणार नाही.

**कुन्ति :** बाळा, लौकिकाची चाड नि जिवाचं भय न बाळगता, इथवर येण्याचं मी धाडस केलं. त्याचं हेच का फळ आईच्या पदरांत तू घालणार ?

**कर्ण :** आई, तुझ्यापेक्षा मला माझ्या शीलाची किंमत अधिक आहे. पाण्डवपक्षपाती कृष्णाच्या भगत बडव्यांनी आम्हा कौरवांच्या बदनामीचा डंका कितीहि पिटला, तरी एक सत्यवादी, सत्यशोधक आणि सत्यप्रतिज्ञ राष्ट्रवीर म्हणूनच मला भारतीय इतिहासात जिवन्त राहायचं आहे.

[ आत नौबदी, कर्णे, तुताऱ्या व शिंगें वाजतात. हातांत चाबूक घेऊन **शल्य** धाईधाईनें प्र० क०]

**शल्य :** कर्णा, किती हा उशीर. सगळ्या सैन्याची तयारी होऊन ते आघाडीला गेलं, तरी अजून तुझा पोषाख नाही ? रथ जोडून तयार आहे, आणि तुझे आवडते पंचकल्याणी अबलक घोडे समरांगणाकडे धाव घ्यायला फुरफुरत एक सारखे थै थै नाचत आहेत. चल चल लवकर. अरे वा ! इथं तर एक मोठी परिषदच भरलेली दिसते. काय, आहे काय प्रकरण ?

**कर्ण :** शल्या, माझ्या विनंतीला मान देऊन माझं सारथ्य करायला तयार झालास, मला फार आनंद वाटतो. [कुन्तीला] मातोश्री, ही पहा सैन्याच्या उठावणीची नौबत झडली. आपण आता रजा घ्या आणि या आपल्या पुत्राला आशीर्वाद द्या. [तिच्या पायावर मस्तक ठेवतो.]

**कुन्ति :** कर्णा, बाळा, तुला काय आशिर्वाद देऊ ?

**कर्ण :** हवा तो दे. मला तो मंगलच होईल. रणक्षेत्री मरणाचा आशिर्वाद दिलास तरीहि तो मी मंगलच मानीन.

**कुन्ति :** बाळ, काय बोलू ? माझ्या काळजाचं काळीज तू ! तुला मी जन्म दिला—

**कर्ण :** आता मरणाचा मंगल आशीर्वाद दे, म्हणजे माझ्या जीवनाच्या दोनीहि टोकाना तू धन्य केलंस, असं मी मानीन.

**कुन्ति :** चिरायु भव. बाळ ऊठ. तुझ्या उदार चारित्र्यानं मला तू अगदी बुळीबावळी केलीस. तुझ्या भेटीची खूण म्हणून माझ्यावर थोडीशी तरी दया दाखव. निःपाण्डवी पृथ्वी करून, या तुझ्या आईला निपुत्रिका म्हणून नरकाची वाट तरी दाखवू नकोस. दानशूरा, एवढी तरी भीक या भिकारणीला घाल.

[पदर पसरते.]

**कर्ण :** ज्या उदरातून हा कर्ण जन्माला आला, ती माझी माता भिकारीण ? कोण म्हणेल ? तुझ्या गर्भवासाच्या श्रीमन्तीनं गर्भश्रीमन्त बनलेला हा कर्ण, तुझी हवी ती इच्छा पूर्ण करील, पण कल्पान्त कोपला तरी पाण्डवांना सामील होऊन दुर्योधनाचा घात मी करणार नाही. [दुर्योधन धावत येऊन कर्णाला कवटाळतो.]

**दुर्यो० :** आणि प्राणान्त होईपर्यंत दुर्योधन कर्णाला अन्तर देणार नाही. अंगराजा, तुझ्या निःस्सीम भक्तीनं आणि उदार चरितानं आज साऱ्या कौरवाना तू धन्य केलंस.

**कुन्ति :** कर्णा, मी जाऊ ना ? मी येताक्षणीच तू दिलेलं पाण्डव-रक्षणाचं वचन फोलच समजायचं ना ?

**कृष्ण :** आत्याबाई, चला परत. कसली वचनं नि कसली दानं. सारी फोल.

**कर्ण :** कर्णाचं दान नि वचन फोल ? शक्य नाही. आई, पुत्रनात्यानं मी तुला एवढीच आश्वासनाची देणगी देतो की, अर्जुन वजा करून मी कोणत्याहि पाण्डवाशी लढणार नाही. जा आता.

**कुन्ति :** युद्धात तुझ्या सामन्याला एकटा अर्जुन टिकणार नाही. मग " कुन्तीचे पाचहि पाण्डव चिरंजीव राहतील " या तुझ्या वचनाची वाट काय ? कर्णाचा शब्द खरा असेल तर माझे पाचहि पाण्डव चिरंजीव राहिलेच पाहिजेत.

**कर्ण :** कुन्तीचे पांच पांडव अखेर जिवन्तच राहणार. आजच्या कर्णार्जुन संग्रामांत मी मेलों, तर तुझे पांच पाण्डव जिवन्त राहतील आणि प्रतिज्ञेप्रमाणे अर्जुनाला मी ठार मारले, तरीहि माझ्यासकट पांच पाण्डवांची माता तू राहणारच आहेस. जा. कर्णाचा बोल फोल होणार नाही.

**दुर्यो व शल्य :** सेनापति अंगराज कर्णाचा जयजयकार !

## अंक २ रा समाप्त.

## अंक ३ रा] [प्रवेश १ ला

[**स्थिति :** एका बाजूने काथ्याची गुण्डी पेटवून, रस्त्यावर काहीतरी हरवलेले शोधीत आहे, असा बेहडा आणि दुसऱ्या बाजूने खाकेत दारूची सुरई लपवलेला हिरडा येत आहे.]

**हिरडा :** बेहड्या बेहड्या हो ऽ ऽ तू. अरेच्चा हा आपल्याच नादात ! शोधतोय तरी काय ? ए बेहड्या ! याच्या कानांनीसुद्धा पाहाण्याचं काम पत्करलंय की काय ? अरे ए बहिऱ्या, कसली मसण–धुण्डाळी चालवली आहेस ?

**बेहडा :** गप बस जरा बाजूला. घात झाला. हरवली. गेली.

**हिरडा :** हरवली ? गेली ? कोण गेली कोण ? आवळकटीच ना ?

**बेहडा :** त्रिफळाचूर्ण झालं तिचं. त्या गप्पाळ गंगेचं नाव काढू नकोस.

**हिरडा :** अरे मग गेली कोण ?

**बेहडा :** तू मधे लुडबुडू नकोस रे बुवा. पायदळी नाहीशी व्हायची. बाजूला हो. डोळे फाडफाडून ताणताणून वासवासून शोधतोय मी. हरवली. घात झाला.

**हिरडा :** अरे पण हरवली काय–कोण, ते तर नीट सांगशील ? नुसतं " हरवली–हरवली " करीत, रस्त्यावर कसला हा तमाशा चालवलाहेस हा ? हे काय, सारे लोक तुझ्या पागलपणाकडं पाहून हासत आहेत.

**बेहडा :** लोकांना हसायला काय ? डोळे आहेत म्हणून पाहतात अन् बत्तिशी शाबूद म्हणून हासतात. माझं नुकसान भरून द्यायला कुणी थोडाच पुढं येणार आहे ! गेली तरी कुठं ?

**हिरडा :** अरे, गेली कोण, ते तर सांग, म्हणजे तुझ्या दोन डोळ्यांच्या दिमतीला माझ्या दोन डोळ्यांची जोडी जोडून, तिचा दुप्पट दुजोऱ्यानं शोध करू.

**बेहडा :** [रडण्याचा गळा काढून] हिरड्या गेली रे गेली, या अभाग्याला याच दिवसांत एकाकी सोडून गेली.

**हिरडा :** [स्व.] याची आई मेली का बायको ? [उ.] जाऊ दे बेहड्या, जग म्हंजे पाण्याचा फुगा–रडू नकोस उगा. तुझी आई मेली का बायको गेली ? ते नीट सांग. म्हंजे ठरावीक सुरात भोकाडा पसरून, मला तुझ्या सुराला सूर देता येईल. सांग, तुझी आई का मेली ?

**बेहडा :** म्हातारी मरता नयेचि तिजला माता मदीया अशी.

**हिरडा :** काय ? मरता नयेचि तिजला ?

**बेहडा :** होयरे बाबा. म्हातारपणामुळं माझ्या आईला मरायची अगदी ताकदच उरली नाही. फार वर्षं जगण्याच्या संवयीमुळं, सफाईत मरायची हिकमत ती अजिबात विसरली आहे.

**हिरडा :** मग कोण तुझी बायको का मेली ?

**बेहडा :** अरे बाबा, मेलास तरी असं बोलूं नकोस. मी मरतो. पण बायको जगू दे. तिला अखंड सौभाग्यवती राहू दे. विधवा म्हंजे मेल्या नवऱ्याचं जिवंत सार्वजनिक स्मारक. ते तरी मला लाभू दे. गेली ऽ ऽ

**हिरडा :** तुझी एकादी बहीण का मेली ? का कुणाचा हात धरून उठून गेली ?

**बेहडा :** बहीण मरती किंवा उठून जाती, तरी हरकत नव्हती. भाऊबिजेच्या छनछनित भवानीसाठी, गावातली हवी ती बया बिनभोभाट गळ्यात येऊन पडती. पण ही–ही–गेली ना !

**हिरडा :** ती गेली मसणांत नि तू जा सरणांत. पण गेली काय कोण ते तर सांगशील ?

**बेहडा :** अरे बाबा, माझ्या एकट्याची जाती तर नसतो मी एवढा रडलो. पण सगळ्या कौरव पाण्डवांची गेली.

**हिरडा :** सगळ्या भरतखंडाची गेली. पण काय गेली ते तर सांगशील मसण्या.

**बेहडा :** तेवढंच नेमकं विसरलो ना मी ? मायाजाळ मोठा कठीण आहे !

**हिरडा :** बेअक्कल गंजड !

**बेहडा :** अक्कल. अक्कल. आठवली रे आठवली. अक्कलच गेली. अक्कल हरवली.

**हिरडा :** अन् हा काथ्याचा काकडा पेटवून, तू अक्कल का शोधीत होतास गंजडा ? अकलेच्या कांद्या, भीष्माचार्य, द्रोणाचार्य, कृपाचार्य असल्या बड्या धेंडांच्याच नव्हे, तर स्वर्ग पाताळ पृथ्वीच्या अकलेचा खजिना, हा बघ, या हिरड्याच्या बगलेत आहे. मागं, कोणे एके काळीं, वाली नावाच्या हुप्या वानरानं, लंकेच्या रावणाला बगलेत मारून,

सात वेळा पृथ्विप्रदक्षिणा केली. तसा हा हिरडा, दुनियेच्या अकलेचा रस्सा, अस्सा बगलेत मारून, या कौरव-पाण्डवांच्या समरांगणावर बेरोजगारीं पण्डितासारखा वणवण भटकत आहे.

**बेहडा :** गि-हाइकच नाही वाटतं ! असणार कुठून ? गांजा तो गांजा. त्याची सर नाही यायची कुणाला. गुंडी पेटवायची थाथड, का ढोरांच्या मढ्यावर जशी गिधाडं, तशी जमलीच भगतांची गोचिडगर्दी. उगाच नाही मुरदंग्याना गांजाची एवढी भक्ति ! चामडं कुठून लाकडाच्या ठोकळ्यातनं बोल काढावे लागतात बोल. धाकिट ताकिट तक-तकधिन धुनुनुनू——

**हिरडा :** कशाला सांगतोस या महामायेपुढं त्या पागल गांजाचीं मिजास. कौरवांचे सेनापति चिलमीत अडकले म्हणून तर हे महायुद्ध. भीष्मद्रोणानी गांजाऐवजी या दिव्य अर्काची आराधना ठेवली असती, तर कौरव-पाण्डवांत तंटाच मुळी लागला नसता. एका घोटात पोटातल्या पोटात जिरता.

**बेहडा :** अरे वा ! हा मोठा कर्दनकाळ अर्क दिसतो.

**हिरडा :** हा असा तसा नाहीं. शिंपीभर अर्कात हण्डाभर पाणी मिसळलं, तर त्या तीर्थाच्या प्राशनानं शंभर टोणगे माकडांसारखा वेदघोष करतात.

**बेहडा :** मग माणसं कसला घोष करतात ?

**हिरडा :** ते सांगण्यापेक्षा ऐकण्यातच खरी खुमारी असते.

**बेहडा :** यंव रे यंव वल्ली. हिरड्या, तू देव आहेस, ब्रह्मदेव आहेस, महादेव आहेस, बापदेव आहेस. दाखव दाखव मला तो अकलेचा अर्क.

**हिरडा :** (सुरई पुढे ठेवतो) अगत्य अगत्य. या पात्राला सुरइ म्हणतात अन् यात जे परब्रह्म आहे, त्याला म्हणतात सुरा.

**बेहडा :** सुरा ? अन् कुणाच्या खुपसायचा तो उरा ?

**हिरडा :** गांजाच्या धुरानं तुझी अक्कल पुरी धुरकटली. ही सुरा म्हणजे खाटकाचा सुरा नव्हे. ही स्त्रीलिंगी. तो असतो पुल्लिंगी. अरे अरे अरे, गंजड लिंगभेदाला सुद्धा पारखेच अं ? अरे शहाण्या, " देवीं दैत्यीं सागरमंथन पैं केलें " तें सुद्धा विसरलास ? सुरा हें त्यांतलं चौथं रत्न.

**बेहडा :** म्हणजे चौदाव्या रत्नाच्या फार पूर्वीचं.

**हिरडा :** बेहड्या, गांजा सोडून तू आता या अर्काची आराधना चालू कर. मी तुझा गुरु न् तू माझा शिसा. आपण गवई नि मृदंगे एक धंदेवाले. दोघानीं सुरेची एकतान उपासना केली तरच आपले जलसे सुरेल रंगतील. मुरदंग्याचा गांजा न् गवयाची दारू,

असला बेताली मामला आता बस्स झाला. मी काशीला नि तूं रामेश्वरला. मी देतो तुला हिची दीक्षा. हिचा एक घोट पोटात जाताच, अकलेचं चक्र भिर्रर्र फिरू लागतं. भूत, वर्तमान, भविष्य आरशासारखं स्वच्छ दिसतं. नामर्द मर्द बनतो. अन् मर्दाची मर्दाई वारा प्यालेल्या वासरासारखी बेफाम भडकते. हिचं आकण्ठ प्राशन करणारा भक्त, वामनाप्रमाणे, तीन पावलात पृथ्वी पालथी घालून, चवथ्या पावलांत बळीप्रमाणं पाताळाचा ठाव घेतो.

**बेहडा :** अरे वा ! ही तर मोठी कडकलक्ष्मी दिसते. आजच कुठून बुवा ही एकदम प्रगट झाली ?

**हिरडा :** गांजा ढोसून ढोसून तुझ्या अकलेला गंज चढला, बेहड्या. ही सुरा मुळची भरतखण्डीच. वेदांच्या पूर्वी हिचा जन्म झाला. फार काय पण, या सुरेच्या सुरांतूनच वेदांची उत्पत्ति झाली. प्राचीन आर्यांनी या सुरेच्या तारेतच आपल्या अकलेची तार मिसळून चार वेदांची पैदास केली.

**बेहडा :** म्हणजे ही देशी देवता आहे.

**हिरडा :** खास स्वदेशी, शुद्ध औरस भारतकन्या.

**बेहडा :** या भारतकन्येचं पाणिग्रहण करण्याचा मान, गुरुराज हिरडेश्वर, या आपल्या शिसोत्तमाला आता द्याच.

**हिरडा :** अवश्य, अगत्य. हे घे पाहिले पात्र. मी म्हणतो मंत्र, तू चालू कर सत्र. "शुभं करोतु कल्याणम्——"

**बेहडा :** हा तर दिवालागणीचा मंत्र.

**हिरडा :** मग चुकलं कुठं त्यात ? सुरा ढोसून अकलेचा दिवाच पाजळावयाचा आहेना ? चल ढकल घशांत. " शुभं करोतु कल्याणम् ! आरोग्यं धन संपदा ! शत्रुबुद्धि विनाशाय ! सुरापानं ढसाढसा " ॥ अझून हातातच ?

**बेहडा :** फार जलाल प्रकरण दिसते रे हे ?

**हिरडा :** हां, चर्चा चिकित्सा न कुर्यात्. एकदम् गटायस्वाहा.

[बेहडा पितो. त्याला ठसका लागतो. हिरडा फुटाणे देतो.]

**बेहडा :** अगदी चरचरत गेली रे ! पण आहे मोठी छान न् रुचकर.

**हिरडा :** ही काही दरबारी छापाची बाजारी नाही. खास गुपचुप घरगुती आहे. हिच्या घोटासाठी मोठमोठे दरबारी महाजन सुद्धा अडल्या नारायणाप्रमाणे, हव्या त्या गाढवाचे पाय धरतात. बाजारी मालापेक्षा घरगुती माल केव्हाहि चांगलाच.

**बेहडा :** आहा ! और आहे बुवा ही वल्ली. माझ्या डोक्यात दिवाळीचा भपका उडाला आहे. कर्ण महाराजानी अर्जुनवधाची प्रतिज्ञा केली. अर्जुनानं कर्णवधाची केली. कौरवानी पाण्डववधाची केली. सगळीकडं वधांचा सुळसुळाट उडाल्यामुळं, कलियुग सुरू झालं कीं काय, या भीतीनं सुन्न झालेलं माझं डोकं खाडकन् ठिकाणावर आलं. आणखी एक पात्र दे. (पितो.) पण काय रे, कलियुग खरंच सुरू झालं नाही ना ?

**हिरडा :** कलियुग सुरू व्हायला अजून पुष्कळ काळ गेला पाहिजे. सिन्धु, गंगा, यमुना, कृष्णा असले मोठमोठाले नद नद्या, पाण्याऐवजी, या दारूनं दुथडी भरून वाहतील, तेव्हा कुठं म्हणे कलियुगाची झुंजूमुंजू होईल.

**बेहडा :** मग मी नाही भीत. या दारूचा पुरवठा तरी गांजासारखा भरपूर राहील ना ? का ही पण त्या आवळकटीसारखी द्यायची हातावर तुरी ?

**हिरडा :** सध्या दारूचं माहेरघर म्हणजे यादवांची द्वारका. सगळे यादव लढाईला आल्यामुळं, द्वारकेला पाण्याच्या मोलानं दारू मोकाट मिळते.

**बेहडा :** मग चल आपण द्वारकेला जाऊ. या कौरव पाण्डवाना मरू दे या कुरुक्षेत्रावर, मधाशी नकुलाचा न् वृषसेनाचा अस्सा सामना झाला—अस्सा सामना झाला—

[आंत :—'' वृषसेन पडला-वृषसेन पडला '' अशा आरोळ्या.]

**बेहडा :** वृषसेन पडला ? खरा मर्द.

**हिरडा :** अँ ? यात कसली आली आहे मर्दाई ? दारू ढोसून पडेल, तो खरा मर्द. लढाईत पडला, तो मेला. ठार झाला. जीव गेला तरी पुन्हा उठायचा नाही. पण या जगदंबेचा भगत, कितीही वेळा पडला, तरी तो उठायचाच—उठलाच पाहिजे. वेदांत म्हटलं आहे-पित्वा पित्वा पुनः पित्वा—कुठपर्यंत ? यावत् पतति भूतले. उत्थायच पुनः पित्वा, नर नारायण होतसे.

**बेहडा :** लढाईत मरणाला मोक्ष नसतोच कारे ?

**हिरडा :** कर्माचा आलाय मोक्ष ! जीव नकोसा झालेले मूर्खच लढायला जातात. वृषसेन पडल्यावर कर्ण महाराजाना जगून काय फायदा ? त्याना लढाईत पडलंच पाहिजे. आता ही महायुद्धाची रेटारेटी हिमालयाच्या पायथ्यापर्यंत जाऊन भिडणार.

**बेहडा :** हिमालय ? हे शहर कोणत्या खेड्यात आहे ?

**हिरडा :** चल मूर्खा, असं दारू ढोसल्यासारखं काय बरळतोस ? हिमालय म्हणजे थण्डगार बर्फाचा एक मोठा डोंगर आहे.

**बेहडा :** तिकडं आपल्याला जावं लागणार की काय ?

**हिरडा :** गाड्याबरोबर नळा नि आची-याबरोबर पळा. तिकडं थण्डी म्हणतात इतकी कडक आहे की, कडोसरीचा रुपया एका रात्रीत आखडून त्याची वालाएवढी चवली होते आणि साठ वर्षाचा म्हातारा थण्डीने आखडून आठ वर्षाचा पोरगा होतो.

**बेहडा :** पुरुषांच्या बायका नाही ना होत ? नाहीतर तिकडच्या दौ-यावरून परतल्यावर, घरच्या संसाराचा पातळ झुणका !

**हिरडा :** अरे ही जलाल जडीबुट्टी जवळ असल्यावर कोण लेक थण्डीची पर्वा करतो. [आंत नौबदी, शिंगे वाजतात]

**हिरडा :** ही पहा नौबत झडली, दौ-याची तयारी झाली. चल ऊठ. (त्याला उभा करतो)

**बेहडा :** (झिंगत उठतो) हिरड्या, मी महायुद्ध आहे, बर्फाचा डोंगर आहे, मी दौरा आहे, नौबत आहे. शंख आहे.–काय रे माझे पाय लटपटतात–का डोकं हवेत गिरक्या खातंय ? घालीन पृथ्वी पालथी, स्वर्गा आणीन वरती––

**हिरडा :** अरे, आता स्वर्गाचे पृथ्वीशी लगीन लागणार आहे लगीन. पाय संभाळ. आस्ते कदम. निगा रखो मेहेरबान.

**बेहडा :** स्वर्ग पृथ्वीच्या लग्नातला मी वरघोडा आहे, वरघोडा.

**हिरडा :** (कान पकडून) या घोड्याची लगाम अश्शी पकडून, तबेल्यात ठाणबंद केला पाहिजे. (ढकलून देतो) दारू खुशाल प्यावी–म्हणून काय इतकी ?

(जातात.)

□ □ □

**अंक ३ रा]** **[प्रवेश २ रा**

[समरांगणाची एक बाजू]

[आंत " वृषसेन पडला " आरोळ्या कर्ण व शल्य प्र.क.]

**कर्ण :** कसला हा गलबला ? कोण पडला ?

**शल्य :** कर्णा घात झाला. आपला वृषसेन पडला.

**कर्ण :** वृषसेन पडला ? माझा युवराज पडला ? शाबास शाबास, लाडक्या जिवा, आपल्या सुतकुलाचा उद्धार केलास.

**शल्य :** कर्णा, यापुढे युद्ध चालवण्यात अर्थ नाही. तुझा निर्देश झाला. महाराणी वसुन्धरेला काय वाटेल ? त्या वृद्ध राधा मावलीला काय वाटेल ?

**कर्ण :** त्यांना काय वाटायचे ? वृषसेन पडला. अर्धा दिवस पाण्डवांतल्या मोठमोठ्या मोहऱ्यांना जेरीला आणून, धारातीर्थात माझ्या आधी मोक्षाला गेला. माझ्या वसुंधरेचा कुसवा धन्य झाला. लेकानी बापावर मात केली. माझ्या वीरश्रीला न् कौरवभक्तीला वृषसेनानं चैतन्याची चांगलीच चपराक हाणली.

**शल्य :** पुत्राच्या मृत्युनं तुला काहीच दुःख होत नाही कर्णा ?

**कर्ण :** अरे, माझा वृषसेन काय दुखण्यानं खितपत पडून बिछान्यात मेला, का आकण्ठ जेवणाऱ्या आधाशी भिक्षुकासारखा ठसका लागून, भरल्या ताटावरून ताटीवर गेला ? कुरुक्षेत्राच्या समरांगणावर, तब्बल पंधरा घटका, घमेण्डखोर पाण्डवांची तिरन्दाजी बोथट पाडून मर्दासारखा समरांगणावर पतन पावला. पुत्रवधाची नुसती बातमी ऐकताच देहभानाला नि कर्तव्याला तिलांजली देणारा द्रोणाचार्य मी नव्हे.

**शल्य :** कर्णा, बाहेरून तू कितीहि विवेक दाखवलास, तरी पुत्रशोकाचं जलाल विष खात्रीनं तुझ्या अन्तर्यामीचं पाणी पाणी करीत असणारच. अशा व्याकुळ मनानं अर्जुनाच्या सामन्याचा चंग बांधण्यापेक्षा——

**कर्ण :** शल्या, हा तुझा प्रश्न नव्हे. तू माझा सारथी आहेस. तेवढं काम उत्तम कसोशीनं बजाव, म्हणजे झालं. इतर बाराबत्तल गोष्टींची चर्चा करू नकोस.

**शल्य :** कर्णा, तुझा आत्मविश्वास मला फाजील दिसतो. गर्वाचं घर खाली, ही म्हण विसरू नकोस.

**कर्ण :** पुढारलेल्या धमेण्डखोरानीच मागासलेल्या गोरगरिबांसाठी, असल्या म्हणी चलनी केल्या आहेत. सुखदुःखाची नि यशापयशाची वान्झोटी बडबड निष्क्रीय दैववाद्यांनी करावी. स्वतःच्या पोटचा गोळा, समरांगणावर, मर्दाच्या मरणानं मोक्षाला गेलेला पाहून, वीर पित्याला न् वीर मातेला केवढा ब्रह्मानंद होत असतो, याची कल्पना, यशापयशाची चिन्ता करणाऱ्या भ्याडांना असणार कुठून! चामडी बचावून कसे तरी जगण्यापलीकडे ज्याना विशेष काही कर्तव्य नाही, नव्हे, काही करण्याची अक्कलच नाही–असल्या शेन्दाड षण्ढांनी महत्त्वाकांक्षी मर्दाच्या अपयशांत नि मरणात सुद्धा समाधानाचा काय मोक्ष असतो, याचा ठाव घेण्याची खटपट करू नये.

**शल्य :** कर्णा, कृष्णार्जुनाशी समोरासमोर सामना भिडला नाही, तोवर या जम्बुकी वल्गानाना किंमत.

**कर्ण :** कृष्णार्जुनाचा दरारा तुझ्यासारख्या दुटप्पी दुतोण्ड्यांना. मला नाही.

**शल्य :** अपयशाची बोहणी झालीच आहे. आता लवकरच अधःपाताचा दणका बसला कीं ब्रह्मांड आठवेल.

**कर्ण :** कौरवांच्या सेनापतीचा सारथीच ही बडबड करीत आहे का ? तुझ्या जागी जर दुसरा कोणी असता तर शल्या, त्याचा शिरच्छेद करूनच मी कृष्णार्जुनाशी भिडलो असतो समजलास ? अरे अधःपाताचा दणका सहज लीलेनं झेलायला छातीसुद्धा तशीच कणखर लागते. शल्या, मला माहीत आहे, आज सकाळपासनं हवी तशी उणीदुणी भाषणं बोलून, माझा तेजोभंग करण्याचा सारखा अट्टहास तू करीत आहेस. पण लक्षात ठेव, श्रीकृष्ण यादवाच्या या पाताळयन्त्री कारवायीला बळी पडणारा पिठाचा पुतळा हा कर्ण नव्हे. अरे, तेजोभंग आम्हा सूतादि शूद्रजनांच्या पाचवीलाच पुजलेला ! त्याच्या टचक्यानं पिचणारी आमची हृदये, म्हणजे छेलछबेलीच्या हातातल्या बांगड्या समजतोस की काय ? तू आपलं सारथ्यकर्म कौरवांच्या मिठाला जागून चोख करून दाखव. कर्णाच्या किंवा महायुद्धाच्या भवितव्याचा वान्झोटा उपद्व्याप सोडून दे. प्रतिपक्षाच्या न् निन्दकांच्या बऱ्यावाईट अभिप्रायावर महत्त्वाकांक्षी मर्द आपल्या कर्तव्यनिष्ठेची पावलं मागंपुढं चाळवते, तर शल्या, आजला ही दुनिया माणसांऐवजी कृमिकीटकांच्या सुळसुळाटाची मसणवटी बनली असती.

[आत नौबदी, शंख, शिंगे वाजतात. सैन्याचा गलबला, **कृष्ण.** '' तो पहा– अर्जुना, तो पहा, कर्ण तिकडं आहे. कर्णा चल हो तयार अर्जुनाशी सामना द्यायला. '']

**कर्ण :** हां हां कृष्णा, हा कर्ण तुमचीच वाट पहात आहे. येऊ दे तुझ्या अर्जुनाचा पहिल्या प्रणिपाताचा बाण–

**वांकिव धनुला चढवि बाण आकर्ण ओढि प्रत्यंचा ।**
**प्रहार पहिला मज आवडतो अतिशय मर्द रिपूचा ॥**
**कारण माझा काळबाण सुटतांच रिपूचें स्थान ।**
**क्षणांत होईल भस्म तयाचें कसलें मग अवसान ॥**

[आतून बाण येतो]

–– शाबास– आता पहा या कर्णाचा पराक्रम. शल्या, चल, भिडव आपला रथ कृष्णार्जुनाच्या रथाशी.

**शल्य :** आज्ञा प्रमाण.

[दोघे जातात.]

□ □ □

अंक ३ रा] [प्रवेश ३ रा

[समरांगणाची दुसरी बाजू]

[श्रीकृष्ण आणि अर्जुन प्र.क.]

**कृष्ण :** अर्जुना, पाहिलास ना कर्णाचा पराक्रम ?

**अर्जुन :** कृष्णा, सारथ्यकर्माची आज तू कमाल केलीस. कर्णाच्या बाणाचा वेध न् वेग ओळखून, चटकन् आपला रथ जमिनीत तू दाबला नसतास, तर माझ्या किरिटाऐवजी हे शिरकमलच त्यानं उडवलं असतं.

**कृष्ण :** आणि तुझ्या वधानंच या महायुद्धाचा शेवट आत्ताच लागला असता. पण जोवर मी आहे तोंवर तुम्हा पाण्डवांना कशाचीही भीति नाही. अर्जुना, युद्धनीतीची सूत्रं हालवताना माझ्या वर्तनांत पुष्कळांना धरसोडपणा किंबहूना धडधडीत खोटेपणा सुद्धा दिसून येईल. पण जगण्या मरण्याचा निर्णय ठरवणाऱ्या युद्धात, 'सत्यंवद' 'धर्मंन्चर' असल्या लौकिकी नीतीचा उपयोग करून भागत नाही. शठंप्रति शाठ्यम्सेच काय, पण सत्यमप्रति शाठ्यम्चाही टणत्कार करून विजय मिळवावा लागतो. कौरवांशी सरळ धर्मयुद्धाचा सामना देण्यात पाण्डवांचा टिकाव मुळीच लागला नसता, अन् यापुढं तो लागणारहि नाही. शत्रू अडचणीत सापडलेला पाहूनच त्याला गारद करण्यांत—

**अर्जुन :** पुरुषार्थ कसला?

**कृष्ण :** पुरुषार्थ नसला, तरी कार्यार्थ साधत असतो ना? कार्यसिद्धि झाल्यावर साधनांच्या बरेवाईटपणाची चौकशी कोण कशाला करतो?–(दूर पाहून) अर्जुना-अर्जुना, कर चपळाई. ते पहा, कर्णाच्या रथाचं चाक जमिनींत रुतलं, पृथ्वीनं गिळलं, तो पहा शल्य न् कर्ण रथावरून खाली उतरून, चाक बाहेर काढण्यासाठी खेचाखेची करीत आहेत. हां! पाहातोस काय तोण्डाकडं? सोड बाण न् कर कर्णाला ठार. उशीर लाऊ नकोस. चल आटप.

**अर्जुन :** काय? कर्ण गैरसावध असता, त्याच्यावर मी शरवृष्टि करू? असलं कृत्य पाहून देव-दानव मानव माझी आचन्द्रार्क निन्दाच करतील.

**कृष्ण :** आलं का मोहाचं ढगार पुन्हा तुझ्या मनावर ? फुकट फुकट तुला इतका गीतोपदेश केला नि आत्तापर्यन्त सावरून धरला. मुर्खा, कर्ण तुझा शत्रु. त्याला ठार मारणं, एवढाच तुझा धर्म. अशा प्रसंगी निन्दास्तुतीच्या बुजगावण्याना भिऊन, कर्तव्यच्युत होतोस ? ते काही नाही. कर्णाला याच अवस्थेत तुला ठार मारलं पाहिजे.

हा मोका गमावलास नि कर्ण रथारूढ झाला, तर अर्जुना, लक्षात ठेव, त्याच्या कोदण्डाचा टणत्कार इन्द्राच्या वज्राचेही खडपे खडपे उडविल्याशिवाय रहाणार नाही. चल, चढव धनुष्यावर बाण न् **मी** सांगतो म्हणून ठोक त्यावर दिव्यास्त्र.

**अर्जुन :** कर्णा, सांभाळ. हा पहा आला माझा बाण.

[ आत **कर्ण--** पार्था, पृथ्वीनं गिळलेलं माझ्या रथाचं चाक बाहेर कढण्यात मी गुंतलो आहे. तेव्हा क्षणभर थांब. मला रथावर आरूढ होऊ दे. मग खुशाल चालू दे तुझी अस्त्रवृष्टि. पण अडचणीत सापडलेल्या निःशस्त्र शत्रुवर बाण सोडणं, हा क्षत्रिय बाण्याच्या तोण्डाला काळं फासणारा अधर्म आहे. तो तू करू नकोस.]

[ '' हा अधर्म होत आहे '' असा आत ओरडा ]

**कृष्ण :** राधेया, आता तुला धर्माची आठवण झाली काय ? नीच पुरुषांना व्यसनातिरेकाच्या प्रसंगीच धर्माची आठवण होत असते.

[ अस्तन्या वर सारलेला कर्ण प्र. क.]

**कर्ण :** नीच पुरुष ? कोण नीच पुरुष ? रथाचं चाक बाहेर काढण्यात आम्ही दोघे गर्क असता, आमच्यावर शरसंधान रोखण्याचा सल्ला देणारा नीच, का क्षत्रियोचित धर्मयुद्धाची मागणी करणारा नीच ?

**कृष्ण :** युद्धधर्मात लौकिकी धर्माला जागा नसते.

**कर्ण :** ही कृष्णनीति असेल, पण ती तुझ्या रंगा नावांसारखीच काळीकुट्ट म्हणून विचारी सज्जनांच्या निन्देलाच पात्र होणार. अर्जुनासारख्या धनुर्धरानं धनुर्धराशी सामना द्यावा. मला माझा रुतलेला रथ चालता करू दे. माझं धनुष्य मला हाती घेऊं दे. मग पाहून घेऊ आम्ही एकमेकाला. पण मी नि माझा सारथी रथच्युत असता, आमच्यावर शरसंधानाची चिथावणी देतोस ? हा कोणता नीतीचा धर्म ? शरम् वाटली पाहिजे कृष्णा तुला.

**कृष्ण :** धर्मावरच येऊन भिडलास, म्हणून विचारतो. कर्णा, अक्षविद्येत अनभिज्ञ अशा धर्मराजाला शकुनीनं द्यूताचं पाचारण केलं आणि त्याला फसवलं, त्यावेळी तुमचा धर्म कुठं गेला होता ?

**कर्ण :** तुमच्या धर्माची अक्कल कुठं गेली होती ? अक्षविद्येत आपण ढ आहोत, हे जाणून बुजून पाचारणाचा स्वीकार केला कशाला धर्मानं ? पोहता येत नाही त्यानं पाण्यात पाऊल टाकावंच कशाला ?

**कृष्ण :** बारा वर्षे वनवास नि एक वर्ष अज्ञातवास भोगल्यावर सुद्धा, पाण्डवाना त्यांचं राज्य न देण्याचा तुम्हा कौरवांचा हट्ट, हा देखील धर्मच होता नव्हे का ?

**कर्ण :** राजसंन्यास करून वनवास पत्करणाऱ्या पण्डूच्या नियोगाच्या संततीला कसला आला राज्याचा वारसा ? भारत सम्राटाची राजगादी म्हणजे काय ओसाड गावची धर्मशाळा समजता ? हवे त्याने यावे न् बि-हाड थाटावे ? वनवासाच्या,

संन्यासाच्या न् उपासतापाच्या पुण्याईनं राज्यप्राप्तीचे मुकाबले फडशा पडते, तर कृष्णा, हिमालय पर्वतावर भटकणारे सगळे जोगडे आज भारतसम्राट म्हणून मिरवते.

**कृष्णा :** सूतपुत्रा, वारणावतामधे पाण्डवाना लाक्षगृहात जिवन्त जाळण्यासाठी, कर्णा, तूच नाही का काकडा पेटवलास ? त्यावेळी तुझा धर्म कुठं गेला होता ?

**कर्ण :** अरे, एकदा शत्रु ठरल्यावर त्याचा हवातसा विध्वंस करावा, हा तुझ्याच गीतेच्या कृष्णानीतीचा पुरावा ! एकाच तोण्डाने नीति अनीतीचे सर्दगरम सुस्कारे सोडताना, कृष्णा, तुला तरी खऱ्याखोट्याची चाड राहिली आहे कारे ? तर मला मोठ्या धर्माच्या गोष्टी शिकवतोस?

**कृष्णा :** रजस्वला. द्रोपदीला दुःशासनानं भरदरबारात फरफटत ओढीत आणली, त्यावेळी तू मोठ्यानं खदखदा हसलास. त्यावेळी तुझा धर्म कुठं गेला होता.

**कर्ण :** धटकेत तुझे तेरा रंग ! कृष्णा, काल रात्रीची शिष्टाई विसरलास वाटतं इतक्यात ? मी कुणाचा कोण, हे तुला माहित आहे. अस असताना सुद्धा, त्या दगलबाज द्रौपदीनं, अखिल भारतीय क्षत्रियांसमोर, स्वयंवर प्रसंगी '' सूतपुत्र-सूताधम '' अशा कचकचीत शिव्या देऊन माझा तेजोभंग केला, तेव्हा तुम्ही सगळ्यांनी बत्तिशी वासून हासण्याचा खोकाट केलात, तो अगदी गाळीव धर्माच्या साच्यातलाच होता, नाही का?

**कृष्णा :** सगळे पाण्डव आता भिकारी झाले, कायमचे नरकात पडले, तेव्हा द्रौपदी, तू आता दुसरा नवरा कर, असा टोमणा देताना, कर्णा, तुझा धर्म कुठं गेला होतारे?

**कर्ण :** त्या पाच नवऱ्याच्या पतिव्रतेनं आणखी एका जादा नवऱ्याचं पाणिग्रहण केलं, तर त्यात काय धर्माला एवढी ग्लानी येती? द्रौपदीनं या कर्णालाहि नेत्रकटाक्षाची मोहनी घालायला सोडलं नव्हतं, हे कृष्णा तुला चांगलं माहित आहे. शिवाय एक हौशी उमेदवार म्हणून धनुर्विद्येची परीक्षा द्यायला, मी प्रथम रंगभूमीवर पाऊल ठेवलं, त्यावेळी ' तुझा बाप कोण? तुझा बाप कोण?' म्हणून कलकलाट करणाऱ्या या तुझ्या पाण्डवांना लाज नाही वाटली. अन् आता मोठी धर्माची पुराणं सांगता! गोकुळातल्या गौळणींना बासरी वाजवून नादी लावणाऱ्या कान्होबानं तरी स्त्रीदाक्षिण्याच्या वल्गना करू नये.

**कृष्णा :** माझ्या स्त्रीदाक्षिणाचं रहस्य उमगायला फार युगं लोटली पाहिजेत.

**कर्ण :** प्रत्येक भोन्दू नि लफंगा याच विधानावर आपल्या बुवाबाजीचा बाजार थाटीत असतो.

**कृष्णा :** परवा चक्रव्यूहामध्ये तुम्ही सर्व महारथ्यानी अभिमन्यूला एकटा गाठून ठार मारला. हा तुमचा धर्म झाला काय?

**कर्ण :** तो तरुण मर्द निधड्या छातीने, चक्रव्यूह फोडीत धडाडीनं पुढं जात असता, त्याच्या पाठीशी सैन्याची कुमक न पाठवता, तुझे सगळे पाण्डव व्यूहाच्या बाहेर मजा पहात स्वस्थ बसले, हा काय त्यांचा धर्म, युद्धकौशल्य का शहाणपणा?

**कृष्णा** : पण तुम्ही तर त्याला एकटा गाठून ठार मारलात ना!

**कर्ण** : ते आमचं कर्तव्यच होतं. पण त्यासाठी इतकी हातबोटं चोळायला काय झालं? माझ्या वृषसेनाला आत्ताच, अगदी थेट तस्साच—नाहीत का तुम्ही मारलात.

**कृष्णा** : दाताला दात नि डोळ्याला डोळा, असा सूड आम्ही घेणारच.

**कर्ण** : केवळ सूडाची भावना बाळगणारानी तरी धर्माधर्माच्या बाष्कळ बाता मारू नये. त्या सिंहाच्या छाव्यानं तब्बल पन्धरा घटका तुम्हाला दे माय धरणी ठाय केलं, आणि अखेर त्याचा वध करायला पाचहि पाण्डवाना आपली युद्धशक्ति एकवट खर्ची घालावी लागली ना! मग मी नाही कुठं तुमच्यासारखी बायकी तक्रार केली ती, का माझ्या युवराजाला तुम्ही एकटा गाठून ठार मारलात म्हणून? हे युद्ध आहे, महायुद्ध आहे, ते जिंकण्याची प्रत्येक पक्ष शिकस्त करीत आहे. त्यात अमक्याला अछं मारलं न् तमक्याला तछं मारलं, या लौकिकी रडगाण्याचे सूर दगलबाज धोडेहाक्याच्या तोण्डातच छान शोभतात.

[आत-**शल्य** : कर्णा, चल लवकर परत ये. हे पहा मी तुझ्या रथाचं चाक बाहेर काढलं.]

**कर्ण** : शाबास शल्या शाबास! हा पहा आलोच मी. कृष्णा, तुला निक्षून सांगतो, तुझ्या कपटनीतीच्या भांडवलावर पाण्डवानी जयश्री मिळवली, तरी अखेरीला हे कृष्णानीतीचं भाण्डवल त्यांच्या सार्वभौम सत्तेला कीड लावल्याशिवाय राहाणार नाही, हे लक्ष्यात ठेव.

**कृष्णा** : भविष्याची वाटाघाट आत्ताच कशाला? ते आमचं आम्ही पाहून घेऊ.

**कर्ण** : ठीक आहे. भविष्य तर पहालच, वर्तमान आत्ताच दाखवतो. शल्या, चल आण या बाजूला माझा रथ. कृष्णा, आत्ता मी रथारूढ होतो नि धनुष्य हाती घेतो. मग येऊ दे तुझ्या अर्जुनाची शस्त्रास्त्रवृष्टी. पाहून घेईन.

[जातो.]

**कृष्णा** : अर्जुना, पाहातोस काय? रथारूढ होऊन, कर्ण धनुष्याला भिडला नाही, तोच सोड तुझे राखीव दिव्यास्त्र, शाबास! [अर्जुन दिव्यास्त्र सोडतो. मोठा आवाज होतं. " कर्ण पडला " असा आत ओरडा होतो. बावरलेली कुन्ति येते.]

**कुन्ति** : कर्ण पडला? कर्ण पडला? कृष्णा, कर्ण असा इतक्यात कसा रे पडला!

**कृष्णा** : आत्याबाई, लढाईच्या रणधुमाळीत तुम्ही कशाला आलात?

**कुन्ति** : अरे पण तो रथावर सुद्धा चढला नव्हता?

[चवताळलेला शल्य प्र० क्र०]

**शल्य :** कुन्ति, धिक् तुझ्या पाण्डवांच्या क्षात्रधर्माला! कर्ण रथच्युत आणि निःशस्त्र असतानाच, अर्जुनाने अस्त्र सोडून त्याचा वध करावा? कौरवांचे सेनापति दगाबाजीच्या कपटनीतीनंच ठार मारून मिळणारा विजय तुमचा तुम्हालाच लखलाभ असो. धिःक्कार, कृष्णा, धिःक्कार तुझ्या युद्धनीतीला!

**कुन्ति :** कर्ण निःशस्त्र असता त्याचा वध झाला ? कृष्णा, तू जवळ असता अशी नामुष्कीची गोष्ट कशी रे झाली ?

**कृष्ण :** आत्याबाई, हे युद्धशास्त्रातले डावपेच तुम्हा बायकांना नाही उमगायचे.

**कुन्ति :** पण या डावपेचानी कृष्णा अखेर पाण्डवांच्या बन्धुधर्माला नि क्षात्र धर्माला काळोखी आणली नि मरेपर्यन्त या अभागी कुन्तिच्या आतड्यांत पुत्रशोकाची धुसळण घातली !

**अर्जुन :** पुत्रशोकाची धुसळण ? आई, म्हणतेस काय तू ?

**कृष्ण :** अर्जुना, कर्ण हा तुम्हा पाण्डवांचा श्रेष्ठ बन्धू, पहिला पाण्डव. युधिष्ठिराच्या जन्मापुर्वीच या कुन्तिचा कुसवा धन्य करणारं टाकलेलं पोर.

**अर्जुन :** अरे पण कृष्णा, हे आधी का नाही आम्हाला तू सांगितलंस ?

**शल्य :** त्याला दाणे टाकून कोंबड्या झुंजवायच्या होत्या ना ?

**कृष्ण :** कोंबड्या झुंजवायच्या नव्हत्या, समाजाच्या विकल्पाना तोंड द्यायचं होतं अन् पुरस्कार केलेल्या पाण्डवांच्या महत्त्वाकांक्षा सिद्धीला न्यायच्या होत्या.

**अर्जुन :** अरे, पण हे रहस्य आम्हाला आधीच कळतं, तर वडील बन्धूचा असला अधर्मवध करायचं पातक, कृष्णा, तुझ्या आग्रहानं सुद्धा मी खास खास केलं नसतं.

**कुन्ति :** शल्य दादा, माझ्या बाळाचं शेवटचं दर्शन तरी मला अभागणीला घडेल का रे?

**शल्य :** कुन्ति ताई, आत्म्याची दिव्यज्योत विझालेल्या त्या धनुर्धराच्या शवाचं नुसतं दर्शन घेण्यात काय अर्थ! कुन्ति, तुझं टाकलेलं पोर पाण्डवांच्या कपटनीतीला बळी पडलं! तुझा युवराज गेला.

**कुन्ति :** माझा बाळ गेला? गेला? मला न विचारता गेला? कसा जाईल? नाही जाणार! नाही जाणार ! त्याच्या उदार हृदयाची अथांग श्रीमन्ती शल्यदादा, नाही या अभागी मातेशी अशी प्रतारणा करणार! जा–पहा पहा– माझ्या भेटीसाठी माझ्या बाळाचा प्राण खास धुटमळत असला पाहिजे. दादा, दादा, जा हो कुणितरी माझ्या कर्णाला इकडे घेऊन या. का मीच जाऊ प्रेतांच्या राशी तुडवीत त्याच्याकडं? मीच जाते.

**शल्य :** ताई थांब, मीच त्याला इकडं आणवतो. [जातो]

**कुन्ति :** जा जा लवकर जा. या अभागणीनं जन्म देऊन, माझ्या बाळाला दुधाचा एक थेंबसुद्धा हो नाही कधी पाजला. माझे दोन अश्रुबिन्दु तरी अखेर त्याच्या तोण्डांत पडू द्याहो! अर्जुना-कृष्णा, कसलारे प्रसंग आणलात या कुन्तीवर!

**कृष्ण :** आत्याबाई, स्पष्ट बोलतो त्याचा राग नका मानू. लौकिकाला न् समाजाच्या विकल्पाला वचकून, पोटचं पोर टाकण्याचा अत्याचार, अखेर केवढा भयंकर परिणाम करतो, हे स्त्रीजातीच्या मातृहृदयी मनावर बिम्बवण्यासाठी तुझा अवतार, आणि मागासलेल्या समाजांचा उद्धार करणाऱ्या स्वयंप्रकाशी वीराला, किती विरोधांना तोंड देऊन पुढं यावं लागतं, याचा दाखला जगाला पटवण्यासाठी या वीरमणी धनुर्धर कर्णाचा अवतार! आत्याबाई, कर्णाच्या सर्वांगसुन्दर चारित्र्याचा मला मुळीच आदर वाटत नाही, अशी का तुमची समजूत आहे?—मोठा अभिमान वाटतो. महाभारतीय युद्धाचा इतिहास जरी कायमचा नष्ट झाला, तरी उदारधी धनुर्धर कर्णाचं चरित्र मागासलेल्या न् पददलित अखिल मानवजातींच्या उद्धारासाठी आपल्या देदिप्यमान तेजानं शुक्लेन्दुवत् प्रज्वलितच राहील.

[ " धनुर्धर अंगराज कर्णाचा जयजयकार " अशा गर्जनात मूर्च्छित कर्णाला सेवक घेऊन येतात, शल्य येतो. कुन्ति त्याचे मस्तक माण्डीवर घेते.]

**कुन्ति :** बाळा कर्णा—बोल माझ्याशी एक शब्द तरी बोल रे. ते पहा तुझे ओठ हालताहेत. ' आई ' अशी शेवटची एक तरी हाक मार रे.

**कर्ण :** आई! अधर्मयुद्धानं माझा वध होत आहे. हे तुझं टाकलेलं पोर तुझ्या अंकावर मरत आहे. एवढंच समाधान! ॐ शांतिः शांतिः शांतिः

**कृष्ण :** धारातीर्थी पतन पावलेल्या धनुर्धर कर्णाला श्रीकृष्णाचा पहिला प्रणिपात.

**सर्व :** अंगराज कर्ण महाराजांचा जयजयकार! (त्रिवार)

**ॐ शुभम् भवतु**

# नाटकाची पद्य-पुरवणी

[प्रयोगात अधून मधून पदे असावी, असे ज्याना सोयीस्कर वाटत असेल, त्यांच्यासाठी ही व्यवस्था केलेली आहे.]

(पडद्यांत गावयाची नान्दी.)

(भूप-झपताल.)

हरित हरि दुरित-नग करूनि जय मंगला ।
पांडवारी खलुनि देइ यश वांछिता ।।धृ.।।
देवता अंबिका पार्थ-शर चेतना ।
सारथी हरि रणीं म्हणुनि रिपु भंगला ।।१।।

[ठाकरे]

[हिरडा गात प्रवेश करतो. अंक १, प्रवेश २, पान १३१]

(लावणीमिश्र कटाव.)

हिरडा :-

फुका मरति संगरी धडाधड बुळे बावळे खुळे ।
हे मर्द कशाचे ? तत्वमसि न त्या कळे ।।
सखिविण क्षणभर । राहि नच प्रियकर ।
संताप विरह दे सदा । नामर्द संगरी फिदा ।।१।।
माझ्या जिवा प्रेमाचा चटका । मी मर्द नव्हे मुळिं लटका
नजरेचा लागला झटका ।। गहिरी नजर, करि जवान
जर्जर, क्षणांत रससंगरीं । घेणार उडी बेफाम पृथ्वि
सम्राट सखी जिंकुनि ।।२।।

[ठाकरे]

---

[पान १३७, हिरडा बेहडा जाताना त्रिवर्गांनी म्हणावयाचें पद]

आवळकटी :—

खरतर शल्यें । टोंचुनी शरिरीं । निज मनि देइल मोद।
हिरडा : मधुरशा सुखवशा बाला ।।
आवळ० :
भुलवुनि अति रमणा । रुचत मना । फसवुनि प्रणया ।
सुखद मला गमते । जगीं तें ।।
हिरडा० :
कुणा न रमवी । जगांत रमणी । जोडवी जन सगळे । साचे ।।

आवळ० : छंद सारा

हिरडा० : जीव धाला

आवळ० : जात विलया

हिरडा : शीण सगळा हा

हि० आ :—

चला चला । तयार व्हा । विवाह ये सुखवाया । आतां ॥ १ ॥

[ कवि कै. मानकर.]

[पान १४७, ओळ ५, हिरडा—' काय त्याची तारीफ करावी ? ' यानंतर—]

हिरडा :— [राग बिहागडा]

अरसिक हे गायनास । विटत सतत । विकल होत गाना ।

सुखवित परि । रसिक सकल । मधुर गोड ताना ॥ धृ० ॥

पुनित करित भावनांस । विरुनि जात वासना । वितरत

मधु स्वर सुखदा ॥ १ ॥

[ —मानकर.]

—

[ पान १५५, ओळ १२ ' कबूल, कबूल, कबूल ' नंतर हिरड्याचे पद.]

हिरडा :—

तव पण हा । जिंकुनिया । बघ सखी । तव कर घेईन हा ॥

आवळ० : प्रणाम तव शिर करि पदीं या ॥

हिरडा :

प्रणय फुलां । गुंफुनिया । तुला वाही सजणे सदा ॥ १ ॥

[ —मानकर.]

— —

पान १६७, ओळ २, कुन्ती :—' म्हणून कां माझा राजहंस

[ माझ्यावर रागावला आहे ' यानंतर—]

कुणा कळावा । कुणा दिसावा । मम हृदयीचा बाळ विसावा ॥ १ ॥

अनुढा माता । ठरते पतिता । समाजबंधनीं । तिज ना त्राता ।

मातृस्तनीं या फुटला पान्हा । कुठले कौतुक । त्यजिला तान्हा ॥ २ ॥

[ —मानकर.]

—

[ पान १७४, हिरडा— ' पागलपणाकडं पाहून हासत आहेत ' नंतर—]

हास जरा वा नाच जरा । शीळ जरा लल्कार ।
हलका कर हासून पुरा । जगण्याचा जडभार ॥
हसणारा हसविल दुनिया । रडणारा रडवील
दुक्खावरतीं पसरिल छाया । हसणारे सत्शील ॥
श्रम थोडे वेतन थोडें । बाकीच्या संतोष ।
रम्यतेंत कर मन वेडे । त्यांतच हो बेहोष ॥
असतां असतां हासच अथवा । हसता हसता डोल ।
आनंदाचा असला ठेवा । हें जगण्याचे मोल ॥

[ कवि ' आनंद ' चिपळूण. ]

[ पान १७६, ओळ १७. हिरडा— ' खरी खुमारी असते ' नंतर—]
हिरडा :—

जगीं मोहवाया । सुरा दे विधाता । सुखा या सुधारा ॥ धृ० ॥
सुरासुरां प्रिय ही मदिरा । मधुरस खुलवित । झुलवित
मम मन ॥ १ ॥

[ —मानकर.]

अथवा हे पद. [ चाल—जो पिया आया०]

मधुर वारुणी । स्वर्ग—सौख्यास देइं नरा प्राशनीं ।
तरुण जाया युवा जैं प्रिया ही जनीं ॥ धृ० ॥
निधी-मंथनीचे अमृत त्या शक्ति नसे ॥
सुरा मुक्ति तरां देइ करा श्री भासे ।
तरुणि-नयना हिची उपमा । कवि-कल्पना देतसे जनीं ॥ १ ॥

[ ठाकरे]

□ □ □

# काळाचा काळ

(ऐतिहासिक गद्य नाटक)

— लेखक —

प्रबोधनकार ठाकरे

# काळाचा काळ



## अंक पहिला.

(स्थळ, स्थिती नि पात्रे : चितोड किल्ल्यातील श्री अेकलिंगेश्वराचे देवालय. पूजा आटोपल्यावर पुजारी आणि अितर लोक आरती करताहेत.)

जटा भुजंग पिंगलत् स्फुरत्फणा मणिप्रभा
कदम्ब कुंकुमद्रव प्रदिप्त दिग्वधूमुखे
मदान्ध सिन्धुरस्फुरत् त्वगुत्तरीय मेदुरे
मनोविनोदमद्भुतम् बिभर्तु भूत भर्तरी
अगर्व सर्व मंगला कलाकदम्ब मंजरी
रसप्रवाहमाधुरी विजृम्भणा मधुव्रतम्
स्मरांतकम् पुरांतकम् भवान्तकम् कृतान्तकम्
गजान्त कान्ति कान्तकम् तमान्तकान्तकम् भजे
जयत्वदभ्र विभ्रम भ्रमद् भुजंग मत्स्फुरत्
धगत् धगत् विनिर्भ्रमत् कराल कोल हव्यवाक्
धिमित् धिमित् धिमित् ध्वनन् मृदंग तुंग मंगलत्
ध्वनिक्रम प्रवर्तित प्रचण्ड ताण्डवः शिवः

(आरती पुरी होत असतानाच सरदार जयपाळ दर्शनाला येतो. अेक भटजी घाअीघाअीने पुढे होअून त्याला आरती दाखवतो. जयपाळ आरतीत मोहोर टाकतो. भटजी आशीर्वाद गुणगुणतो. चिरंजीव भव, विजयशाली भव.)

**सर्वजण ओरडतात०**——श्री अेकलिंगेश्वराचा जयजयकार. चितोडाधिपति बनबीर महाराजांचा विजय असो.

(देवळापासून दूर अंतरावर बसलेला, दाढीमिशांचे जंजाळ वाढलेला, फाटके तुटके कपडे घातलेला हमीर कर्कश आवाजात गर्जना करतो०——त्याचा सत्यानाश होवो. दुसऱ्यांदा जयजयकार होताच पुन्हा ओरडतो० त्याच्या तोंडात माती पडो. ते आवाज़ अैकताच सारे चकित होतात आणि अिकडे तिकडे पाहू लागतात. जयपाळाला तो दिसतो. झपाट्याने तो त्याच्या जवळ जातो.)

**जयपाळ०**——हा कोण वेडापीर अिथं आलाय ? चितोडच्या महाराजाना जयश्री चिंतन करतांच, याच्या कां कपाळाला आठ्या ? (हमीर पुन्हा हातबोटे चोळीत दात खात तेच निषेधाचे शब्द अुच्चारतो.) पुन्हा तेच ? काय रे ? कोण तूं ? आमच्या बनबीर महाराजांचं नांव काढतांच.......

**हमीर०**——त्याचा सत्यानाश होवो............ त्याचे कोळसे हावोत......... त्याच्या तोंडात माती पडो.

**जयपाळ०**——(तलवार अुपसून) चूप रहा बेशरम. राजद्रोही.

**हमीर०**——राजद्रोही ? (अुठून समोर येतो.) कोण राजद्रोही ? तूं राजद्रोही............ तुम्ही सारे राजद्रोही.

**जयपाळ०**——(त्याला ओळखून) कोण ? माझा मित्र हमीर ? काय रे वनवासामुळे तुझी स्थिति झाली ही. ये..... ये....... मित्रा, मला कडकडून भेट दे. (त्याला भेटायला पुढे होतो.)

**हमीर०**——हां खबरदार मला शिवशील तर, वनवासानं मला प्रेतकळा आलेली असली, तरी हरामखोर धन्याची सेवा करणाऱ्या गुलामांच्या भपकेदार पोषाकाचं पाप मला मुळीच परवडणार नाही.

**जयपाळ०**——हमीर, या पोषाकावरून माझ्या अंतःकरणाची...... त्यात रात्रदिवस धगधगणाऱ्या विवंचनेची...... किंमत करण्याचं धाडस करतोस तूं ? मोठी चूक करतो आहेस तूं. या पोषाकाच्या आत हमिराच्या शुद्ध अंतःकरणासारखं स्वदेशनिष्ठ नि स्वराज्यनिष्ठ अंतःकरण धडधडत आहे.

**हमीर०**——बस् कर तुझ्या स्वदेश नि स्वराज्यनिष्ठेच्या वल्गना. बाप्पा रावळाच्या तेजाचं, कुंभाराण्याच्या बीजाचं नि करुणदेवीच्या शीलाचं अस्सल रजपूत बियाणं आज हिंदुस्थानात असतं, तर जयपाळ, या जुलमी अत्याचारी नि खुनी बनबिराचा दास तूं खास बनला नसतास.

**जयपाळ०**——तुला माझी भूमिका नीटशी अुमगली नाही हमीर अजून. माझी राजनिष्ठा.......

**हमीर०**——आग लाव तुझ्या राजनिष्ठेला. दगाबाजी खून अत्याचारांच्या काजळीनं काळं तोंड करून, मेवाडवर जुलमी सत्ता गाजवणारा तो बदमाष बनबीर, हाच तुझा राजा ना ?

**जयपाळ०**——चुकत आहेस, हमीर, चुकत आहेस तूं.

**हमीर०**——तर मग या अधमाच्या पायाची धूळ चाटीत कुलुंग्या कुत्र्यासारखा अिथं कां तूं पडून राहिला आहेस ? अत्याचारी जुलमांच्या घरटात मायदेशाची हाडं कडकडा पिचून तसंच त्यांचं पीठ पडत असताना, स्वताच्या प्राणाची न् रुबाबाची पर्वा करणारे तुझ्यासारखे बेमान रजपूत बोकाळले, म्हणूनच बनबिरासारखे नराधम दासीपूत्र चितोडच्या छातीवर टांच देअून अुभे राहिले.

**जयपाळ०**——हमीर, तोंड संभाळून बोल. माझ्याबद्दल तुझ्या काहीहि कल्पना असल्या, तरी मला बेमान रजपूत म्हटलेलं मुळीच खपणार नाही.

**हमीर०**——कशाला खपेल ? हो. अिमानाचा मुखवटा घालूनच हा चोरटा मेजवानीला आला ना ? विक्रमाजित महाराजानी दिल्दार मनमोकळेपणानं या पाप्याचं आदरातिथ्य केलं. आणि....... जयपाळ, त्या काळरात्रीच्या घोर प्रसंगाची आठवण कर. मेजवानीला सुरुवात होते न होते तोंच या कृतघ्न लांडग्यानं ताडकन् अुडी मारून, महाराजांच्या छातींत खंजीर खुपसला. आणि महाराजांच्या अन्नाला न् चितोडच्या अिभ्रतीला बेमान झालेल्या आपल्या जातभाअी रजपूत सरदारानी, मेजवानीची भरली ताटं लाथाडून, राजवाड्यात कापाकापीची कत्तलरात्र केली. काय ? तुझ्या डोळ्याना पाणी ?

**जयपाळ०**——कां येणार नाही. हमीर, त्या काळरात्रीची आठवण, काळाच्या काळजाचं सुद्धा पाणीपाणी करील, मग माझी कथा काय ? अरेरे, कसली घातकी ती काळरात्र.

**हमीर०**——राज्यतृष्णेपेक्षा राणी रूपमतीविषयी त्या राक्षसाची विषयवासनाच त्या खुनाच्या मुळाशी होती ना ? सारे रजपूत क्षुद्र स्वार्थाला बळी पडून, आत्मद्रोही बनले नसते, तर अिराण अफगाणच्या धाडशी लुटारुंची या हिंदुस्थानाकडं वाकडी नजर फेकायची काय माय व्याली होती. रजपूतच अेकमेकांची हाडं कडकडा चावायला सवकले, म्हणूनच अकराव्या शतकात महमद गझनीचा सोटा सोमनाथाच्या टाळक्यावर तडाड् कोसळला.

**जयपाळ०**——हमीर, असा त्रागा करून, जुलमी सत्तेचं अुच्चाटन होणार नाही. शांतपणानं.... विवेकानं.....

**हमीर०**——बस् कर तुझ्या शांतीच्या न् विवेकाच्या गप्पा, बदअफलाद बनबिराच्या अेका शब्दाचा तरी कुणाला निर्वाळा देता येअील काय ? राजकुमार वयात येअीतोंवरच मेवाडची राज्यसत्ता मी चालवीन. नंतर बिनतक्रार सत्तासंन्यास करीन, अशी आपल्या साक्षीदार रजपूत सरदारांशी केलेली प्रतिज्ञा तरी त्या नीचानं पाळली काय ? अुलट, महाराजांच्या तेराव्याच्याच दिवशी कुमार अुदयसिंहाचा खून पाडण्याचा त्या राक्षसानं धाडशी प्रयत्न केला. त्या प्रसंगी, त्या पन्नादाअीनं...... आहा, देवते पन्ना, तुझं नुसतं नामस्मरण केलं तरी हा चितोड न् मेवाडचसा काय, अुभा भरतखंड अुद्धरून

जाअील........ त्या महान् देशाभिमानी पन्नेनं, आपला पोटचा गोळा बळी देअून, कुमाराला प्राणदान दिलं. जयपाळ, जयपाळ, कुठं ती त्या पन्नादेवीची राजनिष्ठा न् कुठं तुम्हा मिशाळ मर्दांची शांतीची नि विवेकाची पुराणं.

**जयपाळ०**——माझी विवेकाची भूमिका तुला क्षुद्र वाटणं साहजीक आहे. पण मातोश्री राणी रूपमतीच्या पातिव्रत्यावर त्या लांडग्याची झांप पडू नये, म्हणून, हमीर, या जयपाळानं अपल्या नाटकी राजनिष्ठेची ढाल आड धरलेली आहे.

**हमीर०**——खरंच का हे जयपाळ ?

**जयपाळ०**——श्री अेकलिंगजी याला साक्ष आहे. अखंड रक्तपाताला सोकावलेल्या बनबिरासारख्या बोक्यापुढं, नीच गुलामाला साजेल, अशा निष्ठेच्या नटवेपणान नाचून, राणी रूपमतीच्या दुक्खाचा कडेलोट सांवरून धरताना, या हतभागी जयपाळाच्या मनाचे आतल्या आत काय धिंडवडे अुडत असतील, याची हमीर, तुला कल्पना करता येत असेल तर करून पहा...... अुद्या तर तो प्रळयच करणार आहे.

**हमीर०**——काय करणार आहे ?

**जयपाळ०**——परमारांचा पराभव करून आल्यामुळं, बनवीर विजयानंदानं अगदी बेहोष झाला आहे. राणी रूपमतीनं आपलं अुधंडअुधड पाणीग्रहण करून, विक्रमाजिताच्या रक्तानं माखलेल्या सिंहासनावर, बनबीर-पत्नि म्हणून भरदरबारात अुद्या बसलंच पाहिजे, असे जबरदस्तीचे यत्न आता चालू आहेत.

**हमीर०**——आमच्या मातोश्रीवर तो नराधम हात टाकील, तर जयपाळ, माझ्या आअीच्या रक्ताची शपथ घेअून सांगतो, अुद्याचा सूर्य अुगवण्यापूर्वीच हा हमीर त्याचं नरडं चिरल्याशिवाय रहाणार नाही.

**जयपाळ०**——खुनाचा यत्न फसल्यावर, हद्दपार झालेल्या अुदयसिंहाचा सुद्धा बनबिरानं पाठलाग चालवला आहे. सापडेल तिथं त्याला ठार मारण्याठी, गुप्त वेषाचे पटाअीत मारेकरी, देशोदेशी रवाना झाले आहेत. कदाचित्........ या पूर्वीच बिचाऱ्या अुदयसिंहाची अितिश्री......

(अेकदम नौबदी कर्णे तुताऱ्या वाजतात.)

**जयपाळ०**——हां. चल, पळ अिथूनं आता. बनबिराची स्वारी देवदर्शनासाठी राजवाड्यात्नं निघाल्याची शिंगं वाजली. आता तूं अिथं कुणाच्या नजरेला पडलास, तर फुकट प्राणाला मुकशील. चल जा जा, लवकर जा.

**हमीर०**——अुकीरड्याच्या मोलानं जीव गमावणारा हा हमीर नव्हे. (जयपाळाच्या कंबरेच्या पट्ट्याला झोंबतो.) दे दे, जयपाळ, दे मला तुझा हा खंजीर. आता अेकटाच चित्त्यासारखा अुडी घेअून, त्या अधमाच्या नरड्याच्या चिंधड्या चिंधड्या अुडवतो.

**जयपाळ०**—हमीर थांब. अशी लाट करू नकोस. तुझ्या या आकांतांडवानं नजिकच्या राजवाड्यातले लोक धावून येतील आणि तूं नि मी अचानक गोत्यात सापडलो का आपल्या साऱ्या मनोरथांचा डोलाराच जमीनदोस्त व्हायचा. जा. आल्या पावली परत जा.

**हमीर०**—जातो. पण जयपाळ, विक्रमाजित महाराजांच्या छातींत धुसलेला तो भयंकर खंजीर, रक्ताच्या चिळकांड्यानी भरलेला तो पंचपक्वान्नांचा थाळा, रक्तांच्या पिचकाऱ्यानी लालबुंद रंगलेल्या त्या चादरी, नि गालिचे, महाराजानी फोडलेली शेवटची ती भेसूर किंकाळी नि मागे लोडावर टाकलेली ती मान, जयपाळ, आठवण कर, त्या सर्व देखाव्याची आज सहा वर्षांनी पुन्हा आठवण कर, आणि तुझ्या मेवाडनिष्ठ हृदयात सूडाचा धगधगता वणवा भडकत राहू दे.

**जयपाळ०**—तो देखावा रात्रंदिवस माझ्या डोळ्यांसमोर वावरतो आहे अन् सूडाच्या भावनेलाहि माझं मन पारखं झालेलं नाही. (आत पुन्हा कर्णे तुताऱ्या नौबदींचा आवाज.) ही पहा, त्या बनबिराची स्वारी जवळ येत चालली. चल. जा जा चटकन निघून जा. (पुन्हा शिंगे वाजतात.) चल आटप. या दक्षिण बाजूच्या दरडीवरून घसरत जा. जोहार.

**हमीर०**—जोहार. (अिकडे तिकडे पहात निघून जातो.)

**(आत०**—राजकन्या कमलादेवी देवदर्शनाला जात आहेत. जाबता बंद. निगा रखो मेहरबान.)

**जयपाळ०**—आस्सं, राजकन्या येत आहे. हमीर गड अुतरून गेला का नाही, पाहिलं पाहिजे. (जातो.)

(पूजेचे साहित्य घेतलेली दासी चंचला आणि पाठोपाठ राजकन्या कमला.)

**कमल०**—चंचले, परमारांचा पराभव करून महाराजानी दिग्विजय मिळवला. म्हणून साऱ्या गडावर आज कितीहि आनंद अुसळला असला, तरी या अेकलिंगेश्वराच्या मंदिरातला आनंद काही निराळाच असतो, नाही का ? वाटतं, रात्रंदिवस अिथंच त्या गाभाऱ्यात बसून, या गौरीहराची मंगल स्तोत्रं सारखी गात रहावं.

**चंचला०**—ताअीसाहेब, आज आपण अगदी दैवी पार्वतीचीच भाषा बोलताहात, असं वाटतं.

**कमल०**—काहीतरीच बोलावं झालं. कुठं पार्वति माअी न् कुठं आपण माणसं. देवाची योग्यता माणसाला अशी लावू नये चंचले.

**चंचला०**—लावू नये खरं. पण आपले शुद्ध विचार नि तसाच हा पांढरा शुभ्र वेष पाहून, हृदयेश्वर महादेवाला प्रसन्न करण्यासाठी ही हिमनगजा गौरी तपश्चर्येच्या तयारीत आहे, असाच देखावा मला आता दिसत आहे.

**कमल०**—गौरीसारखी तपश्चर्या कुणाला साधणार चंचले. तपाच्या तेजानं गौरीनं हराला प्रसन्न करून, जगाला गौरीहर दाखवला.

**चंचला०**––मग या आमच्या गौरीला राजकुमार भेटून, आज मलूल असलेल्या या कमलाला प्रफुल्लित करणार नाही की काय ? अेकलिंगेश्वराची सेवा वाया जायची नाही म्हणते.

(आत वाद्यांचा गजर होतो.)

––अगबाअी. महाराजांची स्वारी देवदर्शनाला येत आहे वाटतं.

**कमल०**––चल, आपण पूजा आटपून लवकर परत जाअू राजवाड्यात. (चंचला पूजासाहित्य घेअून पिंडीजवळ जाते.) थांब थांब चंचले. मी माझ्या हातानीच देवाला साज चढवते. (पिंडीला हार घालते.)

**चंचला०**––ताअीसाहेब, ही पहा बिल्वपत्रं खाली पडली. गौरीहरानं कौल दिला. राजकुमार अुदयसिंह लवकरच येणार गडावर.

**जयपाळ०**––(प्र.क.) धारानगरीच्या भावी सम्राज्ञीचा जयजयकार असो.

**चंचला०**––(मोठ्याने ओरडते.) गोषा गोषा. जाबत्यावर कोण आहे ?

**जयपाळ०**––घरोब्याच्या मंडळीना कसला आलाय गोषा ? गोषा अितराना. जयपाळाला नाही.

**कमल०**––चंचले, अग हे आपले हप्तहजारी सरदार जयपाळ. असं काय नीट माणूस पाहिल्यावाचून खस्‌कन् अेकाद्याच्या अंगावर जावं.

**जयपाळ०**––(प्रणाम करीत) धारानगरीच्या भावी सम्राज्ञीचा जयजयकार.

**कमल०**––जयपाळ, हा प्रणाम का माझी थट्टा?

**जयपाळ०**––कर्दनकाळ बनबीर महाराजांच्या लाडक्या राजकन्येची थट्टा? कोण करील? धारानगरीच्या आजच्या युवराज्ञीनं आणि अुद्याच्या परमार सम्राज्ञीनं या राजनिष्ठ जयपाळाचा मुजरा घ्यावा.

**कमल०**––तुम्ही खास माझी थट्टा करीत आहात.

**चंचला०**––कदाचित् विनोदाचा अेक नवा प्रकार असेल हा. महाराजाना कळला तर?

**जयपाळ०**––कळला तर? कमलदेवीला ही आनंदाची बातमी प्रथम कळवल्याबद्दल मला शाबासकीच मिळेल.

**कमल०**––मी धारानगरीची युवराज्ञी? कुणाशी हा आचरटपणा करता अहात जयपाळ?

**जयपाळ०**––राजकन्येनं राग मानू नये. हा आचरटपणा नाही कागदोपत्री ठरुन गेलेला सिध्दांत आहे. महाराजानी पराभूत केलेल्या परमारांचे प्रतिनिधि, तहनामाच्या अटीप्रमाणं, अुद्या सकाळी भर दरबारात, मंगल आहेराचा राजकन्येला साखरपुडा देणार. आमची राजकन्या कमलदेवी धारानगरीची परमारयुवराज्ञी होणार.

**चंचला०**—आय्या. ही बातमी आम्ही आताच ऐकतो.

**जयपाळ०**—वा या विवाहाच्या टोलेजंग तयारीचे खास हुकूमसुद्धा सर्व खात्याना जाहीर झाले, आणि देवीना अजून पत्ताहि नाही? ... हां. कदाचित् असं असेल. विजयोत्सवाच्या आजच्या दरबारी मेजवानीत, ही मंगल वार्ता देवींच्या कानावर घालून, आपल्या लाडक्या राजकन्येच्या कोमल मनाला साखरधक्का द्यायचा महाराजांचा विचार असेल.

**कमल०**—कोण कुठली धारानगरी न् कोण कुठले परमार. जन्मात, त्यांची तोंडंहि पाहिली नाहीत मी न् म्हणे, त्याच्याशी माझा विवाह.

**जयपाळ०**—देवी, हा राजकारणी विवाह आहे. प्रेमकारणी नव्हे. आणि तो बनबीर महाराजांनी आपल्या भावी सुखाकडं पूर्ण लक्ष देऊनच ठरवला असला पाहिजे.

**कमल०**—राजकारणी विवाह म्हंजे प्रेमाचं झालंच मातेरं. आणि प्रेमाशिवाय विवाह म्हंजे प्राणाशिवाय प्रेताचंच जिणं, नाहीतर काय? मला मुळीच न विचारतां, माझ्या दिलाचं दान? देहाच दान? प्रेमाचं दान करायला सुद्धा आम्ही गुलामच वाटतं ?

**चंचला०**—हा काय न्याय झाला?

**कमल०**—माणुसकी तरी म्हणता येईल का?

**जयपाळ०**—न्यायदेवतेप्रमाणं राजकारण हे सुद्धा आंधळं असून, शिवाय त्याला काळीज मुळीच नसतं. राजकारणाच्या अिभ्रतीसाठीच हा विवाह ठरला आहे न् तो सर्वसमर्थ बनबीर महाराजानी ठरवला आहे. कोण त्याला आता विरोध करणार?

**कमल०**—त्या अिभ्रतीच्या थडग्याखाली ही कमल जिवंत गाडली गेली, तरी त्याची मग कुणालाच पर्वा नाही, असंच ना जयपाळ?

**जयपाळ०**—चाणाक्ष राजकन्येला हे काय मी सांगायला हवे? राजकन्यांचे विवाह राजपुत्रांशीच व्हावे लागतात.

**चंचला०**—तो कसाहि असला तरी?

**कमल०**—जयपाळ, प्रेमाच्या स्वयंवराशिवाय, या कमलदेवीच्या जिण्याचा असा राजकारणी विक्रा व्हायचा असेल, तर परमाराना म्हणावं, तुमच्या युवराजाना या बनबीरकन्येच्या प्रेताचंच पाणिग्रहण करावं लागेल.

**जयपाळ०**—देवीनी थोडा विवेक करावा. त्रागा करू नये. विवाह राजकारणी असो, नाहीतर प्रेमकारणी असो, ती सुखी किंवा दुक्खी करण्याचे मर्म पतिपत्नीच्याच हाती असते.

**कमल०**—बाबांच्या राजकारणी जुगारीला मान वांकवण्यापेक्षा, माझ्या हृदयाला जिंकणाऱ्या त्या दिव्य जादूसाठी...... आ हा....... ही कमलदेवी आपल्या जिवाचं रान करायला मागं पुढं पहाणार नाही.

**जय०**——म्हणे ? ताईसाहेबानी आपल्या हृदयाचं दान आधीच कुणाला केलंय की काय ?

**चंचला०**——या गौरीवर चितोडच्या गौरीहरानं आपल्या मायेची पखरण घातली आहे हो.

**जय०**——चितोडचा गौरीहर ? चितोडचा गौरीहर कोण ?

**कमल०**——चितोडचा हा अेकलिंगेश्वर नाही का ? याला मी माझं सारं जीवनच अर्पण करून टाकलंय. (चंचलेला डोळ्यानी दटावते.)

**जयपाळ०**——प्रश्न जोवर लाडुकपणाचा किंवा सामोपचाराचा असेल तोवर ठीक आहे. पण राजकारणाची पाषाणहृदयी भूक शमवण्यासाठी, परमारांना राक्षसविवाहाची परवानगी मिळाली, अन् आपली संमति असो वा नसो, आपल्यावर बलात्काराचा प्रसंग आला..........

**कमल०**——तसा तो येअील म्हणता ?

**जयपाळ०**——शंका आहे की काय ? बनबीर महाराजांच्या राजवटीत आज अशक्य असं काय आहे ?

**कमल०**——तसाच मुकाबला बितला, तर माझ्या प्राणेश्वराचं चिंतन करीत आनंदानं मी अग्निकाष्टं भक्षण करीन.

**जयपाळ०**——महाराणी रुपमतीनं हेच करावं, असंच का आपलं म्हणणं ?

**कमल०**——म्हंजे ? तुमचा सवाल समजला नाही नीटसा मला ?

**जय०**——महाराणी रुपमतीनं आपलं राजरोस पाणिग्रहण करून, बनबीरपत्नीच्या नात्यानं, अुद्याच्या दरबारात सिंहासनावर शेजारी बसलंच पाहिजे, अशा हट्टानं, आज रात्री महाराज रुपमतीवर बलात्कारसुद्धा करतील.

**कमल०**——राणीसाहेबांवर महाराज बलात्कार करणार ?

**जय०**——तसा प्रसंग आला आहे खरा.

**कमल०**——नाही...... नाही...... त्रिवार नाही. माझ्या देवाला दिलेल्या वचनासाठी तरी असला प्रसंग राणीसाहेबांवर येअू देणार नाही मी.

**जय०**——प्रश्न स्त्रियांच्या अब्रूचा आहे. आणि तो पुरुषापेक्षा स्त्रियाच कुशलतेनं सोडवतील. माझी मति तर अगदी कुंठीत झाली ताअीसाहेब. म्हणून आपल्या पायांचा आसरा शोधीत धावत आलो. देवीनीच आपल्या जिवाभावाची पाखर राणीसाहेबांवर घातली, तरच त्यांचा काही बचाव होणार आहे. आपण धीर सोडलात......का......साराच अंधार.

**कमल०**——जयपाळ, मुळीच धाबरू नका तुम्ही, हा बाप्पा रावळाच्या पुण्याओचा चितोडगड आहे. बायकांच्या अब्रूचा प्रश्न निघाला, तर सारा गड जोहाराच्या हल्लकल्होळाने भडकून, आकाशाच्या छताची राखरांगोळी करील. पण कोणाहि पाप्याचा हात निष्पाप पतिव्रतेच्या पदराला स्पर्श करू शकणार नाहीं.

**जयपाळ०**——तशी अितिहासाची साक्ष आहे खरी, प....ण.... कालमाहात्म्याबरोबर अितिहास सुद्धा परंपरेला पारखा होतो.

**कमल०**——नाही होणार. बाबांच्या प्रेमाला गदागदा हालवून, मी त्यांची बुद्धि पालटीन. त्यात मी फसलेच तर माझ्या गौरीहराची शपथ घेऊन सांगते, राणीच्या पदराला हात घालायला, बनवीर महाराजाना कमलचं प्रेतच तुडवीत जावं लागेल. (दासीसह जाते.)

(शिंगे कर्णतुताऱ्यांच्या घोषात, मेवाडाधिपति बनबीर महाराज की जय, अशा गर्जना, प्रत्येक गर्जनेला समोरच्या बाजूने विक्रमाजित महाराजकी जय...... राणा अुदयसिंहकी जय, अशा विरोधी गर्जनांची अुलट सलामी मिळते. छत्र मोर्चेले अुडत आहेत, अशा लवाजम्यानिशी संतापाने खवळलेला बनबीर प्रवेश करतो.)

**बनबीर०**——निमकहराम बण्डखोर. विक्रमाजिताचा जयजयकार ? (आतून तसा जयजयकार होतो.) अुदयसिंहाचा जयजयकार ? (तोच जयजयकार आतून. याशिवाय, बनबीराचा सत्यानाश, सत्यानाश, सत्यानाश, अशा आरोळ्या अेकू येतात.)

......जा, त्या राजद्रोही बण्डखोराला आत्ताच्या आत्ता गिरफ्दार करून अिकडं घेअुन या. (काही सेवक जातात.) जयपाळ, परमारांचा पराभव करून, विजयोत्सवात देवदर्शनासाठी आम्ही आलो असतां, आमच्या सत्तेचा अुपमर्द ?

**जयपाळ०**——किती पापी धाडस हे ?

**बनबीर०**——परस्पर वैराच्या वाळवीनं विस्कळीत झालेली रजपुतांची राज्यसत्ता, भरभक्कम पायावर अुभारण्यासाठी, मेवाडचा राजदण्ड हाती घेण्याची आम्ही मेहरबानी केली. गेल्या सहा वर्षात राजद्रोही बण्डखोरांचा नायनाट करून, अुभा मेवाड आम्ही आमच्या कदरबाज शिस्तीखाली अेकवटला.

**जयपाळ०**——सारी दुनिया अुघड्या डोळ्यानी हे पहात आहे.

(काही सेवक अेका तरुणाला पकडून आणतात. बनबीर महारजकी जय असा जयघोष करतात. तो तरुण राणा अुदयसिंहाचा जयजयकार अशी गर्जना करतो.)

**बनबीर०**——चूप रहा बदमाष. जयपाळ, या हरामखोराची जीभ आत्ताच्या आत्ता आमच्या समोर छाटून टाक.... कां ? अशी कांकू कां ?

**जयपाळ०**——(बावरून खंजीर काढीत) बन्दा..... हुजूरच्या..... हुकमाचा...... ताबेदार.....

**तरुण०**—(जयपाळाला) धि:कार धि:कार, त्रिवार धि:कार तुझ्या मुर्दाड बीजाला न् ब्रीदाला.

**बनबीर०**—अुडाव हरामखोराची जिभली सफाचाट.

**तरुण०**—जिभल्या सफाचाट छाटून, आमच्या जळत्या विचारांची भडकती आग तूं थोडाच विझवू शकशील ? तुझ्या राक्षसी संतापाच्या होमात धडाड् उड्या घेणाऱ्या शेकडो जिवांचे शाप, प्रत्येक क्षणाला तुझ्या खुनसट राजदण्डाचे कोळसे कोळसे करीत आहे. हे ध्यानात ठेव. आतापर्यंन्त हज्जारो जिवांची हत्या केलीस, तरी मदान्ध बनबिरा, विक्रमाजिताच्या रक्ताच्या थेंबा थेंबासाठी, तुझ्या नरड्याच्या चिंधड्या चिंधड्या अुडवायला खवळलेला वेताळ काही ठार मेला नाही. अुदयसिंहाचा जयजयकार, बनबिराचा सत्यानाश.

**बनबीर०**—बनबिराच्या सत्तेची बदनामी ?

**तरुण०**—लाख वेळा करीन.

**बनबीर०**—(तरुणाच्या पोटात तरवार खुपशीत) हे घे राजद्रोहाचे प्रायश्चित.

**तरुण०**—(तडफडत मरता मरता) अुदयसिंह झिंदाबाद. बनबिराचा सत्यानाश. चितोड..... चितोड..... चि..तो...ड... (मरतो.)

**जयपाळ०**—किती अुलट्या काळजाचा राजद्रोही हा. (सेवकाना) जा हे प्रेत जिथून घेअून. सरकार स्वारी देवदर्शनाला आलेली न् हा अमंगळ देखावा अिथं कशाला ? जा. अुचला. (सेवक प्रेत नेत असताना) त्याच्या धर्माप्रमाणे त्याचे शेवटचे संस्कार करा.

**बनबीर०**—राजद्रोही बण्डखोराना कसला धर्म न् कसला संस्कार. लाथेच्या ठोकरीनं द्या ते प्रेत गडाखाली ढकलून. कोल्ही कुत्री गिधाडे त्याचे लचके तोडताना पाहून, मेवाडाधिपति बनबिराच्या सत्तेचा क्षुल्लक अवमान करणारांची काय दशा होते, याची अुरल्यासुरल्या माथेफिरूना चांगलीच दहशत बसेल.

**जयपाळ०**—खावंदांचं करणंच रास्त न् न्यायाचं...... हुजूरनी आता देवदर्शन घ्यावं.

**बनबीर०**—(लवाजम्याला) जा. तुम्ही सारे सेवक गुलाम, महाद्वारावर आमची रहा पहात अुभे रहा. (लवाजमा प्रणाम करून जातो. बनबीर गाभाऱ्याजवळ जातो. भटजी त्याला बिल्वपत्रे देतो. ती तो पिंडीवर अुधळतो आणि नमस्कार करून परत येतो.)

जयपाळ, तरूण रजपुतांत असला माथेफिरूपणा बोकाळलेला पाहून, आम्हाला फार आश्चर्य वाटतं. ही सारी भुतावळ अुदयसिंहानंच अुठवलेली असावी, असं नाही का तुला वाटंत ?

**जयपाळ०**—सरकार, वावटळ येते न् जाते. पण तिचा आगापिछा अुमगणं, कठीणच काम.

**बनबीर०**—पण या वावटळीची जरूरच काय ? राजकुमाराचं मोकळ्या मनानं स्वागत करायला आम्ही तयार असतां, आमच्या या मेहरबानीचा धिःकार करून, भणंग भिकाऱ्याप्रमाणं रानावनात वणवण भटकण्याचं दुर्भाग्य त्यानी कां पत्करावं, या त्याच्या मनाच्या ठेवणीचा तुला काही अंदाज घेता येतो काय ? विक्रमाजिताचा अकाल मृत्यू होतांच,..........

**जयपाळ०**—(स्व.) हो. खून म्हंजे अकाल मृत्यूच तो.

**बनबीर०**—नुसत्या परंपरेच्या पुण्याईनं अुदयसिंह बालराजा गादीवर बसता, तर जयपाळ, अेकमेकांची हाडं फोडायला सवकलेल्या, तुम्हा पागल रजपुतांच्या बेबंदशाहीच्या थडग्याखालीच तो जिवंत गाडला जाता आणि या चितोडावर मुसलमानांचा चान्दतारा हमखास फडकला असता.

**जयपाळ०**—यात मला तर मुळीच शंका वाटत नाही.

**बनबीर०**—बेबन्दशाहीची पाळंमुळं खणून काढून, रजपुती सत्तेचा विस्ताराचा मार्ग आम्ही बिनधोक खुला केला. आणि चितोडच्या दराऱ्यानं अुभा हिंदुस्थान धाकात ठेवला. आज चितोडची राजगादी म्हणजे बिनकाटेरी गुलाब पुष्पांची शय्या बनवली आहे आम्ही. वचनाप्रमाणं ती अुदयसिंहाच्या हवाली करायला आम्ही तयार असतां, त्यानं निव्वळ खोडसाळ द्वेषानं आमच्या सत्तेविरुद्ध दिल्लीच्या पातशहाकडं गुप्त खलबतं करावी, हे काहीसं चमत्कारीक नाही का ?

**जयपाळ०**—चमत्कारीक तर खरंच सरकार.

(म्हातारा कर्णपाल सरदार प्र.क.)

**कर्ण०**—राजाधिराज बनबीर महाराजांचा जयजयकार असो.

**बनबीर०**—कोण ? कर्णपाल ? काय बातमी घेऊन आलास ? आनंदाची का दुक्खाची ?

**कर्ण०**—दुक्खाची ? आता वाऱ्याच्या झुळकीवरसुद्धा दुक्खाला थारा मिळेनासा झाला आहे सरकार. चितोडगडाला न् खुद्द महाराजाना माझ्या बातमीचं मोल करता करवणार नाही. अुदयसिंहाचा अवतार संपला.

**जयपाळ०**—(दचकून) अुदयसिंहाचा अवतार संपला ?

**बनबीर०**—का ? जयपाळ, या बातमीनं तूं अितका बावरलास ? पाण्ढरा फिकट पडलास ? तो आमचा कट्टा दुष्मन नव्हता का ?

**जयपाळ०**—म्हणूनच मला आश्चर्य वाटलं सरकार. कोणत्या मर्दानं सरकारच्या कपाळी हा यशाचा टिळक लावला ? काय, तपशील तरी काय आहे कर्णपाल ?

**कर्णपाल०**—राजकुमार प्रथम दोन तीन वर्षं आग्रा येथे हुमायून बादशहाच्या आसऱ्याला होता.

**बनबीर०**——पण त्याच्यामागे तो शेरशहा शनीसारखा लागला आहे ना ?

**कर्ण०**——होय सरकार, हुमायूनच जिथं पळपुटीच्या घसरणीला लागलेला, तिथं तो या पळपुट्या राजपुत्राला कितीशी मदत करणार ? अग्र्याहून अुदयसिंह रोठज येथे शेरशहाला शरण गेला...

**बनबीर०**——परधर्मी शेरशहाला शरण ?

**जयपाळ०**——मूर्तिभंजक सैतानाशी संगनमत ?

**बनबीर०**——त्या पोराच्या नादी लागून, शेरशहा मेवाडवर चाल करून येता, तर त्याच्या तोंडावर आमचा दोस्त गुजराथचा बहादूरशहा सोडून, आम्ही काट्याने काटा अुखडला असता.

**जयपाळ०**——आणि खुद्द खावंदानीच त्याचा पार धुव्वा अुडवायला काय कमी केलं असतं ?

**बनबीर०**——अलबत्. पण जयपाळ, राजकारणात अजून तूं कच्चा आहेस.

**जयपाळ०**——अगदीच.

**बनबीर०**——दैत्यांवर दैत्य घालून देवांनी जय मिळवला, तरच ते राजकारण. बरं, पुढं काय झालं ?

**कर्ण०**——अिकडून रवाना झालेल्या दोन मारेकऱ्यांनी अुदयसिंहाला अखेर कनोज येथे गाठला. तिघांचा भयंकर अटीतटीचा सामना झाला. राजकुमारसुद्धा काही सामान्य असामी नव्हता. पहिल्या झटापटीतच त्याने अेका मारेकऱ्याला ठार लोळवला. पण शेवटी दुसऱ्या जोडीदारानं मात्र मात केली. त्याच्या खंजिरानं अुदयसिंहाच्या काळजाचा बिनचूक ठाव घेतला.

**बनबीर०**——फुटक्या कपाळाच्या कृतघ्न पोरा,. तुटली...... तुटली तुझ्या पोरकट महत्त्वाकांक्षेची वावडी. परधर्मियांचे आंगठे चुखण्यापेक्षा, तुझ्या आजाचं——संगराण्याचं रक्त नसानसात खेळवणाऱ्या या स्वधर्मी चुलत्याची मनधरणी तुला बेअब्रूतीची वाटावी काय ?

**जयपाळ०**——चुलता म्हणजे पिता.

**बनबीर०**——पण या पित्याला रक्तपित्या समजून, त्या अुद्दाम पोरानं जाणूनबुजून माझ्या मेहरबानीचा धिःकार केला.

**कर्ण०**——दैव देतं न् कर्म नेतं, ते हे असं.

**बनबीर०**——जयपाळ, तुझ्या राजनिष्ठेबद्दल आमची बालंबाल खात्री पटलेली आहे. तरीसुद्धा तुझं अिमान कसोटीला लावून पहाण्याची आमची लहर लागत आहे. दिल्दार जयपाळ, शास्त्रशुद्ध विवाहाच्या बंधनानं राणी रुपमति माझ्याशी अेकजीव झाल्याशिवाय,

आमच्या मस्तकावरचा राजकिरीट केव्हाही डळमळीतच रहाणार. तूं आत्ताच्या आत्ता जाऊन राणीची भेट घे. तिला सांग, अल्पायुषी नवऱ्याच्या पापासाठी, सोनेमोल आयुष्याच्या मातीचा चिखल, अश्रूंच्या अखंड पाटानी भिजवीत बसण्यापेक्षा, त्या हतभागी नवऱ्याची राज्यलक्ष्मी मनगटाच्या जोरावर हस्तगत करणाऱ्या आमच्या सारख्या दिग्विजयी पुरुषोत्तमाची पट्टराणी होऊन देवानं दिलेल्या आयुष्याचा, तारुण्याचा आणि सौंदर्याचा सदुपयोग कर, अशी राणी रुपमतीची तूं खात्री पटवली पाहिजेस.

**जयपाळ०**—यशापयश देवाधीन, प्रयत्नांत कसूर करणार नाही.

**बनबीर०**—ती आमची खात्री आहे. जा. आत्ताच्या आत्ता धावत जा. तिच्या पुत्राच्या मृत्यूची बातमी तिच्या कानांवर जाऊन, मनोविकारांच्या सर्व कोमल भावनाना ती पारखी होण्यापूर्वीच तिच्या पाणिदानाची संमति तूं मिळवली पाहिजेस. मनाच्या वेगानं जाऊन, तितक्याच तातडीनं राणीच्या मनाला काबीज कर. तिच्या प्रेमदानाचं स्वागत करायला, प्रेमाचे पंख लावून, तुझ्या पाठोपाठ आम्ही आलोच समज. जा.

**जयपाळ०**—जोहार. (जातो.)

**बनबीर०**—कर्णपाल, आत्ताच आपण खरी मात केली. आता मी मेवाडचा खराखुरा अधिपति झालो. आम्हाला आता अेकसुद्धा प्रतिस्पर्धि अुरला नाही. विक्रमाजिताच्या राज्यलक्ष्मीप्रमाणंच त्याची पट्टराणी आमची अर्धांगी झाल्यावर, बनबिराची ही विजयी समशेर, दिल्लीला पालथी घालून, काबूल कंधारच्या डोंगराळ मुलखात पराक्रमाचा धौशा गाजवण्याची कामगिरी हाती घेणार आहे.

**कर्ण०**—योग्य....... रास्त....... वाजवी.

**बनबीर०**—आता तूं अेक नाजूक काम केलं पाहिजे. राणी रुपमतीनं आपले वैधव्याचे अश्रू पुसून, शास्त्रशुद्ध विवाहानं आम्हाला निष्कलंक प्रेमाचं पाणिदान करायचं निश्चित ठरवलं आहे, अशी दे अेक कण्डी तूं लोकांत फैलावून.

**कर्ण०**—पण राणी वश होण्यापूर्वीच ?

**बनबीर०**—तिच्या खुषिनाखुषीची कोण पर्वा करतो. बेलाशक दे ही बातमी फैलावून सगळ्या गडावर. सामोपचारानं ती वळली नाही, तर जबरीनं तिला अंकित केल्याशिवाय आम्ही रहाणार नाही. बनबिराच्या अिच्छेला विरोध ? परमेश्वराची छाती नाही, मग या बंदिवान् रुपमतीची काय प्राज्ञा.

**कर्ण०**—वाहवा. ही शक्कल मात्र नामी खरी. स्वयंभू सत्ताधीशांखेरीज असले मुकाबले पार पडत नसतात. जबरदस्ताच्या जबरीची जरब. गाभण नसेल तीहि गाभ टाकील.

**बनबीर०**—कर्णपाल, परमारांवर मिळवलेल्या विजयाच्या आनंदोत्सवासाठी आजची सारी रात्र मेजवान्या, नाचगाणे......

**कर्ण०**—आणि मदिरापानात......

**बनबीर०**—घालवण्याची आमची अिच्छा आहे.

**कर्ण०**—आणि ती योग्य वाजवी न् रास्त आहे सरकार.

**बनबीर०**—आमच्या सर्व लढाअू सैनिकानी सुद्धा आजची रात्र बेहोष आनंदात घालवावी, म्हणून आमच्या खास मयागारातल्या कंधारी अनार मद्यार्कांची सर्वांना सर्रास सवलत आम्ही देत आहोत.

**कर्ण०**—द्वारकेच्या यादवांवर ताण.

**बनबीर०**—फक्त गस्तीच्या शिपायाना मात्र सक्त मनाअी आहे.

**कर्ण०**—आणि ती वाजवी योग्य आणि रास्तच आहे. गस्तीचे शिपाअी मस्तीला आले का साऱ्या बंदोबस्ताला बस्तीच मिळायची. असली नसती सुस्ती काय कामाची.

**बनबीर०**—जा तर मग. आमच्या वैभवशाली मेजवानीच्या व्यवस्थेचे हुकूम जारी कर.

**कर्ण०**—जो हुकूम. जोहार. (जातो.)

**बनबीर०**—(स्व.) आत्ताच्या मेजवानीच्या प्रसंगीच राणी रुपमति माझ्या मागणीचा स्वीकार करून, शेजारी बसेल, तर माझ्या आनंदाला सीमा अुरणार नाही. या रजपूत स्त्रियांचा मानीपणा अेरवी कुणाला कितीहि कौतुकास्पद वाटला, तरी माझ्यासारख्या दिग्विजयी नरकेसरीचा अिच्छाभंग होत असताना, त्या मानीपणाची मान्यता कोण मानी मान्य करील ?...... खरं पाहिलं तर रुपमतीच्या बापाजवळ प्रथम मी तिला मागणी घातली. पण पृथ्वीराजाचा मी दासीपुत्र, या सबबीवर त्या अुर्मटानं माझ्या मागणीचा धिःकार करून, तिला विक्रमाजिताच्या बाशिंगाला आवळली. बनबीर दासीपुत्र आं ? पण आज याच दासीपुत्राच्या सत्तेखाली शुद्धबीजाचे हे घमेण्डखोर रजपूत माना वांकवून अुभे आहेत ना ? गुलामगिरीच्या बेशरम फासात माना अडकल्या असतांना सुद्धा, शुद्ध रक्ताच्या न् शुद्ध संस्कृतीच्या गप्पा झोडणाऱ्या हिंदूंच्या या पागलपणाला अुपमा देताना शरमेलाहि शरम वाटली पाहिजे...... पण रुपमति, तुला माझ्या मागणीला बिनतक्रार मान वाकवलीच पाहिजे. मोठमोठ्या मानधनप्रभूंच्या माना वांकवून, त्याना माझ्या पायांवर लोळण घ्यायला लावणारा हा बनबीर, या काळाच्या काळाशी गाठ आहे. सामोपचाराची कालमर्यादा संपल्याबरोबर, नादान गुलामानी थेर माजवलेल्या नीतिशास्त्राच्या नरड्यावर टांच देअून, रुपमति, तुझ्या निरीला हात घातल्याशिवाय हा बनबीर रहाणार नाही.

**अंक पहिला समाप्त.**

# काळाचा काळ



अंक २ रा] [प्रवेश १ ला

**स्थळ आणि पात्रे :** राजवाड्याचा महाल. (कव्हर.) विचारमग्न बनबीर शतपावली करीत फिरत आहे.

**बनबीर०**—(स्व.) काय बरं हे गूढ असावं ? अुदयसिंहाच्या खुनाची बातमी अितक्या झटपट हिच्या पर्यन्त कशी गेली ?... जयपाळ ?... जयपाळनं तर सांगितली नसेल ?... पण असं होणार नाही. त्यानं आपल्या अिमानाची साक्ष हरवख्त चोख पटवलेली आहे.

(कर्णपाल येतो.)

**कर्ण०**— बनबीर महाराजांचा जयजयकार.

**बनबीर०**— कोण ? कर्णपाल ? अगदी वेळेवर आलास. संताप नि निराशा यानी माझ्या हृदयात धुसळण घातली असतां, मनाला धीर देण्यासाठी तुझीच जरूरी होती.

**कर्ण०**— महाराजांची अिच्छा हात जोडून मूर्तिमंत अुभी आहे.

**बनबीर०**— कर्णपाल, ती हेकेखोर रूपमति...

**कर्ण०**— काय, जयपाळला सुद्धा वश होत नाही ?

**बनबीर०**— आमच्या खास मनधरणीलाहि ती जुमानीत नाही. आम्ही आत्ताच तिची भेट घेअून आलो, अुदयसिंहाच्या खुनाची बातमी तिच्या कानी अितक्या झटपट कशी पडली कोण जाणे. त्यामुळं सारं गाडं अेकदम बिथरलं. जयपाळानं तरही चुगली केली नसेल ?

**कर्ण०**—अशक्य. अगदी अशक्य. सरकारची शंका अस्थानी आहे. जयपाळासारखा हाडाचा चोख माणूस मी आजवर कधि पाहिला नाही.

**बनबीर०**— मग सात पहाऱ्यांची तटबंदी फोडून ही बातमी राणीला बिनचूक कशी मिळाली ?

**कर्ण०**—— बातम्या न् बायका, शिंदळीच्या दोघीही पळण्यात पटाईत. बोल बोलता स्वर्ग पाताळाचा ठाव घेऊन पृथ्वीवर हजर. गडावर ही बातमी सगळीकडे ज्याच्या त्याच्या तोंडी झाली आहे. बायकांची तोण्डं म्हंजे बिनबुडाचं भांडं. तिथं काही टिकायचं नाही. रूपमतीच्या दिमतीच्या अेकाद्या फटाकड्या बटकीचं तोंड कुठंतरी लागलं असंल अन् तिनं ही बातमी तिला सांगितली असंल.

**बनबीर०**—— त्या अवदसेला शोधून काढून ठार मारली पाहिजे.

**कर्ण०**—— बेषक बेषक. जीभ कापून जीव घेतला पाहिजे. हासुद्धा राजद्रोहच आहे... पण सरकार, रूपमति म्हणते तरी काय ?

**बनबीर०**—— मी तिची मनधरणी केली, हवी ती लालूच दाखविली, अखेर दटावणीचा वळसाहि दिला. पण या तीनीहि अुपायानी तिच्या हट्टी स्वभावापुढं हात टेकले. मी अेवढा काळाचा काळ, पण माझ्या शब्दाला ती रतिमात्र भीक घालीत नाही.

**कर्ण०**——सरकार, आपलं थोडं घसरलं... फारसं नाही चुकलं.... पण घसरलं. जयपाळाच्या खटपटिंचा अंदाज घेण्यापूर्वी राणीच्या तोंडाला तोंड देण्याची खावन्दानी अुगाच घाई केली. अहो ही बायकांची जात भाटीसारखी मोठी हट्टी. धरायचं ते धरतील, करायचं ते करतील, पण गुरगुरण्या, फुसफुसण्यानं सारा गाव अुठवणीला आणतील. पडछाया न् बाया, अेकाच सूत्रागोत्राच्या. आपण जों जों त्यांच्या पाठी लागावं, तों तों त्या टिकलीच्या पाठ दाखवून पळतात. पण तुम्ही त्यांच्याकडं पाठ फिरवा मात्र, का चिकटल्याच येअून त्या पोटाला.

**बनबीर०**——तरुणींच्या प्रेमयाचनेत म्हातारे बुड्ढक बरेच वाकबगार असतातसं दिसतं.

**कर्ण०**——सरकार, प्रश्न अनुभवाचा आहे. रंगेल प्रेमाला ही काळ्या पांढ-या रंगाची कसोटी बिनचूक अुमगते. काळ्या कुळकुळीत केसांच्या पार्वतीनं पांढ-याशुभ्र जटादाढीमिशीच्या म्हाता-या शंकरासाठी काय अुगाच घोर तपश्चर्या केली ? त्याने तिला कितीतरी झिडकारली, फिडकारली पण अखेर पार्वतीनं शंकराच्यांच गळ्याला मिठी मारली ना ?

**बनबीर०**——तारुण्यापेक्षा केसांच्या रंगाची महति विशेष असते म्हणतोस ?

**कर्ण०**——आकर्षणशास्त्रातला हा मोठा गमकाचा मुद्दा आहे सरकार. काळ्याभोर केसांपेक्षा, पिंगट भुऱ्या केसांच्या तरुणीकडे सगळ्यांचे डोळे चटकन वळतात, ते काय अुगाच ? काळ्या डोळ्यांपेक्षा घा-या डोळ्यांची चमक काही न्यारीच असते. काळ्या डोक्यांची तरूण मंडळी पांढ-या केसांची टर अुडवतात आणि कित्येक पोक्त शहाणे आपल्या पांढ-या केसांना कलप चोपडून काळे करण्याची धडपड करतात. पण त्या दोघाहि मूर्खांना पांढ-या रंगाचं रंगेल माहात्म्य मुळीच अुमगलेलं नसतं.

**बनबीर०**——पांढऱ्या केसांना काय अितकं माहात्म्य आहे?

**कर्ण०**——पांढऱ्या केसांच्या मुत्सद्यांशिवाय आजवर एक तरी राजकारण पार पडलं आहे का सरकार? राजकारणाप्रमाणंच प्रेमप्रकरणात सुद्धा पांढऱ्या केसांची मध्यस्थी तितकीच अुठावदार वठत असते. लग्नं जुळवण्याच्या मोहिमेवर काळ्या केसांच्या कच्च्या तरुणापेक्षा पांढऱ्या केसांचे पक्के दर्दी बुद्रुक काय उगाच जातात, खावंद, पांढरे केस म्हंजे बायकांच्या घोळक्यात बिनदिक्कत घुसण्याचा राजरोस परवाना. शिवाय, पांढऱ्या केसांचे तरूण अलिकडे बायकांना फार आवडतात आणि म्हाताऱ्यांच्या कामचेष्टा कितीहि खोडकर असल्या तरी चिडखोर बायका फारशा वर्दळीवर येत नाहीत.

**बनबीर०**——पांढऱ्या केसांच्या कर्णपालाअैवजी काळ्या केसांचा जयपाळ राणीकडं पाठवण्यात चूकच झाली म्हणायची आमची.

**कर्ण०**——छे छे छे छे, चूक आणि सरकारकडून? व्हायची नाही. सगळाच व्यवहार त्रयराशिकी पद्धतीनं करून थोडंच चालणार? अेका बाअीला पाच पोरटी म्हणून दहा बायकांना पन्नास कारटी थोडीच होणार? सम व्यस्त, शक्याशक्य, पात्रापात्र सगळंच नीट पहावं लागतं. रुपमतीपुढं हा कर्णपाल म्हंजे महिषासुर मर्दिनीपुढं टोणगाच म्हटला तरी चालेल. खावंद, राणीच्या वशीकरणाची कामगिरी माझ्यापेक्षा जयपाळच चोख बजावील. अहो, तरुण तरुणी सगळे छांदिष्ट. अेकदा एखाद्या गोष्टीचा छंद घेतला, का त्याच्यासाठी जीव द्यायचा. मोठे हट्टी. आपली ही राजकन्याच घ्या ना.

**बनबीर०**——राजकन्या ? कमलनं काय केलं ?

**कर्ण०**——मेजवानीची सारी तयारी झाली न् हिचा पत्ताच नाही.

**बनबीर०**——पत्ताच नाही ? गेली कुठं मग ती ?

**कर्ण०**——सारा राजवाडा पालथा घातला...

**बनबीर०**——रूपमतीकडं तर गेली नसेल ?

**कर्ण०**——तिकडेहि शोध केला.

**बनबीर०**——मोठी हट्टी पोर. चितोड जिंकला, त्या दिवशी सकाळी आम्ही या कमलचं तोंड पाहिलं. भाग्याची पोर, म्हणून राजकन्येसारखी हिला आम्ही वाढविली. हिच्या हट्टीपणाचा आम्हाला पुष्कळ वेळा राग येतो, पण ती गुणाची पोर समोर आली, का सारा राग जागच्या जागी जिरतो. कर्णपाल, कमलला कुणी काही बोललं तर नाही ना ? (दूर पाहून) ती... ती... ती कोण तिकडं चालली आहे ?

**कर्ण०**——ती... ती... ती.... बटकिची चंचलादासी... अग अे फटाकडे, अिकडं ये. (चंचला येते.) राण्डलेक, चिचुंद्री, बिजलीसारखी अिकडून तिकडं. तिकडून अिकडं, कंबर लचकावीत, मान फलकावीत न् डोळे मिचकावीत चमकतेस, पण राजकन्या कमलदेवी कुठं आहे ?

**चंचला०**——ताअीसाहेब आत्ताच अेकलिंगेश्वराच्या देवळाकडं गेल्या.

**बनबीर०**——दर्शन घेअून नुकतीच ती आली होती ना ? मग पुन्हा कशाला गेली ? बरोबर कोण आहे ?

**चंचला०**——कुणी नाही. पाठोपाठ मी जात होते, तर मला दटावून म्हणाल्या, नको येअूस माझ्या मागं. मग मी काय करणार सरकार.

**बनबीर०**——मलाच जाअून तिची समजूत घातली पाहिजे. (जातो.)

(चंचला जाऊ लागते.)

**कर्ण०**——अग ए चटकचांदणी, अगदी लांडोरीच्या फणका-यानं चाललीसशी?

**चंचला०**——माझ्यामागं कामं आहेत.

**कर्ण०**——काम सगळ्यांच्याच मागं लागलेला आहे. थोडी थांबलीस, तर काय माझ्या अुभा-यांनं तुझ्या मखमाली नख-यात गरममसाला पडेल?

**चंचला०**——म्हातारे बाबा . . .

**कर्ण०**——तुझा बाप म्हातारा, म्हातारा म्हातारा कुणाला म्हणतेस? मला तुं दुस-या लाख शिव्या दे, पण म्हातारा शिवी देशील, तर नाक चिरून मिरच्या भरीन.

**चंचला०**——म्हातारा ही कधिपासून शिवी झाली बाई? आता तुम्हाला म्हातारा नाही म्हणायचं, तर काय तरूण म्हणून आरत्या ओवाळायच्या?

**कर्ण०**——आढीतल्या पाडापेक्षा पिकल्या आंब्याचा दर्जा केव्हाहि मोठाच, वयानं म्हातारे, मनानं म्हातारेच असतात, असा काही नेम नाही. तारुण्याच्या भरअमदानीत म्हातारे बनणा-या तकलादी तरुणापेक्षा, म्हातारपणच्या भर अवसानात तारुण्याची कळी टिकवणा-या, माझ्यासारख्या कळीदार जवानाशी, तुझ्यासारखी तरुण फटाकडी, जरा बोलली चालली, किंचित हसली खेळली, जरा नाचली बागडली...

**चंचला०**——(स्व.) म्हातारा आज रंगात आलाय,

**कर्ण०**——तर काय चटदिशी तूं म्हातारी होशील, दासीची कुत्री बनशील, बाओीचा बुवा होशील, काय होओील तरी काय ?

**चंचला०**—माणूस जसजसं म्हातारं होत जातं, तसतसे त्याला तरूणपणचे रंगढंग करण्याची तलफ जास्त येते. शोभतो का या वयात हा चारगटपणा ?

**कर्ण०**—न शोभायला काय झालं ? तारुण्याच्या धिसाडधाऔत थातूरमातूर अुरकलेले रंगढंग, प्रौढ वयाच्या अनुभवी अवसानात यथासांग वठवता येतात.

**चंचला०**—वय गेली तरी नजर.....

**कर्ण०**—अजून जशीच्या तशी कायम आहे. आम्ही तुमच्याकडं निरखून कळवळ्यानं पाहती, पण राण्डेच्यानी, तुम्ही आमच्या डोळ्याला डोळासुद्धा मिळवीत नाही. बायकांच्या जातीला तरी असला अरसिकपणा शोभत नाही.... बरं ते जाअू दे.... राजकुमाराची काही बातमी समजली आहे का तुला ?

**चंचला०**—राजकुमाराची बातमी ? राजकुमार कोण ? बनबीर महाराजाना कधि झाला राजकुमार ? तो तर विधूर.

**कर्ण०**—अग चंवढाळ सटवे, मला बनवतेस काय तूं ? राजकुमार अुदयसिंहाची तुला काहीच माहिती नाही म्हणतेस ?

**चंचला०**—अुदयसिंह ? साऱ्या रजपुतान्याभर सिंह, सिंग, पाल, बीर न् वीर बोकाळले आहेत. त्यांच्या अुठाठेवी आम्हा बटकीना काय करायच्या ? दिल्या दामाची न् सांगितल्या कामाची आम्ही माणसं. आम्हाला काय चाटायचं ते सिंह न् सिंग. आजीचा, आज कन्दाहारी अनार मदिरेच्या कोठाराच्या किल्ल्या हातीं आल्या आहेत, म्हणून मेजवानीच्या आधीच नैवेद्य केलेला दिसतो. (जाते.)

**कर्ण०**—(स्व.) या मिरकीच्या दासी मोठ्या फिरकीच्या असतात. कसा मला हिनं वरच्यावर अुडवला हो. खोल विहिरीचं पाणी काढता येअील, पण तरुणींच्या मनाच्या बोकलावर नुसतं डोकावण्याची पंचाऔत. (जातो.)

---

**अंक दुसरा.] [प्रवेश २ रा**

**स्थळ, स्थिति नि पात्रे :** अेकलिंगेश्वराच्या गाभाऱ्यात कमल हात जोडून अश्रू ढाळीत आहे. बनबीर तिला हाका मारीत येतो.

**बनबीर०**——कमलदेवी, कमलदेवी, कमल... कुठं गेली ही अेकटीच.

**कमल०**——(गाभाऱ्यातून बाहेर येत) कोण ? बाबा ? ही मी अिथं आहे.

**बनबीर०**——(तिच्या डोळ्यांत आसवे पाहून), कमल, साऱ्या चितोडगडावर आनंदोत्सव चालू असता, तुझ्या डोळ्याना पाणी ? हव्या त्या वेळी आसवं गाळणं, हा तुझ्या करमणुकीचा खेळ तर नाही ना होअून बसला ?

**कमल०**——अश्रूंचा खेळ कधि कुणी खेळतं का बाबा ?

**बनबीर०**——मग हा तुझा मूर्खपणा तरी होत असला पाहिजे. तुला माझं वाढतं अैश्वर्य पाहवत नाही का ?

**कमल०**——बाबा बाबा बाबा, किती अघोरी कल्पना केलीत ही. या कमलच्या मनाची अखेर हीच का पारख केलीत ?

**बनबीर०**——मग तुझे डोळे पाण्यानी कां भरले आहेत ?

**कमल०**——आनंदाचा दहिवर आणि करुणेचा गंहिवर, मनाच्या पाझरणीत्नं झिरपू लागला, म्हणजे या कमळाच्या पाकळ्या अशाच डबडबतात.

**बनबीर०**——आता तूं आनंदाच्या दहिवरात आहेस, का . . . . .

**कमल०**——करुणेच्या गंहिवरात आहे बाबा. राणी रूपमतीच्या वतीनं आपल्यापाशी मला एक याचना करायची आहे.

**बनबीर०**——श्रीमंतांच्या लाडक्या पोरी असल्याच भानगडी खेळवीत असतात. रूपमतीच्या वतीनं याचना, बहुतकरून ती आमच्या अिच्छेचा मानभंग करणारीच असणार. बोला बोला, काय तुमची याचना आहे ती.

**कमल०**——परमारांशी घोर संग्राम करून आपण विजयी झाल्यामुळं, राणीच्या मनात आपल्याविषयी भयंकर धास्ती उत्पन्न झाली आहे.

**बनबीर०**——तशी ती दिल्लीपति हुमायुनीला नि त्याचा प्रतिस्पर्धी शेरशहालाहि झाली आहे. राणी रूपमतीली तसल्या धास्तीचा संबंध काय?

**कमल०**——बाबा, राणीच्या भावनांची आपल्याला नीटशी कल्पना नाही. आपण त्या पतिव्रतेच्या पाणिदानाचा आग्रह धरल्यामुळं, त्या अनाथ गाअीनं कोणत्या दैवाची करुणा भाकावी? मेवाडच्या परमेश्वरानंच तिची लाज राखावी, म्हणून आपली ही लाडकी लेक आपले पाय धरीत आहे. बाबा, राणीच्या पुनर्विवाहाचा आपला हट्ट सोडून द्या.

**बनबीर०**—नाही, ते आम्हाला नाही खपणार. आमच्या इच्छेला नकार? कृतांत काळाची छाती नाही. कमल, परमारांच्या मोहिमेमुळं चितोड सोडून आम्हाला बाहेर जावं लागलं नसतं, तर रुपमतीच्या हेकेखोर नकाराला भीक न घालता, यापूर्वीच तिला मी तुझी आई बनवली असती. पण आता? रूपमतीची प्राप्ती, हा आमच्या अैश्वर्याचा, सौख्याचा, छे, खास आमच्या मनस्वास्थ्याचा प्रश्न आहे आणि त्याला विलंबाची सबब सुद्धा आम्ही आता जुमानणार नाही.

**कमल०**—बाबा बाबा, आपल्या दिल्दार हृदयाला असा पोलादी कठोरपणा आणू नका. राजवैभवाच्या भरल्या ताटावरून अुठलेल्या त्या अनाथ गरीब गाअीला...

**बनबीर०**—सनाथ करून त्याच भरल्या ताटावर सन्मानानं बसवीत असता, मला विरोध ? कमल, हा तुझा न् त्या राणीचा मूर्खपणा होत आहे. पण आजच तुला राणीबद्दल अितका अुमाळा येण्याचं कारण काय ?

**कमल०**—जोवर राणी रूपमति दुक्खात बुडालेली आहे, तोवर या कमलदेवीला सुखाचा लेशहि लाभणार नाही.

**बनबीर०**—खरं ना हे ? खरं ना हे ? माझी लाडकी कमल बेहद्द सुखात लोळावी, म्हणून राणी रूपमतीचं पाणिग्रहण करून, तिच्या सगळ्या दुक्खांचा आजच्या आज मी शेवट करणार.

**कमल०**—नाही, नाही, बाबा नाही. कमलच्या सुखाचा हा मार्ग नाही. रजपूत वीरांगना आपल्या पातिव्रत्याला किती कडव्या कदरीनं जपतात आणि वेळच आली तर जोहाराची अग्निकाष्ठं सहज लीलेनं कशी गिळतात, याचा अितिहास, बाबा, नजरेआड करू नका.

**बनबीर०**—बस्स कर तुझं जोहार पुराण. हट्टी पोरी, भलभलत्या कुकल्पनांच्या भरीं पडून, सर्वत्र चाललेल्या आनंदात विरजण घालू नकोस. तुला माझ्या मनस्स्वास्थ्याची काही चाड वाटत असेल, तर चल, आटप, पूस ते अश्रू. अश्रू अुसासे न् अुमाळे, बनबिराच्या या दिग्विजयी रियासतीत, आजच्या आज, आत्ताच्या आत्ता, हद्दपार झाले पाहिजेत. (कमल अश्रू पुसते.) हां. शाबास. चल अेकदा गोडशी हास पाहू. (ती हसते.) शाबास. अुगाच नाही लोक म्हणत का आमची कमलदेवी गुणांची म्हणून. अशी तुं हासऱ्या चेहऱ्यानी माझ्यापुढं आलीस, का माझ्या पराक्रमांचं चैतन्य दुप्पट चौपट वाढतं. कमल, आता नुकतीच आलेली बातमी, अुद्या सुर्योदयाबरोबर, साऱ्या मेवाडभर पसरताच, माझ्या किर्ति दुंदुभीचा दणदणाट गगनाला भिळेल. आनंदानं दाही दिशा कोंदाटून जातील.

**कमल०**—अशी कोणती आनंदाची बातमी ती बाबा ? या कमलला नाही का ती सांगायची ?

**बनबीर०**——तुला ती बातमी आधी सांगितली पाहिजे. पहिली बातमी. आमची लाडकी राजकन्या कमलाराजा लवकरच धरमार युवराज्ञी होणार. (कमल दूर होते.) मनाजोगतं असं काही झालं म्हंजे आपली पसंति कुमारिका अशाच गोड तिटका-यानं दाखवतात. का ? फिरली आमच्याकडं पाठ ? लागला धारा नगरीचा ध्यास ? (तिचा हात धरून जवळ आणतो.) पण अितक्यातच का आमचा हा तिटकारा. लग्न झाल्यावर विसरा वाटेल तर आम्हाला, आणि विसरणारच. आम्ही तो विचार गोड गोडच मानू. पण त्या गोष्टीची गोडीसुद्धा निगोड पाडणारी दुसरी बातमी, म्हणजे राणी रूपमति ज्या लौकिकी आक्षेपाच्या तंतूसाठी माझं पाणिग्रहण करायला बाचकत होती, त्या आक्षेपाचा विषय.... तरूण अुदयसिंह.....

**कमल०**——(अेकदम अुमाळ्यानं) काय? चितोडला परत येणार ?

**बनबीर०**——माझ्या पटाअीत मारेक-यानी जगात्नं कायमचा नाहिसा केला.

(कमल किंकाळी मारून खाली पडते.)

**बनबीर०**——कमल कमल, झालं काय तुला अेकदम असं ? (तिला अुठवतो.)

**कमल०**——(रडत) अुदयसिंह... अुदयसिंह, तुमचं अंतःकरण किती हो अुदार, दिल्दार न् सरदारी होतं.

**बनबीर०**——(स्व.) आस्सं. यात काहीतरी भानगड दिसते. (अु.) कमल, माझ्या कट्ट्या दुस्मानाची ही बातमी अैकून तुला अेवढा धक्का बसावा ? दुक्खाला बेभान भरति यावी ? काय याचं कारण ? खरं सांग. बतावणी करशील, तर देखत हुकूम देशोधडीला जाशील.

**कमल०**——बनबीराच्या रागाचा झपाटा ही कमलदेवी चांगली जाणून आहे. पण प्राण गेल्यावर प्रेताला आगीचं भय कितीसं असणार ? ख-या गोष्टी मी आता कशाला छपवू ? बिचारा अुदयसिंह गेला.. गेला बाबा, तुमच्या न् जगाच्या रागालोभाच्या हद्दपार गेला. आता त्याला कुण्णा कुण्णाचं भय अुरलं नाही. राजकुमार, या बेमाणुसकीच्या जगातनं झाली तुमची सुटका, पण आपल्या दिल्दारीनं सा-या जगाला हो लावलात चटका.

**बनबीर०**——अुदयसिंहाची न् तुझी भेट झाली होती ?

**कमल०**——सहा महिने झाले बाबा. विश्वेश्वराच्या दर्शनाला आपण मला काशीला पाठवलं, तिकडून परत येताना शेरशहाच्या अेका लुटारू टोळीनं आमच्यावर हल्ला करून, राखणीचे सारे शिपायी ठार मारले आणि मला कैद करून रोठसच्या किल्ल्यात शेरशहाकडे नेले. बाबा, ही हकीकत आपण अितक्यातच नाही ना विसरलां ?

**बनबीर०**——नाही. आणि त्याचा नतिजा शेरशहाला कधि ना कधि दिल्याशिवाय मी खास राहणार नाही. पण त्या गोष्टीचा अिथं काय संबंध ?

**कमल०**——त्या वेळी माझ्यावर गुदरलेल्या त्या प्रसंगाची, बाबा, आपल्याला करवेल तशी कल्पना करा. मुसलमानांच्या कैदेत हिन्दु तरुणी, म्हणे हव्या त्या चारगटानं हवी ती थट्टा करण्याची बेवारशी चीज. बन्दिवासाचे.. अुधळ्या हवेतले.. काटेरी पिंजऱ्यातले ते दिवस मी कसे काढले असतील, ते मला माहीत का या अेकलिंगजीला माहीत. अशा वेळी अेका तरुणाचं हिन्दु हृदय, माझी दुबळी स्थिति पाहून कळवळलं. आ हा, शुक्राच्या चांदणीप्रमाणं चमकणारे त्याचे ते सरदारी दयाळू डोळे...

**बनबीर०**——आणि तो तेजस्वी डोळ्यांचा तरुण म्हणजे अुदयसिंह, हेच ना तूं मला सांगणार ?

**कमल०**——होय बाबा. त्या नरकवासातनं अुदयसिंहानंच माझी सुटका केली. प्रथम त्याने शहाची पुष्कळ मनधरणी केली. विनवणी केली, पण खंडणीचा हट्टच जेव्हा तो घेअून बसला, तेव्हा अुदयसिंहानं आपल्याजवळ होतं नव्हतं ते... अंगावरल्या पोषाखासकट विकून टक्के केले, नि खंडणीचा अैवज भरुन माझी सुटका केली.

**बनबीर०**——(स्व.) आश्चर्यानं हिनं मला चकित केलं.

**कमल०**——अुपकारांच्या अुमाळ्यानं आणि आनंदाच्या अुसळीनं, बाबा, त्याच्या अीश्वरी पायांना मी आपल्या आसवांनी आंघोळ घातली. त्याच्याहि डोळ्यांतल्या आसवांनी माझ्या मस्तकावर अभिषेक केला.

**बनबीर०**——त्यानं नाही का तुझी विचारपूस केली ?

**कमल०**——पणं मी जेव्हा माझं नाव बनबीर महाराजांची राजकन्या कमलदेवी असं सांगितलं, तेव्हा तो एकदम दचकला. त्याचा चेहरा पांढरा फटफटित पडला.

**बनबीर०**——तुझी सुटका केल्याबद्दल त्याला पश्चात्ताप झाला असेल.

**कमल०**——मुळीच नाही बाबा. चटकन भान सावरून तो मला म्हणाला, कमलदेवी, तूं आता खुशाल चितोडला जा. तिथं माझी अनाथ माता आहे. तुला इथल्या बंदिवासाची काही कल्पना असेल, तर त्या मावलीची सावलीसारखी पाठराखणी कर. अुदयसिंह तुझ्याशी ज्या माणुसकीनं वागला, त्या भावनेनं तूं तिच्याशी वाग. असा तो श्रीमंत दिलाचा दिलदार सरकार. आणि असला अुमदा मोहरा, देवा गौरीहरा, पोटभरू मारेकऱ्याच्या हातनं मारला जावा ना. (स्फुंदन करते).

**बनबीर०**——कमल, या भानगडीचा आजवर मला तूं थांगसुद्धा लागू दिला नाहीस.

**कमल०**——बाबा, उपकारानी त्यानी माझं जीवनसर्वस्वच जिंकून घेतलं हो ?

**बनबीर०**—माझा दुस्मान तुझं जीवनसर्वस्व जिंकणार ?

**कमल०**—मरणीं मेलेल्या महात्म्याबद्दल आता कशाला एवढा राग बाबा. आपला राजकारणी द्वेष सारखा हात धुवुन त्यांच्या पाठीमागं लागला होता. म्हणून स्वताचं नांव बाहेर न फोडण्याबद्दल, त्यानं मला तुमच्याच हो रक्ताची शपथ घातली होती. त्याच्या मृत्यूबरोबरच, बाबा, तुमच्या द्वेषाची नाही का तुम्ही आता समाप्ती करणार ?

**बनबीर०**—तुझ्या बापाच्या दुस्मानानं दिलेल्या स्वातंत्र्यांची तुला एवढी गोडी न् महति वाटते ?

**कमल०**—पण बाबा, स्वप्नात तरी त्यानं तुमचा हेवादावा केला होता का हो ?

**बनबीर०**—बेइमान. बनबिरापुढं अुदयसिंहाची तरफदारी ? त्याच्या गुणांमुळेच तो हरामखोर ठार झाला.

**कमल०**—राजाधिराज बनबिराच्या मुलीची अब्रू ज्यानं राखली, त्याचे असेच का आपण उतरायी होणार? राजकारणी हेवादावा कितीहि कडवा असला तरी, बाबा, सत्ताधाऱ्यांनी माणुसकीला अगदीच लाथाडून भागणार नाही.

**बनबीर०**—बापाच्या दिग्विजयी कीर्तीला काळिमा फासणारी कारटी बनबिरानं अजून जिवंत ठेवली आहे. याबद्दल तुझ्या दैवाचे तूं आभार मान, माझ्या दुश्मानाच्या मेहरबानीनं जिवंत रहाण्यापेक्षा, शेरशहाच्या काटेरी पिंजऱ्यांत तूं गुलाम राहिली असतीस, तुझ्या अब्रूचे हवे ते बीभत्स धिंडवडे निघाले असते, निर्जन अरण्यात लांडग्या कोल्ह्यांनी तुझ्या शरिराचे लचके लचके तोडले असते, तरी देखिल मला इतकं वाईट वाटलं नसतं.

**कमला०**—बाबा, देवाप्रमाणं तुम्हाला वंद्य मानून, माझ्या पितृभक्तीची मी कसोशी केली, त्याला अखेर हेच का फळ? कातड्याच्या प्रेमापेक्षा आतड्याची माया निराळीच म्हणतात, ते काही खोटं नाही. कुठं तो दिल्दार अुदयसिंह. . . . .

**बनबीर०**—(तलवार उपसून) माझ्या शत्रूचा नावाचा उच्चार? सफाचाट गर्दन छाटून टाकीन.

(गाभाऱ्यात अुदयसिंह झिंदाबाद असा ध्वनि निघतो. बनबीर ३ वेळा अुदयसिंह झिंदाबाद? असा प्रश्नार्थक सवाल टाकतो, त्याला तीनहि वेळा तोच जबाब मिळतो.)

**बनबीर०**—काय? हरामखोर देवसुद्धा माझ्या वैऱ्याचे साथीदार?

**कमला०**—बाबा, देवानं काय केलं? तुमच्याच शब्दांचा गाभाऱ्यात प्रतिध्वनि उमटला.

**बनबीर०**—पण प्रथम ध्वनि कुणी काढला? अुदयसिंह झिंदाबाद? (तोच आवाज होतो) नाही नाही. बनबीर झिंदाबाद. आता कां नाही होत प्रतिध्वनि? हा एक लिंगेश्वरच राजद्रोही हरामखोर आहे. बस् ते काही नाही. आमच्या सत्तेविरुद्ध नुसता सुस्कारा टाकणाऱ्या दानव, मानव, देवांचा, क्षणाचाहि मुलाजा हा बनबीर राखणार नाही. कोण

आहे जाबत्यावर? (एक सेवक येतो.) जा, एक घण घेऊन ये. (आज्ञा म्हणून तो जातो.) बनबिराच्या सत्तेचा उपमर्द? मानला तर देव, नाहीतर धोंडा. (सेवक घण आणून देतो.) (पिंडीला उद्देशून) बोल, काय उद्गार काढलास? (गाभा-यातून.––अुदयसिंह झिंदाबाद) अुदयसिंह झिंदाबाद? निमकहराम, हे घे बनबीरद्रोहीचं प्रायश्चित.

(पिंडीवर घण उभारून धावतो. कमल एकदम लगट करून त्याच्या हातून घण हिसकावून घेते.)

**कमल०**––बाबा, बाबा, काय करता हे ? बाप्पा रावळानं प्राणप्रतिष्ठा केलेलं चितोडचं हे कुलदैवत.

**बनबीर०**––कुलदैवत. आमच्यासारख्या दिग्विजयी जेत्याना असल्या दगडी कुल-दैवतांची पर्वा नाही. हा काळाचा काळ देवबीव कुछ जानता नहि. मेवाडचा परमेश्वर हा बनबीर. त्याची अिच्छा हीच रजपुतांची राजनीति. तिला विरोध करणारांची तमा आम्ही बाळगणार नाही. (सेवकाला) हे अेकलिंगेश्वाराचं देवूळ आत्ता आजच्या रात्री जमिनदोस्त करा. अुद्या सकाळी सूर्यानं पूर्व क्षितिजावर आपलं डोकं वर काढताच, या ठिकाणी गाढवांचे नांगर फिरताना त्याला दिसले पाहिजेत. (सेवक जातो.) कमल, जा. यापुढं राणी रूपमतीच्या मुलाखतीची तुला सक्त मनाअी करण्यात येत आहे. चल, जा, चालती हो.

(कमल जाते आणि कर्णपाल येतो.)

**कर्ण०**––आनंदाची बातमी, सरकार, आनंदाची बातमी.

**बनबीर०**––काय, जयपाळानं रुपमतीची संमति मिळवली ?

**कर्ण०**––त्या राणीला राहू द्या तशीच जळफळत. अुदयसिंहाला ठार मारणारा आपला तरूण मर्द मारेकरी हुजूरच्या दर्शनाला आला आहे.

**बनबीर०**––कोण ? आपला जेठी प्राणमल्ल ?

**कर्ण०**––प्राणमल्लाचा प्राण अुदयसिंहानंच घेतला. पण त्याच्या बरोबर असणा-या या मर्द केदारनाथानं अुदयसिंहाला स्वता ठार मारून, सरकारच्या पायांची बिनमोल सेवा बजावली आहे.

**बनबीर०**––शाबास त्या मर्दाची. त्याच्यापाशी आमची खुणेची राजमुद्रिका आहे ना ?

**कर्ण०**––अलबत. ती घेअूनच महाराजांची खात्री पटवण्यासाठी आज्ञेची वाट पहात तो बाहेर अुभा आहे.

**बनबीर०**––जा. आत्ताच त्याला आमच्या समोर घेअून ये. (कर्ण, जातो.) (स्व.) या बातमीनं तर माझ्या मनोरथाची भिंगरी आशेच्या अंतराळात पार भिरकावून दिली. हा केदारनाथ खुणेची राजमुद्रिका घेअून आला असेल, तर अुदयसिंहाच्या अवतारसमाप्तीची शंकाच अुरणार नाही.

(केदारला घेअून कर्णपाल येतो.)

**कर्ण०**——सरकार, हा पहा तो मर्द केदारनाथ.

**केदार०**——महाराजाधिराज बनबीर महाराजांचा जयजयकार असो. सरकारच्या पायांच्या पुण्याईनं अुदयसिंहाला ठार मारण्यात यशवंत झालेल्या या केदारनाथ सेवकावर खावंदाची मेहरनजर असावी. (आंगठी दाखवून) ही सांकेतिक खूण माझ्या सेवेची बिनतोड साक्ष देईल.

(कर्णपाल आंगठी घेअून ती बनबिराला देतो.)

**बनबीर०**——(आंगठी तपासून) खात्री पटली. शूर केदार, तुझ्या कामगिरीविषयी आमची बालंबाल खात्री पटली. प्राणमल्ल जेठीचा मदतगार दोस्त तूंच ना ?

**केदार०**——हां हुजूर. शत्रुच्या रक्ताचा टिळा महाराजांच्या कपाळी जाअून लाव, अशी प्राणमल्लाची शेवटची इच्छा. ती मला अक्षरशः जरी पार पाडता आली नाही, तरी अुदयसिंहाच्या रक्तानं माखलेला हा खंजिर तरी, महाराजांनी आपल्या भालस्पर्शानं धन्य करावा. (खंजीर देतो.)

**बनबीर०**——(खंजिराला लागलेले रक्त पहात.) केदार, या खंजिरानं राजकुमाराच्या काळजाचा ठाव फार सफाईत घेतलेला दिसतो. या टिचभर पात्यानं त्याच्या साऱ्या धाडशी महत्त्वाकांक्षा चुटकीसरशा हवेत फुंकून, आमच्या दिग्विजयाचा राजरस्ता सताड मोकळा केला, आ हा. अेकवार त्या भिकारड्या पण धाडशी पोराच्या छातीत बनबीरद्वेषानं उसळणार ताजं तांपट रक्त, या तिखट पात्यावर माखून, आज माझ्या हातात आलं आहे. याला कसलंहि चैतन्य नसलं, तरी माझ्या पराक्रमाच्या भरारीचं चैतन्य, रक्तलेपानं बेहद्द फुरफुरलं आहे. याला वाचा नसली तरी अशाही निर्वाच्य स्थितीत, बनबीराच्या भावी उत्कर्षाची गीता, हे रक्त मुक्त कंठानं गात आहे. (रक्ताचा वास घेत) आ हा हा, आपल्या कट्ट्या दुस्मानाच्या रक्ताचा अस्सा वास घेण्याचं भाग्य फारच थोड्या नरपतींच्या नशिबी लिहिलं असेल. जगातल्या साऱ्या सुगंधाचा अर्कसुद्धा याच्या पासंगाला पुरणार नाही.

**केदार०**——खावंद, बेआदबी माफ, आपल्या सारख्या दिग्विजयी नृपतीनं हिऱ्यामोत्यांची राजचिन्हं छातीवर लटकावण्यापेक्षा, आपल्या दुस्मानाच्या रक्तानं माखलेले खंजीर, माळ करून, वैजयंतीप्रमाणं गळ्यात धारण केले पाहिजेत. देवाधिदेवि महादेव नररुंड मालधर म्हणून मिरवण्यातच धन्यता मानतात.

**कर्ण०**——श्रीशंकर तर नुसता नररुंड-मालधर, पण आपले राजाधिराज प्रत्यक्ष नृपरुंड-मालधर.

**केदार०**——यात काय संशय, परमेश्वरी अवताराशिवाय पराक्रमांचा धौशा असा हुकमी विजयी होत नसतो. महाराज, आपल्या मेहरबानीची एकाग्र नजर किंचित त्या पात्यावर फिरवावी म्हणजे सरकारच्या भावी चरित्राचा चित्रपट त्यावर स्पष्ट उमटलेला दिसेल.

**बनबीर०**—(पात्यावर तीक्ष्ण नजर रोखून) खरंच, केदार, कर्णपाल, या रक्तलांछित खंजिराच्या पात्यावर आमच्या सर्व महत्वाकांक्षा जिवंत हालचाल करताना दिसताहेत. हा पहा, हा काळाचा काळ बनबीर, केवळ मेवाडच्याच नव्हे, तर साऱ्या हिंदुस्थानचा बादशहा म्हणून, कौरव पांडवांच्या हस्तिनापूरच्या प्राचीन सिंहासनावर चढत आहे. पादाक्रांत झालेले हुमायून, शेरशहा, आमची रत्नजडीत भरजरी झगा अुचलून, आदबीनं आमच्या मागं चालत आहेत. काबूल कंदाहार न् कुस्तुन्तुनियाच्या सुलतानांचे अेक वेळ मगरुर असलेले प्रतिनिधी, हातात करभार घेऊन, आम्हाला खडीताजीम देण्यासाठी दरबारात खाली माना वाकवून अुभे आहेत. ही पहा, अैका, तोफांची सरबत्ति झाली. मंगलवाद्यांचा घणघणाट चालू झाला. आम्ही आता बादशाही सिंहासनावर चढणार. पण आम्ही अेकटेच सिंहासनावर ? काय म्हणूनं ? कर्णपाल, आमची राणी ... नव्हे महाराणी.... सौन्दर्यसम्राज्ञी रुपमति यात कां दिसत नाही ? कुठं आहे रुपमती ? रूपमती, बस्स रूपमती.

**कर्ण०**—सरकार, हा अुद्याचा चित्रपट आहे, आजचा नाही. हस्तिनापूर हस्तगत करण्यापूर्वी रूपमतीचा हस्त हुजूरना हस्तांकित केलाच पाहिजे.

**बनबीर०**—रास्त आहे तुझं म्हणणं कर्णपाल. (केदारला खंजीर परत देतो.) अभिमानी केदार, आज तूं न् तुझ्या खंजिरानं बजावलेली चोख कामगिरी आम्ही फार फार वाखाणतो. आता आणखी अेक तितक्याच महत्वाची, पण नाजूक कामगिरी तुझ्या सुपूर्द करण्याची आमची मेहरबानी होत आहे.

**केदार०**—बंदा हुकमाचा ताबेदार आहे.

**बनबीर०**—आत्ताच्या आत्ता जाअून राणी रूपमतीची भेट घे. लक्षात असू दे, अुदयसिंहाच्या मृत्यूची बातमी तिला लागली असून, खुनाच्या वहिमाची कडवी नजर तिनं आमच्यावर रोखून धरली आहे. केदार, तिच्याकडं तूं जा. राजकुमाराला मरताना तूं प्रत्यक्ष पाहिलंस, अशी तिची खात्री पटव. आणि प्राणांतिच्या भयंकर यातनांनी तो तडफडत असताना, त्यानं आपल्या आअीला शेवटची अशी अिच्छा, तुझ्याजवळ सांगितल्याचं तिला खुलवून सांग, किं माझ्या आअीनं राजाधिराज बनबिराचं शास्त्रोक्त पाणिग्रहण करून, देशात शांतता प्रस्थापित करावी. या युक्तीनं आमच्याविषयी राणीचा सर्व गैरसमज दूर होऊन, आमच्या अिच्छेला ती खास मान देअील.

**केदार०**—वाहवा, युक्ति तर मोठी छान निघाली.

**कर्ण०**—अवतारी महात्म्यांची लीला काय सांगावी.

(जयपाळ येतो.)

**बनबीर०**——ओहो. जयपाळ, अगदी वेळेवर आलास. या तरुण मर्दाला तूं ओळखतोस काय ?

**जयपाळ०**——(केदारला निरखून) नाही सरकार. मी याला कधीच पाहिलेला नाही. हा चितोडकर नसावा, परदेशी असावा.

**बनबीर०**——या अनोळखी परदेशी केदारनं आपल्या साम्राज्याची अेक अतिशय महत्वाची कामगिरी बजावली आहे. जयपाळ, आत्ताच्या आत्ता तूं याला घेअून राणीकडं जा. मरण पावलेल्या राजकुमाराची शेवटची अिच्छा हा तिला स्वतः सांगणार आहे. ती अेकल्यावर राणीच्या मनात आमच्याविषयी प्रेम अुत्पन्न होअील, अशी आम्हाला बळकट आशा आहे. (कर्णपालास) कर्णपाल, चल. तिकडं मेजवानी अगदी थाटून राहिली असेल. चल. आता अुशीर नको. चमकदार मद्याच्या पेल्यात आमच्या विजयोत्सवाचा आनंद मूर्तिमंत चमकला पाहिजे आणि आज रात्रीच्या रोषनाअीनं प्रत्यक्ष सूर्याचा गर्व पार अुतरला पाहिजे.

(बनबीर आणि कर्णपाल जातात.)

**केदार०**——काय मेहरबान, राजवाड्यात थाटलेली मेजवानीची चंगल नि अर्कप्राशनाची चंगळ अुडवायला, नाही का तुमची लहर लागत ?.... .... काय हो, अुत्तर देत नाही ? मुद्रेवरून तुमच्या डोक्यात कसल्या तरी चमत्कारीक विचारांचं समुद्रमंथन चाललेलं दिसतयं.

**जय०**——समुद्रमंथन तर खरंच. पण कसल्या गुप्त धोरणानं तुझी या ठिकाणी रवानगी झाली आहे, हे तरी सांगण्याची तू मेहरबानी करशील का ?

**केदार०**——हो, हो, न सांगायला काय झालं? माझा धंदा पिढीजात मारेक-याचा. आमच्या डोळ्यांवर सदा न् कदा खून चढलेला. हवा त्याचा, हवा तिथं, हवा तसा खून पाडणं, हाच आमचा मूळधर्म. श्वासोच्छ्वास करणं, ही जशी माणसाची सहज क्रिया, तसे खून पाडणं ही आमची सहज लिला. माझ्या भेसूर उग्र चेह-या-वरून नि पोषाखावरून, अुदयसिंहाचा खून करणारा तो मीच, हे तुला समजायला हवं होतं.

**जय०**——काय? अुदयसिंहाचा खून करणारा?

**केदार०**——का? तुला आश्चर्यसं वाटलं? राजघराण्यातला रक्ताशिवाय, दुस-या कोणत्याही रक्ताची चटक या माझ्या खंजिराला नाही. यात आश्चर्य कसलं?

**जय०**——आश्चर्य कसलं म्हणा. होतंय ते ठीकच होतयं. तो खरोखरच बनबिराचा शत्रू होता.

**केदार०**——बनबिराचा शत्रू, म्हणूनच मेवाडचा हाडवैरी न् चितोडचा चाण्डाळ नव्हे का?. . . का? . . . एकदम तुझी वृत्ति अशी बावरली? खवळली? उसळली?

**जयपाळ०**——आग लागो या माझ्या जीविताला नि दुर्भाग्याला. नाही . . . नाही. . . नाही माझ्या हातून आता असली छपवाछपवी होणार. राजकुमाराच्या रक्तानं माखलेला खुनी बदमाष या माझ्यां डोळ्यांना पहावतो तरी कसा? बस. . . बस झाला हा मनाचा कोंडमारा न् खोट्या राजनिष्ठेचा मुखवटा. जा. आत्ताच्या आत्त त्या जुलमी हरामखोर बदनाम बनविराला जाऊन सांग, जयपाळ तुझ्या सत्तेचा मुलाजा मुळीच मानीत नाही. अुदयसिंहाच्या रक्तानं माखलेल्या या तुझ्या हातांची सुद्धा मी दिक्कत बाळगीत नाही. जा. त्या अत्याचारी सैतानाला जाऊन सांग, राक्षसा, माझाहि प्राण घे. गळा कापून घे, कातडी सोलून घे, हवा तसा घे. बनबीर राक्षसाचा सत्यानाश........ सत्यानाश........ सत्यानाश, अशा आरोळ्या ठोकीत, मरणाला मिठी मारायला हा जयपाळ तयार आहे.

**केदार०**——अरे वा, तुझी बरीच तयारी दिसते. अुदयसिंहावर तुझं प्रेम होतंस दिसतं.

**जय०**——त्याच्यावर कुणाचं प्रेम नसेल. चितोडगडावरचा धुळीचा कण न् कण त्या सद्‌गुणी राजपुत्राच्या प्रेमानं भारलेला आहे. हाय हाय, त्याचा स्वभाव इतका उमदा न् दिलदार, त्याचं चारित्र्य अितकं अुज्ज्वल न् प्रवित्र, का प्रत्यक्ष जहरी द्वेषाची नांगीसुद्धा बोथट पडावी आणि त्याच्या धवल कीर्तीवर शिंतोडा उडवताना, जगातल्या सैतानी वृत्तीची सुद्धा मान मुरगळून पडावी. असला चितोडचा मोहरा, रजपुतांचा राजा, तुझ्यासारख्या पोटभरू मारेकऱ्याच्या शस्त्राला बळी पडावा. त्यापेक्षा आता मरण काय वाईट? ज्याच्यासाठी जगायचं, तोच मरणीं मेल्यावर, धरणीला या अभाग्याचा भार कशाला? त्या पाषाणहृदयी राक्षसाचा तूं इनामी सेवक. मी पण अुदयसिंहाइतकाच त्या राजकुमाराच्या छातीत घुसलेल्या या तुझ्या काळशस्त्रानं, ही माझी बनबीरद्रोही छाती फाडून टाक. टाक . . . टाक. . . .अेका झटक्यात आटपून टाक. (त्याच्या कंबरेच्या खंजिरासाठी लगट करतो.)

**केदार०**——(त्याला आवरून) राजकुमारावरच्या तुझ्या प्रेमाची न् निष्ठेची मी मोकळ्या मनानं तारीफ करतो आणि माझ्या या खंजीराचीच शपथ घेअुन सांगतो, का मी या बनबीराला सपशेल फसवला आहे. अुदयसिंह अजून जिवंत आहे.

**जय०**——अुदयसिंह अजून जिवंत आहे ?

**केदार०**——अितकं नव्हे तर या घटकेला तो चितोडगडावर आहे.

**जयपाळ०**——अशक्य. साफ खोटी गोष्ट. माझ्याशी तरी लफंगेगिरी करू नकोस.

**केदार०**—तुला विश्वास वाटंत नसेल, तर त्याला आत्ताच्या आत्ता तुझ्यापुढं आणून अुभा करतो.

**जय०**—पाया पडतो, बाबा तुझ्या पाया पडतो. अेवढा तरी अत्याचार करू नकोस. या वाघाच्या जबड्यात त्या बिचा-या कोकराचं बलिदान करू नकोस.

**केदार०**—अरे, अितका कशाला घाबरतोस. मी त्याला अितक्या गुप्त वेषानं अिथं घेअुन येतो का, अितरांची गोष्टच सोड, पण तूं सुद्धा त्याला ओळखू शकणार नाहीस.

**जयपाळ०**—काय ? मी सुद्धा त्याला ओळखणार नाही ? तुझा आत्मविश्वास फार दांडगा दिसतो.

**केदार०**—अलबत. किती वर्ष तूं पाहिला नाहीस त्याला ?

**जयपाळ०**—जवळजवळ सहा वर्ष झाली. त्या पन्ना मावलीनं आपला बारा वर्षाचा कोवळा पोटचा गोळा संग्रामसिंह या हरामखोर बनबिराच्या कट्यारीला बळी देअून, राजकुमार अुदयसिंहाचा प्राण वाचवला आणि त्याला हातोहात चितोडहून पळवला. त्या काळघटकेपासून आतापर्यन्त या अभाग्याला राजकुमाराचं मुळीच दर्शन नाही.

**केदार०**—खरं ना ? मग या सहा वर्षाच्या हद्दपारीत त्याच्या वाढत्या तारुण्याच्या आवाजात न् चेह-यात खात्रीनं अितका फरक पडला असेल, का तो तुझ्यासमोर येअून अुभा राहिला तरी त्याला ओळखायला तुझी नजर खास चकलीच पाहिजे.

**जय०**—केदारनाथ, या गोष्टी कितीहि ख-या असल्या तरी अस्सल राजतेजानं चमकणारा त्याचा अुमदा चेहरा आणि पाणीदार डोळे, यांची आमची आठवण कालान्तरानेहि बुजणारी नाही. शिवाय अेक खूण तरी अशी आहे की ती पहातांच, चितोडचा हरअेक मनुष्य त्याला हटकून ओळखल्याशिवाय रहाणार नाही.

**केदार०**—आस्सं ? अशी कोणती ती खुण ?

**जय०**—राजकुमार दहा अकरा वर्षाचा असताना, अजायबखान्यातल्या अेका क्रूर चित्त्याने त्याच्या आअीच्या... राणी रूपमतीच्या अंगावर झाप टाकली. त्यावेळी राजकुमारनं कट्यारीच्या अेकाच वारात चित्त्याला ठार केला. त्या झटापटीत चित्त्याने अुदयसिंहाच्या कपाळावर पंजाची अेक चपराक मारली. त्याची खोक.....

**केदार०**—काय खोक ?

**जय०**—भालचंद्रासारखी ती सुन्दर खोक कधीहि नाहिशी होणार नाही.

**केदार०**—(शिरस्त्राण बाजूला सारून) पहा बरं, ती अशीच होतीच का.

**जय०**––(चपापून) मी कुणाला पहात आहे ? स्वप्नात तर मी नाही ना ? राजकुमार अुदयसिंह ? माझे पूज्य महाराज ? (गुडघे टेकून प्रणाम करतो.) महाराज, हे काय गौडबंगाल ? केदारनाथ मारेकरी हाच राणा अुदयसिंह ?

**केदार०**––यात काय संशय. अिमानी जयपाळ, अूठ अूठ. तुझ्या अेकनिष्ठेची फेड मला अशी करू दे. (त्याला कडकडून भेटतो.)

**जयपाळ०**––महाराज, आजचा दिवस धन्य. आपले दर्शन झाले. पण महाराज.....

**अुदय (केदार)** ०––का ? अेवढा कांपतोस कां ? माझा हात घट्ट का धरतोस ? तुला माझा संशय येतो का ?

**जय०**––मुळीच नाही महाराज. आमच्या थोरल्या महाराजांचा हा हुबेहूब तोंडवळा पाहून कोण शंका घेअील ? पण बनबिरानं मुद्दाम पाठविलेल्या त्या मारेकऱ्याच्या तडाक्यातून महाराजांची कशी सुटका झाली ?

**अुदय०**––प्राणमल्लानं माझ्यावर झाप तर मोठी सफाअीत टाकली. पण चपळाअी करून मी हा खंजीर त्याच्या हातून तितक्याच चपळाअीनं हिसकावून घेतला न् डोळ्याचं पातं लवतं न् लवतं तोंच त्याच्या छातीत बिनचूक खुपसला.

**जय०**––असल्या प्रसंगावधानी चपळाअीबद्दल महाराजांची ख्यातीच आहे.

**अुदय०**––त्याच्या बोटात बनबिराची ही अंगठी होती. प्राण सोडताना तो मला म्हणाला, पापाचं प्रायश्चित्त मला चांगलंच मिळालं. त्याचं थोडंतरी पालन व्हावं म्हणून ही घे अंगठी. बनबिराला ही तूं दाखविलीस म्हंजे तुझ्या मृत्यूबद्दल त्याची खात्री पटेल आणि साऱ्या मेवाडभर आणि खुद्द चितोडगडावर सुद्धा तुला बिनधोक बिनसंशय अुघड्या माथ्यानं वावरता येअील. अितकं बोलून प्राणमल्लानं प्राण सोडला.

**जय०**––पण या कोळ्या कभिन्न वेषानं, राजवाड्यात आपला प्रवेश कसा झाला?

**अुदय०**––कसा म्हजे? अुदयसिंहाचा खून करणारा तो मीच, या बतावणीनं. शिवाय ही खुणेची आंगठी न् बनबिराचं नांव खोदलेला हा खंजीर, प्रत्येकाची तशीच बिनचूक खात्री पटवीत आहे.

**जय०**––आपण अिथं येण्यापूर्वी आपल्या मृत्यूची बातमी सगळीकडं फैलावली होती.

**अुदय०**––ती कंडी मीच पिकवली होती. लोकांचं काय? जरा कुठं कुणी काही हूल उठवली का तिचा प्रतिध्वनि तेव्हाच सगळ्यांच्या जिभांवर नाचू लागायचा. खऱ्या तोट्याची पारख करतो कोण? . . . जयपाळ, वेषांतराचं हे नाटक आतापर्यंत तरी बेमालून बिनबोभाट ठीक वठलं. . . . पण माझ्या आअीची काय अवस्था आहे? तिची

आठवण झाली का माझा विवेक पांगळा पडून, सारा देह थरथर कापू लागतो. तिची जातिवंत रजपुती तडफ अजून आपल्या सत्याला नाही ना पारखी झाली?

**जय०**——नाही, रतिमात्र नाही. खुनाच्या धमक्यांचा न् जबरीच्या दहशतींचा, त्या राक्षसानं त्यांच्यावर सारखा मारा चालू ठेवला आहे, तरीसुद्धा मासाहेब मेरुपर्वतासारख्या अचळ न् अभेद्य आहेत.

**अुदय०**——या कामी, परमेश्वरा, तू माझ्या मातृदेवतेचा पाठीराखा हो आणि तिच्या दुक्खाची समाप्ती करण्याची मला शक्ति युक्ति दे.... बरं जयपाळ, मासाहेबांची न् माझी भेट तूं केव्हा करतोस ? चल, मला त्यांची आत्ताच भेट घेतली पाहिंजे.

**जय०**——महाराज, आपल्या दर्शनानं मला कितीहि आनंद होत असला, तरी आपण या ठिकाणी——या वाघाच्या जबड्यात पाअूल ठेवल्यापासूनं.... काय असंल ते असो... माझ्या मनात भलतीच भीति अुत्पन्न झाली आहे.

**अुदय०**——भीति ? चोर गुन्हेगारानी भीति बाळगावी. निष्कलंक मनोवृत्तीला भीतीची काय पर्वा? आपण काय कुणाचा घातपात केलाय, तर भीतीच्या गोष्टी बोलतोस ?

**जय०**——पण .... बनबिराची शंकेखोर वृत्ति ....

**अुदय०**——त्याची नको तुला काळजी. त्याच्याच खास हुकमानं मासाहेबांकडं मी जाणार आहे, हे तूं अितक्यातच विसरलास ? हे पहा, हा मारेकऱ्याचा पोषाक, ही राजमुद्रिका आणि हा खंजीर, या माझ्या वेषात मला ओळखण्याची कुणाचीहि छाती नाही.

**जय०**——आपण काहीहि म्हणा, नसत्या कल्पानानी माझं मन बेताल होत आहे. (पाय धरून) महाराज, कृपा करा न् शक्य तितक्या लवकर आपण चितोड सोडून जा.

**अुदय०**——प्रतिज्ञेला पाठ दाखवून पळून जाअू ? काय, काय म्हणतोस जयपाळ ? सिंहाचा छावा खवळल्यावर, मत्त हत्तीचं गण्डस्थळ फोडल्याशिवाय तो कसा राहील ? माझ्या ठरलेल्या निश्चयाच्या झंजावाताचा सोसाटा, या जुलमी राजाचं सिंहासन आजच्या आज अुखडून जमीनदोस्त करील.

**जय०**——म्हणजे ? महाराज, आपल्या मनात आहे तरी काय ?

**अुदय०**——माझ्या बाबांच्या रक्ताचा सूड. पन्नादाअीच्या खुनाचा सूड, संग्रामसिंहाच्या बलिदानाचा सूड आणि अखेर.... अखेर .... माझ्या मातेच्या छळाचा सूड.

**जय०**——महाराज, आपण अेकटे. ना कुणाचा पाठिंबा, ना मदत. किती लोकांशी तोंड द्यायचं आहे, याची महाराजांना काही कल्पना आहे काय ?

**अुदय०**—म्हणूनच हा खुनी बदमाषाचा पेहराव. जयपाळ, तुझ्या भीतिग्रस्त मनाची पर्वा करणचं मला काहीच कारण नाही. पण लक्षात ठेव, अुद्याचा सुर्य अअुदयाचलावर येण्याच्या पूर्वीच, त्या पापधन बनबिराच्या रक्तानं या खंजिराची तहान भागलेली तुला दिसेल.

**जय०**—महारुद्र महादेवा, माझ्या धन्यावर तुझ्या कृपेची पाखर घाल. पण महाराज, सूडाची अशी घोर प्रतिज्ञा करण्यापूर्वी, आपण पुरता विचार केला आहे ना ?

**अुदय०**—जयपाळ, विचारात आता किती काळ घालवणार ? या हतभागी राजकुमारानं तब्बल बारावर्ष रानावनात कदन्न खावून काढले, तरीहि तुमच्या विचारांत अजून कमकुवतपणाच ? तुम्हा रजपुताना खरोखरच काही विचार असता, तर हा जुलमी नराधम चितोडच्या छातीवर चढलाच असता कशाला ? .... पण जयपाळ, तूं घाबरु नकोस. भेदरु नकोस. मी अिथं येण्यापूर्वी आपले खरे अिमानी दोस्त, हमीर, कृष्णदेव, मालवराय ....

**जय०**—हमीर मला नुकताच देवळात भेटला.

**अुदय०**—या सगळ्यांच्या हिंमतीवरच मी आपल्या प्रतिज्ञेचा पाया अुभारला आहे.

**जय०**—चितोडच्या स्वातंत्र्याची आशा करण्याअितकी तयारी झाली आहे म्हणायची. तरी म्हटलं, हमीर असा अवचित गडावर कसा आला. महाराज, सांगा सांगा, कशी काय तयारी झाली आहे ती.

**अुदय०**—जयपाळ, परिस्थितीनं चितोडला गुलामगिरीत कितीहि भरडून काढलं, तरी स्वातंत्र्याच्या रजपुती आकांक्षा कधीहि मरणाऱ्या नव्हत. मेवाडाभिमानी निवडक नागरिकांची अेक मजबूत टोळी, दक्षिण बुरूज सुरुंगानं अुडवून आज गडावर घुसणार. आजच्या मेजवानीच्या चमचमीत खाद्यावर आणि भरंसाट मद्यावर यथेच्छ ताव मारून निशाबाजीत बेहोष तर्रर झालेल्या बनबिराच्या पोटभरू सैनिकांची सर्रहा कत्तल करणार आणि मेवाडच्या पायात खळखळणाऱ्या बनबिरी सत्तेच्या शृंखला आजच्या आज तोडणार, अशी बेलभंडार अुचलून सर्वांनी शपथ घेतली आहे. आणि लवकरच अुसळणाऱ्या त्या हलकल्लोळात, बनबिराच्या भडकत्या क्रोधापासून मासाहेबांचं रक्षण करीत, मी अिथंच आसपास रहाणार.

**जय०**—चितोडच्या कुलदेवता आपले मनोरथ पूर्ण करीत. पुण्यश्लोक बाप्पा रावळची पुण्यायी आपल्या निर्धाराना यशवंत करो. चितोडचा अुद्धार होवो.

**अुदय०**—तथास्तु, जयपाळ, तुझ्या अुत्साहि वाणीनं माझ्या सूडाच्या प्रतिज्ञेला दुप्पट चैतन्य आलं. तुमच्या सारख्या अिमानी दोस्तांचं पाठबळ असल्यावर हा अुदयसिंह कळिकाळाला दाद देणार नाही. अितकंच काय, पण आजची रात्र संपण्यापूर्वीच, चितोडची राष्ट्रदेवता, या बनबीर महिषासुराचं मंथन करून, विजयादशमीचं स्वातंत्र्यसोनं साऱ्या मेवाडभर अुधळून तुमचा जयजयकार करील.

**अंक दुसरा समाप्त.**

# काळाचा काळ



**अंक ३ रा]** **[प्रवेश १ ला**

(कमलदेवी आणि अुदयसिंह अचानक समोरासमोर येतात. अुदयसिंह चट्कन मागे परततो. कमलदेवी आश्चर्याने त्याच्या वाटेकडे पहात अुभी रहाते.)

**कमल०**——कोण ते ? बोलत कां नाही ? काय बाअी चमत्कार तरी. अलिकडं असली अनोळखी माणसं काय म्हणून अिकडं घिरट्या घालीत असतात ?

**अुदय०**——(स्व.) अनोळखी शब्दानं बाजू राखली.

**कमल०**——अनोळखीपणाचं पांघरूण पांघरलं, तरी ओळख नाही बरं लपणार. कोण आहे ते ? जबाब येतोय, का मारू जाबत्याला हाक ?

**अुदय०**——(नाइलाजाने पुढे येत.) अरेरे, घात झाला अखेर.

**कमल०**——कमलदेवीच्या हातून घात ? कधीच होणार नाही. अुदयसिंह जिवंत असेल, तर कमलदेवीचा आनंद अस्मान ठेंगणं करील.

**अुदय०**——दगाबाजी, खास माझ्याशी कुणीतरी दगाबाजी करीत आहे.

**कमल०**——दगाबाजी ? कमलदेवीच्या हातूनं दगाबाजी ? प्राण गेला तरी होणार नाही.

**अुदय०**——अहो बाअी, भलत्याच अनोळखी माणसाशी इतकी सलगी करणं शोभत नाही तुम्हाला.

**कमल०**——कशाला हवी आता ही छपवाछपवी ? शेरशहाच्या बन्दीतनं सुटका करून, जिला आपण जीवदान न् अब्रूदान दिलंत, ती ही कमलदेवी, आपल्या जिवासाठी हवं ते दिव्य करायला तयार आहे.

**अुदय०**——कमलदेवी, चितोडवरच्या हजारो लोकांना मी भुरळ पाडली, पण तुझ्या चतुरायीनं त्या भुरळीचं धुकं पार अुधळून लावलं, माझा घात झाला.

**कमल०**——कमल जिवंत असेपयन्त घात ? महाराज, अशी शंका तरी तुम्हाला कशी येते ? अितरानी आपल्याला ओळखलं नसेल नि ओळखणारहि नाहीत. पण दिव्य

प्रेमाच्या शोधनप्रकाशात, महाराज, मी आपल्याला ओळखल्याशिवाय कशी राहीन ? माझ्या अब्रूसाठी आपल्या सर्वस्वाचंहि बलिदान करणाऱ्या महाभागाला ही कमलदेवी कशी बरं विसरेल ?

**अुदय०**——राजकन्ये, तुझ्या मनाचा मोठेपणा नं हृदयाची श्रीमंती, या मृत्युलोकावर स्वर्गाच्या अैश्वर्याची दिव्य साक्ष पटवीत आहे. शेकडो संकटांना नि हालअपेष्टांना पोलादी निश्चयानं भरडीत चुरडीत येथवर मी आलो. पण आज तुझ्या चारुशीलापुढं मी हात टेकले. कष्टांच्या कठोर आघातानी छिन्नभिन्न झालेलं माझं हृदय, तुझ्या चांगुलपणाच्या वसंतानं कल्पनातीत फुलवून, आज पल्लवित केलं. स्त्रियांच्या हृदयाची माधुरी न् मार्दव, या दुर्दैवी अुदयसिंहानं आजवर अनेक वेळा अनुभवलेलं आहे. पण परिस्थिति.... हो परिस्थितीच. या अवदसेनं जन्मापासूनं माझा सारखा पाठलाग केल्यामुळं, त्या दिव्य भावनांचा घोट ओठाआड होण्यापूर्वीच, माझ्या सुखाचे अनेक प्याले खडतर दैवानं लाथाडून फोडलेले आहेत.

**कमल०**——खरं ना हे ? मग महाराज, या काळाच्या गुहेत पाऊल ठेवण्याचं धाडस आपण कशाला बरं केलंत ? महाराज, माझ्याविषयी आपल्याला थोडा तरी कळवळा वाटंत असेल, तर आत्ताच्या आत्ता हा चितोडगड सोडून आपण निघून जा. हात जोडते, पदर पसरते, पाया पडते. अिथं क्षणभरसुद्धा राहू नका गडे. आपण शीर सलामत जिवंत आहात, ही आनंदाची बातमी राणीसाहेबाना सांगून, त्यांच्या दुःखाचा भार हलका करण्याची कामगिरी मी पार पाडते. त्याची मुळीच काळजी करू नका.

**अुदय०**——मी पुन्हा वनवासात जाअू म्हणतेस ?

**कमल०**——आपण परदेशी सुखानं रहाण्यातच या कमलदेवीच्या सुखाचा पाया आहे. आपल्या बऱ्यावाईट भाग्यात सारं जिणं समरस करून बसलेल्या या कमलच्या प्रार्थनेचा नका गडे आता अव्हेर करू. प्रत्येक क्षणाला, महाराज, काळाचा काळपाश आपल्या मानेभोवती घट्टघट्ट आवळला जात आहे, याची जाणीव ठेवा. चला. आता क्षणभरसुद्धा अिथं रहायचं नाही गडे, मी आपली ना ?

**अुदय०**——कमल, मी तरी माझा राहिलो आहे काय ? या अफाट पृथ्वीवर माझं असं म्हणण्यासारखं काय राहिलं आहे ?

**कमल०**——महाराज, आपल्या पाठोपाठ वनवासी म्हणून हवं तिथं अनवाणी भटकायला ही कमलदेवी तयार आहे, पण अचानक काळपाशात सापडून, आपल्या उमलत्या जिवाचं बरं वाईट झालेलं, नाही गडे मला पहावणार.

**अुदय०**——कमल, तुझ्या विचारांची श्रीमंती कुबेराच्या अैश्वर्याचाहि गर्वभार अुतरील, अितकी गोड न् थोर आहे.

**कमल०**——आता बोलण्यात वेळ घालवू नका. अेकेक क्षण आपल्या सोनेमोल आयुष्याची काळनजरेनं मोजदाद करीत आहे. माझ्यावर कृपा करा. वाटेल तर, माझ्या प्रेमाचा धिःकार करा, मला साफ विसरून जा....

**अुदय०**——तुझ्या प्रेमाशी प्रतारणा ? वीज कडाडून मस्तकाचे कोळशे होवोत.

**कमल०**——आता वेळ घालवू नका म्हणते ना ? आपल्या रक्तासाठी तान्हेलेला वाघ सावध झाला नाही तोंच त्याची गुहा सोडून निघून जा लवकर.

**अुदय०**——अिथून लवकर निघून जावं..... असं मलासुद्धा वाटतं... प....ण...

**कमल०**——पण ? चटकन निघून जायला अडचण कसली ?

**अुदय०**——अडचण माझ्या दैवाची, दैव आड आलं नाही, तर मला न्याय मिळालाच पाहिजे. कमल, प्रत्यक्ष कृतान्त काळ कोपला, तरी माझ्या पित्याच्या खुनाचा सूड अुगवल्याशिवाय मी राहणार नाही. संकटाना भिवून मी आपला पाय मागं घेअू ? शक्य नाही ते आता. खुनाचा सूड घेतला नाही, तर माझे स्वर्गवासी बाबा मला शाप देतील.

**कमल०**——काय म्हटलं आपण ? बापाच्या खुनाचा सूड ? हां, महाराज, लक्षात असू द्या. मलाहि बाप आहे म्हटलं.

**अुदय०**——काय... काय म्हणालो मी ? माझ्या बाबांच्याविषयी काही बोललो ? छे छे. त्यात काही अर्थ नाही. त्या गोष्टीच्या आठवणीनं तिनं मला वेडंच लागलं आहे. भलत्याच वेळी त्याबद्दल अुगाच काहीतरी मी बडबडतो झालं.... मी काय बरं म्हणणार होतो ? हो. राणी रूपमतीला.... माझ्या आअीला भेटल्याशिवाय मी कसा परत जावू ?

**कमल०**——मला न्याय मिळालाच पाहिजे, असंच नाही का काहीसं आपण म्हणालात ? महाराज, आपण वेडाचं कितीहि सोंग पांघरलंत, तरी बिजलीच्या कडकडाटासारखे आपले ते शब्द माझ्या काळजात घुसले बरं. हा मारेकऱ्याचा गुप्त वेष, त्वेषानं तारवटलेली ही नजर, कपाळावर सणाणणाऱ्या या शिरा.... अखेर रक्तपात, हाच ना आपला अुद्देश ? महाराज, धर्मपित्याच्या रक्तपाताला कळत नकळत मी कारण झाल्ये, तर माझ्या मनाची काय स्थिति होअील, याचा विचार करा.

**अुदय०**——धर्मपित्याचा रक्तपात ?

**कमल०**——नाहीतर काय ? महाराज, आपली राक्षसी प्रतिज्ञा छपवण्याची धडपड फुकट आहे. माझ्या धर्मपित्याच्या रक्ताच्या घोटासाठी त्याच्याभोवती घिरट्या घालणारा, मी अुघड्या डोळ्यानी पहात असतां, त्याचा मी प्रतिकार केला नाही, तर माझ्या पातकांची मोजदाद करताना, महाराज, चित्रगुप्तालासुद्धा किळस येअील. नको नको, देवा, माझ्या हातून असलं पातक घडवू नकोस.

**अुदय०**—कमल, हेच का तुझं माझ्यावरचं प्रेम ? शेरशहाच्या कचाट्यातून तुझी सुटका करताना प्राणाची तमा नाही बाळगली मी. त्या अुपकाराची फेड तूं अशीच करणार काय ?

**कमल०**—बापाच्या रक्तनं माखलेलं पाणिदान तरी मी आपल्याला कसं करू महाराज. आणि केलंच, तर आपण तरी कोणत्या भावनेनं त्याचा स्वीकार करणार ? माझ्या पित्याशी जितक्या अभिमानानं मला वागलं पाहिजे, तितक्याच अभिमानानं आपल्याहि कल्याणासाठी जिवाची कुरवंडी करायला मी तयार आहे. धर्मपिता आणि भावी पति... मानीत असाल तर.... यांपैकी कुणाचंहि रक्त सांडलेलं मला पाहवणार नाही.

**अुदय०**—हा तुझा हट्ट तडीला जाणार नाही. बनबीर किंवा अुदयसिंह यांपैकी अेक ठार झाल्याशिवाय, दुसऱ्याला जगण्याची मुळी सवलतच अुरलेली नाही. दोघांपैकी कमलदेवीला जो विशेष प्रिय असेल, त्याच्यासाठी खुशाल तिनं आपल्या जिवाचा आटारेटा करावा.

**कमल०**—महाराज, माझ्या निर्मल भाबड्या भक्तीची अशी विटंबना करू नका. मला माझा पिता जसा प्रिय आहे....

**अुदय०**—तुझा बाप, जुलमी अत्याचारी सैतान नाही का ? त्यानं माझ्या बापाचा खून नाही का केला ?

**कमल०**—महाराज, महाराज, क्षमा करा. माझी अब्रू अशी चव्हाट्यावर आणू नका. पाषाणहृदयी राजकारणानं माझे बाबा माणुसकीला मुकले असले, तरी मी त्यांची धर्मकन्या आहे आणि पोटच्या पोरीसारखं त्यांनी माझं लालनपालन केलं आहे, ही गोष्ट मला कशी डोळ्याआड करता येअील ?

**अुदय०**—त्या नराधमाच्या सर्व घाणेरड्या पातकांची वाटेकरी व्हायला, कमलदेवीची तयारी आहे म्हणायची ?

**कमल०**—देवा, अेकलिंगजी महादेवा, असला प्रसंग माझ्यावर आणू नकोस. काही झालं तरी बाबांचा प्राण मला वाचवलाच पाहिजे.

**अुदय०**—अेवढंच ना ? तेवढ्यासाठी तुझ्या अेकनिष्ठेच्या नाटकाची मुळीच जरूर नाही. चल हो पुढं. तुझ्या बापासमोर नेअून कर मला अुभा. नाहीतर, जा, जा, त्यालाच आत्ता अिकडं घेअून ये. बनबीर, तुझा हाडवैरी अुदयसिंह तो मीच, असं मीच त्याला छातीठोक सांगताच, राजपुरुषाच्या रक्ताला चटावलेली त्याची ही कट्यार, झप्कन् या छातीत घुसेल आणि तींतून अुडणाऱ्या लालभडक रक्ताच्या पिचकाऱ्या पाहून,

पितृभक्त कमलदेवी, तूं आपल्या डोळ्यांचं पारणं चांगलं फेडून घे. बोल. मला तिकडं घेऊन जातेस.... का त्याला अिकडं आणतेस ? अुदयसिंह ठार झाल्याशिवाय, बनबीर जिवंत ठेवायला, प्रत्यक्ष परमेश्वर सुद्धा आता समर्थ नाही. जा. अुदयसिंहाच्या रक्ताच्या अभिषेकानं तरी तुझ्या बापाला चिरंजीव केल्याची पुण्याथी मिळवून, चितोडच्या अितिहासात तुझं नाव गाजवून घे.

**कमल०**——काळजाचं पाणी पाणी केलंत महाराज माझ्या. कोणत्या पातकासाठी देवा माझा असा छळ चालवला आहेस तूं. महाराज, या कमलच्या मृत्यूनं जर माझा पिता न् पति शीरसलामत जिवंत रहात असतील, तर ही हिरकणी चावून....(आंगठी चावू लागते, तोच अुदयसिंह तिचा हात पकडून दूर करतो.)

**अुदय०**——कमल, कमल, काय करतेस हे ? आत्महत्या ? महापातक. प्रेमी जिवांच्या सुखासाठी आत्महत्या हेच अेक साधन असतं, तर प्रेमळ हृदयदेवते, तुझ्यावर सौख्याचा मुसळधार पाअूस पाडण्यासाठी, या खंजिरानं अुदयसिंहाच्या छातीचा कोट फोडून, तुला केव्हाच धन्य केली असती. जगातल्या दुक्खांना रामराम ठोकण्याचं आत्महत्या हे अेकच साधन असतं, तर कमल, तुझ्याआधी माझ्या दुर्दैवी मातेनं त्याचा खास अुपयोग केला असता. पण लक्ष्यात ठेव, माझी माता रजपूत वीरांगना आहे. ती आत्महत्येचा असला भ्याड मार्ग कधीच पतकरणार नाही.

**कमल०**——पण महाराज, माझ्या पित्याचा धडधडीत खून होत असतां, मी तो अुघड्या डोळ्यानी कसा हो पाहू ?

**अुदय०**——माझ्या बापाचा खून मी नाही का डोळे अुघडे ठेवून पाहिला ?

**कमल०**——तसाच मी पण पाहू म्हणता ? कसं मला ते सहन होअील ? त्यापेक्षा महाराज, आपल्या या पायाच्या दासीला आपल्याच हातानं आत्ता अिथं खापलून ठार केलीत, तरी माझ्या जिवाचं सोनं होअील. माझ्या प्राणाच्या परमेश्वराला अुदण्ड आयुष्य चिंतीत मी देवाच्या पायांशी जाअून पडेन. (रडू लागते.)

**अुदय०**——कमल रडू नकोस. तुझ्या डोळ्यांतून टपकणारे हे अश्रूबिंदू माझ्या काळजाला सांडशीच्या डागण्या देत आहेत. चल, पूस पाहू हीं आसवं. तुला रडवून मिळणाऱ्या कसल्याहि यशाची मला पर्वा नाही. पण आजचा मुकाबला दुसऱ्या कोणत्या मार्गानं सफाअीत पार पाडता येअील, याची तूच तरकीब काढ. चल. मी आपला हट्ट देतो सोडून. पण माझ्यासाठी तूं बेचैन होअू नकोस.

**कमल०**——आत्ताच्या आत्ता आपण चितोडगड सोडून निघून जा. आपल्या मनाला झालेल्या भयंकर जखमांची मला चांगली जाणीव आहे. पण महाराज, खुनाचा सूड खुनानं घेण्याचा अघोरी विचार आपल्या दिल्दार मनात आणू नका. आपण आपला हट्टच तडीला न्याल, तर जिकडं तिकडं अनर्थ माजेल, याचा या कमलसाठी तरी थोडा

विचार करा. आत्ताच्या आत्ता, याच पावली, याच काळ्या वेषात, अंधाऱ्या रात्रीच्या बुरख्याखाली, चितोड सोडून निघून जा. पाया पडते, जा गडे आत्ता.

**अुदय०**——पण कमल, जिवाचं रान करून, मी माझ्या आओीच्या दर्शनासाठी, प्रत्यक्ष काळाच्या नरड्यात अुडी घेतली, तिच्या नुसत्या नजरभेटीला सुद्धा तूं मला पारखा करतेस ? तुला नाही का कधि तुझ्या जन्मदात्या आओीची आठवण होत ?

**कमल०**——गाय वासराची ताटातूट करण्याचं पाप मी कशी करीन ? आज मी कुमारी असले, तरी मातृपदांनंच माझ्या जीवन-सौभाग्याची अखेर होणार ना ? पण महाराज, प्रसंगाचा विचार करा.

**अुदय०**——मातृदर्शनाच्या स्वर्गसुखापुढं, कमल, प्राणांतीच्या हव्या त्या दिव्याचे वज्रप्रहार आनंदानं मी सहन करीन. पण या कुडीतूनं प्राण जाण्यापूर्वी, या दुर्दैवी जीवाला आपल्या आओीच्या हृदयावर अखेरचे दोन अश्रूबिंदू गाळण्याची तरी संधि मला देशील काय ?

**कमल०**——संधि ? संधि मी कां देणार नाही. आपल्या मृत्यूची बातमी अैकून, राणीसाहेबांच्या अंतःकरणाची अवस्था हिंवाळ्यात वठलेल्या अुपवनासारखी झाली असेल. त्याना आपण अगत्य भेटून, त्यांच्या दुक्खाचा भार हलका करा, त्याना दीलदिलासा द्या आणि पहाट फुटण्यापूर्वीच गड सोडून जा.

**अुदय०**——तुझ्या म्हणण्याप्रमाणं मी अगत्य वागेन.

**कमल०**——न वागाल, तर वेडानं माझं मस्तक फिरून मी भ्रमिष्ट होओीन.

**अुदय०**——छे छे. तसं काही होणार नाही. हा पहा, आओीच्या महालाकडेच मी चाललो. महालाचा रस्ता हाच ना ?

**कमल०**——होय तोच. लवकर भेट घेअून चितोडला रामराम ठोका. काही झालं तरी बाबांचे प्राण....पण नकोत ते विचार. गळ्याची शपथ आहे आपल्याला. पहाट फुटण्यापूर्वी अिथून निघून जा.

**अुदय०**——त्याची नको तुला काळजी. जा आता स्वस्थ जाअून नीज. झाल्या गोष्टी साफ विसरून जा. (जाअू लागतो.)

**कमल०**——(जाते, पण लगेच परतते.) अेकलं का म्हटलं ? (तो परततो.) म्हटलं, मृत्युचा फास आपल्या मानेभोवती पडला आहे, ही गोष्ट नजरेआड करू नका.

**अुदय०**——छे छे. असं कसं होओील. (दोघे दोन बाजूनी जातात.)

अंक ३ रा ] [ प्रवेश २ रा

**स्थळ, स्थिति व पात्रें :**—भव्य दिवाणखाना. अुच्चस्थानी बनबीर. दोनी बाजूला सरदार. बाजूला अेका मेजावर मद्याच्या सुराया प्याले वगैरे. सगळ्यांच्या हातांत मद्याने भरलेले प्याले आहेत. सिंहासनासमोर नर्तकींचा नाच चालू आहे. नर्तकी मुजरा करून जातात.

**बनबीर०**——कर्णपाल आणि सरदार दोस्त, भारतीय संगीत आणि नृत्य, या कलांची थोरवी न् माधुरी, या कलावंतिणीनी फारच छान सिद्ध केली. आमची सारी हयात राजकारणी दलामलीत खर्ची पडल्यामुळं, समशेरीच्या तलख पात्याप्रमाणंच कठोर बनलेल्या मनोवृत्तीला, या अनार मद्याच्या माधुरीप्रमाणं, गोड स्नेहरसानं चटकन् रंगवून गुंग करणारी जादू या संगीतात असेल, अशी आतापर्यन्त आमची समजूत नव्हती.

**कर्ण०**——राजधिराज हुजूरचं बोलणं केव्हाहि रास्त वाजवी न् योग्यच असायचं. संगीत तर मुळातच गोड, पण त्याच्या जोडीला मद्यप्राशनाचा थाट असला की त्या मजलसीची मजा काही और असते. नाच गाणं नि मद्य पिणं, हेच माणसांचं खरं जिणं.

**बनबीर०**——संगीतापेक्षा मद्याला तूं विशेष महत्व देतोस कर्णपाल ?

**कर्ण०**——खावंद देत नसतील तर मीसुद्धा देणार नाही. पण मद्याच्या सबरंगी मसाल्याशिवाय नुसता छुमछुम छननचा पुलावा खात्रीनं खमंग बनणार नाही. अशी माझी समजूत आहे सरकार. पुष्कळ पट्ठे सौंदर्यवान तरुणींच्या प्रेमासाठी अुगाच आपल्या जिवाचे पापड भाजतात. पण मद्याच्या एकाच घुटक्यात सौंदर्य, तरुणी, प्रेम, स्वर्ग, मोक्ष, सब कुछ बडीबडी जडीबुट्टी बेशक भरी हुअि है. अैसा अंदाज है खावंद.

**बनबीर०**——दोस्त हो, कर्णपालाच्या वाग्शैलीने कलावंतिणीच्या पैंजणाच्या झणत्कारालाहि आज मागे सारले आहे.

**कर्ण०**——याची पुण्याअी या पेल्यात साठवलेली आहे, खावंद, प्रेमाच्या मद्यापेक्षा, मद्याचं प्रेम मला विशेष वाटतं. मद्य कसं तयार करतात, माहीत आहे हुजूरला ?

**बनबीर०**——मूर्खपणाचा सवाल आहे हा. बेहोष दारूबाजच असा प्रश्न विचारील. मद्य म्हणजे द्राक्षाचा रस.

**कर्ण०**——ही लौकिकी समजूत आहे सरकार. बायकांच्या जिभांचा आणि सिंहाच्या काळजाचा रस्सा अेकत्र मिसळून, दारू ही चीज पैदा होते.

**बनबीर०**——याला पुरावा ?

**कर्ण०**——पुराव्याशिवाय विधान, म्हणजे दारूशिवाय संगीताचा जलसा आणि डफ तुणतुण्याशिवाय तमाशा. असलं धाडस कोण सच्चा दारूबाज करील ? बायकांच्या चवचाल जिभांचा अर्क दारूत असल्यामुळं, दारू ढोसतांच पट्टीचे मुकेसुद्धा वाचाळ बनतात, आणि त्या अर्काच्या जोडीनंच, सिंहाच्या काळजाचा रस्सा भरपूर मिसळलेला असल्यामुळं,——काय होतं ? सांगा पाहू काय होतं ?

**सर्व दरबारी०**——काय होतं ? काय होतं ?

**कर्ण०**——हवा तो फाटका माणूस, दारू ढोसतांच. सैतानाच्या अंगावर चढाओी करणारा धाडसी मर्द बनतो.

**बनबीर०**——शाब्बास शाब्बास कर्णपाल शाब्बास. हा तुझा नवीन शोध समुद्रमंथनातूनं सुरा निर्माण करणाऱ्या देवदैत्यांचा गर्वभार खात्रीनं अुतरील. कर्णपालाच्या या मद्यसंशोधनाबद्दल, दोस्त सरदार, अनार मद्याची आणखी अेक भरगच्च फैर झडली पाहिजे.

(सर्वः—— अलबत अलबत, म्हणून प्याले भरू लागतात. मेजावरची अेक जुनाट सुरयी कर्णपाल अुचलतो.)

**कर्ण०**——दोस्त हो, थांबा. महाराजांचा पेला भरू नका. आता तो याच प्राचीन सुरयीतल्या पुराणप्रसिद्ध मद्यानं भरला पाहिजे. या दिग्विजयी सुरयीकडं खावंदांनी अेकवार आपली दिग्विजयी नजर द्यावी. बाप्पा रावळने चितोडगडाची प्राणप्रतिष्ठा करून, आपल्या राज्याभिषकाच्या दिवशी याच सुरयीतले पवित्र मद्य प्राशन केलं होतं. तेव्हापासूनं आत्तापर्यंत, या गादीवर जे जे महाराजे विराजमान झाले, त्यानी या मद्याचा घोट घेण्याचा संप्रदाय अखंड चालू ठेवलेला आहे. राजदण्डधाऱ्याशिवाय या मद्याला आजवर कोणीहि स्पर्श केलेला नाही. आणि याचा घुटका घेतल्याशिवाय चितोडाधिपतीचे अैश्वर्य चिरंजीव टिकत नाही. विक्रमाजित महाराजानी या सुरयीचा धिःकार केला——

**बनबीर०**——त्या परिणामाची आठवण काढून नकोस. कर्णपाल, चल दे त्या सुरयीतला मद्याचा पेला चटकन भरून. त्याच्या प्राशनानं माझ्या सत्तेचा पाया मला चिरंजीव बसवलाच पाहिजे.

**कर्ण०**——अलबत. (पेला भरुन देतो). हुजूरनी याचं प्राशन करतांच, महाराज बनबीरांचा राजदण्ड काळाच्या काळदण्डाला सुद्धा भीक घालणार नाही, अशी या मद्याची पुरातन प्रचिति आहे.

(सर्व सरदार अपापले पेले भरून बनबीरासह उभे रहातात.)

**बनबीर०**——(पेल्यातील मद्याच्या रंगांत निरखून पहात) कोणा तरी ऋषिमुनी महात्माच्या तपश्चर्येनं सिद्ध झालेल्या अमृता, तुझ्या दिव्य जादूनं या बनबिराला आता तूं धन्य कर. समशेरीच्या मानवी पराक्रमांपेक्षा आणि राजकारणी दगाबाजीपेक्षा, मेवाडची सत्ता माझ्या हातांत चिरकाल टिकवण्याचं लोकोत्तर सामर्थ्य तुझ्यात असेल, तर त्याच्या तेजानं या बनबिराला अंतर्बाह्य अुजाळा दे. तब्बल आठशे वर्षांच्या प्रचितीची, या अति रसरसणारी तुझी पुण्याअी मी आत्ता प्राशन करीत आहे. हिचा घोट माझ्या पोटात जातांच——

(बाबा बाबा, घात झाला. अुदयसिंहाला मी आता पाहिला. अशी आरोळी मारीत झोपेतून अुठलेली कमलदेवी धावत येते. तिची आरोळी अैकतांच, बनबिराच्या हातचा मद्याचा पेला निसटून खाली पडतो, फुटतो आणि मद्य सांडले जाते. सगळे धाबरून अुठतात.)

**बनबीर०**——(अेकदम अुसळून) कुठं पाहिलास अुदयसिंह ?

**कमल०**——आत्ता...स्वप्नात...बाबा.

(दरबारी अेकमेकांकडे आश्चर्याने पहातात.)

**बनबीर०**——अवसानघातकी पोर.

**कमल०**——आजची रात्र मला काळरात्र दिसते बाबा. तुमचा जीव धोक्यात आहे. भयंकर संकटानी आपल्याला गराडा दिलेला आहे.

**बनबीर०**——पागल. कसलं तरी भिकारडं स्वप्न पाहून, माझ्या रंगाचा बदरंग करायला आलीस. कसला धोका न् कसली संकटं ? चल बस स्वस्थं अिथं.

**कर्ण०**——संकटं न् धोके आम्ही पार पिअून गिळून फस्त केले आहेत. स्वप्नं म्हंजे अपचनानं रात्रीच्या फुगवलेल्या पोटाची बदअवलाद. त्यांची आम्हाला भीति ? मद्याच्या अेका धोटात फडशा पाडू. जय बनबीर महाराजकी जय. (सर्व सरदारांसह पेल्यातले मद्य पितो.)

**बनबीर०**——कसल्या तरी भेसूर स्वप्नानं भेदरवली असेल तुला. चल, मद्याचा अेक पेला पिअून, त्या भीतीला अुधळून लाव, आणि महालात जाअून स्वस्थ नीज.

**कर्ण०**——दारू ढोसल्यावर दारुड्याला काळाचेसुद्धा भय वाटत नाही. मग जित्या मुर्दाची न् मेल्या मर्दाची त्याला काय पर्वा ?

**बनबीर०**——कर्णपाल, दे, कमलला मद्याचा अेक भरगच्च पेला भरून दे. स्वप्नांचा सैतान हुसकून द्यायला मद्य हेच अेक हुकमी शस्त्र नि बिनतोड तोडगा आहे.

(बेशक बेशक म्हणत कर्णपाल तिला पेला देतो.)

**कमल०**—(तो नाकारीत) मी मद्याला कधीच शिवत नाही, शिवले नाही, शिवणार नाही. (कर्णपालावर डोळे वटरीत) हो दूर लुच्चा. सगळीच स्वप्नं अशी थट्टेवारी नेण्यासारखी नसतात बाबा. पाया पडते, माझ्या स्वप्नाची अशी थट्टा करू नका. मला मारा तोडा, वाटेल तर आत्ता जागच्या जागी ठार करा, पण आधी माझं स्वप्नं अैका.

**बनबीर०**—दोस्त सरदार, गुलाब पाण्याच्या शिडकावाप्रमाणं चित्त शांत करणारं संगीत आणि अुत्साहाच्या पाकळ्या हळूहळू अुमलविणारं मद्यप्राशन, यांचा भरघोस कार्यक्रम रंगल्यावर, वेताळपंचविशीतल्या अेकाद्या अद्‌भुतरम्य कहाणीनं आपलं मनोरंजन करणारा कुणीतरी चारण भाट हवाच होता आपल्याला. आमची लाडकी राजकन्या कमलदेवी हे काम पार पाडणार आहे. स्वस्थ बसून हिची स्वप्नाची कादंबरी अैकू या. हं, कादम्बरीदेवी, चलना दो आपकी स्वप्नकहानी.

**कमल०**—कितीहि हेटाळणी करा, बाबा, ही कादम्बरी नाही, देवाचा अिषारा आहे.

**बन०**—दोस्त सरदार, अैका, देवाचा अिषारा अैका. हं. चालू द्या.

**कमल०**—बाबा, स्वप्नात मी असं पाहिलं की चितेच्या राखेत्नं अुदयसिंह जिवंत होअून बाहेर पडला....

**बन०**—अरे वा. बेटा चितापावनच झाला म्हणायचा.

**कमल०**—त्याचे कपडे रक्तानी भरलेले होते. त्याच्या सर्व शरिरात्नं रक्ताच्या जशा काही पिचकाऱ्या अुडत होत्या. रक्तानी माखलेले त्याचे केस सायाळीच्या पिसांसारखे ताठ अुभे होते. त्याचे डोळे...अगबाअी...आंगावर काटाच अुभा राहतो...अिंगळासारखे लालबुंद असून, तो अंतराळी भराभर चालत होता.

**कर्ण०**—अरे वा. अुदयसिंह तो बडा अिल्मी जादूगार बनगया.

**कमल०**—हातातल्या अेका भयंकर कट्यारीनं हवेतल्या हवेत तो त्वेषानं हातवारे करीत होता. त्याने अेकदम अेक भयंकर आरोळी मारली, त्यासरशी कितीतरी वेडीविद्री काळीकुट्ट भुतं भराभर जमून त्याच्याभवती नाचू लागली. त्यानं या राजवाड्याकडं बोट दाखवतांच त्या भुतानी अेकदम वेढा दिला आणि काडकन् सुरूंग फुटल्यासारखा आवाज होवून, हा राजवाडा जमीनदोस्त झाला. नदीच्या फुटत्या धरणासारखा त्या भुतांचा धोळका साऱ्या गडावर सैरावैरा थैमान घालू लागला, आणि...आणि...

**बन०**—आणि ? आणि पुढं काय झालं ? सांग सांग, बेधडक सांग.

**कर्ण०**—अैकायला आमचे कान तयार आहेत.

**कमल०**——आणि आमचे बाबा, असेच....अगदी याच थाटात, मजलसीला बसले असताना, अुदयसिंहानं मोठी गर्जना केली अन् ताडकन् अंगावर झाप टाकून, हातातली कट्यार ताडकन् या या... या अिथं छातींत खुपसली. बाबा बाबा बेसावध राहू नका. (गळ्याला मिठी मारून रडू लागते.)

**बनबीर०**——मूर्ख रे मूर्ख, अगदीच अजागळ. स्वप्नाना अितकं कुणी भितात वाटतं ? चल, अुगाच घाबरू नकोस. अुदयसिंहाची राखरांगोळी झाली आहे आणि तुझा पिता बनबीर तुझ्याजवळ शीरसलामत जिवंत आहे.

**कर्ण०**——चितोडगडावर अुदयसिंह आता कशाला मरायला येतोय.

(अेक नोकर धापा टाकीत येतो.)

**नोकर०**——राजाधिराज बनबीर महाराजांचा....असो.

**कर्ण०**——कायरे अे भेदरटा, धापा टाकीतसा आलास ?

**नोकर०**——ब-ब-बातमीच तितकी....ह्याची ही आहे. राजकुमार अुदयसिंह जिवंत आहे.

**बनबीर०**——अुदयसिंह जिवंत आहे ?

**नोकर०**——अितकंच नव्हे तर या घडीला तो चितोडगडावर आहे, या बातमीनं लोकांतसुद्धा बण्डाच्या अुठावणीची खळबळ अुडाल्यासारखी दिसत आहे. निगा रख्खो मेहरबान. (जातो.)

**कमल०**——बाबा, हा पहा माझ्या स्वप्नाचा पडताळा.

**बनबीर०**——कसला आला आहे पडताळा नि ठोकताळा. असल्या बाजारगप्पानी भेदरून जाण्याअितका हा बनबीर कच्च्या मातीचा पुतळा समजतेस ? अुदयसिंह अजून जिवंत. निखालस खोटी गोष्ट.

**कर्णपाल०**——पण महाराज, बातमी खरी असो वा खोटी असो, हुजूरला तिकडं दुर्लक्ष्य करून भागणार नाही. राजकारण दारूंत बुडाले, तरी ते राजकारणाच्या कदरीनेच हाताळलं पाहिजे.

**कमल०**——निदान या कमलसाठी तरी, बाबा, माझ्या स्वप्नाकडं दुर्लक्ष्य करू नका.

**बनबीर०**——अुदयसिंहाच्या जिवंतपणाची बातमी खरी का खोटी, याचा तुम्ही सर्व सरदारानी आत्ताच्या अत्ता कस्सून तलास घ्या. चौकशीच्या सत्रासाठी गडावरचा मातीचा कण न् कण आणि दगडधोंडा पिळून मळून काढा.

(जो हुकूम, जोहार, म्हणून सर्व सरदार जातात.)

**कर्ण०**——कर्णपाल, थांब जरा. त्या केदारनाथाला आत्ताच्या आत्ता आमच्यापुढं आणून हजर कर.

**कर्ण०**——जो हुकूम (जातो.)

**कमल०**——नको नको बाबा, असा भलताच हट्ट धरू नका. तुमच्या जिवाची तुम्हाला पर्वा नसली, तरी माझ्या बाबांच्या जिवासाठी माझा जीव तिळतीळ तुटत आहे. बाबा, पाया पडते, पदर पसरते, त्या केदारनाथाच्या नजरेला आपण पुन्हा पडूं नका.

**बनबीर०**——काय ? त्या केदारनाथाच्या नजरेला मी पडूं नको ? त्या क्षुद्र चिलटाला भिण्याअितका तुझा पिता निर्बल नामर्द आहे, अंस तुला वाटतं ? मूर्ख पोरी, स्वप्नामुळं तुझा मेन्दू बिघडला खास. जा. जा. आपल्या महालात जाअून स्वस्थ नीज. अुदयसिंह जर खरोखरच जिवंत असेल, तर त्या हरामखोर ढोंगी केदारनाथाच्या अंगाला पलिते लावून जिवंत जाळल्याशिवाय मी राहणार नाही. कोण आहे तिकडे ? जाबता. तो केदारनाथ अजून कां येत नाही ? जा, त्याला आत्ताच्या आत्ता अिथं घेऊन या.

**कमल०**——बाबा बाबा, हा हट्ट सोडून द्या. निदान त्याची या वेळी तरी भेट घेअू नका. पाया पडते. तुम्ही नाही म्हणल्याशिवाय मी हे पाय सोडणार नाही.

**बनबीर०**——आचरट पोरी, चल दूर हो. नाहीतर लाथेच्या ठोकरीनं देअीन झुगारून नरकात. राजकारणात बायकांची ढवळाढवळ ? नाही आम्हाला खपणार. अुदयसिंह जिवन्त ? आमच्या हुकमाची असली अुघडाअुघड पायमल्ली ? नाही, नाही आम्हाला परवडणार.

**कमल०**—पण बाबा, अुदयसिंह जिवंत आहे कुठं आणि जिवंत राहील तरी कसा ? तो कधीच जगातून नाहीसा झाला. लोकांनी अुठवलेली त्याच्या जिवंतपणाची कण्डी, बाबा, अगदी खोटी न् खोडसाळ आहे. आपण कशाला तिकडं लक्ष देता ? आपल्याला अेवढं भिण्याचं कारण तरी काय म्हणते. आणि मी म्हणते, ही बातमी खरी असली, तरी तो बिचारा केदारनाथ खरोखरच हो निरपराधी आहे.

**बनबीर०**——वाह्यात कारटे, तुझं डोकं खात्रीनं ठिकाणावर नाही. म्हणूनच तूं ही असली परस्परविरोधी बडबड चालवली आहेस. चल जा. चालती हो. जातेस का नाही ?. . . . .निघून जा, म्हणून तुला कोण बजावीत आहे, माहीत आहे ना ?

(ती जाअू पहाते तोंच आतून :—राजाधिराज बनबीर महाराजांचा जयजयकार. केदारनाथ दर्शनाला येत आहे. निगा रखो मेहेर्बान.)

**बनबीर०**——थांब, कमल, थाब. केदारनाथ अपराधी का निरपराधी, याचा दाखला तुझ्या समक्ष पटवून देतो.

**कमल०**——नको नको, मला तो दाखला पटायला नको आणि तो आपल्याला भेटायला पण नको. बाबा, बाबा, आधी त्याला थांबवा, येऊ देऊ नका, या वेळी तरी त्याली भेटू नका. (मोठ्याने) जाबता बंद. गोषा गोषा. (केदार येतो आणि वंदन करतो.) (स्व.) कशाला आले हे काळाच्या जबड्यात ?

**बनबीर०**——कुणाच्या पुढं अुभा आहेस, याचा नीट विचार केलास केदार ? ज्याचा वेष तूं पांधरला आहेस, तो तूंच आहेस काय ?

**अुदय०**——म्हंजे ? महाराजांना माझा संशय ?

**बनबीर०**——होय, आम्हाला तुझा संशय येतो आहे. अुदयसिंहाचा खून करणारा मारेकरी म्हणून तूं मिरवत आहेस.

**अुदय०**——अलबत्.

**बनबीर०**——मग सांग, अुदयसिंह जिवंत आहे का मेला ?

**अुदय०**——अुदयसिंह जिवंत आहे का मेला ?

**बनबीर०**——बेशरम. आमच्याच शब्दाचा प्रतिध्वनि काढतो ? जाळून अुभा खाक करीन.

**कमल०**——अुदयसिंहाला तूं ठार मारलंस ना ? सांग तर तसं झटकन.

**बनबीर०**——बोल. सरळ साफसाफ जबाब दे. नाहीतर हो मरणाला तयार.

(कमरेची तलवार अुपसतो. कमल चटकन बनबीर नि अुदयसिंहाच्या मध्ये जाअून अुभी रहाते.)

**कमल०**——बाबा, अजून किती अत्याचार करणार ?

**बनबीर०**——कारटे, बाजूला हो.

**कमल०**——निरपराधी रक्ताच्या घोटाला चटावलेली तलवार आधी या माझ्या छातीतच घुसली पाहिजे.

**बनबीर०**——कमल, दूर सर, बनबीराचा भडकता क्रोधाग्नि न्यायान्यायाची पर्वा बाळगीत नसतो.

**कमल०**——न्यायाला बेपर्वा असलेले राजदण्ड जागच्या जागी जळून खाक होतात. नाही मी बाजूला होणार.

**अुदय०**——राजकन्ये, बाजूला हो. तुझ्या मध्यस्थीनं जगण्याची मला मुळीच अिच्छा नाही. राजाधिराज बनबीराची अिच्छा, हाच अीश्वरी न्याय. तो मला शिरसावद्य आहे. महाराज, थांबू नका, विचार करू नका, बिनधोक आपली समशेर या केदारनाथाच्या छातींत घुसू द्या. राजकन्ये, बाजूला हो.

**कमल०**——नाही, प्राण गेला तरी बाबांच्या हातूनं निरपराध्याचं रक्त सांडता कामा नये.

**अुदय०**——तुझा हट्ट वेडेपणाचा आहे. महाराजांच्या हात्चं मरण, म्हंजे तपाशिवाय मोक्षाची प्राप्ती. ती मला तूं लाभू देत नाहीस ? महाराज, आपली दिग्विजयी समशेर बेलाशक या केदारच्या छातीत घुसवा. म्हंजे तिला तरी माझ्या अिमानाचा ठाव पुरता लागेल. (कंबरेचा खंजीर काढून) अरेरे, या खंजिराला वाचा असती, तर अुदयसिंहाच्या छातीतलं रक्त पितानां याला झालेला ब्रम्हानंद, आत्ता यानं खास गावून दाखवला असता. (खंजीर म्यान करतो.)

**बनबीर०**——केदार, खरोखरच अुदयसिंहाचा खून तूं केलास काय ?

**अुदय० :** राजाधिराज, हा प्रश्न मला आता विचारू नका. आपल्या संशयाच्या कट्यारीनं माझा दिल् जखमी झाला. यापुढं जिवंत रहाण्याची मला मुळीच अिच्छा नाही. सरकार, आता माघार घेअू नका. आपल्या वज्रप्रहाराचं स्वागत करायला...या आभामी केदाराची छाती तयार आहे.

(छाती ताठ करून पवित्र्यात अुभा रहातो.)

**कमल०**——निष्कलंक मनोवृत्तीशिवाय असलं धाडस कोण करील बाबा ?

**बनबीर०**——(तलवार म्यान करीत) जा. राजकन्येच्या हट्टामुळंच आज आम्ही तुला जीवदान देत आहो. चल जा. चालता हो.

**कमल०**——चितोडगडावरनं आत्ताच्या आत्ता चालता हो. पुन्हा तोंड दाखवू नकोस.

**बनबीर०**——नाही. या प्रकरणाची आमची चौकशी पुरी होअीपर्यन्त, नेहमी आमच्या हाकेच्या टप्प्यात राह्यलं पाहिजे तुला.

**अुदय०**——पडछायेसारखा हुजूरच्या पाठीवर आहेच आहे मी, ही खावंदानी खात्री ठेवावी. (जातो.)

**कमल०**——बाबा. कशाला पाहिजे हा आता गडावर ? त्याला आत्ताच्या आत्ता घालवून द्या नं गडे.

**बनबीर०**——कमल, माझ्या धोरणांच्या आड तूं येऊं नकोस. जा. महालात जाऊन स्वस्थ नीज. म्हंजे खोडसाळ स्वप्नानं मस्तकात खवळलेला किड्यांचा बुजबुजाट नाहीसा होईल जा.

**कमल०**——मी जाते.... पण त्या केदारच्या नजरेला पुन्हा पडू नका. (जाते.)

**बनबीर०**——(स्व.) त्या केदारच्या नजरेला पुन्हा पडू नका. वरचे वर असा अिषाराही कां बरं देत आहे ? माझ्या सामर्थ्याच्या पासंगालाहि पुरणार नाही, अशा या तरूण पोरांत काय असं गूढ असावं, का कमलनं त्याची जिवापाड तरफदारी करावी ? त्याच्या नजरेला पुन्हा न पडण्याचा जिव्हाळ्याचा अिषारा द्यावा ? आणि त्या अिषाऱ्यानं माझ्या खंबीर मनाचीहि शांति ढासळूं लागावी ? आगीचे लोळच्या लोळ बेफाम ओकणाऱ्या तोफांच्या तोंडावर बेगुमान घोडदौड चढवून, शेकडो गोलंदाजांची कत्तल सहज लीलेनं करणाऱ्या बनबिराची छाती, कमलच्या या कोमल अिषाऱ्यानं अेकदम धडधडूं लागावी ? ज्याच्या नुसत्या नांवाचा दरारा, दिल्लीच्या पातशाही दैवाचा झोला काबूल ते बंगाल गोता खात भडकवीत आहे, त्या बनबिराचं काळधैर्य आज का खाअूं लागावं ? मनगटाच्या जोरावर काळाचा काळ बनून, शेकडो कर्दनकाळ बण्डखोरांना धूळ चारणारा मी बनबीर... मग अेकाकी माझ्या तेखाला ओहोटी लागल्याचा भास मला कां होत आहे ? कोणतं पाप... पा प... पापांचे पर्वत... बेलगाम सत्तेच्या प्राप्तीसाठी मी अमानुष पापांचे पर्वत रचले. सत्तामदाच्या धुंदीत हज्जारो जीवांचे हकनाहक बळी घेतले. त्या पापांची पिशाच्चें...ही पहा....ही पहा.... मसणवटींतल्या भुतांसारखी....ही पहा....माझ्याभोवती नंगा नाच घालीत आहेत....हां खबरदार....अशी अेकदम लगट करू नका....काय? तुम्ही माझ्या काळजाचे चाअून चाअून तुकडे करणार? अरेरे, किती आक्राळ विक्राळ यांच्या दाढा ह्या. छे, नाही बघवत यांच्याकडे....पापांच्या पायावर अुभारलेली सत्ता, म्हंजे वेताळ पापा, तुझ्या या भुतांच्या भुताटकीचा बिनशर्त बळी. हीच तुझ्या उपासनेची करवंटी अखेर तूं माझ्या हातांत देणार काय?....पण आता या विचारांचा अुपयोग काय? पापाच्या पुरस्कारानेच पराक्रमाचा पतंग थेट अंतराळापार भिरकावून, मी रंकाचा राव झालो. आता माघार? छट्. नरकात गेलो तरी आता पिछेहाटीची बात नाही. माझ्या पातकांच्या पिशाच्चांनो, पश्चातापाची सीमा ओलांडून पार झालेला हा बनबीर, दुष्कर्माच्या भुताटकींत, आता तुम्हीला सुद्धा चारीमुंडे चीत केल्याशिवाय राहणार नाही.... बस्स, आता यापुढें, खून रक्तपात अत्याचार यांचाच राक्षसी धुमाकूळ मी खेळत बसणार. पुण्यकर्माचा पुरस्कर्ता म्हणून नांवलौकीक

कमावण्याची संधि जरी मला मिळाली नाही, तरी, माझ्या मनाच्या मसणवटीला काबीज करणाऱ्या वेताळा, दुष्कर्माचा बादशहा म्हणून माझी कीर्ति अितिहासात मी अजरामर करून ठेवणार. पुण्याचा पुरुषोत्तम म्हणवून घेण्यापेक्षा, पापांचा परमेश्वर म्हणून बखरकारांनी माझें नांव आचंद्रार्क गायलं पाहिजे. बनबिराच्या मानी हृदया (मना), शोध कर.... नीट कसोशीनं शोध कर. सव्दासनेचा अेकादा क्षुद्र तंतू तुझ्या कोनाकोपऱ्यात कुठं दडून बसला असेल, तर त्याला आत्ताच्या आत्ता जाळून टाक. म्हणजे सदसद्विवेक बुद्धीच्या नरड्यावर टांच देवून, पश्चात्तापाचं अुचल खाणारं भुत, मी हां हां म्हणतां कायमचं गाडून टाकीन. (जातो.)

**अंक तिसरा समाप्त.**

# काळाचा काळ



अंक ४ था ] [ प्रवेश १ ला

**स्थळ आणि पात्रें :** गडावरील मैदान. जयपाळ व हमीर

**जयपाळ०**—महाराजांच्या हातून अशी चूक कशी व्हावी, याचं मला नवल वाटतं. तूं स्वतः हा प्रकार पाहिलास ?

**हमीर०**—नुसता डोळ्यांनी पाहिला असं नव्हे, तर चांगला कानानी अैकला.

**जय०**—आणि महाराजानी तिला आपलं नांवसुद्धा सांगितलं ?

**हमीर०**—सांगितलं म्हणण्यापेक्षा, त्या पोरीनं त्याना चटकन् ओळखून हाक मारली. महाराजांच्या मागे मी सावलीसारखा आहे, पण ती कमलदेवी तर राजवाड्यात ठिकठिकाणी त्यांचा पाठलाग करीत होतीसे दिसते.

**जय०**—आणि महाराजानी आपला हेतू सुद्धा तिला अुघड सांगितला म्हणतोस ?

**हमीर०**—अुघडचसा काय, अगदी स्पष्ट शब्दांत सांगितला.

**जय०**—तर मग घात झाला हमीर. त्या बडबड्या पोरीच्या तोंडात कसलीच गोष्ट टिकायची नाही.

**हमीर०**—मला आहे तिचा स्वभाव माहीत.

**जय०**—आणि त्या राक्षसाला महाराजांच्या आगमनाचा नुसता वास आला पुरे, का आजची सारी मसलत फसून, आपला सर्वांचा घात होणार.

(अुदयसिंह येतो.)

**अुदय०**—घात होणार ? काय म्हणून घात होणार ?

**जय०**—महाराज, कमलदेवीला आपण आपल्या बातबेताचा सुगावा दिलात, काय म्हणावं या धाडसाला ?

**अुदय०**—धाडसच झालं नाही का ते ? . . . होअू नये ती गोष्ट झाली खरी. पण माझी खात्री आहे जयपाळ, कमलदेवी माझ्यावर खास अुलटणार नाही.

**जय०**––हा तुमची भ्रम आहे सरकार. त्या भावनावश पोरीच्या डोक्यात अेकदा अेकाद्या गोष्टीनं पोखरण घातली, का तिची बडबडी जीभ कोणत्या वेळी कुठं काय आग लावील, याचा नेम नाही.

**हमीर०**––शिवाय बनबिरानं तिला अितकी लाडावून ठेवली आहे, का त्याच्या जिवासाठी, ती आक्रताळी पोर, तुमचा आमचा घात केल्याशिवाय रहाणार नाही.

**अुदय०**––बापाच्या प्राणाअितकीच माझ्याहि जिवासाठी जीव द्यायला ती मागे पुढे पहाणार नाही.

**जय०**––पण सरकार, कमलदेवीच्या प्राणहत्येनं का आजचा मुकाबला तडीला जाणार आहे ?

**अुदय०**––अरे पण, आत्ताच नाही का स्वताच्या जिवावर अुदार होअून तिनं मला काळाच्या जबड्यातूनं ओढून काढलं ? बरं, गडावरची व्यवस्था कशी काय आहे ?

**हमीर०**––त्याची महाराजांनी मुळीच काळजी करू नये. सारा गड आपल्या बाजूली आहे. सर्व मण्डळी ठिकठिकाणी जय्यत तयारीनं अिषाऱ्याची वाट पहात आहेत. मध्यरात्रीच्या पहारा-बदलीची दुसरी घांट ठणाणली, का अेकदम कत्तल सुरू होअील.

**जय०**––कन्दाहारी अनार मद्यानं बनबिराच्या घोडदळ पायदळात चोख बंदोबस्त केला आहे.

**अुदय०**––आता मला अेकेक क्षण युगासारखा वाटत आहे. तुमच्या शंकेप्रमाणं कमलदेवी जर काही गोंधळ करणार नाही, तर दोन तासांच्या आत, त्या जुलमी बनबिराला रसातळाला गाडून, चितोड पापमुक्त होअील. . . . अवघे दोन तास.

**जय०**––दोन तास कुठले ? अवघा अेकच तास अुरलाय, पण महाराज. मला त्या पोरीची फार भीति वाटते. मधाच्या प्रकारानं बनबिराला आपल्या विषयी चांगलाच संशय आलेला आहे. पितृप्रेमाच्या अुमाळ्यानं तिनं आपल्याला अुघडकीला आणलं, तर अेवढा मोठा व्यूह अुभारून सुद्धा, अेका क्षुल्लक चुकीसाठी आणखी बारा वर्षे बनबिराच्या गुलामगिरीच्या बेड्या तोडता तुटायच्या नाहीत. म्हणून म्हणतो, आपण आत्ताच्या आता चितोड सोडून निघून जा.

**हमीर०**––सरकारच्या पायांच्या पुण्याअिनं, आजची मसलत ठरल्या घटकेला आम्ही फडशा पाडतो.

**अुदय०**––काय म्हणता ? त्या पाषाणहृदयी कामांध राक्षसाच्या झडपेत माझ्या दुबळ्या आअीला अशीच सोडून मी निघून जाअू ? जान गेली तरी बेहत्तर, त्या नराधमां आजच्याच रात्री अतिप्रसंग करण्याची तिला धमकी दिलेली आहे. पडछायेसारखा त्याच्या मागावर राहून, तसाच काही प्रकार मला दिसला, तर चित्यासारखी झाप टाकून, त्याच्या नरडीचा घोट घेतल्याशिवाय मी राहणार नाही.

**हमीर०**——महाराजानी हे काम माझ्यावर सोपवावं. मासाहेबांसाठी प्राणांचा धुरोळा करीन, पण सरकारनी अिथूनं चटकन् निघून जावं. माझ्यासारखे क्षुद्र जीव, सरकार सलामत तर शेकडो हज्जारो लाख्खो मिळतील. पण लाखांचा पोषिंदा अिवल्याश्या कामावर खर्ची घातला, तर बखरकार न् भावी पिढ्या आमच्या नांवांवर थुंकतील. कृपा करून जयपाळबरोबर आपण निघून जावं सरकार. राणीसाहेबांच्या संरक्षणाची जोखीम माझ्या शिरावर.

**अुदय०**——मला तुम्ही, अैन घटकेला चामडी बचावणारा नामर्द समजता काय ? संकटांच्या भडकत्या ज्वालामुखीच्या जबड्यात आघाडीची अुडी घ्यायची धडाडी ज्याच्या मनगटात नसेल, त्यानं राजदण्ड पेलण्याची मिजास मारू नये आणि त्या नामर्द षण्ढाचा महाराज महाराज म्हणून कुणी अुदो अुदो करू नये. गनिमाच्या छाताडावर आघाडीची चढाअी करणाऱ्या हिंमतबहाद्दरासाठीच, बाप्पा रावळाचा चितोडचा राजदण्ड जन्माला आलेला आहे, ही गोष्ट तुम्ही विसरलात तरी विक्रमाजिताच्या छाव्याला ती दृष्टीआड करता येणार नाही. . . . बस्. ते काही नाही. हा मी अस्साच माझ्या आअीच्या राखणीसाठी त्या राक्षसाच्या पाळतीवर राहणार. या मुकाबल्यात मी मेलोच, तर माझ्या न् माझ्या आअीच्या रक्ताच्या थेंबा थेंबाचा सूड अुगवा आणि त्या राक्षसाच्या रक्ताच्या ओंजळी ओंजळीनं आम्हाला, तर्पण देअून, चितोडच्या सूर्यांकित भगव्या झेण्ड्याचा अुद्धार करा.

**जय० हमीर०**——आज्ञा शिरसावंद्य.

**अुदय०**——चला आटपा. बोलण्याच्या नादात काळ झपाझप चालला आहे, आणि बनबिराची काळघटका त्याच्या रक्ताचा घोट घ्यायला अुतावीळ होत आहे.

**जय०**——महाराज, मला शंका येते, क्षमा करा. कमलदेवीची मनोहर मूर्ती आपल्या पुढं येअून अुभी राहिली. . . .

**अुदय०**——आणि तिनं बनबिराच्या प्राणदानासाठी माझ्या पायांवर लोळण घेतली, तर तारुण्यसहज प्रेमानं मी वितळून जाअीन, हीच ना तुझी शंका ?

**जय०**——शंका आली, ती सांगितली. बेआदबी माफ.

**अुदय०**——जयपाळ, चितोडच्या अुद्धारासाठी, स्वताच्या प्राणाची होळी करू पहाणाऱ्या अुदयसिंहाला, अेका तरुणीच्या प्रेमाची कितीशी मातब्बरी वाटंत असेल, याचा तूंच विचार कर. त्या बनबीर बोक्याला तर मी जीवदान देणार नाहीच नाही, पण माझ्या बेताच्या आड दुर्दैवानं कमलदेवी आलीच, तर तिचाहि जोहार करायला मी मागंपुढं पहाणार नाही. तारुण्यसहज प्रेमाची भरारी कितीहि जबरदस्त असली, तरी माझ्या बापाच्या खुनाचा सूड अुगवण्याची प्रतिज्ञा काळाच्या क्रौर्याची सुद्धा नांगी बोथट पाडील.

(आत गजराचा घणघणाट.)

. . . कसली ही घंटा झाली ?

**जय०**—मध्यरात्रीची हिली घण्टा.

**हमीर०**—अर्ध्या तासात दुसरी घण्टा ठणाणताच हल्ल्याला अेकदम सुरवात होओील. चल, जयपाल, आपल्याला पुढच्या व्यवस्थेला लागलं पाहिजे.

**जय० हमीर०**—महाराज, जोहार घ्यावा.

**अुदय०**—दिलदार दोस्त, मला अेकवार कडकडून भेटा. (दोघांना आलिंगन देतो.) कदाचित तुमची माझी ही अखेरचीच भेट असेल. कुणी सांगावं ? क्षत्रियांचा पेषा जितका धन्य, तितकाच तो पाषाणहृदयी असतो. कर्तव्याच्या क्षेत्रात पाअूल ठेवलं पुरे, का माणूसकीच्या सर्व कोमल भावनांकडे त्याला पाठ फिरवावी लागते. अिमानी मित्रांनो, थोरल्या महाराजांच्या निष्ठेला जागून, त्यांच्या या पोरक्या पोराला, प्राणांतीच्या अनेक प्रसंगी, तुम्ही आपल्या जिवाच्या ढालीवर झेलून धरले, या तुमच्या स्नेहाची बक्षिसी परमेश्वर तुम्हाला आजच्या मुकाबल्याच्या यशाने देवो. सत्याची न् ओीश्वरी न्यायाची कसोटी अजमावण्यासाठी आपण आता अितक्यातच विजयदेवतेच्या पाणिग्रहणासाठी समरांगणीर सरसावणार. त्या जुलमी बनबिराच्या पापांचे घडे भरले असतील. आणि भरतखंडाच्या सौभ्याग्यासाठी मेवाडच्या रजपुती सत्तेच्या पुनर्घटनेला परमेश्वराचा आशीर्वाद असेल, तर दोस्त हो, आजचा मुकाबला फत्ते केल्याशिवाय तुमच्या तेखदार तलवारी म्यानात परतणार नाहीत आणि या क्षणाला बनबिराच्या टांचेखाली गुलाम होअून पडलेला चितोड, पुढच्याच क्षणाला त्याच्या मुडद्यावर ताठ अुभा राहील, आणि दोन घटकानी अुगवणाऱ्या सूर्यदेवाला, रजपुतांच्या सूर्य चिन्हांकित निशाणाच्या फडफडाटानं, अभिनव अुद्धाराचं अभिवादन करील. दोस्तहो, जोहार.

**दोघे०**—जोहार जोहार.

(जातात.)

---

अंक ४ था ] [ प्रवेश २ रा

(धाबरलेली नि बावरलेली चंचला धावत येते. दूर पहाते.)

**चंचला०**—कसं करायचं आता . . . . . आता हाक तरी कुणाला मारू ?. . . ते पहा . . ते पहा . . . . महाराज राणीसाहेबांच्या महालाकडेच चालले . . . होय, तिकडंच . . . . आज मात्र घात होणार . . . . . राणीसाहेब एकट्या . . . झोपी गेलेल्या. . . आन् हा मेला बनबीर नराधम . . . त्यांची अबरू कीं हो घेणार. . . . अहो, कुणीतरी धावा हो धावा . . . . कुणीच कसं फिरकत नाही या बाजूला ?. . . . . . ओरडू का मोठ्यानं ??. . . ताऔसाहेब . . . . जयपाळ . . . . . अहो कुणीतरी धावा हो . .

(कर्णपाल येतो.)

**कर्ण०**—काय ग ए पोरी, कसला ठणाणा चालवलायंच एवढा ? चितोडला आग लागली, का तुझा बाप मेला ?

**चंचला०**—बाप मेल्याचं दुक्ख नाही . . . . पण चितोडच्या मातोश्रीची अब्रू ध्यायला . . . .पहा पहा ते महाराज चालले आहेत . . . . .

**कर्ण०**—राजानं राणीकडं नाही जायचं, तर काय तुझ्यासारख्या दासीकडं बघायचं ? चल, जा आपल्या कामाला निघून.

**चंचला०**—म्हाताऱ्या कोल्ह्या, तुला काही लाज शरम ?

**कर्ण०**—लाज शरम ? दारूच्या घोटाबरोबर गेली गेली गडप पोटात.

**चंचला०**—राणी साहेबांवर बलात्कार होतोय न तुला त्याचं काहीच वाटंत नाही ?

**कर्ण०**—बलात्कार ? कुणी सांगितलं तुला हे ? अग दोघांची गट्टी कधीच जमलेली आहे.

**चंचला०**—मेल्या, जिभेचे तुकडे होतील तुझ्या.

**कर्ण०**—मदिरेच्या भक्ताची जीभ आडवी पडली, तरी तुटत फुटत नसते. ध्यायचाय अनुभव ? चल माझ्याबरोबर. अनार मधाच्या पिंपात तुला आरपार बुचकळून काढतो. पोटात दारू गेली . . . . चांगली भरपूर गेली. . . का दुनियेचा सारा रंग न्यारा दिसू लागतो. दारूची नशा डोळ्यांवर चढली म्हंजे कुब्जा नारी अप्सरा दिसते आणि जबरदस्तीचा बलात्कार प्रेमाची कुरवाळणी ठरतो. जा आपल्या कामाला. (जाऊ लागतो.).

**चंचला०**—(त्याला आडवून) कर्णपाल, मी पाया पडते हो तुमच्या. महाराजांना परत फिरवा, चितोडच्या राज्यश्रीची अब्रू वाचवा.

**कर्ण०**—अे मूर्ख पोरी, कसली आणलीस अब्रु न् बेअब्रू ? सत्ताधीशाच्या लहरीपुढं, अब्रूची किंमत दारूच्या फुटक्या पेल्याअितकीसुद्धा नसते. महाराजांना रूपमति राणी हवी. हवी म्हणजे काय ? हवीच. त्यात तुझ्या माझ्या बापाचं काय जातं ? तुझं तरी काय जातं ? बलात्कार झाला तर तो काय तुझ्यावर होणार आहे ? त्यालासुद्धा भाग्य लागतं भाग्य.

**चचंला०**—छे छे छे छे. तुमची सगळ्यांचीच काळजं कशी हो अशी अगदी अुलटी ?

**कर्ण०**—यथा राजा, तथा प्रजा. तुला कुणबिणीला हे राजकारण काय कपाळ समजणार ? तशात, तूं दारूहि ढोसलेली नाहीस. तुला नाही समजणार ही जबरीच्या दोस्तीची भानगड. (जातो.)

**चंचला०**—सगळ्यांचीच मनं आज मेलेली दिसतात.

(अेक पहारेकरी येतो.)

**चंचला०**—अरे बाबा. ते पहा महाराज. . . . ते पहा महाराज. . . .

**पहारेकरी०**—पाहिलं की, रूपमतीच्या महालाकडे जाताहेत.

**चंचला०**—तुझ्या पाया पडते मी. कसंहि करून त्याना परतवशील का ?

**पहारेकरी०**—परतवणार ? कोण मी ? छान. मी फासावर गेलो तर तूं थोडीच माझ्या नावानं कुंकू पुसणार आहेस.

**चंचला०**—तू फासावर जाण्यापूर्वीच वाटलं तर पुसते. . . हे पहा पुसलं. पण त्याना आडव रे आडव. ते राणीसाहेबांची अब्रू घेताहेत.

**पहारेकरी०**—तुझी तर नाही ना घेत ? जा आपल्या कामाला. (जातो.)

**चंचला०**—(मोठ्याने) आज परमेश्वर मेला. . . रजपुतांच्या आकिनीला आग लागली. . . .चितोडची राज्यश्री बुडाली. . .

(अुदयसिंह येतो.)

**अुदय०**—काय झालं ? ओरडतेस कां ?

**चंचला०**—केदारनाथ, तूं महाराजांचा पाळीव मारेकरी असलास, तरी तुला थोडी माणुसकी आहे का रे ?

**अुदय०**—माणुसकीचं राहू दे. काय झालंय ते सांग चटकन.

**चंचला०**—ते पहा. . . . ते पहा. . . दारू पिअून अुन्मत्त झालेले बनबीर महाराज, रूपमति राणीसोहबांवर बलात्कार करण्यासाठी. . . . .धाव धाव. . . .धुसले त्यांच्या महालात.

(अुदयसिंह झपाट्याने धावत जातो.)

. . . .गेला तर खरा तिकडं वेगानं. . . पण. . . पण. . . अुदयसिंहाचा हा पोटभरू मारेकरी. . . .बनबिराचा गुलाम. . . .आग्गबाअी. . . भिडलाच की तो जाअून महाराजांच्या नरड्याला. . .आता ? . . . .आता ?. . . . अिकडंच आली ती लाट, (जाते.)

(अुदयसिंह बनबिराची मानगुटी पाठीमागून धरून त्याला खेचीत आणतो ? आणि अेकदम पलट खाअून त्याच्या समोर होतो. कमरेची कट्यार सरसावून.)

**अुदय०**––मगरूर पाप्या, भोग आपल्या कर्माची फळं.

(बनबिरावर चढाअी करीत असताना, बनबीर त्याचे मनगट पकडतो. हिसकाहिसकी, कट्यार काढून घेतो आणि अुदयसिंहाला दूर लोटतो.)

**बनबीर०**––बैमान सैतान. अखेर बरोबर सापडलास. माझीच अटकळ बिनचूक खरी ठरली. . . कोण आहे तिकडे ? (चार सेवक येतात.) पकडा या हरामखोराला.

**अुदय०**––ठार मराल, पुढं पाअूल टाकाल तर. मी निःशस्त्र असलो तरी, मगरूर बनबीर, माझे नाव ऐकताच तुझ्या हातातली शस्त्रं गळून पडतील.

**बन०**––(सेवकाना) बेवकूब. पकडा त्याला सांगतो ना मी ? (सेवक सरसावतात.)

**अुदय०**––संभाळा. पाठकण्याचा पिंजारा करीन. टीचभर पोटासाठी देशद्रोह. . . राजद्रोह करू नका. मागे फिरा. कुणाला पकडणार तुम्ही ? मला ? तुमच्या औरस राजाला ? अुदयसिंहाला ?

**बन०**––कोण ? अुदयसिंह ?

**अुदय०**––मदांध बनबीर, तुझा काळाचा काळ. . . हा अुदयसिंह. . . नीट पाहून घे.

**बन०**––ओ हो, माझा हाडवैरी अुदयसिंह ? मला सापडलास, काळाचा काळ हा बनबीर, नीट पाहून घे. (सेवकाना खूण करतो. ते त्याला पकडून हात त्याचे हात बांधतात.) जा घेअून याला. आत्ताच्या अत्ता चव्हाट्यावर खांबाला बांधा. आधी याची जीभ कापून, लालबंद सांडशीने याचे डोळे फोडा आणि नंतर याच्या अंगाचे सालटे सोलून, लाथेच्या ठोकरीनं द्या झुगारून गडाखाली.

**अुदय०**––(सेवक नेत असताना) अुदयसिंह मेला तरी त्याच्या तळतळणाऱ्या आत्म्याचे शाप तुझ्या जुलमी राजदण्डाचे कोळसे कोळसे करतील.

**बन०**––सत्ताधाऱ्याना गुलामांचे असले शाप बाधत नसतात.

(शिपायी अुदयसिंहाला खेचून नेतात. कर्णपाल येतो.)

**कर्ण०**––महाराजएचा जयजयकार असो. राजाधिराज, आजची रात्र बरीच धोक्याची दिसते. गडावर सगळीकडं गुप्त बण्डाची काहीतरी धामधूम असल्याच्या बातम्या आहेत.

**बन०**––कर्णपाल, म्हातारपणामुळं तू काळाच्या फार मागे राहिलास.

**कर्ण०**––काळ नेहमीच म्हाताऱ्यांच्या पुढं अुभा असतो. काळ नि म्हातारपण यांची शर्यतच लागलेली असते.

**बन०**––गडावरच्या खऱ्याखोट्या बण्डाळीचा नायक. . . अुदयसिंह. . .

**कर्ण०**––भूत होअून परत आला की काय ?

**बन०**—–नाही, चांगला धडधाकट जिवंत. . . पण आत्तच गिरफ्दार होऊन, मृत्यूचा जहरी प्याला पिण्यासाठी, तो पहा. . . .तो पहा. . .. चव्हाट्यावर रवाना झाला. ती पहा, दिवट्यांची दाटी होऊन, तमासगिरांची गर्दी होत आहे.

**कर्ण०**—–तो प्रकार पाहूनच मी अिकडं लगबगीनं धावत आलो सरकार, महाराज, अअुदयसिंहाला ठार मारून राणीच्या पाणिग्रहणाची तरकीब यशस्वी होणार नाही. अुदयसिंहाचा मृत्यू. . . .

**बन०**—–तसा आमचा हुकूमच आहे.

**कर्ण०**—–आणि रूपमतीच्या प्राप्तीचा मृत्यू यात काहीतरी तडजोड निघाल्याशिवाय, गडावर फैलावलेल्या बण्डाच्या गडबडीला पायबंध ठोकता येअील काय ?

**बनबीर०**—–अुदयसिंहाला जिवंत ठेवून बनबिराला जिवंत रहाताच यायचं नाही.

**कर्ण०**—–आणि अुदयसिंहाला ठार मारूण राणीच्या प्रेमाचा किल्ला हुजूरला सर करता येणार नाही.

**बन०**—–रूपमतीच्या बिनशर्थ प्राप्तीचा प्रश्न आमच्या अजिंक्य महत्वाकांक्षेला कितीहि साजला शोभला, तरी अेका हेकेखोर रांडरूच्या प्रेमयाचनेसाठी, मेवाडच्या सत्तेवर निखारे ओतायला हा बनबीर तयार नाही.

**कर्ण०**—–पण खावन्द. खास हुजूरच्या हुकुमानं आम्ही मेवाडभर फैलावलेली राणीच्या प्रेमदानाची बातमी आता खोटी ठरली, तर आमची तोंडं काळी होतील त्याची वाट काय ? सारे लोक या थेरड्याची माकडटवाळी करतील. सेवकांच्या भल्या बुऱ्या खटपटीना सरकारनीच पाठिंबा दिला नाही, तर सेवकांची निष्ठा गावभवानीच्या प्रेमाच्या पंगतीला जाअून बसली तर त्याचे पाप सरकारच्या माथ्यावर. रूपमतीच्या प्रेमदानाचा मुकाबला डावलून आता मागणार नाही. खावन्दांचा बदलौकीक होअील.

**बन०**—–माझा बदलौकीक ? कसा होणार ?

**कर्ण०**—–पुढं टाकलेलं पाअुल आता मागे घेणार म्हणून.

**बन०**—–प्राण गेला तरी नाही घेणार मागं, रक्तपाताच्या पुण्याअीवर कमावलेली सत्ता, रक्तपाताच्या जोरावरच आम्ही टिकअून धरणार. अुदयसिंहाच्या रक्तानी माखलेल्या हातानी तुझ्या निरीला हात घालीन, ही आत्ताच केलेली प्रतिज्ञा मी फोल पाडू ? शक्य नाही. कर्णपाल, मेवाडच्या सिंहासनाचे माझ्या डोळ्यांदेखत तुकडे तुकडे अुडाले, तरी कोणत्याहि अिच्छेचा न् प्रतिज्ञेचा भंग झालेला मला साफ परवडणार नाही.

**कर्ण०**—–अुदयसिंहाच्या रक्तानं हुजूरचे हात माखलेच पाहिजेत आणि ते माखणारच. पण असं होण्यापूर्वी, अुदयसिंहाच्या जीवदानाच्या हुलकावणीनं, रूपमतीचं पाणिदान पटकावण्याची तरकीब लढवायला काय हरकत आहे ? रूपमति बनबीरपत्नि बनल्याबरोबर, राजकुमाराचा बिनबोभाट निकाल लावायला कितीसा अुशीर ?

**बन॰**——कर्णपाल, तुझं डोकं अितकं मुत्सद्दी असेल, अशी मला कल्पना नव्हती.

**कर्ण॰**——ही सरकारच्या पायाची पुण्यायी तर खरीच, पण त्यात मदिरेची पडलेली भर. मदिरेची निंदा करणारे कितीहि असले, तरी मदिरा नि मुत्सद्दगिरी ही जोडगोळीच राजकारणात आजवर बिनतोड ठरत आलेली आहे.

**बन॰**——नेकजात कर्णपाल, तुझी मसलत आम्हाला बिलकुल मान्य आहे. आतापासून अर्ध्या घटकेच्या आत, आमच्या हातात हात देऊन, प्रेमाच्या सलोख्याला रूपमति तयार असेल, तर अुदयसिंहाला केवळ जीवदानचसे काय, पण राज्यदान द्यायला आमची मंजुरी आहे.

**कर्ण॰**——याला म्हणतात, सरकार, राजकारण आणि मुत्सद्दगिरी.

**बन॰**——चालू रात्रीच्या आनंदात या बिकट घटनेची गोड भर पाडण्याची अकलेची करामत तुझ्यापाशी असेल, तर जा, त्या करामतीला कसाला लावून, आम्हाला धन्य कर.

**कर्ण॰**——बंदा या कामी मुळीच कसूर करणार नाही. (जातो.)

**बन॰**——(स्व.) चितोडावर गुप्त कटवाल्यांची धामधूम ? माझं मन खास अस्वस्थ होत आहे. माझ्या कर्दनकाळ दरा-याची पोलादी तटबन्दी फोडून, बण्डाळीचे भूत खरोखरीच आत घुसले असेल, तर माझ्या सत्तेच्या टिकावासाठी, रूपमतीच्या प्राप्तीच्या आशेला लाथाडून, या भुतांच्या भूतनाथाला, त्या दुष्मन अुदयसिंहाला ठार मारलाच पाहिजे.

(**आत : कमल॰**——बाबा, बाबा, कुठें आहात तुम्ही ?)

**बन॰**——कोण ? कमल, (ती येते.) अजून तूं झोपली नाहीस ?

**कमल॰**——निरपराधी जीवाची हत्या होत असतां, झोप येणार कशी नि मी ती घेलू तरी कशी ? बाबा, आपल्या या लाडक्या मुलीसाठी तरी त्या अुमद्या तरूणावर दया दाखवा.

**बन॰**——दया ? दगाबाज दुस्मानावर दया ? कोणाची तरफदारी करीत आहेस याचा विचार केलास ?

**कमल॰**——रागाच्या झटक्यात ज्याला आपण मृत्यूची शिक्षा फर्मावली, त्या हतभागी अुदयसिंहाशिवाय दुस-या कुणाची मी तरफदारी करू ?

**बन०**——त्याला फर्मावलेली शिक्षा न्यायाची आहे. तुझ्या बापाचा खून करायला धावलेल्या मारेकऱ्याची तरफदारी करताना, कमल, तुला शरम नाही वाटंत ?

**कमल०**——त्याच्या ठिकाणी आपण असता, तर असेच नसता का वागला ? जन्मदात्या आओीवर होणारा बलात्कार आपण तरी मुकाट्याने सहन केला असता का ? बाबा, आपल्यालाही आओी होती, तिची आठवण करा आणि रूपमतीसारखाच प्रसंग तिच्यावर. . . .

**बन०**——कारटे, आओीच्या आठवणीनं माझ्या काळजाला करवत लावू नकोस.

**कमल०**——आणि महाराज, केवळ सत्तेच्या धुंदीनं सत्याच्या मानेवर आपणहि आपल्या सूडाची कुऱ्हाड चालवू नका.

**बन०**——सत्याची मान ? कसल्या सत्याची मान ? त्या हरामखोरानं तुझ्या स्वनातल्या सत्याला मात्र बिनचूक मान दिला खरा, सारा हरामखोर विश्वासघातकी घरभेद्यांचा बाजार, चल जा, चालती हो अिथून, त्या राजद्रोही सोंगाड्या मारेकऱ्याची तरफदारी करून, कृतघ्न कारटे, तूं पण माझ्याशी दगाबाजी करीत आहेस.

**कमल०**——बाबा, शेरशहाच्या बंदीतून त्यानीच नाही का माझा बचाव करून, तुमची अब्रू बचावली ? मला आज त्यांच्या त्या अुपकारांची फेड केलीच पाहिजे. माझ्या अुदयसिंहाच्या प्राणांची मला भिक्षा घालीतोंवर, अश्शी मी या पायांवर अश्रूचा अभिषेक करीत लोळण घेणार, पृथ्विराज महाराजांवर, आपल्या वडलांवर, प्रेमाची झडप घालणाऱ्या, आपल्या मातोश्रीच्या तारुण्याची, बाबा, थोडीशी कल्पना करून पहा.

**बन०**——बेमान दगाबाज कारटे, माझ्या दुस्मानाशी संगनमत करून, छान छान माझ्या प्रेमाचे पांग फेडलेस.

**कमल०**——बाबा बाबा, काय बोलता हे ? तुमच्या प्राणाच्या प्रेमासाठीच अुदयसिंहाच्या प्राणाचं प्रेम मला विशेष वाटतंय. तुम्हा दोघांच्या प्रेमासाठी, मी माझ्या प्राणाच्या प्रेमाची होळी करायला तयार आहे. बनबीर आणि अुदयसिंह दोघंहि शीरसलामत जगावे, म्हणून ही कमलदेवी आपल्या जिवाचा जोहार करायला तयार आहे.

**बन०**——साप मुंगसाच्या जानीदोस्तीची बंद कर ही बडबड. माझा दुस्मन अुदयसिंह मेलाच पाहिजे.

**कमल०**——त्यांचा जीव घेण्यापूर्वी, बाबा, माझा जीव घ्या, (बनबिराच्या कमरेची कट्यार काढून त्याच्या हातात देते.) घ्या ही कट्यार अन् करा या हतभागी कारटीला ठार, (बनबीर कट्यार म्यानात ठेवतो.) कशाला आता माघार घेता ? बाबा, लक्षात ठेवा, कमलाचा प्राण घेतल्याशिवाय, अुदयसिंहाचा प्राण घेण्याची खुद्द बनबिराची छाती नाही.

**बन०**—अेका बण्डखोर तरूणासाठी बापाच्या जिवावर अुठलेल्या नागिणी, तुला जागच्या जागी ठेचून ठार करणं मला खचित कठीण नाही.

**कमल०**—मग करा ना ठार ? ही मी तयारच आहे.

**बन०**—अुदयसिंहाला ठार मारला का जिवंतपणीच मृत्यूचा तुला अनुभव येअील. जा. अिथ्नं निघून जा.

**कमल०**—जिवावर अुदार झालेल्या या निश्शस्त्र मुलीला कशाला हव्यात या धमक्या ?

**बन०**—आधी अिथ्नं निघून जा.

**कमल०**—नाही जात म्हटलं तर काय आपण माझं काय करणार ? जीवच घेणार ना ? घ्या. मला तरी तेच हवे. बनबीर महाराज, अुदयसिंहाच्या नुसत्या केसाला हात लावण्यासाठी, या कमलचं प्रेतच तुडवीत जावं लागेल तुम्हाला, हे लक्षात असू द्या. (जाते.).

**बन०**—कोण आहे तिकडं ? जाबता ? जयपाळ . . . जयपाळ ? (अेक नोकर येतो.)

**नोकर०**—जयपाळ जागेवर नाहीत. मी आहे सरकार.

**बन०**—जयपाळ कुठं आहे ?

**नोकर०**—मध्यरात्रीपासून जयपाळ सरदारांचा पत्ता नाही.

**बन०**—जयपाळाचा पत्ता नाही ?

**नोकर०**—बिलकुल बेपत्ता. कर्णपालसुद्धा तुझा शोध करून थकले. वाड्यात नाही न् गडावरसुद्धा कुठेच नाहीत.

**बन०**—आस्सं बरं, जयपाळ नाही तर नाही. तूंच जा पाहू राजकन्येच्या पाठोपाठ. मेंदूच्या विकारानं तिचं डोकं फिरल्यासारखं झालंय. वेडाच्या भरात ती आक्रस्ताळी पोर भलतंसलतं करणार नाही, अशी खबरदारी घे. जा.

(आज्ञा म्हणून नोकर जातो.)

**बन०**—(स्व.) जयपाळ बेपत्ता ? त्यानं सुद्धा मला दगाच दिला असावा काय ? जिकडं तिकडं दगाबाजी न् विश्वासघात. धिःकार धिःकार माझ्या जीविताला न् सत्तेला. घाणेरड्या खाते-यात मनसोक्त वळवळणारा किडासुद्धा माझ्यापेक्षा खात्रीनं अधिक सुखी असेल. नरांचा नराधीष, कोट्यवधि प्रजेचा स्वामी, सत्तेच्या शिखराला गेलो, तरी भणंग भिका-याच्या नशिबातलं समाधानसुद्धा माझ्या वाट्याला कधि आलं नाही. काळीज तोडणा-या मनाच्या या वेदना. . . नाही, नाही मला आता सहन होत, निरंकुश सत्तेच्या चवचाल महत्त्वाकांक्षेच्या नादी लावून. . . मी खास फसलो. माणूसकीला मुकून समाधानाला पारखा झालो. सच्च्या मित्रांच्या जिव्हाळ्याला लाथाडून,

खुषमस्कऱ्यांच्या पोटार्थी मसलतीना बळी पडलो. अधिराजपणाच्या धमेंडीने खऱ्या खोट्या राजद्रोहाची पाळंमुळं अुखडण्याच्या भरात, माझा नीच आत्मद्रोही बनली. . अरेरे . . . आत्मद्रोह . . . माझा मीच वैरी, माझा मीच दुश्मन् सत्तेच्या न् वैभवाच्या अत्युच्च सुळक्यावर अेकटाच अुभा असलेल्या आत्मद्रोही बनबिरा, कोण तुला आता अिथं आधार देणार ?. . .ओ हो हो हो. केवढा भयंकर अुंच हा सुळका. खाली. . . पुढे. . . मागे. . . .नजर ठरत नाही, वर ? हा हा हा, वर तर सारे आकाश फाटलेले. . .काय ? पुन्हा पश्चातापाच्या पिशाच्चांची माझ्यावर चढाओ ? छट्. आकाश फाटून धरणी दुभंग झाली, तरी हा पापाचा परमेश्वर बनबीर, पश्चात्तापाला पालथा पाडून, पाशवी पराक्रमाने, काळाचा काळ म्हणून दुनियेला बेजार करणार. (जातो.)

**अंक चौथा समाप्त.**

# काळा। काळ



## अंक ५ वा] [प्रवेश १ ला

**स्थळ, स्थिति आणि पात्रें**

अुदयसिंह हातापायात बेड्या घातलेला आणि अेका खांबाला बांधलेला. आजूबाजूला तलवारी सरसावलेले मारेकरी. शेजारी कर्णपाल त्याची समजूत घालीत आहे.

**कर्ण०**——राजकुमार, हा हट्ट सोडून द्या.

**अुदय०**——कर्णपाल, कशाला अुगीच ही वटवट चालविली आहेस ? मरणाला मर्दानी मिठी मारायला मी अुभा असता, तुझ्यासारख्या बुढ्ढ्या माकडाला ही बेशरम वकिली करायला, त्या नराधमानंच पाठवलं असेल, तर खाल्ल्या मिठाचं पांढऱ्या केसाअितकंच सार्थक तूं करीत आहेस. पण माफीच्या मुक्ततेची मसलत, हा तुझाच लांडा कारभार असेल, तर म्हातारपणाबरोबर मनाची मुंडी मुरगाळण्याचा मुर्दाडपणा तूं छान कमावलास, असंच म्हणावं लागेल.

**कर्ण०**——राजकुमार, तुम्ही काहीहि बोललात, तरी मला मुळीच राग येणार नाही.

**अुदय०**——कशाला येअील ? ज्यांचं मन आणि रक्तच ठार मेलेलं, त्याना राग येणार कुठून. पोटासाठी खऱ्या खोट्याची मुस्कटदाबी, ही वकिली धंद्याची मुर्दाड चतुरायी कुप्रसिद्धच आहे.

**कर्ण०**——मी तुमच्या अेवढा–अगदी अस्साच –तरणा जवान बाण्ड होतो, तेव्हा मी असाच काहीतरी अद्वातद्वा भकत असे. जवानीचा भररंग काही न्यारा न् और असतो.

**अुदय०**——त्या रंगाच्या पुण्यायीवरच ना त्या बदअफलाद बनबिराची जुलमी सत्ता तुम्ही मेवाडच्या छातीवर नाचवता आहात ना ?

**कर्ण०**——जवान जिभली वादविवादात अशीच जबरदस्त असते, याची मला चांगली आठवण आहे. तारुण्याच्या भरअंमदानीत माझ्याअितका बडबड्या मुत्सद्दी अुभ्या मेवाडात नव्हता. तलवारीचा पट्टा अेकीकडे आणि माझ्या जिभेचा पट्टा अेकीकडे. म्हणून आपल्या आजानं–राणा संगराजितानं– या कर्णपालाला....

**अुदय०**——लंबकर्णाचा मान दिला असेल.

**कर्ण०**——छे. फत्तेपूर शिक्रीच्या लढाअीत बाबराशी तहनाम्याची वाटाघाट करायला दरबारी वकील म्हणून धाडला होता.

**अुदय०**——आस्स! फत्तेपूर शिक्रीच्या लढाअीत रजपुती वर्चस्वावर कायमचा वरवंठा कां फिरला, याचं गूढ आत्ता समजलं मला.

**कर्ण०**——राजकुमार, साम्राज्याच्या बरकति फारकति दैवाधीन असतात. तिथं वकील काय करणार ?

**अुदय०**——आणि वकीलच आडवा पडल्यावर, दैव तरी कितीसं टिकाव धरणार ? आमच्या काकासाहेबांना–रत्नसिंह महाराजांना–बुन्दीच्या राजाबरोबर द्वंद्वयुद्धाची चिथावणी द्यायला आणि त्यात त्यांचा अकाली घात करायला आपलीच बुद्रुक वकिली खर्ची पडली असेल ? कर्णपाल, लाजलज्जा कोळून प्यालात, तरी देवानं माणसाना काळीज म्हणून अेक चीज दिलेली आहे, याची तुम्हा तोंडपुज्या वकिलांना काही जाणीव असते का रे ?

**कर्ण०**——जाणीव नसते, असं कसं होअील राजकुमार ? वकिलांची तिरंदाजी नेहमी काळजावरच चालते. निष्काळजी राहून त्यांचं भागतच नाही. मला आपल्याबद्दल काही काळजी नसती, तर मरणाच्या महाद्वारातून आपल्याला खेचून काढायला कशाला आलो असतो अिथं ? द्या हा हट्ट सोडून आणि व्हा माफी मागून मोकळे.

**अुदय०**——विक्रमाजिताच्या या मानधन युवराजानं–चितोडच्या या औरस राजदण्डधाऱ्यानं–थेरड्या, तुझ्या या अस्सलबीज धन्यानं, त्या बण्डखोर खुनी बदमाष बदअफलाद बनबिराची हकनाहक माफी मागून मोकळं व्हावं, हीच ना राजनिष्ठ कुत्तरड्या तुझी काळजी न् विवंचना ? बेहत्तर आहे जान गेली तर, पण दगाबाजीनं माझ्या बाबांचा खून करणाऱ्या खाटकापुढं हा अुदयसिंह रेसभरसुद्धा मान वाकवणार नाही.

**कर्ण०**——तुझ्या हात्‌नं कसलंच अत्याचारी दुष्कृत्य घडलं नाही का ?

**अुदय०**——अत्याचारी दुष्कृत्य ?

**कर्ण०**——प्राण घेण्याच्या अिराद्यानं, जंबिया रोखून, बनबीर महाराजावर तूं झाप टाकलीस ना ?

**अुदय०**——अलबत. काय चुकलं त्यात ?

**कर्ण०**——काय चुकलं ? सारंच चुकलं.

**अुदय०**——भर मेजवानीत माझ्या वडलांवर त्या राक्षसानं नव्हता का असाच हल्ला केला ?

**कर्ण०**——तो यशवंत झाला न् तुझा डाव हुकला. खलास मामला. हारजितीच्या ताजव्यातच राजकारणाची चढती अुतरती मांजणी ठरत असते.

**अुदय०**——हे सांगायला तुझी गरज नाही. यशापयशाचा मामला दैवाधीन किंवा देवाधीन ठेवून, संकल्प न् प्रयत्न करणं, अेवढंच माणसाच्या हाती आहे. माझं धाडस फसलं, त्याचा दोष देवाला नसून, तो मी माझ्या दैवाला देतो. माझ्या धाडसाचा अजूनहि मला अभिमान वाटतो.

**कर्ण०**——अभिमान वाटतो ? आश्चर्य.

**अुदय०**——लाजलज्जेचा होम करून, टीचभर पोटासाठी बायकांची अब्रू सत्ताधीशांच्या जनानखान्यात कोंबणाऱ्या नरपशूनाच आश्चर्य वाटणार. म्हाताऱ्या कोल्ह्या, स्वतःच्या आअी, बायको, बहिणीवर अेकादा लाण्डगा जर पाप वासनेनं बलात्कार करू लागला, तर षण्ढा, ताडकन् त्याच्या नरडीचा तूं घोट घेशील, का हरिनामाचा गजर करीत बसशील ? सारा मेवाड मातोश्री म्हणून जिला अेकवार जोहार करीत होता, त्या राणी रूपमतीच्या पातिव्रत्यावर झडप घालणाऱ्या त्या लाण्डग्याचा, निजल्या गादीवर न् बसल्या बैठकीवर गळा दाबून जीव घेतला असतास, तर म्हाताऱ्या भाकडा, या रियासतीच्या तीन पिढ्या खाल्लेल्या मिठाला जागल्याचं पुण्य तरी तुझ्या पागल पदरात पडलं असतं.

**कर्ण०**——राजकुमार, आपला गुन्हा केवढाहि असला, तरी क्ष म स्व या तीन अक्षरांच्या नुसत्या अुच्चारानी जर अकाली मरणाची आपत्ति टळत असेल, तर नुसत्या सत्यनिष्ठेच्या नादी लागण्यात काय अर्थ ?

**अुदय०**——काय ? गुलामगिरीच्या बेहद्द जिण्यासाठी मी सत्याची पायमल्ली करू ? सद्सद्विवेक बुद्धीशी दगाबाजी करू ?

**कर्ण०**——सत्याचा महिमा पुराणात अुदंड वर्णिला आहे. पण, कुमार, सत्ता हेच अितकं मोठं लांब रुंद सत्य आहे, का त्याच्या प्रभावापुढं सत्याची पुराणं फोल ठरतात. सत्तेपुढं शहाणपण चालत नाही. म्हणून म्हणतो, माझ्या पांढऱ्या केसांत भरलेला अनुभव, शांतपणानं विचारात घे. झाल्या गेल्या गोष्टी विसरून जा. महाराजांची क्षमा माग. त्यानाच विक्रमाजित महाराजांच्या ठिकाणी मानून, मातोश्रीसह त्यांची सेवा कर, म्हणजे राजदण्ड तुझाच आहे. महाराज कुठं नाही म्हणतात ? त्यांच्यामागं चितोडचं सिंहासन तुझंच आहे. नाही कोण म्हणतो ? पण राज्य चालवायला थोडी पात्रता लागते, अक्कल लागते, हिंमत लागते, ती महाराजांजवळ शिकलास, का आहे ते राज्य तुझेच. नाही कोण म्हणतो ?

**अुदय०**——कर्णपाल, बंद कर तुझी ही वटवट. राजनिष्ठेसारखा सद्गुण तुझ्या-सारख्या पोटार्थी पार्थिवांच्या हाती गेला म्हणजे त्याची कशी नासाडी होते, याचा

दाखला तूं चांगला पटवलास. भल्या माणसा, जा. तुझ्या अन्नदात्या धन्याला जाऊन सांग, सत्याला पाठ दाखवण्यापेक्षा, तुझ्या अन्यायी सत्तेला शाप देत, मृत्यूला मिठी मारायला मी तयार आहे.

**कर्ण०**——मरायलाच जो तयार, त्याला जगवण्यात काय अर्थ ? अुदयसिंह, अजून विचार कर. महाराज तुला क्षमा करायला तयार आहेत. आततायीपणापेक्षा जुळत्या मिळत्या धोरणानं घेशील, तर त्यात तुझं कल्याण आहे. मृत्यूच्या गप्पा मारतोस, पण त्याच्या वेदना सहन करणे, फार कठीण कर्म आहे राजा.

**अुदय०**——अरे जा. सतीला सरणाची न् मर्दाला मरणाची कां म्हणून भीति वाटावी ?

**कर्ण०**——कुमार, मी जातो. पण लक्ष्यात ठेव. रूपमति महाराजांचं पाणिग्रहण करील, तरच तुला जीवदान मिळेल. (जातो.)

**अुदय०**——हरामखोरा, मोकळा असतो तर जीभ अुखडून घेतला असता तुझा जीव. अरेरे, घरभेदानं पछाडलेल्या राष्ट्रात असल्याच नराधमांची पैदास फार असते अं.

(नागवी तलवार घेअून बनबीर येतो.)

**बन०**——सरता सवाल. तुझी आअी आत्ताच्या आत्ता, बिनतक्रार, आमच्या मंचकाचा स्वीकार करीत असेल, तरच तुला जीवदान मिळेल.

**अुदय०**——बटकीच्या पोरा, स्वताच्या आअीच्या व्यभिचाराचा कशाला असा चव्हाट्यावर डंका पिटतोस ? चितोडचा बदअफलाद चोर तूं. कोण तुझ्याजवळ कसली याचना करणार ?

**बन०**——जा घेअून या त्या तापवलेल्या सांडशी आणि फोडा याचे डोळे आत्ता आमच्या समक्ष. (नोकर आत जातात आणि सांडशी घेअून येतात.) आमच्या मातोश्रीची निंदा ? डागा याचे डोळे.

(धाबरलेला कर्णपाल धावत येतो.)

**कर्ण०**——दगाबाजी, सरकार, दगाबाजी. दक्षिण बुरुजाखाली बण्डवाल्यांची गर्दी अुसळली आहे. पहाऱ्याच्या पहिल्याच ठोक्याला जयपाळ फरारी. त्याच्या स्वारांची पागा रिकामी.

**बन०**——जयपाळ हरामखोर झाला ? कुछ पर्वा नहि. जा. अेकदम सैन्याच्या अुठावणीचा आमचा हुकूम सेनापतीला जारी कर. जा.

**कर्ण०**——आता हुकमाना जुमानणार कोण सरकार ?

**बन०**——कां ? आपल्या सैन्यातहि फितुर न् दगाबाजी ?

**कर्ण०**—दगाबाजी नसली तरी नशाबाजी भरपूर आहे. बराकीतले सारे शिपायी दारू ढोसून मस्त अन् कलावंतिणींच्या मोहल्यात नाचगाण्यात मषुल आहेत सरकार.

**बन०**—म्हंजे ? याचा अर्थ काय ?

**कर्ण०**—यथा राजा तथा प्रजा.

**बन०**—बनबिराच्या सैन्यात नशाबाजी ?

**कर्ण०**—खास हुजूरच्या हुकमाने.

**बन०**—(स्व.) अरेरे. अखेर या बनबीराचा कडवा दरारा दारूच्या पेल्यात पालथा पडण्याचा प्रसंग बितला आं ? (अु०) कुछ हर्जा नहि. कर्णपाल, चल. आत्ताच्या आत्ता या बण्डाळीची भुताटकी दक्षिण बुरुजाखालीच गाडून टाकतो. (सुरुंगाचा स्फोट अैकू येतो.)

**कर्ण०**—सरकार, सरकार, मामला काही ठीक दिसत नाही. (पुन्हा स्फोट.) मला वाटतं, दक्षिण बुरूज कोसळला. चला चला. आलिया भोगासी सादर असलंच पाहिजे.

**बन०**—धाबरू नकोस. चल, पुढे हो.

**कर्ण०**—खावन्दानीच व्हावं पुढं. (स्व०) आम्ही झालो पुढं, का पडलं आमचं मढं. (जातो.)

**बन०**—(मारेकऱ्यांना) फितुरीच्या या सैतानाला मुण्डीछाट ठार मारून, आम्हाला ताबडतोब वर्दी द्या. (जातो.)

**अुदय०**—(स्व०) आस्सं. माझ्या सत्यसंकल्पाचे मोर्चे या नराधमाच्या नरडीला बिनचूक लागले खास.

**मारेकरी०**—(तलवारी परजीत) चल रे. हो मरायला तयार.

**अुदय०**—तुम्ही मारायला तयार आहात ना ? मग विचारता कशाला ? (पुन्हा स्फोटाचा आवाज.) धन्य झालो मी. पोटभरू पाप्यानो, अैका. अैका. काळाची ही काळगर्जना अैका. मरता मरता मेवाडचा पुनर्जन्म मी पहात आहे. चला. आटपा तुमचं काम.

(मारेकरी अवसानात अुभे रहातात. कमलदेवी येते.)

**कमल०**—खबरदार मेल्यानो पुढं पाअूल टाकाल तर. (अुदयला मिठी मारून) आधी माझा जीव घ्या.

**१ मारेकरी०**—तसा हुकूम नाही बाअीसाहब.

**कमल०**——राजकन्या ठार मेल्याशिवाय, राजकुमारांच्या केसाला धक्का लावण्याची खुद्द बनबिराची छाती नाही. समजलात ? जा चालते व्हा, असा माझा हुकूम आहे.

**२ मारेकरी०**——ठीक आहे. तो हुकूम तसा, हा हुकूम असा.

**१ मारेकरी०**——आम्हाला काय ? आम्ही हुकमाचे ताबेदार. (दूर जातात.)

**अुदय०**——कमल, मरणाच्या मंगल मार्गावरचं माझं पाऊल मागं खेचून तुला काय मिळालं ? तूं आली नसतीस तर या क्षणाला माझा आत्मा स्वर्गाच्या स्वतंत्र वातावरणात स्वच्छंद विहार करण्याअितका तरी भाग्यवान झाला असता. प्रेमाच्या माणसानं भाग्याची लाट अशी आडवून धरणं, चांगलं का ?

**कमल०**——महाराज, कोणत्या तोंडानं आपल्याशी बोलू ? माझ्या तोंडानं माझ्या दिलाशी दगाबाजी केली. माझ्या हळव्या मनानं पितृप्रेमासाठी पतिद्रोहाचं पाप माझ्या पदराला बांधलं. निष्ठेच्या निवडीत नादान बनलेल्या या पापिणीनं, राणाजी, आपल्यासारख्या पुण्यात्म्याशी प्रतारणा केली. दगाबाजी केली.

**अुदय०**——कमलच्या हातून दगाबाजी ?

**कमल०**——मी आपला घात केला.

**अुदय०**——परधर्मी पठाणांच्या बंदिवासांतून जिचा मी अुद्धार केला, तीच कमलदेवी माझा घात करते ? या कालकूट जहराचे थेम्ब माझ्या कानात ओतण्यापूर्वी, परमेश्वरा, माझ्यावर मरणाची मेहरबानी कां रे नाहीस केली ? राजकन्ये, माझं मरण लांबणीवर टाकण्यात तुझ्या बापावर तूं ताण केलीस.

**कमल०**——महाराज, माझ्या भोळ्या भावाकडं पहा. माझ्या कमकुवत भाबडेपणानंच आपल्याला मी मृत्यूच्या दारी अुभं केलं.

**अुदय०**——कमलदेवी, डोळे भरल्या केवीलवाण्या मुद्रेनं कशाला आता टक लावून माझ्याकडं पहातेस ? तुझ्या लाडक्या बापानं माझ्या आंगावर कड्याबेड्यांचा हा भरजरी साज चढवून, या जामाताचा गौरव तर छान केला. या मारेकऱ्यांनी माझ्या शिरकमळाला धडापासून वेगळं केलं, म्हणजे त्यातून वहाणाऱ्या लालबुंद रक्ताच्या पाटात, तुला माझ्या प्रेमाची कसोटी बिनतोड अजमावता येअील.

**कमल०**——वीज कडाडून कोसळती तरी खुशाल मी गिळली असती. महाराज, देवानं न् दैवानं माझं हाडवैर साधलं. बोलू नये ते करवलं न् करू नये ते बोलवलं. ज्यानी माझी जान बचावली, त्याच महाभागाच्या मानेवर सुरी ठेवायला मी कारण व्हावं, कसं हे पाप चिकटलं मला देवा ? बाबांच्याबद्दल आपली घोर प्रतिज्ञा अैकून माझी गाळण अुडाली, मन भ्रमिष्ट झालं, जीभ हवं ते बरळू लागली, आणि अखेर.... आणि अखेर.... राणाजी, मी आपला हा अस्सा घात केला.

**अुदय०**——माझा घात तुझ्या पितृनिष्ठेने झाला, का मातृनिष्ठेनं केला, या कोड्याचा अुलगडा......

(बंदुकांच्या फैरीचे आवाज, स्फोट, धरा, पकडा, दगाबाजी, खून, वगैरे संमिश्र आवाज. मारेकरी परत येतात.)

**१ मारेकरी०**——बाअीसाहेब, बंद करा हे आपलं रडण्याचं गु-हाळ. आम्हाला हा गुन्हेगार आता छाटलाच पाहिजे. चल रे हो तयार.

**अुदय०**——किती वेळा विचारता रे तयार हो, तयार हो, म्हणून. मी केव्हाच तयार आहे. तुम्ही कशाला माघार घेता ? कमल, हो बाजूला.

**कमल०**——नाही मी व्हायची बाजूला. अश्शी याना चिकटून रहाणार. आम्हा दोघाना अेकदम छाटा हवं तर.

**२ मारेकरी०**——अहो बाअी, तसा हुकूम नाही.

**कमल०**——हुकूम नाही, तर व्हा चालते अिथ्नं.

**१ मारेकरी०**——चालते होण्याचा हुकूम नाही. (आत शिंगे तुता-या वाजतात.)

**अुदय०**——अैका अैका. चितोडच्या जुलमी सत्तेची राखरांगोळी करणा-या भूतनाथाची ही गर्जना अैका. आ हा हा, अेकलिंगेश्वरा, तुझी लीला अगाध आहे.

**कमल०**——महाराज, ही काय भानगड आहे ? कसला हा भयंकर गलबला ?

(कर्णपाल २-३ सैनिकांसह धावत येतो.)

**कर्ण०**——पळा पळा, जीव घेअून पळा. बनबीर महाराज बेपत्ता. त्याना आधी शोधून काढा. त्याना वाचवा. (सैनिक धावत जातात.)

**कमल०**——कर्णपाल, कर्णपाल, कसला हा गलबला ? काय झालं ?

**कर्ण०**——कपाळ फुटलं तुमचं आमचं. दक्षिणेचा बुरूज सुरुंगाने अुडवून, बण्डखोरांच्या फौजा समुद्राच्या लाटांसारख्या गडावर अुसळत घुसल्या. (शिपायी परत येतात.) परत कशाला मरायला आलात ? जा. कड्यावरून अुड्या घेअून जीव द्या. महाराजांचा बचाव करता येत नाही, कशाला झालात शिपायी ? चला, व्हा चालते. (शिपायी जातात. मारेक-याना पाहून) आणि तुम्ही रे कशाला खुंटासारखे अिथे अुभे ?

**१ मारेकरी०**——आम्ही हुकमाचे ताबेदार.

**कर्ण०**——हुकूम देणारे चालले मसणात, तुम्ही जा त्यांच्या सरणात. राजवाड्याची दारं फोडून गनीम आत घुसला आणि चोरांनो तुम्ही अिथंच ? चला व्हा चालते अिथनं आणि पडा शत्रूच्या तोंडावर तुटून. चोर हरामखोर दगाबाज. (मारेकरी जातात.) महाराजाना जिवंत पकडण्यासाठी राजवाड्याचा कोपरा न् कोपरा गनीम खणून कुदळून काढीत आहे. चला पळा, लढून मरा नाहीतर जीव बचवायला आयाबायांच्या मागे दडा. (जातो.)

(आतः – तोफांची धडेबाजी, गलबला आणि राणा अुदयसिंहाचा जयजयकार, अशा गर्जना.)

**अुदय०**——मदांध बनबिरा, कृतकर्मांचा कृतान्त काळ चढला अखेर तुझ्या छातीवर.

**कमल०**——(मिठी मारुन) महाराज–महाराज, कसला हा दंगा अुसळलाय ? माझं काळीज धडधडू लागलंय.

**अुदय०**——जुलमी सत्तेला गाडून टाकण्यासाठी, पाप्यांचा नायनाट करणारा काळ आता खवळला आहे.

**कमल०**——म्हंजे ? काय होणार आता ?

**अुदय०**——होत्याचं नव्हतं होणार, अशक्य शक्य होणार आणि पापी राक्षसांचा विध्वंस होणार.

**कमल०**——हे सारं कोण करणार ?

**अुदय०**——माणसांच्या रक्ताच्या पुरात, पोलादी समशेरीची लेखणी बुचकळून, अत्याचारी जुलमी सत्तेच्या विध्वंसनाचा अितिहास, कृतान्त काळ आता लिहू लागला आहे.

**कमल०**——आता तो शांत नाही का होणार ?

**अुदय०**——आता त्याची लेखणी धरणार कोण ? तो पहा–पहा–काळाचा थैथयाट. धाबरू नकोस. नीट डोळे अुघडे ठेवून अेकलिंगेश्वराचं हे ताण्डव नृत्य पहा.

**कमल०**——छे छे. मला चक्कर येत आहे महाराज.

**अुदय०**——तुझ्या बापाच्या जुलमी सत्तेचं भूत, किल्ल्याच्या तटबंदीला तडाड् अुखडून, ते पहा–ते पहा, गडावर कसा नंगा नाच घालतयं ते. प्रेतांच्या राशी तुडवीत, तुझ्या बापाच्या पाठलागासाठी, साऱ्या चितोडला आता ते पिळून मळून काढील.

**कमल०**——महाराज, पाया पडते, पदर पसरते. माझ्या शुद्ध प्रेमासाठी तरी माझ्या बाबाना या भुताटकीच्या वावटळीतनं वाचवा हो. चला, मी आपल्या या बेड्या तोडून आपल्याला मुक्त करते. (तसे करते.) चला गडे. आपण दोघेजण बाबांच्या संरक्षणासाठी जाऊ या.

**अुदय०**——या अेका गोष्टीशिवाय तुझ्यासाठी मी वाटेल ते करायला तयार आहे. पण त्या पण त्या पापाधमाचा बचाव करायला प्रत्यक्ष परमेश्वर जरी आता अवतरला, तरी त्यालासुद्धा या खवळलेल्या भुतांच्या भुताटकीपुढं आता हातच टेकले पाहिजेत. काळचक्राच्या या तुफानी दंगलीत कमल, तुझ्या माझ्या प्रेमाची न् प्राणांची जरी आहुती पडली तरी बेहत्तर, पण रूपमतीच्या निरीला हात घालू पहाणारा बनबीर बिलकूल जिवंत रहाता कामा नये. रहाणारच नाही तो.

(आत :—हमीराची गर्जना०—राजवाड्याचा चिरा न् चिरा अुखडून बनबिराला हुडकून काढा. ससेहोलपट करा.)

**कमल०**——काय अैकते मी हे ? माझ्या बाबांची ससेहोलपट ? राणाजी, बाबांच्या बचावासाठी मी अेकटी तरी जाऊ का ?

**अुदय०**——तुला कुणी अटकाव केला आहे ? खुशाल जा. बनबिराच्या बचावासाठी, त्याच्या कन्येनं खुशाला आपली सारी पुण्यायी खर्ची घालावी.

**कमल०**——(स्व.) अिकडं आड, तिकडं विहीर झालंय मला. बापाच्या जिवासाठी धावू, का जिवाच्या देवासाठी अिथं राहू ? (अु०) महाराज, माझा प्राण या पायांशी घुटमळत ठेवून, कमलची नुसती कुडी पित्याच्या बचावासाठी जात आहे. जाऊ ना मी ? जाऊ ना ? (अुदयसिंह तटस्थ. ती जाते.)

(कमला जात असतानाच, समोरून रक्ताने आंग न् तलवार माखलेला हमीर त्वेषाने येतो.)

**हमीर०**——अे छोरी. खडी रहो. थांब. कुठं आहे तो सैतान बनबीर ?

**कमल०**——मला नाही माहीत कोण तुमचा सैतान आहे तो. चल हो बाजूला. खबरदार मला अडवशील तर. बनबीर बिनबीर मी नाही ओळखत. मी माझ्या वडलांच्या बचावासाठी चाललेय. चल हो बाजूला. रानवट लाण्डगे मेले. (जाते.)

**हमीर०**——नाअीक, या पोरीच्या पाळतीवर अेक तुकडी रवाना करा, म्हंजे त्या हरामखोराचा बिनचूक ठावठिकाणा लागेल. जा लवकर. ..... पण राणा अुदयसिंह कुठं आहे. राणाजी... राणाजी....

**अुदय०**——कोण ? हमीर ? हा मी अिथं आहे.

**हमीर०**——(प्रणाम करतो.) महाराज, श्री अेकलिंगजीच्या कृपेनं आणि आपल्या पायांच्या पुण्याअीनं, आमची समशेर आतापर्यंत बिनधोक यशवंत झाली आहे.

**अुदय०**——त्याचं सारं श्रेय तुम्हा दिल्दार दोस्ताना आहे. माझ्या हातूनं काय झालं ? काहीच नाही.

**हमीर०**——महाराजानी असं बोलू नये. हा सारा याच पायांच्या पुण्याअीचा प्रताप.

**अुदय०**——रणकंदनाची धुमाळी आता कोणत्या बाजूला चालली आहे ? जयपाळ कुठं आहे ?

**हमीर०**——जयपाळनं समशेरची न् धाडसाची आज शिकस्त केली. दक्षिण बुरुजाचा सुरुंग त्यानं जातीनं शिलगावला. तटबंदीच्या धडाड कोसळणीखालीच तो गारद व्हायचा, पण बिजलीसारखा निसटून बचावला. बोल बोलता गडावरच्या बनबिरी सैन्याच्या छावण्या अेकाच हल्ल्यात खतम करून, जयपाळने आता खास राजवाड्यावर मोर्चा चढवलाय. बालेकिल्ल्यावर महाराजांचं प्राचीन सूर्यांकित निशाण फडकवून, आपला शोध करीत मी अिकडं आलो.

**अुदय०**——बनबीर ठार झाला नाही, तोंवर या निशाणाचं काय महत्व हमीर. गडाखाली अुत्तर बाजूला परमारांच्या सैन्याचा तळ येअून पडला आहे. तो बनबिराच्या मदतीला धावला तर ?

**हमीर०**——त्याची नको सरकारला काळजी. परमारानीच आम्हाला तोफांची न् दारूगोळ्यांची भरपूर मदत दिल्यामुळंच, आजचा मुकाबला अितक्या सफाअिनं पार पाडता आला. (गुंडाळून आणलेली तलवार नजर करीत.) थोरल्या महाराजांची ही आवडती यशवंति, आपल्या हाती देण्यासाठी जयपाळानं मुद्दाम पाठवली आहे, तिचा स्वीकार व्हावा.

**अुदय०**——(३ वेळा प्रणाम आणि चुंबन घेअून, सपकन् पाते बाहेर काढतो.) आहा. यशवंति. दिल्ली माळव्याच्या चांद ताऱ्याला तब्बल आठरा वेळा नेस्तनाबूद करणाऱ्या संगराजाची ही यशवंति. आता माझ्या हातात आली आहे. दोस्त हो, चला आता. चोहीकडून निकराचा हल्ला चढवून, या महिषासुर-मर्दिनीला त्या बनबीर रेड्याच्या रक्तप्राशनानं अितकी बेहद्द बेताल बनवू का हिच्या ताण्डव नृत्याच्या दणदणाटानं, जगातल्या अत्याचारी मनोवृत्तींना कायमची दहशत बसली पाहिजे. बोला श्री अेकलिंगजीकी जय.

(गर्जना करीत सारे जातात.)

(भेदरलेला कर्णपाल धापा टाकीत येतो.)

**कर्ण०**---(स्व०) अरेच्चा, अिकडंहि धामधूम.. आणि तिकडं ? तिकडं पण धामधूमच. दंगल आग न् रक्तपात यानी सारा गडच खायला अुठलाय. आता मी जाअू कुठं, धावू कुठं, लपू कुठं न् छपू तरी कुठं ? मोका तर मोठा बाका आला. (आत फैरी झडतात.) अरे बापरे. या धडेबाजीनं माझ्या काळजाचा धड हादरून हादरून तुटणारसा वाटतो. कचाकच कत्तल परवडली, पण ही बंदुका तोफांची धडाड् धोम् धडेबाजी मला बिलकुल पसंत नाही. हो. पण माझ्या पसंतीला आता कोण धूप घालणार.... अरे बापरे, ही बंडाळीची वावटळ अिकडंच रेटीत येअू लागली. (आतः- राणा अुदयसिंहाचा जयजयकार अशा गर्जना.) म्हणजे ? बनबीर बुवांचा अेळकोट अुडाला वाटतं ?.... आं. बालेकिल्ल्यावर अुदयसिंहाचं निशाणसुद्धा चढलं ? खतम् मामला. आली रे आली, ही लगट अिकडंच आली. आणि सगळ्यांच्या पुढं थैमान घालणारा.... हा शेन्द-या सैतान कोण ? अरे हा तर जयपाळ. राण्डलेक अखेर बनबिरावरच अुलटला आं ? आपणहि आता केली पाहिजे पगडीपालट.

(आतः- जय०- धरा पकडा, बनबीर पक्षाचा सापडेल तो आसामी बेलाशक ठार करीत चला.)

**कर्ण०**---(स्व.) आता माझा पक्ष कोणता ? बनबिराचे पुरते वाटोळे झाल्याची बातमी नाही. आणि अुदयसिंहाच्या अुदयाची तरी हमी कोण देणार ? लढाअीत कुणाचं पारडं कसं वर खाली होअील, कुणी सांगावं ? आपण आपलं पागडं आता नीट सांभाळलं पाहिजं खरं. शीर सलामत तर पगडी पचास. (बार होतात.) आलाच की हा लोण्ढा अिकडं. जीव बचावण्यासाठी पागडी-पालटापूर्वी जागेची थारेपालट केली पाहिजे. (पळून जातो.)

(जयपाळ नि सैनिक त्वेषाने येतात.)

**जयपाळ०**---पकडा, पकडा त्या हरामखोराला. बनबिराच्या प्रत्येक नीच करणीला हाच थेरडा चिथावणी देत असे. याचं नरडं दाबल्याशिवाय बनबिराचा पत्ता लागायचा नाही.

(शिपायी कर्णपालाली पकडून आणतात.)

**जय०**---लाळघोट्या थेरड्या, पळून जातोस काय ?

**कर्ण०**---पळून जाणं हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे. कारण मी म्हातारा आहे. तरणा नाही.

**जय०**---कुठं आहे तुझा पोषिंदा बनबीर ? काळाचा काळ म्हणून केवढा घमेंड. कुठं बसला आता तोंड काळं करून ? बोल, जबाब देतोस, का छाटू गर्दन ?

**कर्ण०**—–बनबीर माझ्या गर्दनीत थोडाच लपून बसला आहे ? या धामधुमीत माझा मीच बेपत्ता. बनबिराचा पत्ता मला काय माहीत ? जयपाळ, अरे मी तुझ्या बापासारखा अन् माझी अशी विटंबना ?

**जय०**—–चूप रहा बेशरम. पलिते पेटवून अुभा जाळल्याशिवाय तूं खरं सांगणार नाहीस.

**कर्ण०**—–जयपाळ, अे जयपाळ, अरे माझे असे हाल काय रे करतोस ? शरण आहे मी. शरण आला त्याला मरण देवू नये, असे शास्त्रात लिहलंय.

**जय०**—–हे शस्त्र आत्ताचे शास्त्र आहे. खरा जबाब देशील तरच जिवानिशी सुटशील.

**कर्ण०**—–अरे आपण अेका बैठकीतले दोस्त.

**जय०**—–तुझ्या दोस्तीची पर्वा त्या अुन्मत्त बनबिराला. आम्हाला नाही. पेटवा रे पलिते... अुडवा याची पगडी... (शिपायी तसे करतात.) करा तिचा पलिता आणि पेटवा याला.

**कर्ण०**—–(शिपायाना) अरे अे माणसानो, माणसाकडं तरी पहाल का नाही ? माझी पगडी अुडवलीत ? हरकत नाही. शीर सलामत तर पगड्या पन्नास. बनबिराची पगडी गेली तर अुदयसिंहाची चढवीन डोक्यावर. आहे काय अितकं त्यात ?

**जय०**—–तुझ्या बेशरमपणाला काही सीमा आहे का रे थेरड्या ?

**कर्ण०**—–अरे बाबा, म्हातारपण हाच मुळी बेशरमपणाचा पक्का दाखला.

**जय०**—–बस कर तुझी वटवट. बनबीर कुठं आहे ते सांग, नाहीतर, हो मरणाला तयार,

**कर्ण०**—–म्हातारी माणसं मरणाला तयारच असतात जयपाळ. पण.... पण हे कन्दुरीचं मरण रे कशाला देतोस मला ?

**जय०**—–बनबीर रेड्याचा बळी घेण्यापूर्वी, तुझ्यासारखे लाळघोटे बोकड छाटून साफ केलेच पाहिजेत.

**कर्ण०**—–मला पांढरी दाढी असली म्हणून मी बोकड काय रे जयपाळ ?

**जय०**—–बदमाषाप्रमाणं मरायचं नसेल, तर हो सामन्याला तयार. सोडा रे याला. अुपस तुझी तलवार.

**कर्ण०**---तलवार अुपसू ? कशाला ? अरे बाबा, ही माझी शोभेची तलवार आहे. चार पिढ्यात अेकदासुद्धा चुकून कधि बाहेर काढली नाही. म्यानात पातं आहे का नुसती मूठच बसवली आहे, कुणाला माहीत ?

**जय०**---क्षत्रिय म्हणवतोस आणि....

**कर्ण०**---म्हणायला काय ? हवा तो लुंगासुंगा क्षत्रीय म्हणून मिरवतो, पण क्षत्रियाचं कर्म थोडंच साधणार त्याला ?

**जय०**---तुझ्यापाशी तलवार नसेल, तर ही घे. (शिपायाची तलवार देतो.)

**कर्ण०**---छेछे छेछे. हे पाप मला कशाला ? मी आहे श्रीकृष्णाच्या धाटणीचा. न धरी शस्त्र करीं मी...

**जय०**---मग काय ? गोष्टी सांगेन युक्तिच्या चार, अेवढीच अक्कल.

**कर्ण०**---वकिलाचं भाण्डवल अेवढंच.

**जय०**---माणुसकीला मुकलेल्या क्रियानष्ट कोल्ह्या, राणी रूपमति तुला मुलीसारखी. अेका वेळची तुझी चक्रवर्तिनी स्वामिनी. तिच्यावर बलात्कार करण्याचा सल्ला बनबिराला, म्हाताऱ्या डुकरा तूंच दिलास ना ?

**कर्ण०**---मी दिला ? जयपाळ, अरे काय तोंड आहे म्हणून हवे ते बोलतोस ? अुन्मत्त सत्ताधाऱ्याना असल्या पापी गोष्टी काय सुचवाव्या लागतात ? मी फक्त बनबिराच्या हो ला हो ठोकीत होतो. वारा वाहील तशी शिडं फडफडवूनच समर्थांना नेहमी प्रसन्न ठेवण्यातच राजनिष्ठेचा धर्म असतो.

**जय०**---आग लाव तुझ्या राजनिष्ठेच्या धर्माला. नराधमा, चितोडच्या चार रियासतींचे तूं कोळसे केलेस. पोट जाळण्यासाठी, हव्या त्या जबरदस्ताची पायताणं डोओवर नाचवून, देश धर्मावर निखारे ठेवलेस.

**कर्ण०**---घे बाबा. हवं ते बोलून घे. काळ फिरला का नांगराचा फाळ पण फिरतो.

**जय०**---(शिपायाना) जा. या देशद्रोही कुतरड्याला सध्या काटेरी पिंजऱ्यात कोंडून ठेवा.

**कर्ण०**---अे अे अे जयपाळ, अरे मला तलवारीनं छाटून टाक, पण काटेरी पिंजरा दाखवू नकोस रे. माझ्या पांढऱ्या केसांची तरी तुला दया येअू दे रे.

**जय०**---तुझ्या अन्नदात्या बनबिराला मार आता हाका. तो तुझा राजा, न् तूं त्याचा राजनिष्ठ खुषमस्कऱ्या.

**कर्ण०**---अरे बाबा, मला बनबीरच काय चाटायचा आहे ? मी आपला समर्थाचा श्वान. कालपर्यन्त दिला सगळ्यानी मान, आज सापडली तुझ्या हातांत माझी मान. कालपर्यन्त बनबीर जबरदस्त होता, त्याचा जयजयकार केला. आज अुदयसिंह जबरदस्त. त्याचा जयजयकार करीन. आत्ता करतो. राणा अुदयसिंहकी जय.

(आतः--राणा अुदयसिंहकी जय. हमीर०--तो पहा, हरामखोर बनबीर, अुत्तरेकडच्या बुरुजावर सैन्याची जमवाजमव करीत आहे. चला, अेकदम तिकडे मोर्चा फिरवा.)

**जय०**---(शिपायांना) जा याला काटेरी पिंज-यात डांबून, अेकदम अुत्तर बुरुजाच्या हल्ल्यात सामील व्हा. (आत शिंगे वाजवतात.) (जातो.)

**कर्ण०**---(शिपायी नेत असताना) आलिया भोगासी असावे सादर.

(सर्व जातात.)

... ... ... ...

(निराशेने संतापलेला बनबीर येतो.)

**बनबीर०**---निमकहराम. अेकजात सारी दुनिया निमकहराम. जिकडे नजर टाकावी तिकडे विश्वासघात... घरभेद... फितुरी. ठीक आहे. माझे सैनिक फितवले काय ? ठीक आहे. जा. असल्या भाडोत्री शिपुरड्यांच्या पाठबळावर माझा राजकिरीट सावरून धरण्याची माझी मुळीच अिच्छा नाही. मनगटाच्या मगदुरानं मिळविलेली माझी राज्यसत्ता, त्याच मनगटाच्या महशूर मर्दाअीवर, मरणाने मला मिठी मारीतोंवर, मी खालसा होअू देणार नाही. सारी दुनियाच जिथं मरणासाठी आलेली, तिथं, तब्बल सहा वर्षे अुभा हिन्दुस्थान धाकाच्या टाचेखाली ठेचून ठेवणारा हा काळाचा काळ बनबीर, प्रतिस्पर्ध्यांच्या प्रचंड सेना-सागराशी प्रतिकाराची मुसण्डी मारताना, रसातळाला गेला तर त्यात आश्चर्य करण्यासारखं आहेच काय मुळी ? माझ्या सत्तेच्या मदानंच, सैनिकांना नि नागरिकांना मदिरा प्राशनाची शिफारस केल्यामुळेच, या काळतोंड्या कटबाजांच्या कारवाअीची कराल करवाल माझ्या नरड्याला भिडली. मदिरा.... दारू.... अवदसे, तुझ्या मोहक बहिरंगाला न् रुचकर धुटक्याला भाळून आजन्म मी तुझा सत्कार केला. जुगा-याच्या माथेफिरूपणा प्रमाणं, मी तुझा अंकित झालो. तुझ्या प्राशनाच्या बेगुमान धुंदीनं बेहोष होअून, रणांगणावर माझ्या समशेरीचं पाणी आजवर बिनचूक चमकल्यामुळे, राजकारणाची यशवन्ती म्हणून मी तुझी निस्सीम भक्ति केली. पण अखेर.... मोहक चमकीच्या दाहक कवटाळणी, वैभवाच्या शिखरावर माझं अखेरचं पाअूल पडण्याच्या अैन क्षणाला केवढा तूं माझा कडेलोट केलास ? ठीक आहे. राजकारणी धोरणाचा डाव दारूच्या धोटानं हुकवला. बाजू अंगावर आली. आता माधार ? जान गेली तरी कुछ परवा नही. जळत्या सत्तेच्या डोम्बाळ्यात मेरू पर्वतासारखा ताठ अुभा राहून, माझ्या सिंहासनाची न् राजदण्डाची राखरांगोळी

अुधड्या डोळ्यांनी पाहीन, पण काळाचा काळ म्हणून दशदिग्भाग दणाणून सोडणाऱ्या बनबिराच्या छातीच्या कोट, राज्यक्रांतीच्या धरणीकंपात रेसभर हादरला, असल्या बदलौकीकाचा बखरीतला चुटपुटता अुल्लेखसुद्धा या बनबीर बहाद्दराला परवडणार नाही.

(आतः—राणा अुदयसिंहाचा जयजयकार, या गर्जना.)

(सैनिकांसह जयपाळ येतो.)

**जयपाळ०**——याच बाजूनं तो हरामखोर पळाला.

**बनबीर०**——कोण ? जयपाळ ? विश्वासघातक्या, सापडलास शेवटी माझ्या तडाक्यात हरामखोरा.

**जय०**——कोण हरामखोर ? बनबीर हरामखोर, खुनी, दगाबाज. कुणाला सांगतोस हरामखोरीची पुराणं ?

**बन०**——अुलट्या काळजाच्या वटवाघळा, माझं अन्न खाअून माझ्यावर अुलटलास ?

**जय०**——कुणाचं अन्न ? तुझ्या बापाचं ? बंद कर चोरा तुझी ही धमेंडखोर दमधाटी. चितोडच्या मिठाला बिनचूक जागलेला जयपाळ, हा पहा, तुझ्या तोंडावर तुझा धिःकार करीत आहे. चल हो सामन्याला तयार.

**बन०**——तुझ्याशी सामना ? बनबिराशी सामन्याची मगरूर भाषा करण्यापूर्वी चिलटा तुझ्या नालायकीचा विचार कर. माझ्या हुजऱ्याची ज्याला खेटरानी तुडवावा, त्याला माझ्या सामन्याचा मान ? चल हट् कुतरड्या.

**जय०**——तुझे दरबारी, हुजरे नि खुषामत्ये.... तुझ्या पुढच्या तैनातीसाठी केव्हाच झाले रवाना नरकाला. बालेकिल्ल्यावर फडफडणाऱ्या त्या केशरिया निशाणावर नजर टाक.

**बन०**——त्या दिडदमडीच्या फडक्याचा दिमाख तुला. असली रंगीबेरंगी फडकी फडफडवून, राज्यप्राप्तीचे मुकाबले फडशा पडते, तर गावोगावचे परीट नि रंगारी धरोधर दिल्लीची पातशाही निर्माण करते. दगडमातीच्या बुरुजावर झेण्डे नाचवणाऱ्या नामर्दांनो, बनबिराच्या छातीचा कोट फुटेपर्यन्त, मेवाडच्या मातीच्या कणावर सत्ता सांगायची कृतान्त काळाची छाती नाही, तर तुम्हा माकडाना रे कोण विचारतो ?

(आतः—राणा अुदयसिंहाचा जयजयकार.)

**जय०**---बनबीर, तुझ्या काळाची ही काळगर्जना नीट अैक. तुझ्या अगणित पापांनी अुठवलेल्या पिशाच्चांच्या या वावटळीत, कुत्र्याच्या मोतानं मरण्यापेक्षा, अुदयसिंहाच्या फाटक्या पायतणाच्या किंमतीच्या या त्याच्या सेवकाच्या हातूनं, धारातीर्थी मरणाचं पुण्य तरी पदरात पाडून घे.

**बन०**---असल्या भूत वेताळ पिशाच्चांच्या वावटळी पैजाराखाली ठेवायला हा बनबीर खडा तयार आहे. (आतः-राणा अुदयसिंहाचा जयजयकार.)

**बन०**---(तुच्छतेने खोखो हासत) माझ्या हुकमाने गर्दनछाट झालेल्या त्या पोरट्याचा जयजयकार ? (बिकट हास्याचा खोकाट करतो.)

(हमीर सैनिकांसह येअून बनबिराला गराडा घालतो. जयजयकार.)

**बन०**---कुठंय तुमचा अुदयसिंह, तर त्याचा अेवढा मोठा जयजयकार करता ? भ्रमिष्ट माकडानं, माझ्या हुकमानं गर्दनछाट होऊन तो केव्हाच झाला नरकाच्या वाटेला रवाना. (विकट हास्य.)

(अुदयसिंह येतो.)

**अुदय०**---अुदयसिंह गर्दनछाट ? अुदयसिंह गर्दनछाट झाला, तर बनबिराची गर्दनछाट कत्तल कोण करणार ?

**बन०**---(आपादमस्तक न्याहाळीत.) आस्सं. ठीक. अखेर तरी तूं माझ्या सामन्याला आलास.

**अुदय०**---विक्रमाजिताच्या खुनाचा सूड त्याच्या पुत्रानंच घेतला पाहिजे. अुघडअुघड सामना मर्दानं द्यावा नि तुझ्यासारख्या भेकड पापाधम धुबडानी मारेकऱ्याच्या नथणीतूनं तीर मारावा.

**बन०**---तोंडच्या वल्गना आता बंद कर.

**अुदय०**---ठीक. चल हो सामन्याला तयार. आजवरच्या सत्तेच्या न् सामर्थ्याच्या वल्गना नीट कसाला लावून घे. हा घे पहिला मुजरा.

**बन०**---तूं अेकटा माझ्याशी लढणार, का या सगळ्या माकडांना घेवून सामना देणार ? दोनीही गोष्टींना माझी तयारी आहे.

**अुदय०**---तुझ्यासारख्या चिलटाला चिरडायला हे सैनिक कशाला? चला, व्हा रे बाजूला. (सैनिक दूर होतात.) बनवीर, सैतानी सत्तेचा सत्यानाश होअून, न्यायी परमेश्वराचा अंमला आता चालू झाला आहे.

**बन०**---जहान्नम्मे गया परमेसर. ही घे माझी अुलट सलामी.

(जयपाळ, हमीर, सैनिक, श्री अेकलिंगेश्वरकी जय गर्जना करतात.)

(बनबीर आणि अुदयसिंह यांची ढाल तलवारीची लढत. जयजयकाराच्या गर्जना. रणवाद्यांचा कडकडाट. अेकमेकांचे सफाईदार हात पाहून, वाहवा, शाब्बास, जीते रहो पठ्ठे, असे बन० आणि अुदय० अेकमेकाना म्हणतात. दोघेही अवसानाने लढत असताना ---)

**अअुदय०**---बनबीर, देख ले. अुदयसिंहकी आखरी करामात. (वार जिव्हारी लागून बनबीर खाली कोसळतो.)

**बन०**---हा.... आखरी करामात का...री...ग...र. (निश्चळ पडतो.)

**अुदय०**---(त्याला तपासून) (मुजरा करतो.) खलास. दोस्तहो, अत्याचारी जुलूमशाहीचं अुच्चाटन होअून, मेवाडचा अुध्दार झाला. जा. अेकदम लढाअीच्या तहकुबीची नौबद ठोका. गडावर ठिकठिकाणी होळ्या पेटवून, चितोड स्वतंत्र झाल्याचा डंका मेवाडवर जाहीर करा.

**सर्वजण०**---चितोडेश्वर राणा अुदयसिंहाचा जयजयकार.

**बन०**---(सावध होवून अुठण्याची धडपड करतो.) माझा दुस्मन् चितोडेश्वर?

**सर्वजण०**---अरेच्चा, हा साप अजून जिवंत आहे.

**बनबीर०**---(कण्हत वळवळत) नाही नाही...माझा प्राण जाअीतोंवर चितोडचा अधिपती हा बनबीर आहे.

**अुदय०**---(त्याच्या छातीवर पाय देवून) राक्षसा, तुला अजूनहि लढायची खुमखुम आहे ?

**बन०**---बेषक्. क्यों नहि ? बचेंगे तो औरभि लढेंगे.

**अुदय०**---मरणाच्या दारात पाअूल ठेवणाऱ्या पामरा, मारताना तरी पश्चाताप कर.... पतित पावन परमेश्वर तुझ्या पातकांची क्षमा करील.

**बन०**---पश्चात्ताप ? पश्चात्ताप नामर्दांनी करावा. नाही, नाही, दुसमन् अुदयसिंह, दे दे माझी तलवार दे परत. अन् रहा सामन्याला अुभा. पण तलवार कशाला ? (कमरेचा खंजीर काढतो.) तुझ्या रक्तानं माखलेल्या हातानी रूपमतीची निरी हासडल्याशिवाय....

**अुदय०**---(खंजीर हिसकावून त्याच्या छातीत खुपसतो.) हा घे रूपमतीच्या निरीचा हासडा.

**बनबीर०**---(बनबीर झिंदाबाद... बनबीर झिंदाबा....द.. (मरतो.)

**जयपाळ०**---दुष्टांचं मरण त्यांच्या दुष्टपणाच्या हत्यारातच असतं म्हणतात ते काही खोटं नाही. यशवंतीच्या हातूनं मर्दाचं मरण पत्करण्यापेक्षा, या नराधमाचं मरण त्याच्या त्या खुनी खंजिरातच होतं.

**अुदय०**——(दोस्तहो, तुमच्या सगळ्यांच्या श्रमाचं आज सार्थक झालं.

**हमीर०**——ही सगळी प्रभूच्या पायांची पुण्यायी.

**जयपाळ०**——राणाजींची प्रतिज्ञा यशवंत झाली.... पण हे काय ? महाराज, आपण असे अेकाकी खिन्न कां ?

**अुदय०**——दोस्तहो, बनबिराला ठार मारून मी माझी प्रतिज्ञा पुरी केली खरी, पण——

**सर्वजण०**——पण काय ?

**अुदय०**——निदान कमलदेवीसाठी तरी आजचा हा प्रसंग.....

(शोकाकुल कमलादेवी येते.)

**कमलदेवी०**——टाळता आला असता.... तर नसतो काहो बरं झालं. (बनबिराच्या प्रेताला कवटाळीत) बाबा बाबा, आता या अफाट जगात या अभागी कमलला कुणाचा हो आधार न् आसरा.

**जय०**——(तिला सावरीत) राजकन्ये, हे भवितव्य ठरलेलंच होतं, तिथं कुणाचा काय अिलाज ? सत्ताधाऱ्यांची जुलूम जबरदस्ती कडेलोटाला गेली का त्यांची कण्ठस्नानाने अशीच अखेर करावी लागते. देवीनी पितृप्रेमाची मात्र कमाल शिकस्त केली. पोटची पोर कुणावर अितकी भक्ति करणार नाही. देवीनी भविष्याची काळजी करू नये.

**कमल०**——(अुदयला) विजयी महाराज, मी आपली गुलाम बटिक बनले. अखेर आपणच आपला बोल खरा केलात ना ? आता कशाला हे अश्रू न् आसवे ?

**जय०**——देवी, बनबीर आपला काही जन्मदाता पिता नव्हता.

**कमल०**——बाप-लेकाच्या नि मायलेकीच्या प्रेमासाठी जन्माची पुण्यायी लागतेच, असा काही नियम नाही. माझे बाबा कित्ति प्रेमळ होते. अेका शब्दानं त्यानी कधि मला दुखवलं नाही, का माझा शब्द खाली पडू दिला नाही.

**अुदय०**——कमलदेवी बनबिराची राजकन्या नव्हेच तर ?

**कमल०**——खरंच. भलत्याच तरुणीला प्रेमाचं आश्वासन देवून, महाराज, आपण आपल्या कुलवंतपणाला कलंक लावलात.

**जय०**——(चितोडाधिपतीकडून अशी चूक कधीच झालेली नाही. कमलादेवी, तुझा जन्मदाता पिता... हा पहा.... पराक्रमी हमीर अिथंच आहे.

**कमल०**——लढाअीच्या धामधुमीत बायको मुलीला नशिबाच्या वाऱ्यावर झुगारून त्या धुमाळीत जो गडप झाला, त्याला काय बाप म्हणायचं ? माझे बाबा बनबीरच. बाबा....

**जय०**——कमल, तुझ्या प्रेमानंच चितोडला आज हा भाग्याचा दिवस दिसला. तूं आपल्या प्रेमानंच नाही का महाराणी मातोश्रींचा बंदिवास सुखाचा केलास ? हमिराने——तुझ्या पित्याने——धरादाराचा मोह सोडून, वनवास पत्करला नसता, आणि राणाजींच्या पाठीवर सावलीसारखा रानोमाळ भटकला नसता, तर चितोडला अुदयसिंहाचे दर्शन तरी झाले असते काय ? आणि तूं तर राजकुमाराला आजच्या अेकाच रात्रीत या काळाच्या जबड्यातूनं दोनदा प्राणदान दिलंस.

**कमल०**——विजयी महाराज, बनबिराच्या छातीचा ठाव घेणारा तो खंजीर क्षणभर माझ्या हाती द्याल काय ?

**जय०**——तुझ्या हाती नाही. माझ्या हाती. महाराज, आणा पाहू तो खंजीर अिकड. (घेतो.) वेडे पोरी, तूं तर आम्हा सगळ्यांची यशवन्ती. तुला पाहिलं म्हंजे आम्हा सगळ्यांना पन्नाची आठवण होते. तूंच जर राजकुमारावर आपल्या प्रेमाची ढाल आढवी धरली नसतीस, तर आजचा हा चितोड-मुक्तीचा दिवस अुगवलाच नसता. चल. पूस ती आसवं. ... राणाजी, या असे पुढे.... कमलदेवी. तूं पण ये. महाराणी रूपमतीच्या आज्ञेप्रमाणे, या खंजिराला माखलेला बनबिराच्या रक्ताचा टिळा मी तुमच्या दोघांच्या कपाळी लावून, मेवाडाधीश्वर महाराज नि महाराणी म्हणून आपला हाच राज्याभिषेक करीत आहे.

(सगळीकडून गर्जना :——चितोडेश्वर राणा अुदयसिंहाचा जयजयकार, चितोडसम्राज्ञी कमलदेवीचा जयजयकार. शिंगे, तुताऱ्या, नौबदी वाजवतात.)

**हमीर०**——हा पहा सूर्यनारायण अुदयाचलावर आला.

**अुदय०**——अुगवत्या सूर्यनारायणाची आजच्या राज्यक्रांतीवर अखंड प्रकाशाची कृपा असो.

(जयजयकारात नाटकाची समाप्ती.)

००० ००० ०००

ता. २७ जुलअी १९५३.

**अंक पाचवा समाप्त.**

# खरा ब्राम्हण

नवी सुधारलेली रंगावृत्ति.

सन १९४६

— लेखक —

केशव सीताराम ठाकरे.

[प्रबोधनकार]

महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४

# अल्प निवेदन

**खरा ब्राम्हण** नाटिकेला प्रस्तावनेची किंवा जाहिरातीची आता काही जरूरच उरलेली नाही. महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनाच्या इतिहासात या नाटिकेने निर्माण केलेला खळबळीचा एक छोटेखानी अध्याय सर्वश्रुत नि सर्वपरिचितच आहे.

श्रीयुत नन्दु खोटे यांच्या **रेडियो स्टार्स** नाट्यसंधाने ता. १२ एप्रिल १९३३ बुधवारी रात्री १० वाजता, मुंबई येथील बॉम्बे थियेटरात, या नाटिकेचा पहिला आणि लागोपाठ दररोज **७५ प्रयोग** केले. पुढे पुणे, सांगली, कोल्हापूर, रत्नागिरी वगैरे महाराष्ट्रातल्या अनेक ठिकाणी रेडियो स्टार्सनी या नाटिकेचे ५० च्यावर प्रयोग केले. शिवाय, गावोगाव अनेक हौशी नटसंघ गेली १२ वर्षे सालोसाल कितीतरी प्रयोग अखंड करीतच असतात.

पुस्तकाची पहिली पाचहजारी आवृत्ति आता मिळेनाशी झाल्यामुळे, ही दुसरी **रंगावृत्ति** छापली आहे. रंगभूमीवर प्रत्यक्ष प्रयोग करताना या रंगावृत्तीचा योग्य तो उपयोग व्हावा, अशी आता मांडणी केली आहे.

नर्तिकेच्या पात्राची पुष्कळांना अडचण पडते. म्हणून हिरकणीच्या प्रवेशाऐवजी, रंगभूमीवर वठवून पाहिलेले दोन बदलीप्रवेश पुरवणि भागात मुद्दाम छापले आहेत. गावबा नि एकनाथ या पात्रांना दोन तीन नवीन पदे घातली आहेत. केवळ गद्यातच नाट्यप्रयोग करणारांनी पदे गाळली तरी रसहानी कोठेही होणार नाही, असा अनुभव घेतलेला आहे.

माझे स्नेही **श्रीयुत नन्दु खोटे** यांनी नुकतीच आपल्या रेडियो स्टार्स नाट्यसंधाची पुनर्घटना केली आणि महाराष्ट्र ग्रंथ-भाण्डाराचे मालक **श्रीयुत शंकर वामन कुळकर्णी** यांनी शुद्ध आपुलकीच्या भावनेने प्रकाशनाचे कार्य पत्करले, म्हणूनच ही रंगावृत्ति रसिकांच्या हाती द्यायचा मला योग लाभला.

जोशी बिल्डिंग,<br>
रानडे रोड एक्सटेन्शन<br>
मुंबई नं. २८<br>
रामनवमी ता. १० एप्रिल १९४६

नाट्यरसिकांचा कृपाकांक्षी<br>
**केशव सीताराम ठाकरे.**

या नाटिकेसंबंधी सर्व प्रकारचे हक्क माझ्या स्वाधीन आहेत. प्रयोग करण्यापूर्वी नाट्यसंधानी माझी लेखी परवानगी मिळविणे अगत्याचे आहे.

**—के. सी. ठाकरे**

# खरा ब्राम्हण नाटिका.



**अंक १ ला** **प्रवेश १ ला**

[ पैठण शहरातील श्रीराम–मन्दिरात रामनवमीचा उत्सव. स्त्रीपुरुष व मुले देवळात जात आहेत. बाहेर महाद्वारावर विठू महार व त्याची तरूण विधवा सून सीता उभी आहेत. आत नान्दी चालू आहे. ]

नान्दी. (राग––पिलु, ताल––त्रिताल.)

**उधळि गुलाल यशाचा ॥ खुलविशि ।**
**जनमना सतत नवरस–सिंचनिं ॥ उधळि. ॥ धृ ॥**
**मानव–तनुच्या रंगभूवरीं ।**
**हृदयाचे नव पडदे वितरी ।**
**रंगवुनी त्या विविध विकारीं ।**
**सुत्रधार आत्मा नवलाचा । उधळि. ॥१॥**
**तुडवि विषम कल्पना । बुडवि विफल जल्पना ।**
**फुलवि सदय भावना । खुलवि रसिक सन्मना ॥**
**स्फुरवित ममता । पसरित समता ।**
**रमाकान्त सेवक रसिकांचा । उधळि. ॥२॥**

[ नान्दी पुरी होताच राम–मन्दिरात बार होतात, " त्रिलोक प्रतिपालक श्रीरामचन्द्रजीकी जय " असा त्रिवार जयघोष होतो. गुलाल उधळला जातो. टाळ्यांचा कडकडाट. ]

**विठू :** सीताबाय, पोरी, श्रीरामरायाचा जन्म झाला बरं. (देवळाला नमस्कार करतो.)

**सीता :** (नमस्कार करते.) मामाजी, आज कित्ती कित्ती युगं लोटलीं कोण जाणं, दरसाऽल देवाच्या रामनवमीचा उत्सव होतो. पण दर खेपेला वाटतं, आजच–आत्ताच–रामराय जन्माला आले. असं काहो वाटतं आपल्याला, मामाजी ?

**विठू :** मुली, ज्यांचा आत्माराम जागा आहे, त्यानाच असं वाटतं बरं. ज्यांचा आत्माराम निजला आहे, त्यांना दिवसा अन्धार नि चालती बोलती जिती माणसं दगडधोन्डे वाटतात. [ दूर पाहून ] अशी बाजूला उभी राहा. ब्राम्हण देवळात जात आहेत. त्यांच्यावर आपली सावली पडेल.

**सीता :** सावली ? सावली तर आपल्या पायाखालीं, अन् त्यांच्यावर कुठून पडणार मामाजी ?

[भडाग्नि बोजवारे गीता पुटपुटत प्र.क.]

**भडाग्नि :** (स्व.) यदन्येषां हितं न स्यात् आत्मनः कर्म पौरुषम् । अपत्रपेत वा येत न तत्कुर्यात कथंचन ।। (उ.) अरेच्चा हा महारडा ! शिवशील. दूर हो. राण्डलेकानीं अगदी ताळ सोडला. [पंचपात्रांतले पाणी शिम्पडीत] रामाय रामभद्राय रामचंद्राय वेधसे । रघुनाथाय नाथाय–सुळावर चढवले पाहिजेत राण्डेच्यांना. (चरफडत जाऊं लागतो, तोच सीता नजरेला पडते. तिला पाहून स्व.) ही कोण ? उत्फुल्ल–कमल–वदन, बिम्बोष्टी, कुंजर–गण्ड–स्थळ नितम्बी, सरोज–नयना ! वा ! याचं नांव पात्र ! नाहीतर आमची ! वक्रतुण्ड महाकाय–रघुनाथाय नाथाय सीतापतयेनमः (जातो.)

[ चव्हाटे शास्त्री पुटपुटत प्र.क. ]

**चव्हाटे :** (स्व.) पुनरपि जननं पुनरपि मरणं । पुनरपि जननी–जठरे शयनम् ।। (उ.) आं ! अरे ए धेडा, डोळे आहेत का फुटले ? आमचा जाण्यायेण्याचा रस्ता. बटकीच्या, पायरीला अगदीं खेटून उभा आहेस. लाज नाही वाटत. चल हो दूर. (पाणी शिम्पडतो.) भजगोविंदम् भजगोपालम् मूढमते. हा सगळा त्या एक्याचा पाजीपणा ! गाढवान् सगळा महारवाडा डोक्यावर घेतलाय्. (सीतेकडे लक्ष्य जाताच स्व.) यंवरे यंव ! वेलाण्टीनं गोलाण्टी खाल्ली, नाहीतर महारीण होण्याऐवजी महाराणी होण्याच्या लायकीचं पात्र. (उ.) ही कोण रे विठ्या ?

**विठू :** जोहार मायबाप. ही दौलताबादच्या रंगनाक सुभेदाराची मुलगी नि माझी सून सीता, मायबाप.

**चव्हाटे :** तुझी सून ? म्हणजे परवा परनाळ्याच्या लढाईत पडलेल्या त्या तुझ्या रामजी पोराची बायको वाटतं ?

**विठू :** होय जी मायबाप.

**चव्हाटे :** (स्व.) गारगोटीच्या पोटी हिरकणीच म्हणायची ! भज गोविंद भज गोपालं मूढमते. (जातो.)

**सीता :** मामाजी, हे येणारे जाणारे लोक असे काय हो माझ्याकडं रोखून रोखून पाहाताहेत ?

**विठू :** त्यांना डोळे आहेत खरे, पण सारं जग त्यांना उलटं दिसतं. म्हणून ते असे रोखून पाहातात.

**सीता :** असं होय ?

**विठू :** मुली, तू आता घरी जा. नीट जपून जा बरं. प्रसाद घेऊन आलोच मी पाठोपाठ. मग आपण दोघेजण उपास सोडू हं. जा.

**सीता :** लवकर या हं अगदी. (जाते.)

[आंत सारंग रागाचे सूर घुमू लागतात व " बाळा जोजोरे कुलभुषणा । दशरथ-नन्दना " हा पाळणा गातात.]

**विठू :** (स्व.) देवाला पाळण्यात घातला. भाग्याचे भक्त रामरायाला पाळण्यात घालून त्याला झोके देत आहेत. बाळा जोजोरे ! देवा रामराया, तुझ्या पाळण्याला झोका देण्याचं तर राहिलंच, पण भाग्यवन्तानी दिलेले झोके, डोळे भरुन पाहाण्याचं भाग्यसुद्धां आम्हा म्हारा मांगांच्या कपाळी नसावं ना ?— तुझ्या दर्शनाला आमचा जन्म आडवा यावा ? देवा, तू निर्गुण, निराकार, हीन दीन दुबळ्यांच्या उद्धारासाठीं सगुण साकार झालास, तरीसुद्धा तुझं सावळं ढवळं रूप आम्हा अभाग्यांच्या डोळ्याआड केलंस ? भगवंता, भाग्यवन्तानी दगडधोंड्यांच्या देवळात तुला दडवून ठेवला; पण रामा, आम्हा दीनदुबळ्यांच्या दिलाच्या देवळात तर तू आहेसना ! [ पुन्हा पाळण्याचे थोडेसे स्पष्ट शब्द, नंतर नुसता तंतुवाद्याचा कोमल ध्वनि. विठू त्या सुरावर डोळे मिटून ताल धरतो.]

[ भम्पकराव भोजने व म्हादबा पाटील प्र.क. ]

**भम्पकराव :** (विठूला पाहून) म्हादबा पाटील, याचं नाव भक्ति बरं. वाहवा ! भाताला चोपडलेल्या केशरी रंगाप्रमाणं, हा रामभक्त भक्तिरंगात अगदी एकतान रंगला आहे.

**म्हादबा :** माळकरी दिसताया. व्हय. हायेच की त्येच्या गळ्यामन्दि अशी तुळशीची माळ. माळकरी म्हजी आमचा सगा बरका भम्पकराव. मग काय बि भेदभाव न्हाय. जात न्हाय न् पात न्हाय. निवरतीच्या ग्यान्बा द्येवान् आमा गोरगरिबांच्या गळ्यामन्दी ही तुळशीची माळ, हातामन्दी भजनाचा टाळ, अन् पायामन्दी चाळ आडकवूनशान लइ उपकार केलाया, पगा, लइ उपकार केलाया.

**भम्पक :** ज्ञानेश्वरानी भागवत धर्माचा पाया रचून, ब्राम्हणेतर गोरगरीब जनतेला मोक्षाचा एक नवीन दरवाजा उघडला. म्हादबा पाटील, पूर्वी आम्ही ब्राम्हण मराठ्यानासुद्धा शिवत नव्हतो, मग पाणी पिण्याची गोष्ट कशाला ? पण आता आम्ही खुशाल तुमच्या ओटीवर बसून पान तम्बाखू फाकतोच कि नाही ? ही सुधारणा ज्ञानोबानी केली. फार थोर पुरुष ! पुरा अन्तर्ज्ञानी !

**म्हादबा :** अक्षी बराबर. बामनाचा बोल, कोन करनार त्येचं मोल ! ग्येनबा द्येवान् मराठी बोलीमन्दी घेणेसरी ल्हेऊनशान्, उभ्या मर्‍हाठ देशावर माळकऱ्यांचा मेळा मस्त पिकावला पघा–लइ मस्त. जकड पधाल तकड माळ न टाळ–टाळ न माळ. पण्डरीच्या इण्टुबाचा नामघोस सताड गंगेवानी वाहताया. नामाचा मळाच पिकवला जनु. जवारीच्या मळ्यात जसी उमाप कनसं डुलत्यात, तशी या नामाच्या बाजारामन्दी मस्त माणसं कनसापरमान अशी डुलत्यात, खुलत्यात अन् तानभूक बि भुलत्यात.

[ आतील तंतुवादन बंद होते. ]

**विठू :** (डोळे मिटून स्व.) कुळभूषणा, दशरथनन्दना, रामा ! या अभागी विठ्याचा कुळभूषण राम–माझा बचडा रामजी – बाळा, आता कुठं रे तुला पाहू, माझ्या दिलाच्या शिलेदारा ! – धर्मासाठीं, देशासाठीं देवा ऽऽ, तुझ्या देवळाच्या दौलतीसाठीं महिना झाला – पर्नाळ्याच्या वेढ्यात पडला. पाळणा हालतोय, हालतोय रामाचा पाळणा. रामा – विठ्याच्या पोटच्या गोळ्या, माझ्या काळजाचा पाळणा असाच कारे जन्मभर हालत राहणार !

[ ' रघुपति राघव राजाराम ' भजन आंत गायले जाते. विठू ताल धरतो. ]

**भम्पक :** म्हादबा, चुरम्याच्या लाडवासाठी कणकेचे रोठ जसे कंबर मोडमोडून कुटतात, तसा हा रामभक्त, भक्तीच्या उमाळ्यानं एकसारखा टाळ कुटीत आहे. गरम गरम जिलब्यांची वेटाळी पंक्तीत वाढतांना ठसकेदार वाढणारणीच्या नाजूक बोटावरून पाकाचे पाट जसे टिबकतात–

[ गावबा प्र.क. ]

**गावबा :** आन् आपल्या बोटाऐवजी तिचीच बोटं हात धरून चुखावीशी वाटतात.

**भम्पक :** तसे याचे डोळे, गावबा, भक्तिरसानं सारखे पाझरत आहेत.

**गावबा :** थरकत घोडा, भडकत निशान, अठरा बरनके राज महाराज.

**भम्पक :** खरोखर, आपल्या धर्मासारखा धर्म जगाच्या पाठीवर एकसुद्धा नाही.

**गावबा :** तुमच्या पोटांतच धर्म बसल्यावर जगाच्या पाठीवर तो कसा दिसणार ? थरकत घोडा, भडकत निशाण.

**भम्पक :** राज्यकर्ते मुसलमान, म्हणून त्यांच्या इस्लामी धर्माच्या बढाया फार. पण आमच्या धर्मातली मौज गोडी अन् लज्जत त्यात नाही.

**म्हादबा :** वाइच पुन न्हाई पघा.

**गावबा :** येईल कुठून ? थरकत घोडा, भडकत निशाण. ज्या धर्मांत शेण्डी नाही, जानवं नाही, शेण गोमुत्र नाही, बहिष्कार नाही, प्रायःश्चित नाही, विटाळ नाही, भजन नाही,

**भम्पक :** ब्राम्हण–भोजन नाही,

**गावबा :** हो. तो कसला धर्म ! छेः, मला कुणी जबरीनं मुसलमान केलं, तरी मी मुसलमान होणार नाही, भम्पकराव.

**भम्पक :** ऍं, झालास तर आमच्या सनातन धर्माचा काही जीव जाणार नाही.

**गावबा :** तेवढीच काय ती भीति.

**म्हादबा :** गावबा, जवार आपली बामनं खबरदार हायती, तवार आपल्या धर्माचं कायबी वंगाळ व्हनार न्हाय पघा.

**भम्पक :** म्हादबा, सगळे हिन्दु जरी निजामशा बहिरीसारखे मुसलमानी धर्मात गेले, तरी आमच्या सनातन धर्माचा रोमसुद्धा वाकडा होणार नाही.

**म्हादबा :** न्हाय व्हनार, न्हाय व्हनार, न्हाय व्हनार. बामनं हायती तवार काय बी व्हनार न्हाय.

**भम्पक :** हिन्दुधर्म म्हणजे काय थट्टा समजलास ?

**गावबा :** थट्टेचा धर्म नसेल, पण धर्माची थट्टा झाली नाही, म्हणजे थरकत घोडा, भडकत निशाण.

**भम्पक :** ते काही चटकन भिजवून पटकन तळणीला काढलेलं अनारशाचं कच्चं पीठ नव्हे. चांगलं दहा हजार वर्षांचं तिम्बवण आम्बवण आहे.

**गावबा :** तरीच वैदिक अनारशांचा घाणा उतरल्यावर उरल्या पिठाचे इस्लामी मलिपुवे होतात.

**भम्पक :** गावबा, आपला धर्म फार उदार, फार मोठं पोट त्याचं !

**म्हादबा :** लई म्होटं प्वाट ! बामनं बोलत्याति.

**गावबा :** जसा काही मूरतुजा निजामशहाचा पाण्ढरा हत्तीच. थरकत घोडा, भडकत निशाण.

**म्हादबा :** आपला धरम म्हजी योक हात्तीच हाय पघा.

**गावबा :** तरीच बेट्याचे खायचे दात निराळे न् दाखवायचे दांत निराळे.

**लावणी**

**ब्रह्मदेवाचा बाप भट बनला जी ।**
**झाली धर्माची पातळ भाजी ।। धृ ।।**
**चार वर्णांच्या चार कोट जाती ।**
**क्षत्र वैश्यांची केलि चिकणमाती ।**
**शूद्र दुनियेचा बामण गाजी हो ।। झाली० ।। १ ।।**
**देव राहिला पल्याड । बामण राजा अल्याड ।**
**त्याचं लागलं लिगाड । जो तो भीतो**
**भटा करतो जी जी ।। झाली० ।। २ ।।**

**भम्पक :** गाविबा, अझून तू पोर आहेस.

**गावबा :** पोर ? आई म्हणते तू घोडा आहेस: थरकत घोडा, भडकत निशाण.

[ आत रघुपति राघव भजन. विठू ताल धरतो. ]

**म्हादबा :** त्यो पघा, लई उमाळ्यान् भजान करतायां. चला त्येचं दरशाण घेऊ. त्योबि माळकरी अन् म्याबि माळकरी. ('' पुण्डलीक वरदा हाऽऽरि इण्टाऽल '' म्हणून म्हादबा विठूच्या पायावर डोके ठेवतो. विठू दचकतो. उलट पाया पडतो.)

**विठू :** मायबाप, काय केलंस हे ! मी माळकरी खरा पऽण—

**म्हादबा :** माळकरी म्हजी सगा.

**गावबा :** (म्हादबाली हळूच) पण जातीचा आहे ना दगा. आता तुमचं तुम्ही बघा.

**म्हादबा :** (गावबाला हळूच) आर या माळेनं फोडला जातीचा फुगा, न्हा गुमान उगा.

**भम्पक :** रामभक्ता, तू धन्य आहेस.

**विठू :** धन्य ? मी कसचा धन्य. जन्माला येऊन प्रभु रामरायाचं दर्शनसुद्धा या अभाग्याला नाही. मी कसचा धन्य !

**भम्पक :** तू आन्धळा का आहेस ? (विठू नकाराची मान हालवतो) नाही ना ? मग देवदर्शन घ्यायचं तर देवळात जा.

**म्हादबा :** देवळात जा. बामनं बोलत्यात—देवळात जा.

**गावबा :** म्हादबा बि म्हंगत्यात, देवळात जा. हूं ! थरकत घोडा, भडकत निशाण.

**विठू :** देवळात जाऊ ? देवळात कसा जाऊ ?

**भम्पक :** देवळात कसा जाऊ ? वेडाच दिसतो. अरे पायानी चालत जा.

**गावबा :** नाही तर डोक्यानी चालत जा.

**विठू :** डोकी चालती, तर ही दशा कशाली असती. भक्त असून देवदर्शनाला नि माणूस असून माणुसकीला मुकलेला मी एक अभागी आहे. मायबाप, गरीबावर थोडी दया करा. रामरायाच्या गळ्यात हा फुलांचा हार घाला. हा कापूर पेटवून देवाला आरती करा, अन् परत येताना देवा ब्राम्हणांचा उरला सुरला प्रसाद घेऊन या.

**गावबा :** (स्व.) भम्पकरावाच्या भगदाडातून वाचला तर !

**भम्पक :** अगत्य अगत्य. दे तो हार न् कापूर. वाहतो नेऊन देवाला. (स्व.) माझी आयतीच सोय झाली.

[विठूला शिवून त्याच्या हातचा हार न् कापूर घेतो. इतक्यात भडाग्नी व चव्हाटे देवळाबाहेर येतात व हा शिवाशिवीचा प्रकार पाहून मोठ्याने ओरडतात.]

**भडाग्नी व चव्हाटे :** अब्रम्हण्यम् अब्रम्हण्यम् ! हे काय, हे काय ! अहो भम्पकराव महार, भम्पकराव महार.

**गावबा :** भम्पकराव महार ?— काय झालं हो बाप मेल्याइतकं ठणाण बोम्बलायला ? काय देऊळ पेटलं, का घराला आग लागली ?

**भडाग्नी :** धर्माला आग लावलीन् या भम्पकरावान्.

**चव्हाटे :** भम्पकराव, महाराच्या हातचा हार शिवून घेतलास ?

**भम्पक :** हा हार महाराच्या हातचा ? विष्णवे नमः [ हार फेकून देतो. टाणकन् उडी मारून दूर होतो.] कायरे म्हादबा, हा म्हार कायरे ? अन् गाढवा, त्याला तू शिवलास ?

**म्हादबा :** (स्व.) पंचाईतच झाली ! आता कसं करावं. (उ.) आऽऽर इचिभन ! ह्यो कोन म्हार व्हय ?

**गावबा :** (स्व.) भटाला बिचकला हा टाळकुट्या ! (उ.) म्हार असला म्हणून काय झालं ! माळकरी माळकरी सगा.

**म्हादबा :** माळकरी असला म्हून ? आम्ही मर्‍हाठं. म्हाराला शिवून काय धरम बुडवायचा ? बामनं काय बोलत्याल ? थुःत तुझ्या जिनगानीवर मर्दा. मला इण्टाळ केलास व्हय ?

**भडाग्नी :** विटाळ झाला तुम्हाला भम्पकराव. रामनवमीचा दिवस––उपवास––

**गावबा :** आणि भरल्या पोटी विटाळ ? थरकत घोडा भडकत निशाण.

**चव्हाटे :** सचैल स्नानाशिवाय तुम्हाला सुटका नाही. ब्राम्हण म्हणवता आणि महाराला शिवता ? काय सगळी थट्टा समजता ? हे पैठण आहे पैठण.

**गावबा :** गावठण नाही, पैठण आहे, समजलात ? निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, या संन्याशाच्या कारट्यांना जन्मभर मसणवटी दाखवणाऱ्या धर्ममार्तंडांचं हे पैठण. थरकत घोडा भडकत निशाण.

**म्हादबा :** (स्व.) म्हारडा लइ एडपा. घुसायचं देवळात. कोन वळाकत् ?

**भम्पक :** म्हादबा, खूप अक्कल पाघळलीत.

**म्हादबा :** म्या काय केलं भम्पकराव.

**भम्पक :** अकलेच्या कांद्या, सगा म्हणून तू या गाढवाच्या पाया पडलास. म्हणून मराठा समजून याला मी शिवलो न हार घेतला. (विठूच्या अंगावर धावून जातो.) गाढवाच्या लेका, महारडा कारे तू ? लाज नाही वाटत ?

**विठू :** जन्माची नि जातीची कसली लाज ? जोहार मायबाप जोहार, सूर्यवंशी रामाजी बाजीचा मी महार, तुमचे गावचा वेसकर खबरदार, धन्याच्या रजेने सारा कारभार, करतो की जी मायबाप.

**भम्पक :** चुलीत गेला तुझा मायबाप. मसणातल्या म्हसोबा हे आधी सांगायला तुझं तोण्ड काय हुण्डलं होतं ?

**गावबा :** आणि भम्पकराव, तुमच्या डोळ्यावर सडक्या रताळ्याचा कीस बांधला होता, कुझक्या भुइमुगाची भगर थापली होती, का नासक्या केळ्यांची लोंगरं लटकली होती हो ? थरकत घोडा भडकत निशाण.

**भम्पक :** गावबा, तू सुद्धा उलटलास कारे ?

**गावबा :** उलट्या जगात उलटू नको, तर काय सुलटा चालून सालटे सोलवून घेऊ ? थरकत घोडा भडकत निशाण, भम्पकरावांची दाणादाण.

**भडाग्नी :** चला गंगेवर जाऊन प्रायःश्चित घ्या.

**चव्हाटे :** सचैल स्नान करून पंचगव्य घ्या, जानवें बदला—

**गावबा :** शेंडी बदला—

**चव्हाटे :** अन व्हा मोकळे.

**गावबा :** चला गंगेवर नेऊन गंगाराम न्हाव्याकडून सक्षौर मोकळे करवतो. उपासाच्या दिवशी भरल्या पोटी विटाळ झाला. आधीं चांगली खळखळून बस्ती घ्या. नाही तर धोब्याच्या भट्टींत कोठ्या धुवून आणा.

**विठू :** मायबाप, मी पण्ढरीनाथाचा माळकरी आहे. शाकाहारी आहे. तुमच्यासारखा तुमच्याइतका स्वच्छतेनं राहातो. मग माझ्या नुसत्या हाराचा स्पर्श तुम्हाला कसा बाटवतो मायबाप ?

**भम्पक :** स्पर्शच काय, नुसती सावली नाही आम्हाला खपायची म्हारड्या.

**गावबा :** आमचा हिन्दुधर्म फार उदार ! फार मोठं पोट त्याचं ! असंच ना हो भम्पकराव ?

**म्हादबा :** आरं टाळमाळीच्या, म्हर्राट्याना न्हाय तुझी सावली खपायची तर बामनाना र कशी खपनार मैन्दा ?

**गावबा :** अहो म्हादबा पाटील, तुमच्या गेनबाच्या भागवत धर्मात तर जातपात नि विटाळ मानीत नाहींत. ज्याच्या हातीं टाळ, त्याचा फिटला विटाळ. मग आताच तुम्हाला कसा विटाळाचा पान्हा फुटला हो ?

**म्हादबा :** इण्टाळ हाय न् न्हाय. धर्मांत मस्स लिवलय. पन बामनं काय बोलत्याल ?

**गावबा :** बामनं काय बोलत्याल ! पंढरीचे टाळकुटे न् गंगेतले गोटे, छान जमले साटेलोटे ! बामनं काय बोलत्याल !

**भम्पक :** म्हादबा पाटील, तुझ्यामुळं राण्डलेका या क्षेत्रस्थ पंडितावर आंघोळीची पाळी आली.

(एक फकीर आंत दोहा ललकारतो.)

**जिन आपकू धोया नहीं । तनमनसे खोया नहीं**
**मनमैल को धोया नहीं । आंघोल किया तो क्या हुवा ।।**
**अल्लाके प्यारे । तेरे नगरीमें बोलता है कौन ।।**

**भडाग्नि :** (बिकट हास्यमुक्त थट्टेने) आंधोल किया तो क्या हुवा ! (चव्हाटे हास्याचा दुजोरा देतो.)

**गावबा :** अहो भडाग्नि, अहो चव्हाटे, " मनमैलको धोया नही, आंधोल किया तो क्या हुवा " कळतं का काही कळतं ?

**चव्हाटे :** महिन्या महिन्यात यांची न् पाण्याची भेट नाही नि म्हणे आंधोळ किया तो क्या हुवा.

**म्हादबा :** आसं कवा झालया राव. अंगोली धवल्या बिगार कन्दि कोन सूद झालाया ? बामनं काय बोलत्याल ?

**भडाग्नि :** हे फकिरी तत्वज्ञान ब्राम्हणाला काय होय ! भम्पकराव भोजने, स्नान करून प्रायश्चित्त घेत नसाल, तर वाळीत पडावं लागेल.

**चव्हाटे :** हे पैठण आहे पैठण, समजलात ?

**गावबा :** वाळीत पडावं लागेल, काळीत रहावं लागेल, जाळीत बसावं लागेल. विचार करा. थरकत घोडा भडकत निशाण.

**चव्हाटे :** महाराला शिवलात, महार झालात. आता कोण तुम्हाला ब्राम्हण मानणार ?

**गावबा :** अहो चव्हाटे, ब्राम्हण महाराला शिवला तर तो महार होतो. पण महार जर एकाद्या ब्रीम्हणाला शिवला तर तो बीम्हण होईल का हो ?

**चव्हाटे :** आचन्द्रार्क असं घडणार नाही.

**म्हादबा :** असं कसं घडल गावबा, आसं कसं घडल. याद काय लिवत्यात. बामनं काय बोलत्यात.

**चव्हाटे :** एकाच धातूची निरनिराळी पात्रं असली तरी रामपात्राची योग्यता कुणी शौचपात्राला देत नाही. हा विठ्या–महार, म्हणजे शौचपात्र. त्याचा हार ब्राम्हणांनी हातात घ्यायचा ?

**भडाग्नि :** महत्पाप महत्पाप ! अब्रम्हण्यं.

**गावबा :** बामनं तेवढी रामपात्र, बाकीचे तुम्हीं सगळे शौचपात्र. पटतं का पाटील तुम्हांला ?

**म्हादबा :** बामनं बोलत्याती गावबा. करायचं काय ! यदाज्ञा म्हजीच देवाज्ञा.

**गावबा :** (स्व.) तुझ्या अकलेला झाली खरी देवाज्ञा.

**विठू :** मायबाप, महाराला विटाळ असलो, तरी त्या हाराला कसला देवा विटाळ ? देवाघरची मुलं, तशी ही मोगऱ्या गुलाबाची पाक फुलं, मुलांफुलांना, मायबाप, कसली जातपात, विटाळ न् चाण्डाळ ? गंगामाईचं पाकपाणी, देवावर घालावं, अठरापगड जातीनी घ्यावं, आन् जीवन्मुक्त व्हावं.

**चव्हाटे :** महारडा तर महारडा अन् आम्हाला ज्ञान शिकवतो ? थोबाड फोडीन— (अंगावर धावून जातो.)

**गावबा :** (त्याला आडवून) हां हां हां शास्त्रीबुवा, थोबाड फोडाल तर विण्टाळ होईल, आन् सारा गंगेचा घाट विटाळया शास्त्र्यानी भरून जाईल. थरकत धोडा भडकत निशाण.

**म्हादबा :** बामनास्नी गिन्यान शिकावतू ? आर ह्यो मनुक्षे मुंजूबा का म्हसूबा ?

**विठू :** मायबाप, मला वेसकराला कसलं आलयं ज्ञान. तुम्हा सन्तांचे चार उष्टे बोल पडतात कानावर, इतकंच.

**म्हादबा :** बामनावानी सुपास्ट बोलनं धावलं, म्हजी काय बामनाची अकूल येतीया व्हय ! मुर्दाड खावा खावूनशान ही म्हारं लई मुर्दाड झाली पघा.

**विठू :** मायबाप, मुर्दाड जन्माच्या मुर्दाड पापानं देवदर्शनाला मुकलो. पण गंगेवाणी निर्मळ फुलांचा हा हार तरी माझ्या रामरायाला पडूं द्या कि मायबाप. महाराचं पाप हाराला का चिकटवता ?

**चव्हाटे :** महाराचा हार देवाच्या पायावर ?

**भडाग्नि :** देवळाच्या पायऱ्यावर नाही पडायचा, तर देवाच्या पायावर ? पाजी.

**गावबा :** पाजी नाही तर काय. देवाच्या गळ्यातला हार धटकेच्या आत, आनंदी बाजारांतल्या रामनाजी जमनाजीच्या बुचड्यावर चढेल. पण महाराचा हार ? थरकत धोडा भडकत निशाण.

**भम्पक :** ए गावबा, बस कर तुझा तो थरकत धोडा भडकत निशाण. आज देवळात हार गेला, उद्या महार जाईल. मन्दिर–प्रवेश मिळाला किं भोजनाच्या पंक्तीचा हट्ट न् पाठोपाठ लग्नासाठी आमच्या पोरींचा हात धरतील घट्ट.

**म्हादबा :** बामना अदुगर म्हराठ्यांच्या पोरीवर टाकत्याल ही म्हारं हात—

**भडाग्नि :** आणि सनातन धर्माचे पडतील बत्तीस दात.

**गावबा :** लग्नासाठी हात धरायला ब्राम्हण मराठ्यांच्या मुली म्हणजे मण्डईत माण्डलेल्या कोम्बड्या का लिलावातल्या हण्ड्या बांगड्या ? हवी त्याने हवी ती उचलावी व लम्बे करावी. भम्पकराव, तोण्ड आहे का धोड्याचा तोबरा ?

**विठू :** (गावबाला) मायबाप, या अभागी महारासाठी कशाला येता यांच्याशी वर्दळीवर.

**भम्पक :** महारड्या, तोण्डाशी तोण्ड कशाला देतोस ?

**गावबा :** तोण्डाला तोण्ड देण्याची तुमची रामपात्रें फुलपात्रे आनंदी बाजारात आहेत, हे या शौचपात्राला काय माहीत ? हा महारडा ! थरकत धोडा भडकत निशाण.

**चव्हाटे :** त्या पाजी एकनाथाच्या पाठबळानं ही म्हारडी अलीकडं फार शेफारली.

**विठू :** का उगाच सन्ताची निन्दा करून जीभ विटाळता मायबाप.

**भडाग्नि :** सन्त ? तू सन्त का तुझा एक्या सन्त ?

**विठू :** आपण सगळे आमचे सन्त. तुमच्याशिवाय आमचा उद्धार कोण करणार ? मायबाप, आम्ही हीन दीन दुबळे. जन्माचे अडाणी. पण्ढरीरायाचे माळकरी. हिंदुधर्माचे कडवे अभिमानी. शेकडों वेळा आमच्या तरण्याजवान महार–मांग,बाण्डानी समरांगणावर प्राण देऊन, हिंदू धर्म राखला. नुकताच या अभागी विठ्यानं आपला पोटचा गोळा रामजी परनाळ्याच्या लढाईत बळी देऊन, स्वताचा निर्वंश करून घेतला, मायबाप, आपण आम्हा दुबळ्यांचे धर्मबंन्धू. मग आमचा इतका तिटकारा का करता देवा ? आम्हाला रक्तपित्यासारखं कां वागवता ? आम्ही माणसं आहोत. आम्हाला थोडं माणूसकीनं वागवा. यापेक्षां अधिक आम्ही काही मागत नाही. देव सगळ्यांचा एकच. तुम्ही सगळे भाग्यवंत देवळात जाऊन देवाचं दर्शन घेता. त्याच्या भजन–पूजनाचा आनंद लुटता–

**भम्पक :** म्हणजे तुला काय देवळात जाऊ द्यायचा ?

**विठू :** कोण म्हणतं तसं मायबाप.

**गावबा :** अरे बाबा, या देवळात लूत झालेली कुत्री–मांजरं जातात. घाणेरड्या रोगांनी सडलेले शेकडों सम्भावीत जातात. मुंग्यांना साखर चारून माणसांच्या मुण्ड्या मोडणारे नगरशेट जातात. गोमुखीत हात घालून आनंदी बाजाराची वारी करणारे वारकरी जातात, धरांगना जातात, वीरांगना जातात, वारांगना जातात––

**विठू :** पण माझा गरिबाचा फुलांचा नुसता हारसुद्धा रामरायाच्या पायापर्यंत जात नाही! तो असा धुळीत पडतो ! बापहो, विचार करा–– विचार करा––

**भम्पक :** तुझा हा हार मी अस्सा पायाखाली तुडवून टाकतो. [लाथ वर उचलतो इतक्यांत विठू हार उचलून पोटाशी धरतो.]

**विठू :** महाराला तुडवा, पण देवाच्या हाराला तुडवू नका मायबाप.

**भडाग्नि :** किती मदोन्मत्त महारडा हा. दीड दमडीचा हार, पण तो सुद्धा तुडवू देत नाही आम्हाला.

**विठू :** प्राण गेला तरी देवाच्या हाराला कोणाचा पाय लागू देणार नाही.

**चव्हाटे :** म्हादबा, अहो तुम्ही शूर मराठे, वारकरी न धारकरी. महारानं ब्राम्हणांचा अपमान करावा आणि तुम्ही तो उघड्या डोळ्यांनी पहावा ?

**म्हादबा :** ए मैन्दा, बामनांचा पानोतारा करतुस व्हय ? ह्या म्हादबाशी गाठ हई. दण्डुक्यानं टक्कुरं फोडीन. टाक त्यो हार खाली–टाक–टाक–

**विठू :** महार खाली पडेल, पण हार पडणार नाही.

**भडाग्नि :** " ब्राम्हणाची निन्दा ? म्हादबा, पाहतो काय, तुडवा—लोळवा—

**भम्पक :** ' ठोका, जमीनदोस्त करा.

**चव्हाटे :** '

**म्हादबा :** (स्व.) काय करावं इचिभन ! बामन सांगत्यात ! ठोकतोच या म्हारड्याला.

[म्हादबा काठीचा तडाखा मारून विठूला धायाळ करतो. कपाळावर मोठी जखम होते. " अयाई " करीत रक्तबंबाळ विठू झीट येऊन पडतो. सर्वजण धाबरतात. ब्राम्हण दुरून विठूची पहाणी करतात.]

**चव्हाटे :** कायहो म्हादबा, हा काय अनर्थ केलांत ?

**म्हादबा :** म्हजी ?

**चव्हाटे :** असे म्हजी म्हजी काय करता ? वेसकर म्हाराचा खून. प्रकरण फार जड जाईल म्हादबा.

**गावबा :** बामनं काय म्हनत्यात म्हादबा ?

**म्हादबा :** अब असव्हं काय करता बामनानू. तुम्ही समदं म्हंगालात " ठोका येला." म्हून म्या ठोकला.

**गावबा :** त्यात तो मेला. आता सुळावर कोण चढणार? म्हादबा का बामनं?

**भम्पक :** म्हणजे? विठू महार मेला का काय?

**गावबा :** ठार मेला. गार झाला. भम्पकराव, महार मेला, विटाळ गेला. खुशाल आता सगळे घरी जाऊन पुरणपोळ्यावर उपास सोडा. गंगेवरच्या प्रायश्चित्ताची आता गरज नाही. अखेरच्या प्रायश्चित्तासाठी चावडीवर जाऊन मी या खुनाची वर्दी देतो. म्हादबा, बामनं काय म्हनत्यात? संभाळून असा. थरकत घोडा भडकत निशाण. (जातो.)

**भम्पक :** या अनाडी मरगळ्यानं केला खून. जाईल आता राण्डलेक सुळावर. भडाग्नि, चव्हाटे, चला. या म्हादबाच्या नादाला लागून धर्म करतां कर्म पाठीस लागायचे. चला. (जातो.)

**चव्हाटे :** या विकत श्राद्धाचं फुकट तर्पण करतो कोण लेक. [भडाग्निसह जातो]

**म्हादबा :** (स्व.) लइ वंगाळ झालया. आऽऽर जानविच्यानू. पावण्याच्या टाळक्यान् इचू ठेचुनशान पलता व्हय ? आतां मला उमगला तुमचा कावा. भावावर भाव धालून, उलटा हे. चोर साव म्हून गावामदी फिरत्यात. गावातल्या समद्या भानगडी ह्येच ह्येच करत्यात, आन् म्हराट्यावर म्हराटा न्हायतर म्हार धालून, दानं टाकून कोंबड्याच्या झुजा खेळतात. आन् सवता मातूर झटाक् उपरणं झटकून फटाक् निसटल्यात. पन म्हंगावं, आता या म्हादबा पिळवण्याशी गाठ हाई । आक्षि चरकांतल्या उसापरमान पिळूनशान चिप्पाऽडं करतो या समद्यांची. (तडफडत जातो.)

**विठू :** (अर्धवट सावध होतो.) आई–आई–कुठं आहे मी. आई–पण्ढरीचे विठाबाई–बये, तुझ्या नावाची माळ घातली. सारा भरिभार तुझ्यावर टाकला. सारी हयात तुझ्या पायाची भक्ति केली. जोगवा मागितला. पायी वाऱ्या केल्या. अखेर बया माझ्या संसाराच्या कवड्या झाल्या ! दहा वर्षं झाली. महारवाड्याच्या आगीत जन्माची सोबतीण जळून मेली. तरी एकुलत्या एका पोराच्या संसाराकडं पाहून आनन्द मानला. तोहि माझा रामजी–रामजी–देशधर्म देवासाठी–परवा–लढाईत मर्दाच्या मरणानं मोक्षाला गेला. माझी अश्राप पोर सीता, बये, रण्डकी झाली. तिचे चुडे वाढवून तुला भरले न् तिच्या कपाळाच्या कुंकवानं, बये, तुला धवधवीत मळवट भरला ! [जखमेच्या रक्तानं भरलेला हात पाहून] घाव मर्मी बसला ! अबबब, रक्ताचा पाट थांबत नाही. वाहू दे बये वाहू दे, या पापी महीरड्याच्या रक्ताचा पाट असाच वाहू दे. सारी दख्खनची जमीन आम्हा महारमांगांच्या रक्तांनी चिम्ब भिजल्याशिवाय, बये महालक्ष्मी, माणुसकीचं बियाणं इथं नाही रुजणार. जगदम्बे, तुझं रासन्हाणं पुरे होणार नाही अन् आम्हा माणशी जनावराना माणूसकीनं कुणी कुरवाळणार नाही ! आई–आई, आता मात्र मी वाचत नाही. पोरी सीते, तुझा मी घात केला. या विठ्या कसायानं तुझा गाईचा गळा चिरला. तुला या दगडी काळजाच्या अफाट जगात एकटी सोडून मी जाणार ! – पण सीताबाय, तू एकटीच अभागी नाहीस. तुझ्याबरोबर अडीच तीन कोट अस्पृश्य जीव, माणूसकीच्या पाण्याच्या घोटासाठी शेंकडो वर्षे टाहो फोडीत आहेत ! – आई, आई, पण्ढरीच्या विठाई मावली, या विठ्या महाराचा बळी घेऊन ती बये आता सन्तुष्ट हो. आज शेकडो वर्षे – बया – आम्ही अनाथ, दुबळे तुझ्या नावानं धाय मोकलीत आहोत. कशी बये दिलाचे दरवाजे घट्ट लावून तू निघोर बसली आहेस ! बयाऽऽ आता किती अन्त पाहाणार ! आता अखेर झाली. कडेलोट झाली. आमच्या माणशी जनावरांच्या किंकाळ्या ऐक, बया ऐक. जितेपणींच झालो आम्ही ठार – आता उघड बया दार. बयाऽऽदार उघड.

**दार उघड बया । दार उघड बया ।। धृ० ।।**
**हरिहर तुझें ध्यान करिती । चन्द्रसूर्य कानीं तळपती ।**
**गगनीं तारांगणे रुळती । तेवीं भांगी भरले मोती।। बये० ।।**
**बया त्वां रणकुण्ड जबढा पसरला । रणवाद्य दुंदुभी दण्दण्**
**दणकला । रथ घोडे कुंजर तुला । तारळे बया अर्पिली।। २ ।।**
**रक्त वाहे भडभडा । तेचि तेल तूप जळे धडधडा ।**
**पापांचा जुलमी अन्याय-रेडा । शेवटी आहुती घे त्याची।। ३ ।।**

(पुजेचे तबक घेतलेली गिरजाबाई कावरीबावरी प्र. क.)

**गिरजा :** (स्व.) कुणाची किंकाळी ही? इथंच कुठं तरी जवळ ऐकू आली. शब्द

चांगला ओळखीचा वाटतो.

**विठू :** (शेवटच्या वाताच्या झटक्यात)

**दार उघड बये । दार उघड बये ॥**
**अलक्षपूर भवानी । दार उघड बये ॥**
**माहुरकर भवानी । दार उघड बये ॥**
**कोल्हापूर भवानी । दार उघड बये ॥**
**तुळजापूर भवानी । दार उघड बये ॥**
**पण्ढरपूरच्या भवानी । दार उघड बये ॥**

**गिरजा :** कोण ते? विठूबाबा, विठूबाबा-(हातातलें तबक फेकून देऊन जवळ जाते.) काय झाले ?

**विठू :** (उमाळ्याने, डोळे फिरले असताना) कोण ते ? आहा! माझी महालक्ष्मी आली ? विठाई आली ? आहा ऽऽऽ

**जगदम्बा प्रसन्न झाली । भक्ति कवाडे खडाड उघडली ।**
**शंख चक्रांकित शोभली । कोटि चन्द्र सूर्य प्रभावे बाळी ।**
**एका जनार्दनी माऊली । कृपेची कराया सावली ।**
**धावलीस का बये । धावलीस का बये ॥१॥**

**गिरजा :** विठूबाबा, मी महालक्ष्मी नाही. मी गिरजा.

**विठू :** माझ्या एकनाथ सरदारांची गिरजा ?

**गिरजा :** विठू बाबांची मुलगी गिरजा. गंगेच्या डोहात बुडाली असता जिवाची तमा न करता, धडाड उडी घेऊन जिला आपण जीवदान दिलंत ती मी तुमची धर्मकन्या गिरजा नव्हे का विठूबाबा ? असे डोळे काय फिरवतां ? आन् हा रक्ताचा पाट कसला ? [जवळ जाऊन शिवू लागते.]

**विठू :** (दूर सारण्याचा यत्न करतो.) नको नको. गिरजाबाय–गिरजाबाय–नको नको. या विट्या म्हाराला तू शिवू नको.

[गिरजा शिवते व त्याचे डोके मांडीवर घेऊन पदराने कपाळाचे रक्त पुसू लागते.]

**विठू :** बये तू रामदर्शनाला आलीस न् कशाला मला अभाग्याला शिवलीस ?

**गिरजा :** मला विठूबाबा भेटले–हेच माझं रामदर्शन. (पदर फाडून जखमेवर पट्टी बांधते. रक्त थांबत नाहीसे पाहून) अगबाई ! सगळा पदर भिजून चिम्ब झाला तरी रक्त थांबत नाही. – काय करू मी आता !– विठूबाबा काय झालं हे असं ?

**विठू :** गिरजाबाय, हे रक्त नाही. रामजन्माच्या उत्सवाचा हा गुलाल आहे गुलाला.

**गिरजा :** छे ! काही तरी सांगता विठुबाबा. कुण्या मेल्या चांडाळानं माझ्या बाबाना मारलं, त्या मेल्याच्या हाताचे कोळसे होतील.

**विठू :** बये बये, कुणाला शाप देऊ नकोस. माझ्या रामजीनं लढाईत रक्त साण्डून पैठणच्या देवदेळाचं न् हिन्दु धर्माचं रक्षण केलं. या विठ्यानं आपल्या अडीच कोट जातभाईच्या वतीनं, रामरायाला रामनवमीचा फुलवरा चढवताना हा पाहिलास हार–

माझ्या सीतेनं मुद्दाम गुंफलेला हार—माझ्या रक्तानं कसा लालेलाल रंगला आहे तो !

**गिरजा :** अगंबाई ! सारा हार रक्तानं माखलाय.

**विठू :** बये, महार भंगला, पण माझ्या पोरीचा हा हार नाही भंगला. लालेलाल रंगला.

**गिरजा :** पण तुम्हाला मारलं कुणी ? ही जखम कशानं झाली ? सांगा सांगा—मला घेरी येऊ लागली. नाही हा रक्ताचा पाट आता मला बघवत. (डोळे मिटते.)

**विठू :** [खेदयुक्त विकट हास्य] आज शेकडों वर्ष पाण्ढरपेशानी आम्हाला जनावरासारखं राबवून, काळजाला पाडलेल्या शेकडो जखमांपेक्षां, गिरजाबाय, ही जखम तुला इतकी भयंकर वाटते ? अगं आहे काय या जखमेत.– हिच्यामुळं कदाचित फार तर मी मरेन–

**गिरजा :** विठूबाबा, असं बोलू नका. शपथ माझ्या गळ्याची.

**विठू :** एक विठ्या म्हार मेला, म्हणून अस्पृश्यता थोडीच मरणार आहे ! एरवी तरी आम्ही जिते मेले सारखेच नव्हत का ? बये, रामदर्शन आम्हा पाप्याना नाही तर नाही, पण म्हाराचा हा निष्पाप हार दिखील रामरायाच्या चरणावर जाऊन पडायला नापाक ठरला अं ?

**गिरजा :** हा हार रामरायाला का वाहायचा आहे ? द्या. आत्ता मी देवळात जाऊन वाहून येते. [ हार घेते.]

**विठू :** ( तिला आडवीत ) नको नको माझे बये. या हाराच्या पायीं हा महार जखमी झाला. नको बये तू या धाडसात पडू.

**गिरजा :** यात कसलं आलंय धाडस ? आत्ता मी हा हार देवाला वाहून परत येते. कोण मला मज्जाव करतो, अन् माझ्या आंगावर हात टाकतो, ते मी पाहून घेईन.

[ आत भडाग्नि प्रभृति—'' ए केरोबा कळसुत्र्या, ए नारोबा मळसुत्र्या, अरे राण्डलेकानों देवळातले तुम्ही बडवे ना ? बाहेर या बाहेर या.'' उत्तर '' आलों हो आलों '']

**विठू :** गिरजाबाय, ऐकलीस या भुतांची आरोळी. पाया पडतो. तू देवळात जाऊ नकोस. रंजल्या गांजल्यांच्या काकुळतीच्या किंकाळ्या वेळी देवळाच्या दगडी तटाना आरपार फोडतील, पण या भटाच्या पाषाण हृदयाचा पापुद्रासुद्धा हादरणार नाही बरं. बये, थांब, जाऊ नकोस पुढं

**गिरजा :** [ पायऱ्याकडे जाताना ] मी जाणार. ही मी चालले. देवदर्शनासाठी तळमळणाऱ्या भक्ताच्या रक्तानं माखलेला हा हार—

[ भडाग्नि, चव्हाटे, भम्पकराव, केरोबा व नरोबा प्र. क. ]

**सर्वजण :** देवळाच्या पायऱ्या चढू देणार नाही.

**गिरजा :** आऽस्सं ! विठूबाबाला जखमी करणारे चाण्डाळच का मला आडवीत आहेत ?

**पद.** (राग-शंकरा, ताल–त्रिताल) (ऐसो धीट लंगर०)
**ऐसि नीच करणि करि मुख काळे । पाशवि चाळे ।**
**कुटिल कपट मज ना माने ना माने ना माने ॥ धृ० ॥**
**रुधिर-कलंकित सुमन-मालिका । श्रीपदिं वाहिन ।**
**जनन सफल मम या मानें या मानें या मानें ॥ १ ॥**

**चव्हाटे :** गिरजाबाई, पायऱ्या चढू नका. तुमच्यासारख्या आक्रस्ताळी बाईच्या हातून देव देवळे बाटवण्यापूर्वी, आम्ही पैठणकर या पायऱ्यांवर आमचा जीव देऊ.

**भडाग्नि :** नाहीतर, हवा त्याचा जीव घेऊ. खाली उतरा.

**भम्पक :** बाईमाणूस पडलात म्हणूनच तुमची आम्ही गय करतो. नाहीतर विठ्यासारखी कणीक तिम्बवायला कमी करणार नाही.

**गिरजा :** तोफखानाचा धुव्वा उडवणाऱ्या सरदाराच्या या पत्नीवर हात तर उगारून पहा—

**विठू :** (त्वेषाने) त्या हातांची खाण्डोळी करून कोरड्या भाकरीशी खाईन.

(भट दबकतात.)

**गिरजा :** या मर्दाची कणिक तुम्ही तिम्बवणार ? हा एकटा सगळ्या पैठणची मसणवटी करायला समर्थ आहे. पण बिचारा पडला जित्या आईचं दूध प्यालेला वारकरी. तो तुमच्यासारख्या मेलेल्या मुर्द्यावर नाही कधि वार करायचा.—ही मी अशी हा हार घेऊन देवळात जाणार. (पुढे सरते.)

(भट हाताची साखळी करून ' हां खबरदार ' म्हणत आडवे होतात.)

**भडाग्नि :** गिरजाबाई, तुमही महाराला शिवलात तर शिवलात अन् हा रक्ताभरला हार देवाला वाहण्यासाठी देवळात घुसता ? काय हा अत्याचार !

**चव्हाटे :** ब्राम्हणाच्या बाईला तरी हा बाटगेपणा शोभत नाही. चला व्हा मागे—नाहीतर—

**गिरजा :** नाहीतर ? नाहीतर काय ?

**भम्पक :** हात धरून खाली ढकलून देऊ. देवदेवळे भ्रष्टवण्यापूर्वी बाईमाणसाचा अपमान झाला तरी परवडला.

[ गावबा अस्तन्या सारीत प्र. क. ]

**गावबा :** गिरजाबाईचा हात धरणारांची तोंडें तर मला पाहू द्या. थरकत धोडा भडकत निशाण करून टाकतो.

**गिरजा :** गावबा, तू हो बाजूला. मी आहे चांगली खबरदार या भ्याड मांगाना जाब द्यायला.

**सर्वभट :** काय ! आम्ही मांग ? आम्ही मांग ?

**गिरजा :** हो, हो, या रामभक्त विठूबाबाला जखमी करणारे सारे मांग आणि हा खरा ब्राम्हण. या खऱ्या ब्राम्हणाच्या रक्तानं माखलेला हा हार देवाच्या गळ्यात जाऊन पडलाच पाहिजे. चला व्हा दूर. होता कि नाही ?

**भम्पक :** अहो गिरजाबाई, अशा वर्दळीवर येऊ नका. अस्पृश्यांच्या स्थितीबद्दल आम्हाला काहीच वाटत नाही, असा का तुमचा समज आहे ? फार फार वाईट वाटतं. डोळ्यांतून टिपे येतात; पण करायचं काय ? ते आमचे धर्मबन्धु. त्यांचा आपला देव एकच. अखेर सगळ्याना एकाच रामरायाच्या पायाशीं—एकाच मसणवटींत जायचं आहे ना ?

**गावबा :** मसणांतही लेकाच्यांनों तुमचा सवता सुभा. ब्राम्हणांची मसणवटीं निराळी, ब्राम्हणेतरांची निराळी आणि अस्पृश्यांची त्याहून निराळी. एकाच ठिकाणीं सगळे पेटलात तर काय नरकाला जाल ? थरकत घोडा भडकत निशाण.

**भम्पक :** अरे, पण सगळ्याच सवलती त्याना एकदम कशा मिळतील ?

**चव्हाटे :** आज हजारों वर्षे चालत आलेला धर्माचार एकदम कसा मोडता येईल ? म्हणे म्हार मांगाना देवळात घुसवा.

**गिरजा :** घुसवा म्हणून कोण म्हणतो ? पण भक्तिभावानं त्यानी आणलेला हार सुद्धा देवळात जाऊ नये, हा कुठच्या गावचा धर्म ?

**चव्हाटे :** हा पैठण गावचा धर्म. हे पैठण आहे पैठण, समजलात ?

**गिरजा :** मी पण पैठणचीच आहे. अन् पैठणकरांचा भ्याडपणा मला चांगला ठाऊक आहे. इमादशाहीचा वाघ तोफलखान आमच्या सरदारानीं पर्नाळ्यात कोण्डला नसता, तर पैठणचं आज एलीचपूर झालं असतं.

**गावबा :** आन् तुमच्या टाळक्यावरच्या शेण्ड्या हनवटीवर उगवल्या असत्या, समजलात ?

**भडाग्नि :** पैठणचं एलीचपूर नि देवळांच्या मशिदी होईपर्यंत तरी आम्ही अस्पृश्याना देवदेवळांचे हक्क देणार नाही.

**गिरजा :** मुसलमानानी तुमच्या उघड्या डोळ्यांसमोर देवळे जाळलीं न् मूर्ति फोडल्या—

**भम्पक :** तरी आम्हाला पत्करतील. पण अस्पृश्याचा नुसता हार देवावर पडलेला नाहीं आम्हाला खपायचा.

[ सरदार एकनाथ प्र. क. ]

**एकनाथ :** (गिरजेला) फिरा पाहू मागं. क्षेत्रस्थ महाजनांशी असं वर्दळीवर येऊ नये. त्यांच्या संरक्षणासाठीच ना आम्ही तळहातावर शिरं घेऊन मोहिमा झुंजवतो ? देशातल्या लढाऊ तरुण पिढीच्या आहुति देऊन, परचक्रांच्या चढाया उधळून लावतो ? ब्रह्मकर्माच्या जोडीनेच क्षात्रकर्माची शिकस्त करतो ? असल्या धर्ममार्तण्डांची

अवहेलना करून का अस्पृश्यांच्या उद्धाराचा प्रश्न सुटणार आहे ? चला, फिरा मागं. आधीं विठूबाबाच्या जखमेचा बंदोबस्त करूया.—कुठं आहे विठू. (विठूजवळ जातात.) विटोबा, विठ्ठला—

**विठू :** कोण ? सरदार एकनाथजी ? मायबाप जोहार. सरदार, माझा रामराया—राम—रामजी (रडूं लागतो.)

**एकनाथ :** [ त्याला उठंवून पोटाशीं धरतो ] विठोबा, विठूबाबा, आजच तुझ्या समाचाराला विठ्ठलवाड्यात मी येणार होतो. विठोबा, हिन्दुधर्मावरील गण्डांतर टाळण्यासाठी परनाळ्याच्या मोहिमेत मेला तो एकनाथ ब्राम्हण, नि तुझ्याजवळ आलाय, तो विठू वेसकराचा मर्द रामजी महार.

**विठू :** देवा माझ्या रामानं माझ्या महार समाजाचं तोण्ड उजळ केलं. माझ्या घराण्याचं नाव राखलं.

**एकनाथ :** रामजीनं क्षात्रकर्माची कमाल केली. मर्दुमीची शिकस्त केली. अखेरपर्यन्त माझ्या उजव्या बाजूलाच तो सारखा लढत होता. तोफांच्या धडेबाजीनं किल्ल्याचा दरवाजा फोडून आम्ही आंत घुसलो नि तोफलखानाला गिरफदार करण्याचा मुकाबला चालू असतानाच, गनिमाच्या एका फलटणीनी बन्दुकांची फैर झाडली. त्यात आपला रामजी गारद झाला. देशधर्म देवासाठीं त्यानं आपल्या जिण्याचं सोनं केलं.

**गावबा :** आणि त्याच रामजी मर्दाच्या बापाचं कपाळ फोडून या शहाण्यानी आपल्या अकलेचं शेण केलं. थरकत घोडा भडकत निशाण.

**एकनाथ :** गावबा, हा त्या बिचाऱ्यांचा दोष नाही. परम्परेच्या पायदळींनं पतित झालेल्या त्यांच्या विद्येचा नि संकुचित चकारीनं चालणाऱ्या धर्मकल्पनांचा तो दोष आहे. काळाच्या ओघाबरोबर धर्माच्या नि कर्माच्या कल्पना बदलत असतात, ही जाणीवच त्या विचाऱ्याना नाही. शूद्रातिशूद्र ठरवलेल्या नि आजन्ममरण कपाळावर अस्पृश्यत्वाची डागणी डागलेल्या रामजीनं, मोठमोठ्या जन्मसिद्ध क्षत्रियाना क्षात्रधर्मात दिङ्मूढ करावं.—

**विठू :** आणि या अभागी विठ्यानं देशधर्म देवासाठी पांढरपेशांच्या लाथा लाठ्या खाण्यासाठीं जिवंत राहावं—आऽ आऽ पाणी पाणी पाऽऽणी-मला थोडं पाणी पाजा—

(खाली पडतो. सर्व " पाणी आणा-पाणी आणा " ओरडतात.)

**एकनाथ :** गावबा, गावबा, कुठून तरी झटकन् पाणी घेऊन ये पाहू.

**गावबा :** अहो भटजी, भम्पकराव, भडाग्नि, चव्हाटे, थोडं तुमच्या पंचपात्रीतलं पाणी द्याहो.

**भडाग्नि :** पाणी ? महाराला पाजायला ? नाही मिळणार.

**गिरजा :** तान्हेल्या माणसाला पाणीसुद्धा देत नाही ? मेल्यानों, तुम्हाला देवानं निर्माण केलं का सैतानानं ?

**भम्पक :** तुमचा आमचा बाप एकच.

**एकनाथ :** धर्ममार्तंडांनो, तुमच्या काळजाची ही कठोरता पाहून फत्तरसुद्धा शरमेनं उफलतील. आहो, लढाईच्या धुमाळींत शत्रूचा शिपाई पाणी पाणी करीत असला, तर त्यालासुद्धा पाणी पाजून आम्ही जीवदान देतो. इथं तर हा शुद्ध भूतदयेचा प्रश्न आहे. शिव शिव !

**गावबा :** अहो, ही भटं जागतीज्योत भुतं आहेत भुतं. याना कसली दया न माया ! थरकत घोडा भडकत निशाण.

**एकनाथ :** क्षेत्रस्थ बन्धूनो, भूतदयेला पाठ दाखवून शुद्ध मानव धर्माला कलियुगाचं कोळं फांशीत आहात तुम्ही.

**सर्व भटजी :** तुम्ही आहात ना कलियुगाचे कलीपुरुष! आपण हांसे लोकाला न काजळ माझ्या नाकाला.

**एकनाथ :** मर्जी आपली.–चला, गावबा विठूबाबाला आपल्या घरीं घेऊन चला––

**सर्व भटजी :** काय? ब्राम्हणवाड्यात महार नेणार?

**चव्हाटे :** एकनाथ, हा भ्रष्टाकार नाही आम्हाला खपायचा.

**भडाग्नि :** महारड्याना मिठ्या मारायच्या असतील तर महारवाड्यात बिऱ्हाड थाटा.

**एकनाथ :** वेदोनारायणांची इच्छा पूर्ण होईल.

**गिरजा :** अनाथ अपंगांच्या उध्दारासाठीं महारवाड्यालाच आम्ही विठ्ठलवाडा बनवूं बरं! निवृत्तिज्ञानदेवानी पावन केलेला तो विठ्ठलवाडा पाहून, देवसुध्दा आमचा हेवा करतील.

**एकनाथः** आता बोलण्यात वेळ घालवू नका. चला त्याला आपल्या घरी घेऊन न् वैद्यराजांना बोलावून आधी त्याच्या जखमेवर इलाज करा. चला उचला. झटपट करा.

**गिरजा :** नाही. थांबा. या रामभक्ताचा हा रक्ताभरला हार देवळात जाऊन मी रामाला वाहीन, नि मग विठूबाबा इथनं हालतील. नाहींतर मी या पायऱ्यावर माझा जीव देइन, न् विठूबाबा इथं पाणी पाणी करीत प्राण सोडतील.

**एकनाथ :** मला तुमच्या हृदयाची तिडीक समजते. पण असल्या आग्रही आतताईपणानं अस्पृश्यांच्या उध्दाराचा प्रश्न कसा सुटणार? महाराचा हार देवाच्या गळ्यात पडला, म्हणजे अस्पृश्यता गेली, अशी का आपली समजूत आहे?

**गिरजा :** प्रश्न समजूतीचा नाही, तत्त्वाचा आहे. तत्त्वासाठी प्राण द्यायला हरकत कसली?

**एकनाथ :** प्राण देण्याची आततायी कल्पना तत्त्वाला पोषक झाली, तरी तेवढ्यानं मूळ मुद्या गुन्ता सुटत नाही तो नाहीच! जीव देणारे जीव देतील, कांही थोडेसे

हळहळतील, यापेक्षा या आग्रही आततायीपणाला फारसे यश येणार नाही. भावनेच्या खळखळाटानं किंवा उपासतापासाच्या न् जीव देण्याचा धमक्यानी अस्पृश्यतेचा प्रश्न सुटणारा नव्हे. भावना कितीही खवळली उसळली, तरी व्यवहार व्यवहाराच्या कदरीनंच केला पाहीजे.

**पद** (राग-खंबावती, ताल-त्रिताल.)
**लवभाव ना। असे भावना ती ॥ धृ ॥**
**व्यवहार सारा विकारेंच नासे॥**
**विवेकाविना ना कुणा सग्दति॥१॥**

आधी विठोबाच्या जखमेवर इलाज करू, आणि मग योग्य त्या विवेकी मार्गानं, याच ब्रह्मदेवांच्या—

**गावबा :** ब्रह्मसंमंधांच्या—

**एकनाथ :** कृपेच्या गंगाजलानं दख्खनची अस्पृश्ता योग्य वेळी धुवून टाकू. हजारो वर्षांच्या रूढीच्या रोगानं ताठर बनलेली मनोवृत्ति एकाच दिवसात कशी बदलेल?

**विठू :** (उठून) गिरजाबाय, आण तो हार इकडं. मी स्वतः देवाच्या गळ्यात घालणार.

**गिरजा :** हा घ्या. चला तुम्ही न् मी दोघेही देवळात जाऊ.

**चक्राटे :** एकनाथ, विचार करा. दोघानाही आवरून धरा.

**भडाग्नि :** रामनवमीच्या दिवशी तरी रामाच्या पायऱ्यांवर खुनाचा प्रसंग आणू नका.

**भम्पक :** रक्तपात होईल रक्तपात!

**एकनाथ :** रक्तपात पाहिला नसेल, त्याला रक्तपाताची भीति. या एकनाथानं अर्ध्यदाना इतकीच रुधिरदानाचीहि रंगपंचमी खेळलेली आहे. पण हे समरांगण नाही, धर्मांगण आहे, याचा आमचा विवेक जागा आहे.

**विठू :** मायबाप भिऊ नका. ओरडू नका, गिरजाबाय, फत्तराच्या काळजाच्या माणसानी फत्तराच्या तुरुंगात कैद केलेल्या, फत्तराच्या देवापेक्षां—या विठू महाराचा हार–हा पहा–खऱ्याखुऱ्या–चालत्या बोलत्या माझ्या दिल्दार रामरायाच्या गळ्यात पडत आहे. (एकनाथाच्या गळ्यात हार घालतो व पाय धरीत असता झीट येऊन पडतो.)

**गिरजा :** उचला, उचला, विठूबाबा झीट येऊन पडले–उचला.

[ पाणी पाणी असा ओरडा.]

## पहिला अंक समाप्त

## अंक २ रा प्रवेश १ ला

[हातात फुलांची परडी घेऊन, झपझप पावले टाकीत सीता येते. आंतून केरोबा " शू: शू: सीते–सीते–सीताऽऽ " अशा हाका मारतो. ती एकदा मागे पहिल्यासारखे करते आणि तडक निघून जाते.]

**केरोबा :** (प्र. क.) निसटलीच ही बिजली. आहा ! जिवाच्या विसाव्याला असली मोहिनी मिळेल तो पुरुष धन्य. देवळातली देवपुजा टाकून, गेले सहा महिने या देवीच्या पाठिलागावर मी सावलीसारखा फिरत आहे. मी ब्राह्मण–ही महारीण. मला या सीतेचं एवढे आकर्षण का ? तिला माझं आकर्षण असेल–किंवा नसेलहि कदाचित. नसलं, तर तिचा तो दोष नाही. प्रेमी जीवांच्या साहजिक आकर्षणाला बेमुर्वत अटकाव, हाच जिथं आमच्या धर्माचा न् जातीभेदाचा रानटी दण्डक, तिथं त्या बिचारीनं आपल्या दिलाच्या दिल्दारीचे दरवाजे घट्ट लावून बसण्यातच जीवनसाफल्य का मानू नये ? (दूर पाहून) या महारवाड्यात हा पठाण कोण ?

(पठाण वेषांत गावबा प्र. क.)

**गावबा :** ओहो, ओहो, केरोबा बडवे आलेकम् सलाम. मिरचीकम् सलाम्. लसूनकम् सलाम्. का ? अलिकडे महारवाड्यात फारशा वाऱ्या स्वाऱ्या चालल्यात आपल्या ? काही अस्पृश्योद्धाराचा डाव आहे वाटतं ?

**केरोबा :** (गोंधळून) हो जवळ जवळ तसंच. पण गावबा ? तू पठाण कधीपासून झालास ?

**गावबा :** गेल्या रामनवमीच्या पारण्याला मी ही दिक्षा घेतली. त्या दिवशी भटभोजनाऐवजी एकनाथानी महार मांग धेडाना जेवण घातलं नि त्यांच्या पंक्तिला ते जेवले. त्याना तुम्ही वाळीत टाकलं. घरादारावर तुळशीपत्र ठेवून ते महारवाड्याशेजारी गेले. त्याना तुम्ही केलं महार. म्हणून मी बनलो पठाण. केरोबा होता का तुम्ही पण महार ? मी करतो तुम्हाला महार, महार व्हा बुवा. म्हणजे असल्या बुरखेबाज हेलपाट्यांच्या पायपिटीशिवाय, उघड्या माथ्यानं तुम्हाला अस्पृश्योद्धार चांगला करता येईल.

**केरोबा :** एकनाथाबरोबर तू का नाही महार झालास ? पठाण कशाला झालास ?

**गावबा :** अहो, थरकत घोडा भडकत निशाण. महार भटाना भितो. फार भितो. पण भटानी पठाण पाहिला का गंगेचा घाट धोब्यानी फुललाच.

**केरोबा :** गंगेचा घाट धोब्यानी फुलला म्हणजे अस्पृश्यद्धार झाला वाटतं ?

**गावबा :** नाहीतर काय. म्हारवाड्यावर बडग्यांच्या वाऱ्या स्वाऱ्या होऊ लागल्या, म्हणजे अस्पृश्योद्धार होणार वाटतं ? हे पहा, सगळे महार मांग धेड चांभार, मुसलमान तरी झाले पाहिजेत, नाहींतर पेशावरी पठाणांच्या टोळ्या पैठणी भटांच्या छातीवर चढल्या पाहिजेत. त्याशिवाय अस्पृश्यांच्या उद्धाराचा तिसरा मार्ग नाही. केरोबा, थरकत घोडा भडकत निशाण पाहिजे. बोला तर मग, महार होता का पठाण होता ? पण लक्ष्यात ठेवा, महाराला गुन्ता न् पठाणाला सुन्ता. टळायची नाही. का आपले भटोबाच राहाता ?

**केरोबा :** विचार केला पाहिजे. बरं येतो मी. (जाऊ लागतो)

**गावबा :** येऊ नका, जा.–पण थाम्बा. तुम्ही अस्पृश्योद्धार करणार, – नाही का ? पात्रापात्र विचार ठरलाच असेल. तो ती का तें ?

**केरोबा :** पाजी ! (रागाने जातो).

**गावबा :** (स्व.) कमाल आहे बुवा या पैठणी गावगुण्डीची. एकनाथासारखा एवढा मोठा पराक्रमी सरदार, दिलाचा दिल्दार, पट्टीचा पण्डीत, पण त्यानी अनाथ अपंग अस्पृश्यांच्या उद्धाराचा प्रश्न हाती घेताच, साऱ्या पाण्ढरपेशांचे डोळे पाण्डरे झाले, न: हजार हिकमती करून त्याला घरादाराला : मुकवलं. आता, कर्जाच्या उघराणीसाठी त्या दुलिचन्द तीनशेण्ड्याला धरणं धरायला त्यांच्यावर सोडला काय ? [पद पुरवणींत पहा.] पण त्या पाजी बडव्याच्या पाळतीवर आता चांगलंच राहिलं पाहिजे ! (जातो.)

[दाढी मिशा वाढलेला, कपडे मळके, असा म्हादबा प्र. क.]

**म्हादबा :** (आश्चर्याने सगळीकडे टेहळणी करतो.) आं आरिचिभन ! सा म्हयन्यात समदी दुनया फिरली, का माजं डोळंच फिरल्याती ! ह्यो पयठाण का त्ये पयठाण ? त्ये-त्ये-तर पैठाणच अक्षि. मंग ह्यो नईन पैठण इथं कवा आलाया ? ह्यो तर महारवाड्याचं गावठाण. आन् म्हारवाडा काय झालाया ? ही समदी मण्डोली तर वळखीची म्हारंच. आयाबायाबी–व्हय, म्हारनीच न्हवत जनू ! काय, झालाया काय चिमित्कार ह्यो. समदं महार बाप्ये न् आया–वा ! अक्षी पांढरपेश्यावर तान झाल्याती. लइ इस्वाच, लइ इस्वाच. म्हारानी म्हराठ्यावर तान केलिया जनु. ह्यो म्हारवाडा ? कोन म्हंगल येला म्हारवाडा जी ! सराळ वळीमन्दी कशा अक्षि नामी नामी टुमदार झोपड्या. त्यो लहानगा फुलाचा बाग. पड्याल भाजीपाल्याचं हिरवगार मळं. हिरीवर म्वाटबि चाललीया. केराचं काटुकबी न्हाय कुठं गवसायचं. अक्षी नामी. अक्षी चोखाट. वाड्याच्या मदुमद द्येवाच देवाळबी हाय, पुण्डलीक वरदे हाऽऽरी इण्टाल. (साष्टांग नमस्कार घालतो.).

**गावबा :** (प्र. क्र.) (म्हादबाला पाहून) हा कोण लोळपाटण्या इथं ? (म्हादबा उठतो.) कोण? ओहो ! म्हादबा पाटील ? रामराम–रहिमराम. आलात का दौलतबादच्या तुरुंगाची सहा महिने हवा खाऊन ?

**म्हादबा :** कोन ? गावबा ?—आचीर आचीर, समदंच आचीर, आन् ल्योका गावबा, मुसलमान कवा झालाय तू ? बामनं काय बोलत्याल ?

**गावबा :** बोलल्योल आपलं बोडकं. अकलेच्या म्हसोबा, भटांच्या हुलकावणीनं खडी फोडून आलास तरी तुझं " बामनं काय बोलत्याल " कायमच आं ?

**म्हादबा :** गाविबा लइ वंगाळ काम केलाया मी, ग्याबाच्या माळेच्यान् लइ वंगाळ ! यकनाथ महाराजांच्या पायावर डोकशी ठेवल्याबगार आनपान्याला न्हाय यो म्हादबा शिवनार, कुठ हाईत एकनाथजी म्हाराज ?

**गावबा :** ते महाराज महारांचे राजे होऊन, राजवाड्याऐवजी म्हारवाड्यात जाऊन बसले आहेत. त्याना शिवलास, का तू पण होशील महार. मग बामनं काय म्हंगत्याल ?

**म्हादबा :** एकनाथ महाराज म्हार ?

**गावबा :** पैठणकर भटानी त्याना केलं महार, म्हणून मी झालो पठाण,

(आत मारवाड्याची बडबड चालते.)

**म्हादबा :** म्हजी ? ह्यो काय चिमित्कार ? सा म्हयन्यात पैठणचा भूतखाना ?

**गावबा :** भूतखाना का शेतखाना ते आत्ताच पाहून घे. जरा बाजूला ये. (त्याला घेऊन जातो.).

(दुलिचन्द मारवाडी तणतणत येतो. पाठोपाठ एकनाथ त्याची समजूत घालीत प्र. क्र.)

**मार :** साला मोथा सादू बोत्ते. सगदागचा दिमॉक मिगवते. हामचा पैसा कसाला नाय देऊन ताकते? पॉच बगस जाला. ऑत्ता दते, ऊदा देते, पगवा देते. साला थॉपबॉजी कत्ते? सॉंगला सॉंगला बॉमनसी तकलॉग कत्ते. म्हॉग म्हॉग सी जेवाला घॉत्ते.बॉत्या.बॉत्या. समदा हिन्दु धगमला ऑग लावली. पेठनसी पलाला नि ये म्हॉगवाड्यामन्दी येऊनशी लपला. साला ए मगवागीला बनावते? तूजा बॉप हे बॉप पेसा टॉक. दुसगी बॉत नही. पेसा टॉक.

**एकनाथ :** (स्व.) पैठणाच्या धर्मबांधवांकडून माझे सर्व संस्कार यथास्थित झाले. चव्हाट्यावरच्या जोडेपैजारीचा हा संस्कारच कायतो राहिला होता. चित्तशुद्धीसाठी याची जरूर असतेच. (उ.) शेटजी, आज पांच पिढ्यांचा तुमचा न् आमचा व्यवहार. असे वर्दळीवर येणं शोभतं का तुम्हाला?

**मार :** ही बम्बग्यान् ते तुज्या जिनॉग्दनेजीला सॉंग. ये दुलीशनला नको सॉंग. हॉमसा पिसा टॉक. पन्दगा हजॉग! काय समदा तट्टा कत्ते? पीसा टॉक.

**एकनाथ :** अहो, पंधरा हजार असोत, नाहीतर पंचवीस हजार असोत. दौलताबादेहून पर्नाळ्याच्या मोहीमेच्या खर्चाची थैली सात आठ दिसांत आली म्हणजे तुमची रकम धरपोच पाठवतो.

**मार :** अगे सुऽऽलीत गेला ते दोल्ताबाद न् ते तुजा पन्नाला. कसला साँगते ते थेलीची वॉग्ता. दोन बगस झाला. लेस्मीपूंजनलाबी बेज नाच, मूंदल नाय. वॉय्दा-वॉय्दा! जवा बगावा तवा वॉय्दा. साला वॉयदा काय कॉयदा हे! कॉयदामा कइ फॉयदा हे! बस. पीसा टॉक. भॉनसोद कग्जा कात्ते नि धगम कत्ते. पीसा नाय तो धगम कसाला मगाला कत्ते? पीसा टॉक. समदा पीसा बॉमनशी पोटात घातला. आता साला म्हागमाँगशी बोडक्यावग धागते, नि दुलीशनला वॉयदा साँगते. पीसा टॉक. भॉनशोदनी धगम् डुबवला. मगवागीला डुबावते? ए दुलिशनला बुगवते? धगम् गया जान्हम्मा. माजा पीसा टॉक. साला धेडं लोकची वास्ते मगते, मंग आमचा पीसा कसाला नही देते? सोग. भॉनशोद लुश्या. थॉपबाजी कत्ते?

**एकनाथ :** असली शिवीगाळीची अभद्र भाषा आपल्यासारख्या नगरशेटजीला शोभत नाही दुलिचंदजी.

**मार :** अगे, मगवागीला समदा शोभते, समदा शोभते. पीसा टॉक हामचा बस. पीसा टॉक.

**एकनाथ :** शेटजी या वेळीं माझा नाइलाज आहे.

**मार :** ए गोष्टी ए दुलिशनला नको सांग, पीसा टॉक.

**एकनाथ :** पैसा असतां तर दिला का नसता शेटजी.

**मार :** अगे पीसा नॉय तो बजागमन्दी बायको बेचून टक्का हान.

(" बायको बेचून टक्का हान ? " अशी गर्जना करीत सन्तप्त गावबा येऊन मारवाड्याची मान पकडतो.)

**मार :** पिथान-पिथान मगिगियो. ए बालाजी, ए बंकटसगजी, ए गणछोड-गायजी, मागिगियो. पिथान मारी जान मारी नाखशे. ए हिकनाथजी म्हाको बचाव.

**एकनाथ :** गावबा, गावबा, सोड त्याला.

**गावबा :** सोड सोड काय करता ? गिरजाबाईची बदनामी ? जीभ खेचून ठेचून टाकीन. तीन टकलीच्या तुम्हाला कुणी आया बहिणी बायका असतात कि नाही ? [मारवाडी " पाँव पड्डू, पाँव पड्डू, हिकनाथजी म्हाको बचाव " असे किंचाळतो.]

**एकनाथ :** गावबा, अरे मरेल तो, सोड त्याला. दोष आपला. आपण त्याचं देणं लागतो ना ? सोड त्याला. आपण भागवत. विष्णुदास. आपल्याला नाही हे शोभत.

**गावबा :** शोभत नाही काय ? सारं शोभतं. " मेणाहुनि मऊ आम्ही विष्णुदास, कठीण वज्रास भेदू ऐसे ॥ भले तरी देऊ टिरीची लंगोठी, नाठाळाचे काठी हाणू माथा ॥ "

(मार० च्या डोक्यावर काठी मारून त्याला सोडतो)

**मार० :** बचि गियो, ओसे बालाजी, ओ बंकटजी, बचि गिओ.

(गिरजा दागिन्याचा डबा घेऊन येते.)

**गिरजा :** शेटजी, तुमच्या स्वभावधर्माप्रमाणं आमच्या पुरुषांचा अपमान करून, भरलं ना तुमचं पोट ?

**गावबा :** रिकामं असलं तर मी शेण भरतो.

**गिरजा :** तुम्हाला काय दोष द्यायचा म्हणा. माणसासारखी माणसं पैशासाठी पशू किंवा पिशाच्च कशी बनतात, हे जगाला दाखवण्यासाठीच, मला वाटतं, देवानं हा प्राणी पैदा केला असावा. हं, हे घ्या माझे दागिने. (डबा देते.) विकून टक्के करा नि येईल ती रक्कम आमच्या खाती जमा करा.

**एक० :** गिरजा-गिरजा, हे तुझं स्त्रीधन !

**गिरजा :** स्त्रीवर जर पतीची सत्ता, तर तिचं धन कुणाची मालमत्ता ? जनता-जनार्दनासाठी इकडं फकिरी घेतल्यावर मला ही दागिन्यांची अमिरी पाहिजे कशाला ?

**मार० :** (दागिने तपासून) गिरजाबॉय लइ साँगला, लह साँगला माणूस !

**गावबा :** दिडकी दमडीच्या, या मावलीला तू बाज़ारात विकायला काढतोस होय ?

**मार० :** गावबा, पाँव पडू, गिरजाबॉय पाँव पडू.

(सीता दागिन्यांची पुरचुण्डी घेऊन प्र. क्र.)

**सीता :** जोहार मायबाप जोहार. गरीबाची ही फुलाची पाकळी नाकारू नका.

(एकनाथाच्या पायाजवळ पुरचुण्डी ठेवते.)

**एक० :** मुली, काय आणलंस हे ?–काय ? दागिने ? कशाला ?

**सीता :** देवाच्या देवपूजेला मायबाप. मला विधवेला यांचा आता काय उपयोग ? ज्यानी ते केले, ते देवाधरीं गेले–

**पद :** (चाल०–प्रणयतरंगासवें०)
**चारुशील दागिना । हाच आवडे मना ।**
**कांचनीं वांछना धडवि शील-लांछना ।**
**सतत मनि विवंचना ।।धृ०।।**
**घन-धर्षणि चंचला ।**
**तेज उजळि भूतला ।**
**सति चमकत पतिविना ।**
**करुनि शीलवर्धना ।। कांचनी० ।।१।।**

करायचे काय ते दागिने मला आता ? द्या ते या मांगाला नि करा त्याचं तोण्ड बन्द. साऱ्या पैठणची माणूसकी मेली तरी या म्हारवाड्यातून नाही बरं ती गेली. (पुरचुण्डी मार० च्या अंगावर फेकते.) कर मेल्या तोण्ड काळं. गिरजाबाईंना बाजारात विकायला काढतोस होय ?

**विठु :** (प्र.क.) अरे, आमच्या मायबापाकडं वाकडी नजर टाकायची कुणाची छाती आहे ? चल घे हे माझ्या शेतवाडीचे कागद, न् फाड सरदारांच्या नावानं दोन हजाराची पावति.

**मार० :** (कागद घेऊन पाहातो) साँगला. लई साँगला लोग तुमी. गिरजाबाई साँगिला, शीटाबाई साँगला, अने विठाबाई बि साँगला.

**एक० :** विठुबाबा, सीता, काय माण्डलं आहात हे तुम्ही ?

**विठु :** गंगेच्या पाण्यानी गंगेचीच पूजा केली, मायबाप.

**गिरजा :** विठूबाबा, आम्ही आमच्या संसारावर तुळशीपत्र ठेवलं, पण तुम्ही सगळ्यांनी असं करून कसं भागेल ?

**सीता :** मायबाप, अनाथ अपंगाच्या उद्धारासाठी, आपण संसाराची होळी केली. मग आमच्या वेसकर घराण्यातली चारदोन मानाची लाकडं, नको त्या होळीत पडायला ?

**एक० :** आहा! नीच अस्पृश्य ठरवलेल्या हीनदीनांचा शुद्ध माणूसकीचा हा जिवन्त जिव्हाळा पाहून, माझं सारं अध्यात्मज्ञान आज फोल ठरलं.

**गिरजा :** याला म्हणतात हृदयाची श्रीमन्ती बरं! (सीतेचे तोण्ड कुरवाळून) मुली, कोणत्याग देवानं हा वाणी करणीचा गोडवा तुला दिला ?

**सीता :** फुलांचा सुगन्ध मातीला लागला मायबाप.

**गिरजा :** रामजी शिलेदाराची अर्धांगी शोभतेस खरी. पण जगाची नजर मात्र काही चमत्कारिकच ! –

**पद : (चाल०—मरजाउंगी बिना देखे०)**
**अवमानिती गुणा डोळे विषारी हे ॥**
**सारि दुनिया फिरे का नजर फिरे ॥ गुणा० ॥**
**भाव नवा हा धर्म सुमनांचा ।**
**कधिं प्रेमां सु-मन तें लव ना फिरे ॥ गुणा० ॥**
**सौंदर्य बाह्य तरुणीचे भुलवि नजर ती ।**
**चारुशील वसे अंतरीं जणु तिखट कदर ती ।**
**दगड देव उरी जीव जिता धरिती दुरी ।**
**'' शिवशिल दूरदूर '' कटुभाषी हृदयीं सुरी ॥ गुणा० ॥**

**विठु :** (मार. ला) चल दे पावती लिहून.

**गावबा :** का दाखऊ थरकत घोडा भडकत निशाण.

**मार० :** ए गावबा, पाँव पडू, पाँव पडू. ए हिकनाथजी, तू लई साँगला बॉमनं. पाँव पडू. कैं बोल्याचाल्या ते मणमा नही गाखशो जी हाँ. ए बेवाग छे. बेवागमा खट्टी मिट्टी बात शाम्बळवीज जोईए– मे जाऊ ?

**गावबा :** आणि पावती कोण तुझा बाप देणार ?

**मार :** अगे इसा पाँती पाँती काय कत्ते ? काले सवागे दुकानमाथी भेजून देते.–कई इश्वास बिश्वास ?

**विठु :** तुमच्यावर विश्वास ? मग सापावर तरी का नसावा ?

**गावबा :** चल हो पुढं. का करू थोतरीची बोतरी.

**मार० :** अगे म्हागो लाढीजी, थागा व्हाला बचीगियो रे म्हागा बालाजी ! [ जाऊ लागतो, तोच आत " किधर रेहता है सरदार इकनाथ " असा जोरकस शब्द ऐकू येतो. मारवाडी घाबरतो. " अगे पिथान पिथान, मगी गियोरे बाबा, पिथान! " असे ओरडत जातो. गावबा त्याच्या मागोमाग जातो. ]

(निशाणाचा भाला घेतलेला आरब स्वार प्र. क्र.)

**स्वार :** किधर है इकनाथ सरदार ? [विठु बोटाने दाखवतो] यह आदमी इकनाथ सरदार ? पागल, क्या खूब मजाक मचाते हो ? आज बडी फजरसे पैठणका तमाम मोहल्ला मोहल्ला धूमधूमके धूण्ड रहा हूं कोईभी शक्स सरदारका पता नहि बदलाती. क्या यह पैठाण है, या पागलखाना ?

**एक :** ऐ नादान, बक्‌वा बिलफेल बन्द कर. जिस शक्सको सरदार इकनाथ केहलाते है, उसीके सामनेही तू खडा है. बोल, क्या तेरा बयान ? कहांसे आया ?

**स्वार :** बडी ताजूबकी बात ? इकनाथजीको इक दो दफा मैने दौलताबादमें देखाथा. वाहवा, कैसा बडा उमदा अमीर ! उसीका नूर देखतेही दिल आराम होता था ! आप मुझे कंगाल फकीर दिखते हो.

**एक :** फकिरी पाया तो क्या हुवा ?

**पद :** (इस तन धनकी)
**अल्ला रखेगा वैसाही रहेना ।**
**मौला रखेगा वैसाही रहेना ।।धृ०।।**
**कुइ दिन राजा बडा अधिकारी ।**
**एक दिन हुआ कंगाल भिकारी ।। १ ।।**
**एका जनार्दनि करत कर तारी ।**
**गाफिल, क्यंव करता मगरूरी ।। २ ।।**

**स्वार :** बडा अवलिया जनार्दन दिवानजीका नाम ? कुसुर माफ, सरदार, कुसुर माफ ! मय आपके दिलकूं रंज खीचा हूं. मुझे माफ हो.

**एक :** माफ भाई माफ. क्या तू दौलताबादसे आया ?

**स्वार :** शेहेन्शा मूर्तुजा निजामशहाके खास मोर्तबकी यह थैली, दिवाण अवलिया जनार्दनजीने, आप हुजूर के खिदमतमे सुपूर्द करनेके वास्ते ए बन्देको हुक्क फर्माया है. थैलीमे तीस हज्जारके रोखे रख्खे है. गिन्के लेना, और बन्देकू फौरन वापस जानेकी ताबिल देना.

(सलाम करून जातो)

**एक :** (थैली मस्तकाला लावतो) काय चमत्कार आहे या लक्ष्मीचा. हिच्यासाठी जे जीव टाकतात, त्यांच्याकडं ही ढुंकूनसुद्धा बघत नाही. अन् जे हिचा संन्यास करतात त्यांच्या पायाशी ही अशी लोळण घेत येते. जडमूढ जीवांच्या पाषाण हृदयातनं माणुसकीचा पाट फोडण्यासाठी आम्ही दारिद्र्याचं कवच पांघरलं. मनोवृक्षावर मोहाचं मोहोळ बाजू नये, म्हणून या विठ्ठलवाड्यात वस्ती केली. तरीदिखील या लक्ष्मीची मोहिनी काही आमची पाठ सोडीत नाही.

**गिरजा :** या मोहिनीला आपला नाद चांगलाच लागलेला दिसतो. आमच्या दरिद्री संसाराचं वैभव या सवतीला पाहावंत नाहीसं दिसंत !

**अभंग**

**या गरीबिच्या संसाराचें कोण मोल देई ।।**
**कोण मोल देईव बाई कोण तोल देई ।। धृ० ।।**
**कोण्डियाचा गोड माण्डा । समाधान हातीं खाण्डा ।**
**स्नेहभाव या ब्रम्हाण्डा । व्यापुनिया राही ।। १ ।।**
**आप्त बन्धु सगळी दुनिया । भेदभाव गेला विलया ।**
**नजर जाइ तिकडे माया । पान्हवती गाय ।। २ ।।**
**श्रीमन्तिचा हेवादावा । प्रेमामधें उजवा डावा ।**
**नीच थोर असला कावा । ठाऊकाच नाही ।। ३ ।।**
**जनार्दन जनता सारी । एकनाथ हरि कंसारी**
**पूजि सतत या संसारीं । रमाकान्त पाय ।। ४ ।।**

**एक :** विठोबा, आजच्या आज ही थैली सुभेदाराकडं पाठवून दा नि त्याना म्हणावं गेल्या लढाईत जखमी झालेल्याना नि ठार झालेल्यांच्या वारसाना ही रक्कम वाटून द्या. सरकारचा पैसा सरकारी कामालाच खर्ची पडला पाहिजे.

**सीता :** आमच्याकडं मात्र त्यातली दिडकी येता कामा नाही बरं ! आम्ही घेणार नाही.

**विठू :** त्याची वासलाद मी लावतो. ही थैली घेऊन तू चल पाहू घरी देवदर्शन घेऊन आलोच मी पाठोपाठ.

[गिरजा, सीता, विठू जातात.]

**एक :** (स्व.) झाला हा प्रकार ठीकच झाला. आत्मोद्धार किंवा समाजोद्धार साधायला सर्वस्व त्यागासारखं दुसरं अभेद्य कवच नाही. आता मात्र मी खराखुरा सरदार बनलो. आत्मबल नि

वैराग्य या ढाल समशेरीनंच हिन्दूंच्या कठोर मनोवृत्ती व हल्ले चढवून, मला या अनाथ अस्पृश्यांच्या उद्धाराचा मार्ग चोखाळला पाहिजे. जन्माच्या सबबीवर मूठभर मगजबाज लोकानी. इतर हजारो जातीना क्षुद्र लेखावं, त्याना तिटकाऱ्यानं वागण्यातच आपल्या श्रेष्ठपणाचं मण्डन करावं, अडीच तीन कोट लोकांना अस्पृश्य मानून त्यांना मसणवटीच्या राहणीत डाम्बावं, अन् हे सगळे अत्याचार न् जुलुम, धर्माच्या नावावर बिनअटकाव चालू रहावे, या धडधडीत अन्यायाविरूद्ध माझ्या रक्ताचा थेम्ब न थेम्ब बण्डासाठी सणाणत आहे.

(जाऊ लागतो तोंच म्हादबा दवकत भीत प्र० क०)

**एक० :** कोण ? म्हादबा पाटील ?

**म्हादबा :** (पायावर डोके ठेवीत.) म्याच नव्हका त्यो पापी ? द्येवा, म्या लई वंगाळ काम केलाया. लई पापी.

**एक० :** पापी ? म्हादबा, पापी कोण नाही ? आपण सगळे पापी. आम्ही पापी. ही दख्खन पापी. आमचा चालू धर्म पापी. फार काय पण म्हादबा, पाण्ढरपेश्यांच्या आचार-विचारांत माणूसघाणेपणाची कीड घालणारा देवसुद्धा मी पापीच समजतो.

**म्हादबा :** असत्याल. पुन म्हाराज, इण्टू एसकरला भटांच्या चितावणीनं हकनाक जखमी करनारा ह्यो म्हाद्या समद्याहून लइ वंगाळ. लइ पापी.

**एक० :** दोष तुमचा नाही न् कोणाचाहि नाही. दोष काळाचा आहे. कुठं तरी काहीतरी चुकलंय. माणसाशी माणसासारखं वागण्याइतकीहि माणुसकी ज्या धर्मात नाही, तो आचन्द्रार्क आम्हाला गुलामगिरीतच पिचवणार खास, हिंदु समाजाचे धुरीण म्हणवणारेच जिथं माणूसकीला पारखे झाले, तिथं तुम्हांला काय दोष द्यायचा ?

**म्हादबा :** न्हाय म्हाराज. समदा दोष माजाच. आन् त्येचं पराचित पुन् म्या भोगलाया, अक्षी निरोती ग्येन्बाच्या या माळेच्यान्—

**एक० :** (चपापून) काय ? तुमच्या गळ्यात माळ ? तुम्ही माळकरी ?

**म्हादबा :** व्हइन्हाय, माळ घातलीया. चाळ भान्दुन टाळ घेऊन भजान करतुया. ग्यानबा द्येवाचं, णामदेवाचं अभांग गात पण्डरीला दिण्डी घ्येऊनशान दरसाल जातोया, अन्—

**एक० :** अरे अरे ! विठू पण माळकरीच. त्याला जखमी करायचा अविचार तुमच्या हातून कसा झाला म्हादबा ?

**म्हादबा :** बामनानी अक्षी चिथावलंच न्हव जनू !

**एक० :** पण तुम्ही त्यांच्या चिथावणीला कसे बळी पडला म्हादबा ! भिक्षुकी धर्मानं समाजाची घडी बिघडली, धर्माच्या खऱ्या अर्थाचा अनर्थ केला, अन् सगळीकडे माणूसघाणीचा उकिरडा फैलावला. म्हणून ज्ञानेश्वर महाराजानी भावार्थ–दीपिका पाजळून, भागवत धर्माचा पाया याच विठ्ठलवाड्यात घातला ना ? आपण माणसं सारी एका देवाची लेकरं. त्यात कोणी उच्च नाही,

नीच नाही. कुणीकुणाचा विटाळ मानू नये. सगळ्याशी बंधूप्रेमानं वागावं. मोक्षाचा अधिकार सगळ्याना सारखा. ही आपल्या भागवत धर्माची शिकवण, ही तुळशीची माळ, रात्रंदिवस तुमच्या मनावर बिंबवीत असता, विटोबा वेसकर,–जातीनं महार–म्हणून तुम्ही त्याच्यावर हात टाकावा ? मागासलेल्या स्पृश्यास्पृश्य ब्राह्मणेतर समाजांच्या उद्धारासाठीच भागवत धर्माची ध्वजा फडकली ना म्हादबा ? अन् तुम्ही मराठे बंधूच जर असा आचरटपणा करू लागला, तर आळंदीला समाधिसुखात डुलणाऱ्या ज्ञानोबारायाना काय वाटेल ब्रं ? त्यांच्या काळजाला चटका बसेल. त्यांचा समाधि–भंग होईल. निवृत्ति देवांची वृत्ति कावरीबावरी होईल. मोक्षसोपान चढलेले सोपानदेव जागच्याजागी थबकतील. मुक्ताबाई ढळढळा रडू लागतील. नामदेवरायांच्या अखंड टाळाला खंड पडेल. दौलताबादला जनार्दन स्वामी उपोषणं करतील, अन् सारी दुनिया या एकनाथाच्या तोण्डाला काळं फासून, म्हादबा, माझ्या तोण्डात माती किहो घालतील.

**म्हादबा :** (शोकमग्न, पाय धरतो.) या म्हाद्याच्या त्वाण्डात माती पडो. पुन द्येवा, माज्या निरोती गेन्बा न् स्वापान मुकताई णामद्यावाच्या नगरं नग इन्दुबा ! म्हाराज, या म्हाद्याला द्या सोडून शिम्भार ख्याटरं हाना, पन् या पाप्याला पावन करा जी मायबाप.

**एक० :** (त्याला उठवून पोटाशी धरतो) उठा उठा महादबा. पश्चातापासारखं दुसरं प्रायश्चित नाही. तुम्हा मराठे बांधवांच्या मनावर न् मनगटावर तर साऱ्या दख्खनची मदार! आपले महार-मांगादि अस्पृश्य बान्धव तुमच्या इतकेच पराक्रमी, धाडसी न् मनानं पाक प्रामाणिक आहेत. त्यांच्याशी तुम्ही मर्द मराठे जर एकदिलानं वागाल, थोर सरदारी दिलानं त्यांना आपलेसे कराल, तर तुमच्या संघटित सामर्थ्याच्या जोरावर ज्ञानबांच्या भागवत धर्माचा भगवा झेंडा त्रिखण्ड दुनियेवर डौलाने फडकू लागेल. इतकंच काय, पण महादबा, मनातलं एक गुपित सांगतो, भावी धर्मराज्याची आशा, तुमच्या जातभाईंच्या मर्दुमकी भोवतीच घुटमळत असलेली मला स्पष्ट दिसत आहे.

**अभंग**

**मराष्ट्रीं मऱ्हाठे प्रबळ होतील ।**
**अवतार घेतील शंभूदेव ।। १ ।।**
**देव देवस्थानें संस्थांना सकळा ।**
**मऱ्हाठ्यांचा मेळा उद्धरील ।। २।।**
**कृष्णा कोयनेचे खोरे उफाळेल ।**
**दक्षिण उजाळेल स्वराज्यानें ।। ३।।**
**उभा हिंदुस्थान मऱ्हाठ्यांच्या धाकें ।**
**वांकवील नाकें आदराने ।। ४ ।।**
**ध्यानी मनिं स्वप्नीं नाचतें भाकीत ।**
**ठेवा हे गुपीत मनामाजीं ।। ५ ।।**

(पुराणाची पोथी घेऊन गिरजाबाई प्र. करते)

**गिरजा :** शहरात पुराणाला जायची नाही का वेळी झाली ?

**एक :** खरचं. हे माझ्या लक्षातच राहिलं नाही. (पोथी घेऊन) म्हादबा येता का आमचं बालबोध भागवत ऐकायला ?

**म्हादबा :** लइ आनंदानं, द्येवा, लइ आनंदानं.

**गिरजा :** अगबाई, म्हादबा पाटील का हे ? ओळखूसुद्धा आले नाहीत. काय तुमची दशा ही!

**म्हादबा :** मातुसरी दण्डवत घ्यावा. (साष्टांग नमस्कार घालतो.)

**गिरजा :** उठा बरं म्हादबा, उठा. पुराण आटपल्यावर आमच्याकडंच फराळाला या. विठूबाबांना पण भेटा. ते तुमची सारखी आठवण करीत असतात.

**एक० :** बरं. मी आता पुढं होतो. (जातो.)

**गिरजा :** काही ही संकोच बाळगू नका बरं. अहो आपण सगळी एकाच मातीची मडकी. काही कच्ची, काही पक्की. इतकचं !

**म्हादबा :** काय सांगू मातुसरी, माझ्या काळजामंदी औताची पोखरण पडलिया. शरमेनं म्या मेलू पघा. इण्टुबा देवमाणूस. लाखामन्दि न्हाय असा गवसायचा, न्हाय गवसायचा. पुन् म्या डुकार, आक्षी रानडुकार. आतचि म्या घरातून् आलो. माजी आवा न् समदी कचीबच्ची सीताबाय नि इण्टुबाला मायन्दाळ दुवा देत्याति. मला पकडून दौलताबादला नेलाया, तवापून या पैठणाच्या एकाबि भटानं न्हाय कवा इचारपूस केली, का म्हादबाची आवा न कच्चीबच्ची म्येली का जिती हायती ! पुनै त्या इण्टुबाच्या सुनबाय सीतामावलीनं-बये तू हाईस तरी कोन ? इण्टलाची रकमाय् का रामचिन्दराची सीतामाय ?–तिनं तडाक् माज्या घरी जाऊनशान माझ्या आवाचं डोळं पुसलं, धीर दिलाया, पोराबाळाना पोटाशी धरलाय, आन्-आन्–मातुसरी काय बोलु ! इण्टु एसकरानं डाळदाना लाकुडफाटा दुधदुभतं घरपोच पाठवूनशान, गेलं सा म्हइनं माझी कच्चीबच्ची वाचवलीया बया.

**गिरजा :** म्हादबा पाटील, रडू नका. डोळे पुसा, अहो माणसानी नाही माणसांच्या उपेगी पडायचं तर कुणी पडायचं तर कुणी पडायचं ?–जा आता पुराणाला न् मुलाबाळाना घेऊनच या फराळाला याल नं ? (जाते.)

**म्हादबा :** (स्व.) थू:त तुझ्या जिनगानीला म्हाद्या ! म्हार म्हून ज्येचं तू टक्कुरं फोडलंस, त्येनंच तुझ्या कच्चाबच्याना आनपानी द्याव ? काय, हाय काय यो चिमित्कार ? इण्टुबा, इण्टू एसकरा, आऽऽर तू हाइस तरी कोनरं बाबा ? इण्टु म्हार ? न्हाय न्हाय. तु इण्टु म्हार न्हाईस. राजाऽऽ तू पण्डरीचा इण्टुबाच हाइस.–अदुगर तुज्या पायावर डोई घासतो न् मग यकनाथ द्येवाच्या भागवताला जातो. (जातो).

## अंक २ रा — प्रवेश २ रा

[**स्थळ, स्थिति व पात्रे :** हिरकणी गायिकेच्या माडीवर नाच गाणे चालू आहे. भडाग्नि, चव्हाटे, भम्पकराव, दुलिचन्द मारवाडी, ममदूशेट बसले आहेत. मधोमध चांदीचे तबक ठेवले असून त्यात मधून मधून दौलतजाद्याचे रुपये खणाणत आहेत. हिरकणी खालील लावणी गात, हावभावासह नाचत आहे.–अर्धे अधिक गाणे झाल्यावर केरोबा उठतो. ममदूशेट व दुलिचन्द " काहो. मध्यन्तरी उठलातसे ? बसा " अशा अर्थाची खूण त्याला करतात, कान–जानव्याची खूण करून तो जातो. गाणे नाच चालूच असतो.]

**हिरकणी :**

**लावणी**
**प्रेमाचि गत न्यारी । गत न्यारि ॥ धृ० ॥**
**दोराविण वावडी उडे अन्तराळि ।**
**सुराविण संगित धुमवी गळि ।**
**वेलाविण टवटवते नवकळि ।**
**अशि हि जादुगारी ॥ १ ॥**
**धनाविण रसरसते श्रीमन्ति ।**
**बोलाविण खुले फुले रसवन्ति ।**
**तोल ना मोल सदा यशवन्ति ।**
**अशि हि सरदारी ॥ २ ॥**
**प्रेमाचा सौदा नसे बाजारिं ।**
**मानि ना भाऊ बाप अधिकारि ।**
**सतार ती दिसे, असे एकतारि ।**
**दिलाचि दिलदारी ॥ ३ ॥**

[गाणे चालले असतानाच बाहेरून " धावा हो धावा-लवकर कोणी तरी धावा." अशी सीतेची किंकाळी ऐकू येते.]

**हिरकणी :** (चपापून) अगबाई ? कुणाची ही किंकाळी ! काही तरी दगा दिसतो.

[ती गडबडीने जाऊ पाहते. " कुत्रं केकाटलं–खटा-याचं चाक किकाटलं–मांजरीनं म्यौं म्यौं केलं–जाऊ द्या बसा.–मरू द्या.–एक जिवनपूरी छेडा.–वाटेल तर भैरवी होऊ द्या असे म्हणून मण्डळी तिला अडवतात. नाच गाणे चालू होते. इतक्यात पुन्हा तीच किंकाळी ऐकू येते.]

**हिरकणी :** ही पहा पुन्हा किंकाळी ! दगाच आहे खास. मला जाऊन पाहिलंच पाहिजे. (गडबडीनें जाते.)

[दुलीचन्द, ममदू वगैरे निराशेचे सुस्कारे सोडीत जातात.]

**चव्हाटे :** रांडेच्या केऱ्याने तर अतिप्रसंग नाही ना केला ?

**भडाग्नि :** हा गाढव नेहमी असाच गोन्धळ घालतो.

**भम्पक :** काही तरी गोंधळच दिसतोय. आपल्यालाच जाऊन प्रकरण निपटलं पाहिजे. चला चला.

**चव्हाटे :** चला, कर्मण्ये वाधिकारस्ते मा फलेषु कदाचन. (सर्व जातात.)

[विस्कटलेले केस मोकळे सुटले आहेत व दम टाकीत आहे, अशा सीतेला घेऊन हिरकणी येते. तिचे कपडे झाडते व बुचडा बांधते.]

**हिरकणी :** माझ्या बगिच्यात येऊन असला हलकटपणा करायला या मेल्याला लाज कशी वाटली नाही.—सीताबाई, तुला काही दुखापत तर नाही ना झाली ?—चांडाळ मेले गावगुंड ! केऱ्या कळसुत्र्या तुझ्या अंगावर हात टाकण्याइतका पाजी असेल, असं नव्हतं बाई मला वाटलं ! मेले देवाचे बडवे म्हणवतात न् असली बदकर्म करतात !—पण तुला कुठं लागलं नाही ना ?

**सीता :** थोडा केसांना हिसडा बसला इतकंच. हिराबाई. ऐन वेळेला तुम्ही धावत आलात, म्हणून बरं झालं बरं. नाहीतर माझ्या हातानं आज घात झाला असता.

**हिरकणी :** तुझ्या हातनं कसचा ? त्याच मेल्यानी केला असता. त्यानी पाळत ठेऊन हल्ला केला. तरी म्हटलं, मधीच जलशातनं उठून हा गेला कुठं ? मेले देवाचे पुजारी म्हणवतात—[केरोबाचे कान पकडून गावबा प्र. क्र.]

**गावबा :** अन् गावाचे शेतखाने उपसतात. काय बडवे महाशय, देवाच्या काकड आरतीची वेळ न् इकडं कुठं अक्कल पाजळायला चुकलात ? चोरानो, पुजारी म्हणून मिरवता. अस्पृश्याना अन्नदान केलं म्हणून एकनाथांना महार म्हणता. सावकारांकडून त्यांची अब्रू घेता. घरदार लुटवून माणसातनं उठवता. अन् इकडं गोरगरीब पाक पोरीच्या अब्रूवर धाड घालता ? बदमाष ?

**केरोबा :** गावबा, कान सोड. मग करतो सगळा खुलासा.

**गावबा :** आधी आठवली अवदसा नि आता करतोय खुलासा.

**हिरकणी :** माझ्या बागेत एकटी गाठून, सीताबाईसारख्या आश्राप अनाथ तरूणीच्या अंगावर हात टाकता ? केरोबा, मेल्या तू ब्राम्हण का मांग ?

**गावबा :** सीताबाई, बोल. या बडव्याची हाडं उभी चिरू, का आडवी ठेचू ?

**सीता :** गावबा, त्याला सोडून दे.

**गावबा :** सोडून दे ? सोडून देण्यासाठी का मी या देवळी गाढवाला पकडलं ? तुझ्या शीलावर यानी हल्ला करावा—

**सीता :** हल्ला ? अरे माझ्या शीलावर हल्ला करायला कुणाची माय व्याली आहे गावबा. ही सीता म्हणजे पांढरपेशाच्या परसातलं लाजाळूचं झाड का दावणीची गाय समजतोस ? म्हारवाड्यातल्या विठू वेसकराची सून आहे मी सून. लढाईत मर्दाच्या मरणांनं मरून देवाघरी गेलेल्या रामजी शिलेदाराची रण्डकी आवा आहे, मी रण्डकी आवा. खाली बागेत फुलं तोडताना,

गैरसावध पाहून यानी माझ्या आंगावर हात टाकला. पण त्यापुढं याची मजल जाती तर– (निरीतून कट्यार काढते) पाहिलीस ? पाहिलीस ही ?–यावर माझ्या शिलेदारचं नाव खोदून नगराहून या रण्डकीला आन्दण आली आहे आन्दण. (कट्यार कपाळाला लावून तिचे चुम्बन घेते) या महालक्ष्मीनं या रेड्याच्या काळजाचा ठाव पाहिला असता.

**गावबा :** हिरकणीबाई, कशी आहे सीता ? आहे ना जागती ज्योत भगवग्दीता ?

**सीता :** राजे महाराजांच्या महाराण्यांवर बलात्कार होतील, पण महारणीवर हात टाकणा-यांच्या धरातले कुंकवाचे करण्डे पालथे पडतील.

**गावबा :** ऐकलं का भूदेव ? (हिरकणीला) आपण तर भूदेवी. आपल्या मळवटाला नाही कशाची भीति. थरकत घोडा, भडकत निशाण.

**सीता :** माझी किंकाळी ऐकूण हिराबाई जर चटकन् धावल्या नसत्या, तर गावबा, माझी एक गरीब बहीण आज फुकट रण्डकी होती बरं. दे त्याला सोडून. पाप्यावर आपण नेहमी दयाच केली पाहीजे.

**गावबा :** दया केल्याचं दुःख नाही, पण बडवा सोकवतो, त्याची काय वाट ?

**केरोबा :** त्याची वाट आता तडक–घराकडं–घराकडं–घराकडं !

**गावबा :** घर तर आहेच हो. पण हिराबाईच्या माडीवर थोडा जलसा तर होऊ द्या. मध्याशी अर्ध्याच मैफलीतून उठलात. अर्धी बैठक मी पुरी करतो.– हिरकणीबाई, ऐका. सीता तू पण पहा. या तम्बो-याच्या खुण्ट्या पिरगाळून भैरव रागाचा मी कसा उद्धार करतो तो ! [जोराने कान पिळतो, तो ओरडतो] टँव् टँव् टँव्ऽऽ–अझून झार नाही लागत नीटशी. भोपळा फोडून षड्ज ताणला पाहिजे. (केरोबा " कान सोड " ओरडतो) जण्हारी बिघडली वाटतं ? हिराबाई, जरा पायातली चप्पल काढून, नाक–बोण्डीची जव्हारी जरा घासून दुरुस्त करा पाहू. (करोबा मोठ्यानें ओरडतो.) हाऽऽ ! याला म्हणतात दरबारी कानडा. का लागला का नाही तम्बोरा भरघोस सुरात ?

**सीता :** जाऊ दे रे गावबा, सोड त्याला. असल्या भल्या माणसाची अवहेलना करणं चांगलं का ? सोड त्याला.

**गावबा :** [सोडतो] जशी तुझी मर्जी, ए मानवाच्या काट्या, जा. देवळात बसून रोज अडाण्यांचा उद्धार करतोस. आज वेश्येच्या माडीवर एका म्हारणीनं तुला मोक्ष दिला. चले जाव. का दाखऊ थरकत घोडा, भडकत निशाण.

(केरोबा किंचाळत जातो.)

**सीता :** गावबा, तूरे इकडं कसा आलास ?

**गावबा :** अग, मी या बडव्याच्या पाळतीवर गेले सहा महिने आहे.—गावडुकरं धाणखाते-यावरच हटकून सापडायची. म्हणून आज मी हिरकणीच्या माडीनजीकच पाळतीला राहिलो.

**हिरकणी :** घाणखातेरं ? गावबा काय म्हणतोस तू ?

**गावबा :** मी ? वेडा, वेड्याचं काय ऐकता ?

**हिरकणी :** वेडा ? मी तुझ्या वेडातच वेदान्त असतो.

**गावबा :** वेदान्ती बनले वेडे, म्हणून माझ्या वेडात वेदान्त रडे, हिरकणीबाई–हिराबाई–हिराजान, सगळे समर्थ तुमचे श्वान. वा ! नावाप्रमाणं तुम्ही चमकदार हिरकणी, भेटेल त्याला पाजाल पाणी मला सगळ्यांनी वेडा ठरवलाच आहे. आहेच मी वेडा पण हिराबाई, तुमच्या हिरामहालाची ही माडी, म्हणजे या असल्या हलकट पाजी गावगुण्डांच्या गुंडगिरीचा अड्डा, न् पैठण शहराच्या कचरपट्टीचा पेटारा असावा ? फार शरमेची गोष्ट आहे बुवा. पहा विचार करा. मी काय ? ढिल्या डोक्याचा न् ठिसूळ मेन्दूचा. अधिक बोलण्याची माझी लायकी नाही. कारण गावबा म्हणजे पैठणचा सार्वजनिक गाढव ठरलेलाच आहे. थरकत घोडा, भडकत निशाण.

[जातो]

**हिर० :** (खेदयुक्त चिंतन) गावडुकरांचं खातेरं––गुण्डगिरीचा अड्डा–कचर––पट्टीचा पेटारा––

**सीता० :** हिराबाई, त्या वेड्या गावबाचा बोल काय इतका मनावर घेता ? कुठं काय बोलावं नि कसं वागावं, हे किनै त्याला मुळीच कळत नाही. तो अगदी वेडा आहे बरं, अगदी वेडा.

**हिर० :** सीताबाई, शहाण्याना जरी हा वेडा दिसला, तरी शेकडो वेड्याना हा शहाणा करील. या वेड्याने आज मला शहाणी केली. माझ्या जातीचं नि जन्माचं पाप त्यानी मला दाखवलं.

**सीता० :** हिराबाई, गावबासाठी मी तुमच्या पाया पडते. तुमच्या मनाचा मोठेपणा––

**हिर० :** मनाचा मोठेपणा ! पण, जनांच्या नीचपणाला त्याचा आम्हाला बिनशर्त कसा बळी द्यावा लागतो, हे गायक समाजात जन्म घेतल्याशिवाय नाही कुणाला उमगायचं सीताबाई. आमच्या दिलाच्या बगिच्यात चारुशीलाच्या कोमळ पाकळ्यानी डवरलेली नि सद्वासनेच्या सुगंधानं दरवळलेली सारी फुलं, दुनियेच्या कामशांतीची प्रेतं शृंगारतात. थोरथोर कविजनानी मुक्तकंठाने गायलेल्या स्त्रीजातीच्या चारुशीलाच्या रखरखीत निखाऱ्यानंच या आमच्या ऐश्वर्याचा दिमाख रसरसलेला आहे. . .हे ऐश्वर्य . . . हा दिमाख. . .ही संपत्ति

**सीता० :** काय करणार तुम्ही, हिराबाई ?

**हिर० :** आत्ता आत्ता–जाळून भस्म करणार !

**सीता० :** नि त्याचं पाप माझ्या नि गावबाच्या माथ्यावर ?

**हिर० :** नाही. सीते, पांढरपेशांनी अस्पृश्य म्हणून तुम्हाला मसणवटीच्या रहाणीत डांबलं, तरी पतिपत्नि–प्रेम, चारुशीलाची जोपासना, नीतीचा विकास यांना तरी तुम्ही पारखे झाला नाहीत. म्हारवाड्यातसुद्धा कदरबाज पतिव्रता नि शीलासाठी प्राण वेचणारी तुझ्यासारखी स्त्रीरत्नं निपजतात ना ? रामजी शिलेदाराच्या नुसत्या नावासाठी–

(सीता आदराने आकाशाला नमस्कार करते.)

–सीताबाई, कठोर वैधव्याचं सतीचं वाण किती आनंदानं नि अभिमानानं तू पाळतेस, हे पाहिलं म्हंजे मला आमच्या जिण्याची अगदी शिसारी येते. असलं जिणं जगण्यापेक्षा–

**सीता०** : काय करणार ?

**हिर०** : काय करणार ? काय करणार ? या पापी ऐश्वर्याची आत्ताच्या आत्ता आग लावून राख करणार.

(आंत धावत जाते नि पेटलेला काकडा आणते. तो पहाताच सीता धाबरते नि मोठमोठ्याने आरडाओरडा करते. " धावा हो धावा–हिराबाई घराला आग लावताहेत– आग आग–याना कोणीतरी आवरा हो–धावा हो धावा. " एकदम गावबा येतो. हिसकाहिसकी करून हिरकणीच्या हातातला काकडा विझवतो नि काढून घेतो. पाठोपाठ एकनाथ येतो.)

**एकनाथ** : मुली काय चालवलं आहेस हे.

**हिर** : माझ्या पातकांची राखरांगोळी.

**एकनाथ** : पातकांची राखरांगोळी धरादाराला आग लावून होत नसते.

**हिर** : महाराज, महाराज, या अभागणीला वाचवा. पावन करा. सन्मार्गाची वाट दाखवा.

**एकनाथ** : तुला तुझा हा पातकी संसार जाळायचा आहे ना ? अगत्य जाळ,

**पद.** : (चाल.—–दत्तगुरू दत्तगुरू) राग परज.

**जाळ संसार हा टाळ घेऊनि करीं ।**
**चाळ पदिं बांधुनी माळ गळिं घाल ही ॥ धृ० ॥**

**चाळ जाळील तव पापराशी अखिल ।**
**टाळ हा संचिता लावि टाळा ॥**

**माळ ही माणसां शिवणी माणूसकी ।**
**भागवत धर्म हा ज्ञानदेवें दिला ॥ १ ॥**

## अंक दुसरा समाप्त

## अंक ३ रा — प्रवेश १ ला

[ पाण्ढरे शुभ्र पातळ नेसलेली, केस मोकळे कपाळावर चन्दनी मुद्रा, गळ्यात तुळशीची माळ, उजव्या हातात चिपळ्या, डाव्या हातात लहानसे भगवे निशाण, पायात चाळ अशी हिरकणी एकतानतेने भजन गात नाचत प्र.क.]

**हिरकणी—**

[पद.]

**असा कसा देवाचा देव बाई ठकडा ॥**
**देव एका पायाने लंगडा ॥ ग बाई एका० ॥ घृ० ॥**
**गवळ्याघरिं जातो । दहिदुध खातो ।**
**करि दह्या दुधाचा रबडा । ग बाई० ॥ १ ॥**
**शिंकेच तोड्तो । मडकेच फोड्तो ॥**
**पाडि लोणि ताकाचा सडा, सडा ॥ ग बाई० ॥ २ ॥**
**वाळवण्टिं जातो । कीर्तन करतो ॥**
**घेतो साधुसन्तासी झगडा ॥ ग बाई० ॥ ३ ॥**
**एका जनार्दनी भिक्षा वाढा बाई ॥**
**देव एकनाथाचा बचडा ॥ ग बाई० ॥ ४ ॥**

**विठू :** (प्र. क.) ही कोण ? —देवी, विठू वेसकराचा दण्डवत घ्यावा, (साष्टांग नमस्कार घालतो. ती डोळे मिटून हात जोडते व '' पुण्डलीक वरदा हाऽऽरिविठ्ठल. जनार्दन एकनाथ '' म्हणते.)——माझ्या लंगड्या भगवन्ताच्या प्रेमासाठी विषचा पेला आनन्दानं हासत हासत पिणारी साध्वी मिरा——

**हिरकणी :** नाही देवा, व्यभिचार—पंकात रुतलेल्या गायिका गार्यीच्या उद्धारासाठी, गोसावी बनलेली, एकनाथांच्या पायीची पैजार हिरा.

**विठू :** कोण? आपण हिरकणीबाई ?

**हिरकणी :** हिरकणी ! अनीतीच्या तकलादी वैभवाला भाळलेली ती हिरकण्णी, विठ्ठल नामाची हिरकणी चाऊन मागेच मेली. माझा गायिका भगिनीनी, नीतीचा दीप पाजळून, विवाहाच्या राजमार्गानं, प्रचंड थाटून परमार्थ साधावा अन् पापी गोमन्तकाचा पुण्यप्रभावी स्यमन्तक करून दाखवावा, म्हणून गळ्यात ही ज्ञानदेवाची माळ घालून, दुनियेपाशी माणुसकीची भीक मागणारी भिकारीण हिरा तुमच्यापुढे उभी आहे. देवा घालता का या भिकारीणीला थोडी भीक?

**विठू० :** हिराबाय, तुझ्यासारख्या भाग्यवंत भिकारणीला हा हतभागी काय आपल्या कर्माची भीक घालणार !

**हिरा० :** मला तुमच्या कर्माचीच भीक पाहिजे. पैठणभर लाळीच्या रोगानं ढेरं पटापट मरत आहेत--

**विठू० :** नि पडी उचलून शहरसफाई करायला आमची महार मंडळी साफ नकार देताहेत. या पांढरपेशानी काय आम्हाला असं माणुसकीनं आजवर वागवलं, तर त्यांची ढोरं ओढायला आम्ही जावं, असं त्याचं म्हणणं. अडवणूक म्हणजे सोडवणूक नव्हे, असं परोपरीनं त्यानां पटवण्याची मी खूप खटपट केली. पण त्यांचा आपला एकच हेका. काय करावं, सुचत नाही.

**हिरा० :** म्हारवाड्यांच्या बिनमोल स्वार्थत्यागानीच गावठाणांचे कसबे, कसब्यांचे गाव नि गावांची शहरे झाली नि आजवर टिकली. जनतेच्या आरोग्यासाठी आजवर तुम्ही आपल्या देहमनाचा धुरोळा केलात. आत्ताचा प्रश्न सार्वजनिक आरोग्याचा आहे. ज्याना माणुसकीची ओळख नाही, अशाना आपणच माणसकीनं लाजवलं पाहिजे. शिवाय, काही झालं तरी आपण एका गावचे गावकरी. संकटाच्या वेळीं सगळी भाडणं नि भेद विसरून, एकमेकांच्या उपयोगी पडण्यातच आपल्या भागवत धर्माचं सार्थक होणार आहे. चला, विचार कसला करता. चला मी येते तुमच्याबरोबर पडी उचलायला. सार्वजनिक संकटाच्या वेळी उच्च नीच भेद बाळगणं मोठं धोक्याचं आहे.

(सीता धावत गडबडीने येते)

**सीता :** मामाजी, अहो, इकडे असे विचार करीत काय बसला ? गावातली बातमी तरी आहे का ?

**विठू० :** आणखी काय भानगड झाली ?

**सीता ० :** पड्यांची परवड निपटायला एकनाथ महाराजसुद्धा धावले. पाठोपाठ श्रीखंड्या, गावबा, नि तो केरोबा बडवासुद्धा धावत गेला.

**विठू० :** हा विठ्या वेसकर जिवंत असता, माझ्या एकनाथ मायबापाला श्रमसाहास? प्राण देईन. (झपाट्याने निघून जातो. पाठोपाठ दोघी जातात)

(भडाग्नि चव्हाटे नि भम्पकराव बोलत येतात.)

**भडाग्नि :** आता टाळकं फिरण्याची वेळ आली! पैठण शहर म्हारवाडा बनलं नि म्हारवाड्याला पैठणचं माहात्म्य आलं! एकनाथाच्या पुराणाला राममंदिरात बंदी केली तर सगळं पैठण म्हारवाड्यातल्या विठ्ठलमंदिरात घुसू लागलं! छे! वैतागला जीव! हे प्रकार असेच चालू राहिले तर धर्माचं वाटोळं होऊन तुम्हा आम्हाला शेणगोमुत्राइतकीसुद्धा किंमत राहणार नाही.

**चव्हाटे :** राहणार नाही कसली ? अहो, राहिलीच नाही. भागवत धर्माच्या या नवीन बंडानं तुमच्या आमच्या बायकासुद्धा वेड्या बनल्या. नवऱ्याना गुंगारा देऊन, खुशाल एकनाथाची पुराणं ऐकायला जातात.

**भडाग्नि :** पायात चाळ नि हातात टाळ घेऊन, तुमच्या आमच्यापुढं ग्यान्बा एकनाथचे जलशे नाचवायचेच काय ते बाकी उरलं आहे.

**चव्हाटे :** विठ्ठल नामघोषाचाच महिमा वाढल्यामुळें, वैदिक क्रियाकर्मान्तरावरचा लोकांचा विश्वास अज्जिबात उडाला नि आमच्या पोटावर बिब्बा पडला. काय करावं, काही सुचत नाही.

**भम्पक :** मला विशेष संताप कशाचा आला असेल तर या एकनाथी खटपटीनं ब्राम्हण-भोजनाचा प्रघात बंद पडून, म्हारमांगादि भिकारड्याना सुग्रास अन्नदान सुरु झालं, याचा. जे हरामखोर पूर्वी आमच्या उष्ट्या खरकट्यासाठी कावळ्यासारखे जमायचे, ते राण्डलेक गावातली मेलेली डोरंसुद्धा ओढायला अळम्टळम् करतात ! आमच्या भोजनाच्या जन्मसिद्ध हक्कावर कुणी गदा आणील, तर त्याच्या नरडीचा मी घोट घेईन.

**चव्हाटे :** या पाजी एकनाथाचा काटा आपल्याला उखडलाच पाहिजे.

**भम्पक :** त्या विठ्यालाच चांगला ठेचून चेचून जमिनदोस्त केला पाहिजे.

**भडाग्नि :** जमीनदोस्त करायचा कुणी ? तुम्ही, मी का या चव्हाट्यानी ? दर्भ मंत्रून त्रिभुवनाची होळी करण्याचं आपलं तेज आता फक्त पुराणांतच पाहून घ्यावं.

**भम्पक :** त्या युगाची आठवण झाली की पुरणपोळ्यांच्या भरगच्च भोजनाचे उम्हासे येऊ लागतात. आहा! काय तो काल! काय ते युग! नि केवढा त्याचा महिमा! कालाय तस्मै नमः!

**चव्हाटे :** ' परस्पर पावणेतेरा ' एवढंच शस्त्र सध्या कलियुगात आपल्यापाशी उरलं आहे. पण ते सुद्धा या एकनाथानं अगदी बोथट पाडलं. महिन्यापूर्वी त्या गेन्या जन्या मांगाना, हे दोन काटे उखडण्यासाठी, पन्नास रुपये देऊन फितवण्याची थोडी का खटपट केली ? पण मेल्या मारल्या ते तयारच होत ना! राण्डलेक मांगसुद्धा अलिकडे सात्विकपणात आम्हाला लाजवू लागले आहेत.

**भम्पक :** (चिडून) त्या मांगांना म्हणावं, व्हा तुम्ही ब्राम्हण. आम्ही होतो मांग. रोख पैसे घेऊन माणसांचे खून पाडीत नाहीत ते मांग कसचे ? त्यापेक्षा आम्ही बरे!—त्या एक्यानं ब्राम्हणेतराना तर बगलेत मारलंच मारलं, पण पाहिलात ना आत्ताचा प्रकार ? त्या गोवेकरणी राण्डानाहि चिथावून पैठणातून पळवल्या.

**भडाग्नि :** या हिरकणीनं तर काय मिराबाईचं अवसान आणलंय. गळ्यात लाकडाची माळ अडकवून, हातात टाळ घेतलाय नि " सगळ्या गोवेकरणींनी लग्ने लावावी, शंछार थाटावा, धंदा बंद करावा, " असला उपदेश करीत गावोगाव ती भटकू लागली आहे. पैठणचा सारा आनंदी बाजार ओस पडला.

**भम्पक :** राज्यकर्ते तर विधर्मीच. पण परमेश्वरा, तुला हा अनाचार पाहवतो तरी कसा रे बाबा! दिवसाची प्रपंचाची दगदग उरकल्यावर, रात्रीं घटकाभर कुठं थोडी

करमणुकीची-विरंगुळ्याची- सोय होती. तिलासुद्धा त्या एक्यानं भडाग्नि दिला. जिवाचा अस्सा संताप होतो का एकदम कुठंतरी काहीतरी कसंतरी करावं नि त्यात गुपचुप मरून जावं.

**चव्हाटे :** हां हां हां भम्पकराव, काय हा अविचार. कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ?

**भडाग्नि :** अनार्यजुष्टम्! अस्वर्ग्यम्! अकीर्तिकरम्! काय हे, असे अर्जुनासारखे हातपाय गाळून काय होणार ? पैठणकराला तरी हे शोभत नाही. शारीरिक शक्तीनं आम्ही कमजोर असलो, तरी आमच्या या डोक्याच्या युक्तीपुढं ब्रम्हदेवाच्या चार डोक्यानाहि नाकं धासावी लागतील नाकं.

**चव्हाटे :** एकनाथाचा बंदोबस्त करायला काशीक्षेत्राहून आज्ञापत्र मागवलं आहे ना ? चारदोन दिसात ते आलं, की मोडल्याच एक्याच्या नांग्या.

**भम्पक :** कर्माच्या मोडतात नांग्या! ते आज्ञापत्र काय करणार ? एकनाथाला वाळीत टाकणार. तो बेटा आधीच आपणहून वाळीत जाऊन बसलाय्. आज्ञापत्र त्याचं आणखीन काय वाकडं करणार ? आज्ञापत्राचे न् मानपत्रांचे हे पोरकट चाळे! अशानी तो म्हसोबा थोडाच वंगणार ? विंचू दिंडीवर असो, नाहीतर पिंडीवर असो, नालबंद खेटरानीं ठेचल्याशिवाय काय होणार ? म्हणजे आज्ञापत्र यांच्या नांग्या मोडणार! वेदांची बासुंदी आटवून आटवून तुमच्या बुद्धीचा खवा झालाय खवा, भडाग्नि चव्हाटे.

**चव्हाटे :** वेदान्त-व्यसनानं बुद्धीला जाड्य येणं क्रमशक्य आहे. आमच्या बुद्धीचा झाला खवा पण भम्पकराव, तुमच्या अकलेचा इतका तापला तवा, तर त्यावर भाजला आहात का एकाद्या बिनतोड युक्तीचा रवा ?

**भडाग्नि :** का उगाच तोंडची हवा, न भम्पकरावी गवगवा.

**भम्पक :** रवा भाजून शिरा केल्याशिवाय गवगवा करणारा हा भम्पकराव नव्हे. माझ्या युक्तीचा शिरा, त्या एकनाथाच्या काळजात शिरून, विठ्या महाराच्या धोडशिरा तोडायला झाला-गेला, अहमदनगरला जाऊन पोचला.

**भडाग्नि, चव्हाटे :** काय म्हणता, काय म्हणता भम्पकराव? तुमचा शिरा नगरात शिरला?

**भम्पक :** उगाच नाही. दररोज सकाळी चार डिंकाचे लाडू, वेळणीभर चमचमीत तुपाचा शिरा दोन शेर आटीव दूध अन् वर जोंधळ्याची खरपूस भाजलेली भाकरी चावतो, नि मग डोळे उघडून उजाडल्याची चौकशी करतो. अहो, त्या म्हादबा पाटलाला बनवला न दिली सुरुंगाची रंजुक शिलगाऊन न काय?

**चव्हाटे :** म्हादबाला बनवला ? वाहवा! वाहवा! याला म्हणतात विराट पुरुषस्य शीर्षम्.

**भडाग्नि :** तो माळकरी मरगट्टा बनला बरा?

**भम्पक :** अहो हे मराठे मनगटानं दणगट असले, तरी मनानं अगदीच कळकट-फार ठिसूळ, दमडीच्या गीजांत सारा गाव डोक्यावर घेतील.

**भडाग्नि :** मला नाही बुवा या म्हादबाचा विश्वास! पक्का थिल्लर! कैदेतनं सुटून आल्यावर एकनाथाच्या सावलीत गेला, न विठू महाराच्या गळ्यात गळा घालून बागडू लागला. विठु महार म्हणजे पंढरीचा विठोबा अन् एकनाथ म्हणजे ज्ञानेश्वराचा अवतार. असा साऱ्या गावभर शंख करीत फिरू लागला जसा रंग तसा याचा ढंग!

**भम्पक :** हे काय लहानसान भांडवल समजला की काय? सध्या पैठणभर गुराढोरावर आलाय लाळीचा रोग. ही सन्धि साधून त्या बावळट म्हादबाला परवा द्वादशीच्या पारण्याला घरी जेवावयाला बोलवलं. काटकोनात पाट मांडून पंक्तीचा देखावा केला. बेत अगदी साधा पण निर्लेप भात, वरण, तूप, भाजी, भाकरी, आमटी, लोणचं-सगळं दुधात शिजवलं. पाण्याचा स्पर्श नाही. भरगच्च जेवण झाल्यावर, चम्पक, चिमाबाई शिलगावली न दोघानी मनमुराद–हूं ! भर रंगात आल्यावर, चंचुप्रवेशे मुसलप्रवेशः!

**भडाग्नि, चव्हाटे :** मुसलप्रवेशः ? वाहवा! कसा काय लेला बुवा मुसलप्रवेशः

**भम्पक :** आधी तो थोडासा आपल्यावर गुरगुरला मी म्हटलं म्हादवा,कैदेची शिक्षा झालेल्याची पाटीलकी जाते. पण आम्ही सगळ्या पैठणकर ब्राम्हणानीं थेट दरबारपर्यंत खटपटी करून, तुमची पाटीलकी टिकवली. नाहीतर आज तुमची अन्नान्न दशा झाली असती. या तोडग्यानं तो कोडगा खुलला. मग काढली ढोरांची साथ. म्हणलं म्हादबा, गावात ढोरं कशी मरताहेत ती पाहिलीत ना? अहो ढोरं ,आपल्याला पारासारखी. पण ही म्हारडी मांगडी त्याना धडाधड वीष घालून ठार मारताहेत रोग कसला न् राई कसली. सगळी एकनाथी बतावणी. बरं ढोरं तर फटाफट मरताहेत, न पडी उचलायला एकही महारडा येत नाही. तुम्ही तर गावचे पाटील अशावेळी नुसती माळ घालून टाळ कुटीत बसाल, तर पाटीलकीला मुकाल. हे ऐकताच ते बावळट भेदरलं न् लागलं गयावया करायला— " येसिन उपाय काइ " म्हणून आमच्याजवळ अर्ज लिहून होताच तयार. त्यावर घेतली त्याची सही न दिला एकदम दीक्षितांच्या वामन्याबरोबर नगरला पाठवून, त्यावर कोतवालीकडे फर्मानसुद्धां आलं. चला.

**भडाग्नि, चव्हाटे :** योग्य, वाजवी, रास्त! परस्पर पावणेतेरा !

(जातात)

—

## अंक ३ रा — प्रवेश २ रा

[ प्रथम काही वेळ चाबकाचे फटकारे ऐकू येतात. '' बोल, ढोराना वीष घातलं का नाही ? हरामखोर, आता का दातखिळी बसली ? बोलतोस का नाही ?'' असे कोतवालाचे धमकावणीचे शब्द ऐकू येतात. मग पडदा वर जातो. विठूला दोरानी हातपाय बांधून उभा केला आहे नि कोतवाल मार देत आहे. आजूबाजूला भडाग्नि, चव्हाटे, भम्पकराव कोतवालाला चिथावण्या देत उभे आहेत. कोतवाल एक दोन फटकारे मारतो, तोंच ' कोतवाल ' अशी एकनाथाची हबकणीची आरोळी लांबून ऐकू येते. ती ऐकताच '' अरे बापरे! एकनाथच आला वाटतं! होय तोच. पळा. '' असे म्हणत तिघेहि भटजी पळून जातात. संतप्त एकनाथ हिरकणीसह येतो. एकनाथाला पहाताच कोतवाल चाबूक टाकून त्याला मुजरा करतो. हिरकणी विठूला बांधलेले दोर सोडवून, त्याला सावरते, वारा घालते, रक्त पुसते. ]

**एक० :** कोतवाल, काय हा अत्याचार चालवलाहात तुम्ही. निरपराध्याला चौकशीवाचून असली हाणमार करता ? मूर्तूजा निजामशहाच्या राज्यात अझून मोगलाई नाही चालू झाली, समजलात! विठोबानं काय कुणाचं घोडं मारलं ?

**कोत० :** (मुजरा करून) घोडं नाही मारलं. वीष घालून गावातली ढोरं मारली न् सारी पडी कुझत ठेली. हा अर्ज वाचा म्हणजे खात्री होईल. (अर्ज देतो. एकनाथ वाचतो.) प्रकरण वरून आलेलं. मला चौकशी केलीच पाहिजे.

**एक० :** हा म्हादबा पाटलाचा अर्ज!

**कोत० :** थेट शहाकडून खास चौकशीसाठी आलाय. दादो नरसू काळ्यांची त्यावर मखलाशी आहे. माझा काय इलाज ?

**एक० :** माझा काय इलाज ? लाज वाटत नाही, कोतवाल असं बोलायला तुम्हाला? दादु काळे झाले काय, अन् मेहेरबान शहासाहेब झाले काय, पन्नास कोसावरचे अधिकारी. पैठणच्या खऱ्या हकिकती त्याना कशा कळणार? वहिवाटीप्रमाणे आलेला अर्ज त्यानी इकडे चौकशीसाठी पाठवला. पण तुम्ही तर पैठणलाच राहता ना? डोळे उघडे ठेऊनच कोतवाली करता ना? महारानी वीष घालून गावातली ढोरं मारली म्हणावी, तर खुद्द म्हारवाड्यातली ढोरं कशानं मरताहेत ? तुम्हाला ठाऊक असलंच पाहिजे, का गेली आठ वर्ष पैठणचे म्हार मांग धेड-कुणीही-मेलेल्या जनावराचं मास मुळीच खात नाहीत. कित्येक तर मासमच्छी दारूला सुद्धा शिवत नाहीत. मग त्याना

ढोरं मारण्याची जरूर काय ? हे तुम्हाला उमजायला हवं होतं. कुणातरी दुस्मानानं हवे ते खोडसाळ अर्ज वर पाठवले न् ते खाली चौकशीला आले, म्हणजे त्यातला प्रत्येक शब्द खरा मानून, स्थानिक अधिकारी वाटेल त्याला फासावर चढऊ लागले, तर ती चौकशी, माणुसकी, का न्यायाचे धिण्डवडे ?

**कोत० :** ढोरं कशानेहि मरोत, त्यांची पडी उचलायला महारानी नकार का दिला? वेसकराची फूस असल्याशिवाय ?

**एक० :** पडी ओढायला महार आले नाहीत, तरी गावात पडी कुझत पडली का? केलात तपास तुम्ही ? का इथंच चावडीवर बसून चौकशीच्या वावड्या उडवता? कोतवाल, लक्षात ठेवा, साऱ्या म्हारानी जरी साफ नकार दिला, तरी या या विठोबा वेसकरानं, अन्नपाण्याची पर्वा न करता, रात्रंदिवस श्रमून, शहरातली सगळी मेलेली ढोरं ओढून टाकलेली आहेत, समजलात! सीता न् हिरकणी या दोन मुलीनी, अन् गावबा न् केरोबानी याला मदत केली. शहरचे कोतवाल म्हणवता, न् या गोष्टी तुम्हाला, कशा दिसल्या नाहीत. शहराच्या आरोग्यासाठी या मण्डळीनं हे घाणेरडं काम केलं नसतं, तर आजला सारं पैठण एकाद्या रोगाच्या साथीनं उध्वस्त झालं असतं. लोकहिताच्या या बिनपगारी कामगिरीबद्दल विठोबाला बक्षिसी काय? तर त्याला चावडीवर आणून सर्व पैठणकरांसमोर ढोरासारखा बडवता? रक्तबम्बाळ होईसा चाबकानी सडकता?

**कोत० :** पण विठोबानी या गोष्टी आधी मला सांगितल्या असत्या—

**एक० :** सांगायच्या कशाला ? दिसत नाहीत तुम्हाला ? अझून दिसत नसेल, तर मी दाखवितो तुम्हाला. या एकनाथाला केवळ दर्भधारी दक्षिणांपान्त् भिक्षूक समजू नका. सात्त्विकपणाचा मला कितीहि हव्यास असला, तरी आजच्या सारख्या रानटी अन्यायाना पायबन्ध ठोकण्यासाठी तामसी वृत्तीला मनमुराद मोकळी सोडायला हा एकनाथ कमी करणार नाही. थाम्बा. आजच्या या पाशवी प्रकाराबद्दल मीच दरबारकडे तक्रार अर्ज पाठवून, तुम्हाला माणुसकीचा घडा शिकवतो.

**कोत० :** (एक० चे पाय धरून) सरदारसाहेब, माझ्या हातून फार मोठी चूक झाली. क्षमा करणार खावन्द समर्थ.

(म्हादबा येतो.)

**म्हादबा :** आं! यो हाय काय परकार ? अन् इण्टुबा, आं! तुमास्नी आसं कुनि मारलाया ?

**कोत० :** हा पहा तो पाजी अर्जदार. गावचा पाटील म्हणवतो न् बादशहाकडं खोटे अर्ज पाठवतो.

**एकनाथ :** म्हादबा पाटील, बादशहाकडे तुम्हीच हा अर्ज पाठवला होता ?

**म्हादबा :** अर्जी व्हय? म्या काय लिवनार हाई, तर अर्जी लिवनार ?

**एकनाथ :** विठू वेसकराविरुद्ध केलेल्या या अर्जावर तुमची सही आहे की नाही ?

**म्हादबा :** मला फकात सयी लिवाया येती. पुन अर्जी—अन् ती इण्टु एसकरा इरुध ? कशापायी लिवणार जी ? हाय काय यो समदा परकार ?

**एकनाथ :** तुमच्या या खोडसाळ अर्जानं विठू वेसकाराची सालटी सोलून काढली. आहात का या पापाला जबाबदार तुम्ही?—हा घ्या अर्ज (देतो.) अन् सांगा खरं काय ते.

**म्हादबा :** (डोके खाजवीत) ही अर्जी यो कागूद हां आलं अक्षि. ध्येनामन्दी. गावामन्दी ढोरावर रोग आलाया, तवा त्येचा काइ दवापानी सरकारनी तुरुत पाठवूनशान द्यावं, म्हून या अर्जीवर त्या भम्पकरावान् माझी सही लिहूनशान घेतली व्हती. पुन् इण्टुबाबाच्या इरुध येच्यामन्दी कायबी असाल, तर म्हाराज, ग्येन्बाच्या या माळेच्यान्, मुर्दाड भम्पकरावान् समदा घात केला,—अरारारारा! ही काय मानसं हायती, का हायती तरी कोन!(विठोबाच्या पाया पडून) इण्टुबाबा, म्या असं वंगाळ काम कवा करीन कारे! अरारा, माज्यापायी तुजं असं धिण्डावडं निघावं, अन् त्ये या म्हाद्यानं बघावं ! रगातपिती उठाल माज्या आंगावर !

**एक० :** (शान्त होऊन) झाला सगळा खुलासा. तुम्हाला कळलीना कोतवाल? हात जोडण्याचं काही कारण नाही. मी आता शान्त झालो. हे प्रकरण आता इथंच गतीला गेलं. योग्य तो खुलासा लिहून. अर्ज परत वर पाठवा न् स्वस्थ रहा. (अर्ज घेऊन मुजरा करून कोत जातो.)

**म्हादबा :** महाराज, माज्या सयीनं माज्या इण्टुबाच्या आंगातून रगात काडलं. (पायावर पडतो.) आपल्या पाइच्या ख्येटरानं या म्हाद्याचं टक्कुरं फोडा. न्हायतर सयी करनारा यो हात इळ्यानं तोडा.

**एक० :** म्हादबा, उठा दोष तुमचा नाही. या पापाला तुमचा अडाणीपणा कारण आहे. त्यामुळे शत्रुमित्राची पारख तुम्हाला नीट होत नाही.

**म्हादबा :** (उठून) मुर्दाड भम्पकरावान् समदा घात केला यो.

**एक० :** त्यानाहि दोष कशाला द्या, म्हादबा. दोष आपला. कवण्ढळापासून गोडीची अपेक्षा करणं मूर्खपणाचं आहे. (विठूजवळ जावून) विठ्ठला, तुला या अवस्थेत पाहून मला फार फार समाधान वाटतं—फार समाधान वाटतं. समाजाच्या आत्मोद्धारासाठी कसलं लेणं आंगावर चढवून घ्यावं लागतं, हे अस्सं पाहिलं, म्हणजे, जगदुद्धारासाठी भगवन्ताना किती श्रम सायास सोसावे लागत असतील, याची छान कल्पना येते.

चाबकाच्या तडाक्यानी तुझ्या आंगातून रक्ताच्या चिळकाण्ड्या उडत असताना, तू, जी धीरगंभीर वृत्ति कायम ठेवलीस, ती पाहून पण्ढरीचा राणा विटेवर थै थै नाचला असेल बरं. असले प्रकार पाहताना वाईट वाटतं खरं, पण ते पाहण्याचं भाग्य लाभणं सुद्धा कठीण बरं! विठोबा काय कमी ताकदीचा माणूस आहे? एका चफराकीत कोतवाल चावडी यानं उधळून लावली असती. पण ती पाशवी शक्ति! प्रतिकाराची भरपूर धमक असतानाच विरोधकाचे हवे ते अत्याचार निमूटपणानं सहन करण्यातच दैवी शक्तीचा विकास होतो. विठ्ठला, तो तू छान केलास, मला आनन्द झाला. अस्पृश्यांच्या उद्धाराच्या प्रश्नाचं महत्व आज सिद्ध झालं. जसजसा विरोधाचा जोर वाढत जातो, तसतशी आपल्या कार्याच्या यशाची खूणगाठ घट्ट बसत जाते बरं चल, पण्ढरीनाथाच्या पायावर डोके ठेवून, आजचं सारं पुण्य श्रीकृष्णार्पणमस्तु करून टाक.

(सर्व जातात.)

---

## अंक ३ रा प्रवेश ३ रा

[पगडी उपरण्याचा उत्तम पोषाख केलेले भडाग्नि, चव्हाटे, भम्पकराव प्र. क्र.]

**भडाग्नि :** (दूर पाहून) झाली ही व्यवस्था उत्तम-अगदी मनपसंत झाली. गावाबाहेर-थण्डगार आमराईत-हवाशीर. अगदी मनपसन्त. काशीक्षेत्रातून एवढे मोठे प्रचन्ड विद्वान् धर्ममार्तण्ड स्वामी येणार, एकनाथाच्या धर्मभ्रष्ठतेची जाहीर चौकशी करणार, त्याना गरुडमण्डपाच्या आटोपशीर जागेत कोम्बण्यात अर्थच नव्हता. ब्राम्हण, ब्राम्हणेतर, अस्पृश्य, अलम् दुनियेपुढंच त्या एक्याची जाहीर चौकशी न् नाचक्की व्हायला पाहिजे.

**चव्हाटे :** हजार खटपटी करून आपण काशीकर स्वामीना पैठणला आणलं. त्यानी एकनाथाचे अपराध त्याच्या पदरात बान्धले. तरी ते त्याला काय शिक्षा सांगणार?

**भडाग्नि :** काय सांगणार म्हणजे? देहान्त प्रायश्चित्त!

**चव्हाटे :** देहान्त प्रायश्चित्त! भडाग्नि बोजवारे, तुमची सारी अक्कल अग्निहोत्राच्या कुण्डात जळून राख झाली आहे राख. अहो, पैठणात धर्ममार्तण्ड म्हणून मिरवलात, अन् पुराण प्रवचनांत ब्रम्हदेवाच्या चारी दाढ्या गदगदा हालवण्यांचं मोठ्ठं अवसान आणलंत, तरी तुमच्या धर्मराज्याची शेण्डी मुसलमानी राजधर्माच्या हातात आहे. तुम्ही मेलेले गुलाम काय त्याला देहान्त प्रायश्चित्त देणार हो !

**भम्पक :** [उसासा टाकून] राज्यसत्ता ! तिच्या शिवाय आमची सत्ता, केवळ विधवा—अगदी अस्त्रायफट् विधवा होऊन बसली आहे! आमचे शापसुद्धा ढेकरासारखे हवेतल्या हवेत नाहीसे होतात !

**चव्हाटे :** शिवाय, एकनाथ कितीहि कंगाल स्थितीत राहात असला तरी तो सरदार आहे. सारी रयत त्याच्या भजनी लागलेली.—परवाच्या अर्जाचं प्रकरण त्यानं थेट वर पाठवलं असतं, तर कोतवालाची कोतवाली जावून, भम्पकराव, तुम्हाला कोतवाल चावडी गाठावी लागती. म्हणे दादो नरसू काळ्यांचा वशिला ! काय चाटायचा !

**भम्पक :** अहो, प्रयत्नें वाळूचें—! नाही गळलं तेल, तर नाही. गळवाला तुम्बडी तर लावून पहावी.

(आत गावबा–तुम्बडि भरदे मेरि तुम्बडि भर दे.)

**भम्पक :** हा कोण आला तुम्बडि भरदे वाला !

**भडाग्नि :** अँ ! अहो तो आपला वेडा—गावबा.

**चव्हाटे :** वेडा ? धालवेडा आहे लेकाचा. शालजोडीतले देण्यात फार पटाईत.

**भम्पक :** वाजवा म्हणावं तुम्बड्या न् उडवा शालजोड्या—आज सन्ध्याकाळ पर्यंत !

**भडाग्नि: चव्हाटे :** सन्ध्याकाळपर्यंत ? म्हणजे ?

**भम्पक :** अहो ती आज्ञापत्रं न् स्वामी, काय यांच्या धुडगुसाचा बन्दोबस्त करणार ! हा म्हारवाडाच जाळून फस्त केला पाहिजे. सभेची नान्दी तुम्ही करा हवी तशी. भरतवाक्याचा बार हा भम्पकराव कसा उडवतो ते पाहून घ्या. भरिताच्या वांग्यासारखा सारा म्हारवाडा भाजून काढतो.

(तुम्बडी वाजवीत गावबा प्रवेश करतो.)

[पायात लालभडक दक्षिणी जोडा, रेशीमकाठी धोतर, अंगात मुसलमानी धर्तीचा पातळ सदरा, जरतारी हिरवे जाकीट, त्यात लाल रेशमी रुमाल गळ्याशी कोम्बलेला, कपाळावर पाण्ढऱ्या गंधाचा रुपयाएवढा टिकला. डोक्यावर मळकट महारी पागोट्याची पट्ट्या सुटलेली थप्पी. हातात नारळाची तुम्बडी घेऊन गावबा प्र. क.].

**गावबा :**

**तुम्बडी भरदे । मेरी तुम्बडी भरदे ॥ घृ० ॥**
**एक—दोन्—तीन्—**
**तीन मिले नाना । उनका नाम नहि लेना ।**
**ऐसा चालु है जमाना । मेरि तुम्बडी० ॥ १ ॥**
**खाते घी शक्कर रोटी । मूमे बात बडि मीठी ॥**
**जालिम जेहर उन्के पोटी । मेरि० ॥ २ ॥**
**कहते अछूत मेरा भाई । और गाय मेरी माई ।**
**ए तो धरमके कसाई । मेरि० ॥ ३ ॥**
**स्वामि दौड आये काशी । कहते नाथ जाव फाशी ।**
**नाकीं शिरली गांधिल माशी । मेरि० ॥ ४ ॥**

**भम्पक :** काय गावबा, भाद्रपदातच कशाला हा शिमगा ?

**गावबा :** गावाच्या पितरपाखात भटांची दिवाळी, म्हणून भटांच्या भाद्रपदात गावबाचा शिमगा.— अहो तुम्ही इकडं जामानिमा करून निघालात, पण तिकडं सारा प्रलय झाला ना.— अहो असं तोण्ड वासून काय पाहाता? डोळे वासून पाहा. सगळा धोळा—ब्रम्हघोटाळा झाला.

**तिघेजण :** कसला घोटाळा? झालं तरी काय? का पैठण पेटलं.

**गावबा :** पैठण पेटतं तर त्यावर माझी गुडगुडी नसती का शिलगावली? —पण इकडं तर सारा ब्रम्हघोटाळा—विराट पुरुषाच्या तंगड्या वर झाल्या ना?

**तिघेजण :** विराट पुरुषाच्या तंगड्या वर झाल्या ?

**गावबा :** अगदि ! **खाली डोकं वर पाय वेद करति हायहाय। । भटं रडति धायधाय। तुंबडी ॥** दिसंत नाही तुम्हाला ? पडसं आलंय तुमच्या डोळ्याना ? चाम्भाराकडून डोळ्याना गोठ मारुन घ्या. (वसानात) हा पहा, तुमचा-सगळ्या दुनियेचा बाप--विराटपुरुष तुमच्या पुढं उभा आहे. वेदातलं चित्र पहा न् हे चित्र पहा--

**पावमे बम्मन । शिरपर अछूत ।**
**बीच घुसे बिसमिल्ला ॥**
**कहे गावबा, सुनरि गव्हारो ।**
**खतम् अकलका किल्ला ॥ १ ॥**

--काय? फुटतात का अकलेला फान्दे? नाही ? वठलेल्या वडाच्या पारम्ब्या आहात सगळे !

**भम्पक :** मूर्ख आहेस तू.

**गावबा :** मी मूर्ख नसतो तर तुमचा शहाणपणा उकीरड्यावर गेला असता ! विराटपुरुषाच्या तंगड्या वर झाल्या, तरी तुम्ही अझून पायानीच चालता ? डोकं चालवा, डोकं चालवा. नाही चालत ? शहाणे कशाला म्हणवता हो ?--

**बनला लड्ड लड्ड बोके । डोके झाले तुमचे खोके ।**
**पाडलि वाळविनी भोके । मेरि० ॥ १ ॥**
**डोका चलाव मेरे यार । निकालो अक्कलकी हतियार ।**
**नहि तो काळ करे बेजार । मेरी० ॥ २ ॥**

--अहो, ब्रह्मदेवाचे औरस लेक गेले आता उडत--रावणाच्या लंकेत. अस्पृश्य शूद्र चढले गौरिशंकराच्या टाळक्यावर. अन् मधी घुसलं हे इस्लामी राजसत्तेचं पुरण ! भम्पकराव, कसा काय आहे हा पुरणपोळीचा बेत !

**भम्पक :** आमचा विराटपुरुष असा नाहीच मुळी.

**गावबा :** हो हो. खरंच. तुमचा विराटपुरुष म्हणजे शूद्र तंगड्यानाच चिकटलेलं भटी डोकं. सत्ययुगाच्या फासांत मुण्डकं लटकाऊन कलियुगाच्या खाते-यांत तंगडझाड करणारा ! कम्बरेला मुण्डकं चिकटवण्याची मी खूप खटपट केली हो. पण काही केल्या छातिपोटाची अडगळच निघेना.

**भम्पक :** म्हणून काय, वैदिक विराटपुरुषाच्या पोटात हे इस्लामी पुरण भरायचं ? गाढव.

**गावबा :** गाढव?—

**सुनो गद्धेकि गवाई । क्षत्रिय वैश्य जगिं नाही ।**
**ऐसा कहते बम्मन भाई । मेरि० ॥ १ ॥**
**चढा छातीपर इस्लाम । चलाता पैजारका पैगाम ।**
**बम्मन बोले रामराम । मेरी० ॥ २ ॥**
**देखा एकनाथका दण्ड । सैतान हुवा मुर्दा थण्ड ।**
**ये है पुरणपोळिका बण्ड । मेरी० ॥ २ ॥**

**भम्पक :** छान, छान शिमग्याचं सोंग काढलसं, गावबा.

**गावबा :** वेदापासून पंचगव्यापर्यन्त सगळाच शिमगा. त्याला साजं शोभेसं नको का आपण वागायला ?

**भम्पक :** आणि अशा सोंगानं का तू सभेला निघालास गाढवा ?

**गावबा :** पाजी-मूर्ख-वेडा ! (जातात)

**गावबा :**

**वेडा खाई पेढा । त्याचा बोल बाका तेढा ।**
**वेदघोष करि रेडा । त्याची शंका सारे फेडा । मेरि० ॥ २ ॥**

—(स्व.) आजच्या या सभेच्या पोटात आणखी कसलं तरी काळकूट असलं पाहिजे. त्या केरोबाला मी पाळतीवर ठेवलाच आहे. मी वेडा कायरे ? ठीक आहे शहाण्यानो, दाखवीन या वेड्यांचा इंगा !

(जातो.)

---

## अंक ३ रा — प्रवेश ४ था

[आम्बराईत सार्वजनिक सभा. उच्चासनी काशीकर स्वामी. एका बाजूला भडाग्नि प्रभृति ब्राम्हण, दुसरीकडे म्हादबा, गावबा. दूर बाजूला विठू महार वगैरे, एकनाथ उभा आहे.]

**भडाग्नि :** एकनाथ, या महासभेपुढं तू आरोपि आहेस. काशीक्षेत्राहून स्वामीमहाराज ब्रम्हवृंदांचं आज्ञापत्र घेऊन आले आहेत.

**एकनाथ :** सन्तांचं आज्ञापत्र मला शिरसावन्द्य आहे.

**स्वामी :** मऱ्हाठी भाषेत भागवतादि पुराणं रचून, प्राचीन देववाणीचा—संस्कृत भाषेचा— तू अनादर करीत आहेत. ब्रम्हविद्येला प्राकृताच्या चव्हाट्यावर माण्डून, तिच्या गूढ पावित्र्याला तू कवडीमोल ठरवीत आहेस.

**एकनाथ :** ब्रम्हविद्येला साधा सुटसुटीत मऱ्हाठी पेहराव चढवून तिला बालबोध करण्याचा मान माझा नव्हे. पावणेतीनशें वर्षांपूर्वीच श्रीज्ञानेश्वर महाराजानी या पुण्यप्रधाताचा पाया घातला.

**चव्हाटे :** ब्राम्हणेतराना ब्रम्हविद्या शिकवणं महापाप आहे.

**एकनाथ :** ज्ञान हेच अत्यन्त पवित्र, मग त्याचा प्रसारच तेवढा महापाप कसा ठरणार ? स्वामी महाराज, ब्रम्हज्ञान म्हणजे एकट्या ब्राम्हणाचीच मिरास नव्हे. अलम दुनियेची त्याजवर सारखीच सत्ता आहे.

**गावबा :** स्वामीमहाराज, संस्कृताच्या तळघरात ब्रम्हविद्येला भटी सवळ्याची बुरशी चढली, म्हणून ज्ञानोबानी मऱ्हाठीच्या मैदानावर तिचे हातपाय ताणून वाळत घातली. यात या भटांच्या नाकात झुरळं शिरायला काय झालं हो ?

**चव्हाटे :** एकनाथ, काशिक्षेत्रस्थ पण्डितांची आज्ञा आहे.—

(पदराखाली पोथी घेऊन गिरजा प्र. क्र.)

**गिरजा :** त्यांची काय आज्ञा आहे ?

(ब्राम्हण मण्डळीत " ही आली महाराची महारीण " अशी हळू, पण गिरजेला ऐकू जाईल अशी कुजबूज होते.)

**गिरजा :** आपण माझा सन्मान करीत आहात बरं ! स्वामी महाराज,—

**मी महारीण नव्हे लानसान ।**
**म्याच उपटिले त्रिमूर्तीचे कान ।**
**निर्गुणाचे केले सगुण ।**
**आले की जी मायबाप ॥**
(नमस्कार करते.)

**भडाग्नि :** एकनाथानं लिहिलेले भागवतपुराण नष्ट करण्यासाठी स्वामीमहाराजांच्या चरणी अर्पण करावं.

**गिरजा :** भागवत पुराणानं काय पाप केलं ?

**भडाग्नि :** पाप ? महत्पाप ते म-हाठी आहे, गीर्वाण नाही.

**एक० :** गीर्वाण भाषा देवे केली, अन् म-हाठी काय चोरे आणली ? ग्रन्थ नष्ट केला, म्हणजे माझं भागवत नष्ट होईल, अशी का सगळ्यांची समजूत आहे ?

**चव्हाटे :** प्रश्न आज्ञापत्राचा आहे, समजुतीचा नाही.

**एक० :** नुसत्या पोथीनंच सन्तांचं समाधान होत असलं तर— ?

**गिरजा :** (पोथी पुढे ठेवते) ही घ्या पोथी न् करा काय वाटेल ते तिचं.

(भडाग्नि पोथी ताब्यात घेतो.)

**स्वामी :** अग्नीत जाळून ही पोथी भस्मसात् करा.

**सर्व भट :** भस्मसात्-भस्मसात् करावी (टाळ्या.)

**गावबा :** (हळूच) म्हादबा, बामनं काय म्हंगत्यात !

**गिरजा :** भस्मसात् करावी ? सगळ्या दख्खन्-दुनियेनं ज्याला आत्मसात् केलंय्, त्याला तुम्ही काय भस्मसात् करणार !

**म्हादबा :** अक्षि टक्कुरंच श्येक्लं जनु !

**भडाग्नि :** मला वाटतं खाली वर दगडाच्या लठ्ठ चिपा बान्धून, या बाडाला भागीरथीतच जलसमाधी द्यावी.

**सर्व भट :** जलसमाधी द्यावी-जलसमाधी द्यावी.

**गिरजा :** देऊन पहा. तमाम भागवत-भक्तांनी हृदयाच्या खोल तळाशी ज्याला ठाव दिलाय, त्याला कोणती भागिरथी आणखिन् बुडवणार ? ज्ञानदेव जनार्दन स्वामींचा हा प्रसाद, स्वामीमहाराज, अल्म दुनियेची गंगा, हातावर झेलून मस्तकावर नाचवील बरं मस्तकावर !

**म्हादबा :** सनान् हानलिच अनु गोफनिची फ्याक्

**गिरजा :** पोथ्या जाळल्या बुडवल्या, तरी पाठ न् संप्रदाय कधी बुडत नसतात.

**भम्पक :** श्रीनी बायकांशी वाद करणं, प्रशस्त नाही.

**गिरजा :** कां प्रशस्त नाही ? आद्यशंकराचार्यांनी मण्डनमिश्राच्या सरस्वतीशी केला होता ना वाद ?

**चव्हाटे :** अन् आचार्यांनी तिला पराभूतच केली ना अखेर ?

**गिरजा :** मग करा ना मला पराभूत ? बायकांवर दिग्विजय मिळवायची ही दुसरी सन्धि कशाला दवडता ?

**म्हादबा :** श्येन भरलाच भडकावला जनु !

**स्वामी :** ॐ शान्तिः शान्तिः शान्ति :

**गावबा :** खामोष खामोष. गडबडम् न कुर्यात्. सावधान दे दान, सुटेऽऽगिराण.

**स्वामी :** एकनाथ तू अन् तुझी विदुषी पत्नी, जातीधर्मानं ब्राम्हण असून, एकीकडं मोठा धर्माभिमान दाखवता, अन् दुसरीकडं धर्मभ्रष्ट क्रियानष्ट चाण्डाळ अन्त्यजाना डोक्यावर घेऊन नाचता. जन्माच्या जातीशी विरोध करून, अन्त्यजाशी सलगी करता ! सहकार्य करता !

**एक :** सहकार्यचसं काय, पण सहकुटुंब सहपरिवार सहभोजनहि करतो.

**सर्व भट :** धिःक्कार, धिक्कार, धिक्कार!

**एक :** ब्राम्हणजनाशी मी विरोधानं वागतो, हा शुद्ध गैरसमज आहे. स्वीमीमहाराज, केवळ ब्राम्हणांच्याच नव्हे, तर अखिल हिंदुजनांच्या उद्धारासाठीच अस्पृश्यांना जवळ आणण्याची मी धडपड करीत आहे. आमच्या माणुसकीचा बदलौकिक टाळण्यासाठीच या अभागी अस्पृशांना माणुसकीनं वागवा असा मी सारखा टाहो फोडीत आहे. त्यांचा उद्धार तुम्ही आम्ही कोण करणार ? तो करायला ते समर्थ आहेत.

**भडाग्नि :** मग त्यांच्याशी संगनमत करून पाण्ढरपेशा समाजाविरूद्ध त्याना तू का चिथावण्या देतोस ?

**एक :** मानवी जिण्याचं कर्तव्य त्याना मी शिकवीत असतो. चिथावण्या देत नसतो. तुम्ही गुलाम आहात, हे गुलामाना पटवून देणं, अन् शिरजोराना त्यांच्या जुलमी शिरजोरीची लाज उत्पन्न करणं, हाच वास्तविक प्रत्येक धर्माचा मूळ उद्देश. तोच विचार मी उच्चाराप्रमाणं आचारात वठवीत असतो.

**चव्हाटे :** धर्माचा उद्देश तुमच्याकडून शिकण्याइतकी वैदिक संस्कृति म्हणजे कच्च्या मातीचं मडकं नव्हे !

**भम्पक :** का कच्चं भाजलेलं थालिपिट नव्हे !

**भडाग्नि :** तुझ्या साऱ्या खटपटी वर्तमान धर्मांचा उच्छेद करणाऱ्या आहेत.

**एक :** एवढं मात्र तुम्ही खरं बोललात. जो धर्म प्रेमाला पारखा झाला त्यात कसलं प्रेम उरलं ? दयेचा थेम्ब शिल्लक नसलेल्या या धर्मकल्पनेचा न् तिनं समाजांत फैलावलेल्या माणूसघाणीचा उच्छेद करणं हाच माझ्या जीविताचा एक छन्द होऊन बसला आहे. स्वामीमहाराज—

(**भैरवी :** जोगी मत जा०)

**लोकीं तिळ या हृदया न दया ॥**
**धर्म धरी अविवेका ॥ धृ० ॥**
**मोक्ष-वल्गना घुमविती गगना ।**
**मानवता नच मनुजा ॥ १ ॥**
**धारण सुटले मारण सुचले ।**
**हाय ! अधर्म-पसारा ॥ २ ॥**
**दयाशून्य हा धर्म भारता ।**
**दास्य-पंकिं ने विलया ॥ ३ ॥**

**स्वामी :** एकनाथ, ही तुझी आचार-विचार-सरणी महापतकी,-अतएव सनातन धर्माविरुद्ध बण्ड आहे.

**एक :** होय, बण्ड आहे. अन् त्या बण्डाच्या वेडानं उभ्या दख्खनला मी वेड लावलं आहे. प्रचलित धर्मकल्पनांना मी जबरदस्त धक्का दिला, आज देत आहे, न् या कुडींत प्राण असेपर्यंत देत राहाणार.

**म्हादबा :** (स्व.) येला म्हनत्यात मनुक्षे ! न्हाइ तर हाईत— मायन्दाळ हाईत. जगत्यात् नि मरत्यात् !

**एक :** भागवत धर्मच दयेच्या ओलाव्यानं ब्राम्हणासकट अखिल हिन्दुजनांचा उद्धार करील, असा माझा आत्मविश्वास आहे.

**चव्हाटे :** उद्धार करील ! केला उद्धार. सगळ्या समाजाची घडी बिघडवली—

**गावबा :** दौलत्या परटाकडं धुवायला टाका—

**म्हादबा :** म्हजी, अक्षी कडाक इस्तारींत परात !

**चव्हाटे :** याच्या मराठी पुराणानी सारे ब्राम्हणेतर तर बिथरलेच, पण बटकीचे म्हारमांगसुद्धां गावकीची कामं साफ नाकारू लागले. स्वामी महाराज, एकनाथच्या या अधर्मी बण्डाळीमुळं, वैदिकधर्म तर साफ बुडालाच, पण पाण्ढरपेशा रयतेला—

**गावबा :** म्हणजे भोजनभाऊ भटाना—

**चव्हाटे :** इभ्रतीनं जगण्याची सुद्धा पंचाईत पडली आहे.

**भम्पक :** भिक्षुक म्हणजे तळलेला पापड हवा त्यानं टिचकीनं फोडावा. आंगाचा कसा तिळपापड होतो.

**चव्हाटे :** नुकताच पैठणवर लाळीचा रोग आला. शेकडो ढोर मेली. पण पडी उचलायला एकहि म्हारडा आला नाही. अखेर आम्हाला ती महाराची कामं करावी लागली.

**गावबा :** बेचाळीस पूर्वज गतीला गेले. वाईट काय झालं त्यात ? आपलं प्रेत आपणच जाळण्या पुरण्यात सोवळं टिकतं.

**भडाग्नि :** नावाचा एकोबा, पण महारमांगांना चिथाऊन यानं सगळ्या पैठणचा एकोपा बिघडवून टाकला.

**एक :** अक्षरशः कबूल. अभागी अस्पृश्यांच्या मनात मी त्यांच्या गुलामगिरीची खन्ति उत्पन्न केली. माणुसकीच्या हक्काची त्याना जाणीव दिली, अन् भागवत धर्माच्या दिक्षेनं भिक्षुकी धर्माचा सैतानीपणा त्याना पटवला.

**स्वामी :** एकनाथ, समाजात असन्तोष भडकवणारी असली कृत्यं तुझ्या सारख्या विद्वान्, नीतिवान् न् जबाबदार माणसाला शोभत नाहीत.

**एक :** जबाबदारीची जाणीव ठेऊनच, स्वामी महाराज, हा विस्तवाचा खेळ मी खेळलो न् खेळणार. माझ्या मतानं मी ब्राम्हणाचं आद्यकर्तव्य बजावीत आहे. पण तुमच्या दयाशून्य धर्माच्या दृष्टीनं, मी जाणून बुजून भयंकर अपराध केला आहे. या महापातकाबद्दल अधिकात अधिक असेल ती शिक्षा स्वामींनी खुशाल द्यावी. ती भोगायला मी सहकुटुम्ब सहपरिवार आनन्दानं तयार आहे.

**स्वामी :** (स्व.) याच्या आत्मबळापुढं आमची निर्णयशक्ति दिङ्मूढ होत आहे !

**भडाग्नि :** स्वामी महाराज, याला देहान्त प्रायश्चित्ताशिवाय दुसरं प्रायश्चित्त नाही.

**एक :** प्रायश्चित्त ? प्रायश्चित्त पश्चात्तापाला. मला प्रश्चात्तापच होत नाही, तर प्रायश्चित्ताचा प्रश्नच येतो कुठं ? अस्पृश्योद्धार हा माझ्या जीविताचा पंचप्राण आहे, अन् तो एकनाथ नष्ट झाल्याशिवाय थाम्बणार नाही.

**गिरजा :** देहान्त शिक्षेच्या धमक्या देता कुणाला ? अनाथ अपंगांच्या सेवेला ज्या दिवशी तनमनधन अर्पण झालं, त्याच दिवशीं आमची या देहावरची सत्ता गेली. आमचे देह जाळून त्यांची राख केलीत, तरि त्या राखेचा कण न् कण, अस्पृश्योद्धाराच्या किंकाळ्या मारीत, उभ्या भरतखण्डात धिंगाणा घातल्याशिवाय राहणार नाही.

**एकनाथ :** स्वामी महाराज, आपण धर्मज्ञ न् धर्मात्मे आहात, प्रचलित धर्माच्या स्नेहशून्य ताठरपणाची आपली जर खात्री पटली असेल, तर चला–उठा. भिक्षुकशाहीच्या या प्रतिनिधित्वाचा त्याग करा, अन् श्रीज्ञानदेव नामदेवरायांच्या, अस्पृश्य सन्तशिरोमणी चोखोबारायांच्या भागवत धर्माचं भगवं निशाण हाती घ्या. हिन्दु समाजाला माणुसकीचा धर्म शिकवा. गावोगावच्या असल्या मूठभर भटाभिक्षूकाऐवजी, उभा भरतखण्ड–महाराज–आपल्या पायावर लोळण घेऊन आपला जयजयकार करील.—हे पसंत नसेल, तर करा शिक्षेचा उच्चार. हा मी सहकुटुम्ब तयारच आहे.

**स्वामी :** (स्व.) याच्या अन्तःकरणाच्या तळमळीनं आमच्या कोत्या धर्माभिमानाचा फोलपणा चांगलाच सिद्ध झाला.

**गावबा :** बुचकळ्यात पडू नका. देहान्त शिक्षा पार पाडायला समोरल्या मंडळींत मांगांची उणीव पडणार नाही.

**स्वामी :** शास्त्रीजनहो, विवेक–प्रामाण्य श्रेष्ठ, का ग्रन्थ–प्रामाण्य श्रेष्ठ, हा प्रश्न प्रस्तुत वादात महत्त्वाचा आहे.

**भडाग्नि :** आम्ही ग्रन्थप्रामाण्य श्रेष्ठ मानतो.

**गावबा :** मी भोजनप्रामाण्य श्रेष्ठ मानतो.

**एकनाथ :** धर्मग्रंथाच्या उलथापालथीपेक्षा, स्वामीमहाराज, तुमच्या आमच्या अन्तःकरणाच्या उलथापालथीनंच या हीनदीन जीवांचा उद्धार होणार आहे. काळाबरोबर काळजाची ठेवण बदला न् विवेकाच्या उजेडानं चालू दुनिया पाहा. बापहो, या अडीच तीन कोट धर्मबान्धवाना साध्या माणुसकीनं वागवीयची आम्हाला अक्कल नसेल, तर आमच्या मोक्षाच्या वल्गानांवर सैतानसुद्धा विश्वास ठेवणार नाही.

**स्वामी :** ही गोष्ट आम्हालाहि पटते. प्रस्तुत वादाला आम्ही तडजोड सुचवितो.

**गावबा :** (स्व.) आँ ! जोडाजोडीवरून तडजोडीवर आले. (उ.) म्हादबा, बामनं काय म्हंनत्यात ?

**म्हादबा :** (हळूच) म्हनत्यात् बिरामदेवाचं टक्कुरं !

**स्वामी :** ब्राह्मण ग्रंथप्रामाण्य मानतात. अन्त्यजोद्धार ग्रन्थप्रामाण्याशीं विसंगत आहे. तेव्हा पैठणला भडकलेला समाजिक असन्तोष तात्पुरता शमविण्यासाठी, अन्त्यजोद्धाराचा त्याग करायला, एकनाथ, तू तयार आहेस का ?

**एक :** प्राणान्तीही नाही.

**गिरजा :** गळा कापला तरी त्या गोरगरिबांशीं आम्ही बेमान होणार नाही.

[ विठू आणि म्हादबा सद्‌गदित होऊन एकनाथ गिरजेच्या पायावर " पुण्डलीक वरदे हारी विठ्ठल ! जनार्दन एकनाथ " म्हणत डोके ठेऊन आपापल्या जागावर येतात ]

**एक :** इतकंच काय, पण अस्पृश्यता–विध्वंसनासाठी ब्राम्हण्यविध्वंसन करायलासुद्धा माझी तयारी आहे.

**भम्पक :** ब्राम्हण गेलं, मग राहिलं तरी काय ?

**एक :** हिन्दुत्व ! जबरदस्त संघटित हिन्दुत्व. त्याच्या टिकावासाठीच अस्पृश्याना आम्ही जवळ केलं पाहिजे. फार काय, पण हिन्दुत्वासाठी, वेळ पडली तर, ब्राम्हण्याचा बिनशर्त बळी देईल, तोच " खरा ब्राम्हण " म्हणून सारं जग त्याच्या माणुसकीची गीता गाईल.

**भम्पक :** चाण्डाळ अन्त्यजासाठी ब्राम्हणाची होळी ? वाहवारे अस्पृश्य न् धन्य त्यांचा उद्धार ! (सर्व बिकट हास्य करतात.)

**स्वामी :** ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ! (ब्राह्मणाना) असलं विकट हास्य तुम्हाला शोभत नाही. आज तुम्ही त्या हीनदीन अस्पृश्यांची हासून टवाळी करीत आहात. पण त्यांच्या हृदयांत पेटलेल्या असंतोषाच्या ठिणगीकडे दुर्लक्ष करू नका.

**तिध :** ठिणगीच आहे ना ? आग नाही ना अजून लागली ?

**गावबा :** आग लावण्याचा मान तुमचा. तुम्ही लावाल तर लागेल आग.

**एक :** ती ठिणगी विझवण्याचा आत्ताच यत्न झाला नाही, तर तिच्या प्रचंड होळीत, ते गुलाम न् आपण शिरजोर, दोघेही जळून खाक होऊ.

**भडाग्नि :** आग तर भडकू द्या. मग जगतो कोण न् जळतो कोण, पाहून घेऊ.

[ आतून " आग आग–धावा धावा–म्हारवाड्याला आग लागली, " असा ओरडा होतो. सर्व धाबरून आगीच्या दिशेकडे पाहू लागतात. **गावबा** म्हादबाला घेऊन धावत जातो. आपल्याकडे कोणाचे लक्ष्य नाही असे पाहून, **भम्पकराव**प्रभृति एकमेकांच्या हातावर टाळ्या देतात, ]

**एक :** परमेश्वरा, काय हा आकान्त ! विठोबा धाव. (एकनाथ, गिरजा, विठोबा धावत जातात.)

**स्वामी :** (आसनावरून उठून पुढे येतात.) आमच्या आगमनप्रसंगीच हा अग्निप्रलय व्हावा ! नितान्त दुर्भाग्य ! कशानं ही आग लागली ?

**भम्पक :** परमेश्वराला अधर्म तिळमात्र खपायचा नाही. अन्त्यज आपली पायरी सोडून अधर्मानं वागतात. म्हणून अग्निदेवाचा प्रकोप असाच नेहमी होत असतो.

**स्वामी :** बन्द करा मूर्खांनो तुमची ही पाखाण्डी बडबड, स्नेहशून्य धर्माचरणानं तुम्ही किती पाषाणहृदयी झाला आहात, हेच तुम्ही या पैठणात मला दाखवलंत. शिव शिव ! एकाद्या क्षेत्रालाहि लाजवील असा हा सुंदर विठ्ठलवाडा भस्मसात व्हावा !

[ सर्वांग भाजलेल्या सीतेला गावबा व म्हादबा हातावर उचलून आणतात. मागोमाग गिरजा, हिरकणी, एकनाथ व विठू येतात. गिरजा सीतेला माण्डीवर घेऊन बसते. ]

**म्हादबा :** अरारारारारा ! परमेसरा, काय या देवीपरमान् बयेची दशा केलीस ! कशी बिजली परमान् समद्या इण्टल वाड्यामन्दी चमकत व्हती रऽऽ देवा. समद्या आयाबायांना न् कच्या बच्यांना मावलीनं ध-धरून ध–धरून भाईर काढलं. त्या चांगनाकाची आवा दिड म्हयन्याची बाळातीण, आगीत आडाकली. तिला न् तिच्या न्हानुल्या बचड्याला वाचवायला, बया कशी वाधिनीवानी डोम्बाळ्यात धावली ! बाळ बाळातीणं भाईर काढली न् माझी सोन्यासारखी बया आगीत धावली !

**गिरजा :** आमच्या दुस्मनाना म्हणावं, घ्या आपल्या डोळ्याचं पारणं चांगलं फेडून !

**भम्पक :** म्हणजे ? आम्ही का आग लावली, गिरजाबाई ?

**गावबा :** खाई त्याला खवखवे. देवळात देवी अन् गावभर नायटे. कळतं आम्हाला सगळं !

**एक :** गावबा-म्हादबा, धावत जाऊन शहरातनं वैद्य शास्त्रीबुवाना घेऊन ये.

**गावबा :** त्यांच्या पायावर मी लोळणं घेतली. ते येत नाहीत. म्हणतात, म्हारमांगड्यासाठीं नाहीं मी वैद्य बनलों.

**सीता :** (कण्हत बेसावधपणें) हं ! चला-चला. बाहेर पडा-इकडं इकडं ये बाळ-धाबरू नकोस-अरे मीच तुझी आई ! पेटली, ती पण झोपडी पेटली.

**गिरजा :** बाळ-बाळ , अशी काय बरं बडबड करावी ! मी तुला माझ्या माण्डीवर घेतली आहे ना ?

**सीता :** माई-माई, आपला विठ्ठलवाडा वाचला का ? सगळे भाईबंद बाहेर पडले का ?

**गिरजा :** सगळे पडले बरं. तूच नाही का त्याना जीवदान दिलंस बये !

**सीता :** विठ्ठलवाडा-सरदारांचा लाडका विठ्ठलवाडा !

**एक :** पोरी, कशाला हळहळतेस त्या जळत्या वाड्यासाठी. म्हारवाडा ही कायमचीच जळती आग. तुझ्यासारख्या शेंकडो जीवांचा बळी घेऊन, अखेर ती हिन्दुसमाजाचीही राखरांगोळी करणार !

**सीता :** मामाजी-सरदार-माई, पाणी पाऽणी.

**गिरजा :** पाणी पाणी-गावबा-पाणी.

[ गावबा पाणी आणायला जातो. ]

**विठू :** . . .(सीतेजवळ जाऊन) लाडक्या जिवा, या फत्तराच्या दुनियेत तुझ्या तोंडात घालायला कुठचं पाणी मिळणार ! या हतभागी विठ्याच्या डोळ्यातनं कोसळणारी ही गंगामाई-(डोळे निपटून ते पाणी सीतेच्या तोंडात घालतो.) पी, माझ्या जिवा पी !

**सीता :** आहा ! माझा आत्मा थंड झाला ! [ एकदम झटक्याने अर्धवट उठून ] ते पहा, ते पहा-माझे शिलेदार आले. घोड्यावर बसून आले,-येऊ ? मी येऊ ? आले हो आले.-राऽम ! (पडते व मरते.)

**गिरजा :** अगबाई ! हे कसं काय झालं ! पहा हो-पहा हो !

**एक :** देवाचं देणं देवाधरी गेलं !

**गिरजा :** सीता-सीता. हिरकणी, गेली आपली सीता !

**हिरकणी :** माझी गुरुमावली, अनाथ अपंगांची सावली, सगळ्याना चटक लावली न् बिजली चमकून गेली.

[ गावबा पाणी घेऊन येतो. पण सर्व प्रकार पहाताच पाण्याचे भांडे त्याच्या हातून गळून पडते. ]

**विठू :** हिराबाय, गिरजाबाय, तुम्ही रडता ? ही रडण्याची वेळ ?

**गिरजा :** विठूबाबा, तुमच्या घराण्याची होळी झाली हो होळी !

**विठू :** तशी सगळ्या विठ्ठलवाड्याची झाली. बये, समाजाच्या उद्धारासाठी संसाराच्या न् घराण्याच्या होळ्या अशाच पेटवाव्या लागतात, हे तुम्ही मायबापानीच नाहीं का आम्हाला शिकवलं ? आज तर आपण सगळ्यानी दिवाळी साजरी करून, देवाघरी गेलेल्या या देवमाणसाचा नको का उत्सव करायला ? पहा, पहा, माझ्या पोरीचा चेहरा पहा. कसा फुललेल्या गुलाबासारखा हासतमुख आहे तो ! पापी माणसं मृत्यूच्या नुसत्या कल्पनेनंच भेदरतात. पण असली देवमाणसं हासत हासत मरणाला मिठी मारतात. देशधर्म देवासाठी, माझ्या रामजी शिलेदारानं समरांगणावर पंचप्राण वाहिले. आज माझ्या या जिवाच्या विसाव्यानं, आगीच्या डोम्बाळ्यात सापडलेल्या शेकडो जिवांच्या बचावासाठी, आपल्या जिवाचं सोनं केलं. माझ्या वेसकर घराण्याचा उद्धार झाला. बाप हो, असल्या आत्मयज्ञानंच जनता–जनार्दनाच्या हृदयात माणुसकीची गंगा भागिरथी प्रगट होईल, अन् आम्हा अभागी अस्पृश्याना मायेच्या थण्डगार पाटानी भिजवून चिम्ब करील.

**स्वामी :** (उद्वेगाने) धिःकार धिःकार आमच्या ब्रह्मज्ञानाला न् ब्राम्हण्याच्या अहंकाराला !

**सर्व भट :** हे काय ? हे काय ?

**स्वामी :** गप्प बसा मूर्खांनो.

**एक :** स्वामी महाराज, जोवर असले प्रकार गावोगाव चालू आहेत, तोवर कोणत्या ना कोणत्या जबरदस्त सत्तेच्या गुलामगिरीशिवाय हिन्दुजनाना दुसरा कोणता मोक्ष मिळणार ?

**स्वामी :** एकनाथ, तुझ्या विवेचनेची तिडीक आम्हाला पटली. या हृदयविदारक दृश्यानं आमच्या आचारविचारांत क्रांति झाली. अस्पृश्यता हिन्दुधर्माचं महापाप आहे. आमच्या भवितव्यावरचं सनातन गण्डान्तर आहे. (उठून विठूजवळ येतात.) आऽहा ! विठोबा, जातीनं तू महार. तुला अन्त्यज म्हणणारांच्या जिभा झडल्या पाहिजेत. तुझी ही स्वार्थत्यागी सत्वशील न् धीरगंभीर वृत्ति पाहून '' तूच खरा ब्राम्हण–तूच खरा ब्राम्हण '' म्हणून तुला अस्सा (मिठी मारतो.) हृदयाशी कवटाळण्यातच आमच्या धर्माची माणुसकी सिद्ध होणार आहे.

**सर्वजण :** तथास्तु तथास्तु तथास्तु.

**'' खरा ब्राम्हण '' नाटिका समाप्त.**

**जनता जनार्दनार्पणमस्तु.**

---

## नवीन पुरवणी प्रवेश



**हेतू :** खरा ब्राम्हण नाटिकेचे प्रयोग करणाऱ्या अनेक हौशी नाट्यसंघाना नर्तकी हिरकणीच्या पात्राची मोठी अडचण पडते. प्रवेश गाळावा तर पंचाईत, न गाळावा तरीहि पंचाईत. डेक्कन पार्क्स नाट्यसंस्था चालविताना माझ्यापुढे हीच अडचण पडली होती. तेव्हा मी एक नवीनच प्रवेश लिहिला नि रंगभूमीवर दाखवला. तोच या पुरवणीत मुद्दाम छापीत आहे. त्याचा पुष्कळ नाट्यसंघानां चांगला उपयोग होईल, अशी माझी खात्री आहे.

**—के. सी. ठाकरे.**

---

**अंक २ रा.—प्रवेश २ रा.** (हिरकणीच्या प्रवेशाऐवजीं.)

**स्थळ : एकनाथाच्या घराची ओसरी.**

[**स्थति :** पठाणाचा वेष घेतलेला गावबा एका बाजूने येतो नि दुसऱ्या बाजूने जातो. पाटोपाठ त्याच्याकडे पहात गिरजा प्रवेश करते.]

**गिरजा :** हा काय मेला चमत्कार ? कोण रे तो. होतोस का नाही बाहेर, का श्रीखंड्याकडून घालू खेटर मारून बाहेर. पैठण क्षेत्राचं अझून काही हिंदुस्थान नाही झालं. श्रीखंड्या—अरे गावबा, मारा रे याला मोजून दहा धक्के नि न्या पकडून तिकडच्या समोर. म्हंजे दाखवतील उर्मटाला दौलताबादचा तुरुंग. श्रीखंड्या—

**गावबा :** [प्र. क.] श्रीखंड्या पानी भरता है मायजी. मै गावबाखान हूं. तशरीफ उठानेके लिये बन्दा एक छोडके दो पांवपर खडा है. आलेकम सलाम.

**गिरजा :** काय चमत्कार तरी ! गावबा, दिसंदीस तू फारच आचरटपणा करू लागलास.

**गावबा :** आचरटपणा हा सध्याच्या युगाचा महिमा आहे. मायजी. त्याशिवाय उगाच का हलकेसलके गावगुंड देवकळा पावतात नि रंकाचे राव होतात ? मला पुरुषोत्तम व्हायचं आहे. ज्ञानदेव नामदेवावर ताण करायची आहे.

**गिरजा :** आस्सं ! मुसलमान बनून का तू पुरुषोत्तम होणार ?

**गावबा :** मी कुठं मुसलमान बनलोय ? भलतेसलते आरोप नका करू बुवा.

**गिरजा :** तुला आता मुसलमान नाही म्हणायचं तर काय हिंदू ?

**गावबा :** पेहराव बदलला का धर्म बदलता, तर आपल्या विठू वेसकराला मराठे मण्डळीनी मराठा मानून, शुद्ध करून, केव्हाच पंक्तिपावन केला असता. राजकर्त्यांचा राजमान्य पेहराव

पांधरला म्हणजे काय चमत्कार होतो, माहीत आहे ?—नाही ?—चालू जमान्यात थोड्याशा बदलानं—पगडीपालटानं—चारचौघात मानमान्यता मिळते. नाक्यावरले—चावडीवरले शिपायी मुजरे करतात. अडाणी लोक टरकून दूर होतात. शेकडो नंदी महादेवाच्या गाभा-यावर देवकळा पावतात. असे किती तरी फायदे होतात.

**गिरजा :** हां, अन् उचल्या भामट्याना राजरोस खिसे कापता येतात.—दात काय काढतोस ? तिकडून तुला असं पहाणं झालं, तर काय म्हणतील.

**गावबा :** का—ही म्हणायचे नाहीत. बाहेरच्या रंगाढंगावरून अंतर्यामाची किंमत करणारी कोती कावळी दृष्टी स्वामींना असती, तर, मायजी, सन्त म्हणून एकनाथजींचा डंका काशी ते रामेश्वर झडलाच नसता.

**गिरजा :** अरे, पण आमच्या थेट धरात मुसलमान वावरताना पाहून लोक काय म्हणतील ?

**गावबा :** लोक काय म्हणतील ! गिरजाबाई, फुकट फुकट स्वामींच्या अर्धांगी झालात ! अझून तुम्ही लोकमताला भिताच आं ? आमच्या लोकाना खरोखरच काही मत असतं, तर अस्पृश्यतेसारखी बेमणुसकीची रक्तपिती हिंदुसमाजाला लागलीच असती कशाला ? हा महारोग समूळ नाहीसा करण्यासाठी, एकनाथजीनी हातात वीरकंकण बांधलं, ते काय या पिसाट लोकमताची पर्वा करूनच वाटतं ?

**गिरजा :** आहा गावबा, तुझ्या वेडचाराचा राग येतो खरा. पण कित्येक वेळा तुझे हे असले खडे तात्विक बोल ऐकून कौतुक वाटतं. कुठं रे हा इतका शहाणपणा शिकलास ?

**गावबा :** शहाणपणाचा गड्डा शहाण्यांच्या पागोटींत. माझ्या खाकोटींत थोडाच असणार ! मला सगळ्यानी ठरवलाच आहे वेडा. ढिल्या डोक्याचा नि ठिसूळ मेन्दूचा. अधिक बोलायची मला लायकी नाहीं. कारण, गावबा म्हणजे पैठणचा सार्वजनिक गाढव. थरकत धोडा भडकत निशाण.

**गिरजा :** ज्ञानेश्वर महाराजांच्या कृपेनं रेडा जसा वेद बोलू लागला—

**गावबा :** तसा मात्र हा गाढव जुन्या वेदांची रकटी चघळणार नाही हां, ख्याल रखो. माझा खाक्या थरकत धोडा भडकत निशाण. नित्य नवे गावबाला हवे. काल आपल्या घरीं श्राद्धाच्या ब्राह्मण भोजनाऐवजीं, म्हार-मांगादि अस्पृश्याना मुक्तद्वार सुग्रास भोजन घातलं. तुम्ही स्वता त्याना पंक्तीत वाढलं—आग्रह केला. त्या बिचा-याना केवढा बरं आनंद वाटला ! एकनाथजींच्या डोळ्यातसुद्धा ब्रम्हानंदाच्या हिरकण्या—कशा चमकू लागल्या—पाहिल्यात ना ? रेड्यामुखी वेद बोलाविणा-या ज्ञानोबानी सुद्धा असल्या आनंदाचा हेवा करावा. मग तुम्हीच सांगा. अस्पृश्यांच्या पंक्तीला, जोडीला जोड म्हणून, एकादा वकठलेण्डमुण्डखान किंवा गावबाखान मांडी ठोकून बसला असता, तर काय तुम्ही श्रीखंड्याकडून त्याला गचांड्या दिल्या असत्या ?

**गिरजा :** मुळीच नाही. सर्वांभूतीं सम, वैष्णवाचा धर्म, भेदाभेद भ्रम अमंगळ.

(लांबून " धावा धावा, कुणीतरी धावा, " अशी सीतेची किंकाळी ऐकू येते.)

**गिरजा :** अगबाई ! कुणाची ही किंकाळी ? काहीतरी दगा दिसतो. गावबा धाव धाव.

**गावबा :** पाहून घ्या आता या गावबाखानाचा तडाखा. माझा होरा चुकायचा नाही.

**गिरजा :** सीतेचीच किंकाळी ही. (दोघे लगबगीने जातात.)

(दुलीचंद मारवाडी नि भंपकराव भोजने येतात.)

**मार :** साला येची धरमंदी मिसिलमान बी रेते ?

**भंपक :** सगळा भ्रष्टाचार मांडलाय रांडलेकान् ! काल सगळ्या महार-मांग-धेडांना श्राद्धाचं भोजन घातलं, नि पितर म्हणून हा एकनाथ त्यांच्या पाया पडला.

**मार :** अने ते धेडलोगला दिच्छिना बि दिली ? अगे बालाजी, बंकटजी, रनछोडरायजी, ए तग धरमला डुबवते साला.

**भंपक :** पाहून घ्या. स्वताच्या डोळ्यानी पाहून घ्या. खात्री करून घ्या. आम्हाला सगळ्यानी ठरवलंच आहे म्हणा कानफाटे. तशात आम्ही तुम्हाला चिथावलं, असा नसता आरोप नको बुवा आम्हा गरिबांच्या माथ्यावर. पैठण म्हणजे दक्षिणेतली काशी–

**मार :** तिला ए हिकनाथ देते फाँसी.

**भंपक :** अशा पवित्र क्षेत्रात असा भ्रष्टाचार होऊ लागला तर सारी दुनिया आमच्या तुमच्या तोंडात–काय हवे ते घालील.

**मार :** घालेल घालेल–मूमंदी शेन घालेल.

**भम्पक :** तर मग या बाटग्याला पैठणातनं नको का उखडून टाकायला ? विचार करा. तुम्ही तर आमचे पुढारी–नगरशेट–सारा व्यापार तुमच्या हातीं. धर्माचे तुम्ही कट्टे कैवारी. तुम्हीच मनावर घेतलं नाहीत, तर आम्ही पळीपंचपात्रवाले काय हो करणार ? कलियुग म्हणून पोटाची दामटी चोळीत बसणार !

**मार :** अगे ईसा कसाला धाबरते. तुमी शानालोग काय आमाला खोत्ता सांगते, ए हिकनाथजीणे सम्दा बॉतेगिगीचा बेपाग चालवूनशी हिंदु धरमला ऑग लावली ऑग.

**भम्पक :** लावली ना ? पाहिलीत ना ?

**मार :** हामसा तो दोका भडकला !

**भम्पक :** हां ! धर्म भडकला, तरी डोकं भडकूं देऊ नका. शीर सलामत तर धर्म पचास. डोक्याचा धर्मच धर्माचं डोकं वाचवील.

**मार :** धरम गेला मंजी काय राला ? तमे न हमे ? शेटजी ने भटजी ?

**भम्पक :** ही जोडगोळी हवा तो धर्म पैदा करील. पण टिकली पाहिजे कशी ? अश्शी ! अगदी कडीत कडी. बोला. पैठणची अब्रू वाचवता, का हा भ्रष्टाकार मेल्या मुर्द्यासारखा उघड्या डोळ्यानी पहाता ?

**मार :** कसाली पाहेल–कसाला पाहेल. साला ए हिकणाथजीला उखडून टाकेल.

**भंपक :** मग काढा तुमचं उधराणीचं शस्त्र बाहेर नि आणा रांडलेकाची हंडी-मडकी चव्हाट्यावर.

**मार :** ए भंपकराव, असा नको तू बोल. तेनी तग आमचा सम्दा पीसा कवाच देऊनशी टाकला.

**भंपक :** अहो पण अजून तुम्ही पावती कुठं दिली आहेत ? पावतीशिवाय पैशाची फेड कायद्यानं होत नाही.

**मार :** अगे ते इठू नि गावबा हामसी छातीवग बसला मजी कॉयदा बॉयदा सम्दा––

(आत गावबा ओरडतो०– " जोड्याखाली फटकावतो हरामखोराला. ")

**मार :** अगे भागो भागो–ते गावबाच हिकडशी आला. बालाजी बंकटजी.

(भंपकराव नि मारवाडी पळून जातात. सीतेसह गिरजा प्र. क.)

**गिरजा :** आमच्या बगिच्यात येऊन असला हलकटपणा करायला या मेल्याला लाज कशी वाटली नाही. तुला काही दुखापत तर झाली नाही ना सीताबाई. चांडाळ मेले गावगुंड ! तुझ्या आंगावर हात टाकण्याइतका हा के-या कळसुत्र्या पाजी असंल, असं नव्हतं बाई मला वाटलं. मेले देवाचे बडवे म्हणवतात––

(गावबा केरोबाला कान पकडून खेचीत आणतो. तो ओरडत असतो.)

**गावबा :** अन् गावाचे शेतखाने उपसतात. काय बडवे महाशय, देवाच्या काकड आरतीची वेळ नि इकडं कुठं अक्कल पाजळायला चुकलात. चोरानो, पुजारी म्हणून मिरवता. अस्पृश्याना अन्नदान केलं म्हणून एकनाथजीना महार म्हणता. त्याना वाळीत टाकण्याच्या खटपटी करता. गंगेच्या घाटावर मुसलमान गुंडाला चिथावून त्यांच्या आंगावर थुंकायला लावता. अन् इकडं गोरगरीब पाक पोरीच्या अब्रूवर धाड घालता.

**केरोबा :** गावबा, कान सोड म्हंजे करतो सगळा खुलासा.

**गावबा :** आधी आठवली अवदसा नि आता करतोय खुलासा.

**गिरजा :** आमच्या बागेत एकटी गाठून, सीतेसारख्या अनाथ आश्राप पोरीवर हात टाकलास ? मेल्या तू माणूस का पशू ?

**गावबा :** सीताबाई, बोल या बडव्याची हाडं उभी चिरू का आडवी ठेचू.

**सीता :** गावबा, त्याला सोडून दे.

**गावबा :** सोडून दे ? सोडून देण्यासाठी का या देवळी गाढवाला पकडलं ? तुझ्या शीलावर यानी हल्ला करावा––

**सीता :** हल्ला ? अरे, शीलावर हल्ला कराया कुणाची माय व्यालीय गावबा ? ही सीता म्हंजे पांढरपेशांच्या परसातलं लाजाळूचं झाड, का दावणीची गाय समजतोस ? म्हारवाड्यातल्या

विठू वेसकराची सून आहे म्हटलं मी सून ! लढाईत मर्दाच्या मरणानं मरून, देवाघरी गेलेल्या रामजी शिलेदाराची रण्डकी शिलेदारीण आहे मी शिलेदारीण. बागेत तुळशी तोडताना, गैरसावध पाहून यानी माझ्या आंगावर हात टाकला. पण–त्यापुढं मजल जाती तर– (निरीतून कट्यार काढते.) पाहिलीस ? पाहिलीस ?––पहिलीस ही ?––त्यावर माझ्या शिलेदाराचं नाव कोरून, नगराहून या रण्डकीला आंदण आलीय आंदण. (कट्यार कपाळाला लावून वंदन करते.) या महालक्ष्मीनं या रेड्याच्या काळजाचा ठावच पाहिला असता.

**गिरजा :** अहो ब्रम्हदेव....भूदेव....पाहिलीस ना कशी आहे सीता ? आहे ना जागतीज्योत भगवद्‌गीता ?

**गावबा :** अहो, याच्या कंबाटात पाहिजेत लाथा. गाढवापुढं कशाला गीता.

**सीता :** राजे महाराजांच्या महाराण्यांवर बलात्कार होतील. पण महारणीवर हात टाकणा-यांच्या घरातले कुंकवाचे करंडे पालथे पडतील.

**गावबा :** ऐकलं का भूदेव ? का करू कानाची भोकं साफ ?

**सीता :** माझी किंकाळी ऐकून, मायजी चटकन धावल्या नसत्या, तर गावबा, माझी एक गरीब बहीण आज फुकट रंडकी होती बरं ! दे त्याला सोडून. पाप्यावर आपण नेहमीं दयाच केली पाहिजे.

**गावबा :** दया केल्याचं दुख नाही, पण बडवा सोकावतो त्याची वाट काय ?

**केरोबा :** (किंचाळत) त्याची वाट आता तडक घराकडं....घराकडं....घराकडं !

**गावबा :** घर तर आहेच हो. पण आज देवाच्या काकड आरतीला धाब्यावर बसवलीत. आनंदी बाजाराच्या माडीवरच्या सैंयामैंया जलशाला टाकून इकडं वडलांच्या श्राद्धाला धावलात. आता इथंच थोडी संगीत आरती नि डफावरची लावणी होऊन जाऊ द्या बुवा. थोबाडाचा डफ नि कानाचं तुणतुणं मी अस्सं सुरात लावून बदडतो, का गंधर्व तुंबरूनी क्षीरसागरात जलसमाधीच घेतली पाहिजे.––गिरजाबाई, ऐका सीता, तू पण नीट ऐक––या तंबो-याच्या खुंट्या पिरगाळून भैरवरागाचा पहा कसा मी उद्धार करतो तो. (जोरानें कान पिरगाळतो. केरोबा ओरडतो.) टँव् टँव् टँव्––अझून झार नाही लागत नीटशी. भोपाळा फोडून षड्ज लागला पाहिजे. (केरोबा '' कान सोड, कान सोड, मेलो ! '' असे ओरडतो.) अरेच्चा जव्हारी बिघडली वाटतं. सीता, तुझं ते नालबंद खेटर कुठं आहे. खेटरानं नाकबोंडीची जव्हारी चांगली घासून दुरुस्त केली पाहिजे. (केरोबा मोठमोठ्यानें ओरडतो.) हां. याला म्हणतात दरबारी कानडा. का, लागला की नाहीं तंबोरा भरघोस सुरात.

**सीता :** जाऊ दे रे गावबा. सोड त्याला. असल्या भल्या माणसाची अवहेलना करणं चांगलं का.

**गिरजा, सीता :** सोड त्याला, सोड !

**गावबा :** जशी तुमची मर्जी. ए मानवाच्या कारट्या, जा. देवळात घंटा बडवून, रोज अडाण्यांचा उद्धार करतोस. आज एकनाथजींच्या ओसरीवर एका महारणीनं तुला मोक्ष दिला. चले जाव ! का दाखवू थरकत धोडा भडकत निशाण.

(केरोबाला गावबा रट्टे लगाऊन हाकलतो. तो ओरडत बाहेर जात असतानाच एकनाथ येतो.)

**एकनाथ :** गावबा, गावबा, काय हा अत्याचार.

**केरोबा :** (एकनाथाच्या पायावर पडतो.) नाही महाराज. अत्याचारी मी. मी पापी. आता डोळे उघडले. मला क्षमा करा. बस्स झाला हा भिक्षुकी पुजाऱ्याचा पेषा. हा संसार नको. काही नको.

**एकनाथ :** केरोबा, उठा. पश्चाताप हीच शुद्धि.

पद : राग परज, (दत्तगुरु दत्तगुरु०)

**जाळ संसार हा । टाळ घेऊनि करीं ।**
**चाळ पदिं बांधुनी । माळ गळिं घाल ही. ॥ धृ० ॥**
**चाळ जाळील तव पापराशी अखिल ।**
**टाळ हा संचिता लावि टाळा ।**
**माळ ही माणसा शिकवि माणूसकी ।**
**भागवत धर्म हा ज्ञानदवें दिला ॥ १ ॥**

## अंक २ रा समाप्त.

## अंक ३ रा.—प्रवेश १ ला.

(हातात चिपळ्या, एक लहानसे निशाण घेऊन, सीता भजन गात येते.)

**पद.**

**असा कसा देवाचा देव बाई ठकडा।**
**देव एका पायानें लंगडा ॥ धृ० ॥**
**गवळ्याघरिं जातो। दहिंदुध खातो।**
**करि दह्यादुधाचा रबडा ॥ १ ॥**
**शिंकेच तोडतो। मडकेच फोडतो।**
**पाडि लोणि ताकाचा सडा ॥ २ ॥**
**वाळवण्टिं जातो। कीर्तन करतो।**
**घेतो साधुसन्तांशी झगडा ॥ ३ ॥**

(स्व.) विठ्ठला—पांडुरंगा, पैठणवर कसला आकांत गुजरलाय, नि देवा ! तू डोळे मिटून स्वस्थ का बसला आहेस ! काय आम्ही असं पाप केलं का देवा, आमची गुरंढोरं लाळीच्या रोगानं धडाधड मरावी. गुरांढोरांवर सारी शेती. शेतीवर तुझे भक्तजन जगायचे. त्या गुरांचाच संहार झाल्यावर, देवा, आम्ही गरिबानी कुणाच्या तोंडाकडं पाहायचं बरं. विठाई माउली दयेची भीक वाढ बये,....दयेची भीक वाढ....

**एका जनार्दनी भिक्षा वाढा बाई।**
**देव एकनाथाचा बचडा ॥ ४ ॥**

**विठू :** (प्र. क.) माझ्या लंगड्या भगवंताच्या प्रेमासाठी, विषाचा पेला हासत हासत पिणारी साध्वी मिरादेवीच आली की काय, असा मला भास झाला. मुली, तुझ्यातरी हाकेला पंढरीनाथ धावतो का ?

**सीता :** मामाजी, माणसानं देवाची प्रार्थना करावी. पण संकटाचा भडिमार त्याच्यावर टाकून, स्वता भक्तानंच देवाच्या नावानं संकटांना तोंड देऊन त्यांचा फडशा पाडला पाहिजे. भक्त नि देव निराळे नाहीत.

**विठू :** मुली, मला हे सगळं समजतं. पण ढोरांची पडी उचलायला आपला एकहि जातभाई घराबाहेर पडत नाही. पांढरपेशांविरुद्ध त्यांच्या मनांत भयंकर तेढ पडली आहे.

**सीता :** पडली असेल. पण आपला विवेक तर चांगला जागा आहे ना. भक्तासाठी देवानंसुद्धां हवी ती बरीवाईट कामं नाहीत का ? पंढरीरायानं कबिराचे शेले विणले. सावता माळ्याच्या मळ्यांत राबला. सजन कसायाच्या दुकानात देवानं मासाच्या धड्या रचल्या, नि आपल्या संत शिरोमणी चोखोबारायांच्या बरोबर भगवंतानं मेलेली ढोरंसुद्धां ओढली. मग आपल्या गावातली पड्यांची परवड निपटायला, मामाजी, आपल्याला हो कसली लाज नि शरम. [ दूर पाहून ]

ते पहा–ते पहा. स्वता एकनाथ महाराज पडी उचलायला धावले. तो पहा श्रीखंड्या आहे बरोबर; गावबा पण आहे, आणि तो केरोबासुद्धा लागला त्यांच्या मदतीला. मामाजी, पहाता काय चला धावा. आपण भागवतधर्मी काय नुसते टाळकुटे. जगाच्या सुखासाठी हव्या त्या संकटाच्या खायींत धडाड उडी घेईल, तोच खरा भागवत. चला बोला, पुंडलीक वरदा हाऽरि विठ्ठल.

(दोघे गर्जना करीत जातात.)

---

# पद्यांची पुरवणी

(१) पान ३०२. " धरणं धरायला सोडला काय ? " या वाक्याच्या पुढे :

गावबा :

राग—मुलतानी. चाल : सार्थचि ते वदती.
कलिमय हा झाला । पसारा ।।
मानवतेला कुठे न थारा ।। धृ० ।।

दर्जनांस त्या वैभव आलें ।
सुजनीं जीवन कठोर झालें ।
नय नीतीचे नियम विराले ।।
मानवासि धरि मानव वैरा ।। १ ।।

(२) पान ३२५. " विटेवर थैथै नाचला असेल " या वाक्याच्या पुढे :

एकनाथ :

चाल : सबसे रामभजन करलेना.

श्रीरंग दिव्य हें बघुनी नाचे अलोट आनंदें ।। धृ० ।।
प्रतिकाराची शक्ती तामस सत्वगुणीं आंवरतां ।
मी–तुं–पणाचा निरास झाला भूषण हें भागवतां ।। १ ।।
क्रोध पळाला भेद निमाले वृत्ती हरिमय झाली ।
देहिं विदेही मिळे समाधी समता–पर्वणी आली ।। २ ।।

(३) पान ३२९. " दाखविन या वेड्याचा इंगा " या वाक्याच्या पुढे :—

गावबा :

चाल : रजनिनाथ हा नभीं०

बिकट पाश हा गुरुवरि पडला ।
गिळू पाहतो राहू रविला ।। धृ० ।।
शास्त्र–चिकित्सा वर देखावा ।
अंतरिं विषसम कपटी कावा ।
जनार्दनी जनतेचा धावा ।
दे जय जय दे भागवताला ।। १ ।।

—

श्रीरामाचा पाळणा

बाळा जो जो रे । कुळभुषणा । दशरथा—नंदना । निद्रा करिं बाळा ।
मनमोहना । रामा लक्षुमणा । बाळा जो जो रे [१]
ध्याती मुनि योगी तुजलागी । कौसल्या वोसंगी ।। बाळा. [२]
वेदशास्त्रांची मति जाण । स्वरुपीं झाली लीन ।। बाळा. [३]
चारी मुक्तींचा विचार । चरणीं पाहति थोर ।। बाळा. [४]
राम भावाचा भुकेला । भक्ता आधिन झाला ।। बाळा. [५]

---

**किंमत १।। रुपया.**

प्रकाशक : **शंकर वामन कुळकर्णी,** महाराष्ट्र ग्रंथ भांडार, गिरगांव, मुंबई ४
मुद्रक : **प्रे. के. अत्रे,** अत्रे प्रिंटिंग प्रेस, वि. प. रोड, गिरगांव, मुंबई ४

# विधिनिषेध

" डेक्कन रंगबहार " ची
तीन अंकी संगीत नाटिका.

—लेखक—
**केशव सिताराम ठाकरे**
**(प्रबोधनकार)**

प्रकाशक
**वि. ग. ताम्हणकर**
**महाराष्ट्र पब्लिशिंग हाऊस लि. पुणें.**



आवृत्ति पहिली ] कि. १० आणे [ १९३४

# विधिनिषेध



नाटिकेचा पहिला मंगल प्रयोग पुणे येथे विजयानन्द नाट्य मन्दिरात, ता. ९ फेब्रुवारी सन १९३४ शुक्रवार रोजी सायंकाळी ६ वाजता, **मेसर्स श्री. आणि कम्पनीच्या** सुप्रसिद्ध टापटिपीच्या व्यवस्थेखाली झाला.

**नाटिकेतल्या भूमिका व स्पार्क्स.**

| | |
|---|---|
| क्रान्ति . . . . . . | श्री. कमळाबाई कामत |
| शान्ति . . . . . . | भाई कर्णिक |
| भैरव . . . . . . | श्रीकान्त राजे |
| पुराणे . . . . . . | प्रधान |
| डॉ. प्रवाळ . . . . . . | वसन्त कुळकर्णी |
| विवेकराव . . . . . . | नीलकण्टराव पाटील |
| बवळे . . . . . . | ओंकारराव पाटील |
| वावळे . . . . . . | वसन्त म्हैसाळकर |
| सनातने . . . . . . | नाथ टिपनीस |
| गोरक्षण्या . . . . . . | डोंगर चिरमाडे |
| बगळाजी . . . . . . | सदाशिव जावळे |
| इन्स्पेक्टर . . . . . . | जगन्नाथराव कुलकर्णी |

**दत्तात्रय विश्वनाथ सुळे.**
जनरल मॅनेजर
पुणें, ता. ९–२–३४ **" डेक्कन स्पार्क्स " नाट्यसंस्था**

संगीत

# विधिनिषेध नाटिका



## अंक पहिला

----

### प्रवेश पहिला

नान्दी

नित नवल नटविशी नटेश्वरा ।
विधीनिषेध तुज ना जरा ॥ ध्रु० ॥
मानव हृदया विस्मया–खनि करूनी ।
हसविशि रूसविशि । क्षणांत जनांत ॥
नर राक्षस राक्षस नरसम कृति ।
दिसे जनी । चराचरी । परोपरी ॥ १ ॥
[ क्रान्ति प्र. क्र.]

क्रान्ति०–

(पद)
फुरफुरत्या हृदया प्रणति करित क्रान्ती ॥ ध्रु० ॥
हरविल झणिं भ्रान्ती ॥
खुलविल नव शान्ती ॥
बदलासि भ्याड भीतो । काळासि ओळखी ना ।
त्यागोनि दिव्य क्रान्ति । शान्तीसही मुके तो ॥ १ ॥
मर्दास क्रान्ति शोभे । मुर्द्यास शान्ति लाभे ।
क्रान्तीच शान्ति देई । परी हीच भ्रान्ति लोकां ॥ २ ॥

# संगित–विधिनिषेध नाटिका

[ शान्ति प्रवेश करते ]

**शान्ति**––कोण क्रान्ती ? हल्लो, गुड् ईव्हनिंग्.

**क्रान्ति**––(शान्तीने कुंकू लावलेले पाहून) छान, अगदी छान कुंकवाची ही टिकली लावल्यानं आत्ता तू किती किती छान दिसतेस म्हणून सांगू ! तुझी दृष्ट काढाविशी वाटते.

**शान्ति**––माझ्या पांढ-या फटफटीत कपाळावर एकसारखी खिळलेली लोकांची दृष्ट हा टिकला खरच काढील काग ? क्रान्तिताई, इवलासा टिकला, पण पिंजरेची चिमुट हातात घेऊन कपाळाशी नेताना, माझी छाती किती किती धडधडत होती म्हणून सांगू ! दोन तीन वेळा तर लोक काय बोलतील ? या भीतीन माझा हात खाली पडला. घाबरून आरशात पाहते, तो काय ! माझ्या चेह-याऐवजी तुझाच हा रागीट चेहरा तिथे मला दिसला. मग केलाच हिय्या, अन् टेकलाच हा टिकला एकदाच कपाळाला !

**क्रान्ति**––पण आता तर नाहीना तुझी छाती धडधडत ?

**शान्ति**––छाती नाही धडधडत, पण मन मात्र गडबडतं खर. पण कायग, लोकं मला नाव तर नाहीना ठेवणार ?

**क्रान्ति**––लोकं नावं ठेवीत नाहीत कशाला ? आतापर्यंत पांढ-या कपाळाची म्हणून बोटं दाखवली, आता कुंकू लावलं म्हणून दाखवतील. त्याचा विधिनिषेध आता किती बाळगायचा ! पांढ-या फटफटीत कपाळाकडं ज्यानी त्यानी रोखरोखून मारलेले डोळे सहन करण्यापेक्षा, कुंकवाचा हा कम्युनिष्टी लाल बावटा पत्करला. कुंकू लावलंस, ठीक केलंस. आता मरेपर्यंत ते पुसू नकोस. –– म्हणे विधवांनी कुंकू लाऊ नये !

**शान्ति**––क्रान्तिताई, नावासारखी आहेस खरी तू क्रान्ति. अग, कुणाला विधवा म्हणावं, न् कुणाला नाही, याचा तरी विधिनिषेध पुरूषांनी बाळगला आहे थोडाच ! मला तर मेलं काहीच आठवत नाही. पण बाबा म्हणतात म्हणूच मी समजून चालते, का केव्हातरी, कुठंतरी, कुणाशीतरी माझं लगीन लागलं, न् नवरा मेला, म्हणून मी विधवा. पण तू तर जित्या नव-याची जिती बायको. तुझ्यात न् विधवेत काय फरक ? मेल्या सनातन्यानी क्षुल्लक कारणासाठीं तुला टाकली. जिता असून तुला मेल्यासारखाच नाहीं का ?

**क्रान्ति**––शान्ते, अग मी पण विधवाच ! तुझा नवरा तुझं कपाळ असून मेला, अन् माझा नवरा मला विवाहाचा डाग लावून जगला. एवढाच काय तो फरक. बाकी आपण दोघीजणी विधवाच.

**शान्ति**––कुंकू लावण्याच्या धाडसाबरोबर, मला पुनर्विवाहाचं पण धाडस करता येईल. पण तुला तीही सवलत नाही, क्रान्ते.

**क्रान्ति**––मला त्याचा मुळीच विधिनिषेध वाटत नाही. एकाच विवाहाचे असले थेर झाल्यावर, पुनर्विवाहाच्या फन्दात पडून मला काय मिळणार ? बी.ए. झाले म्हणून या केंब्रिज एम.ए. शहाण्याच्या बाशिंगाला बाबांनी मला बांधली. त्याचा हा असा विचका झाला ! विवाहाचे न् संसाराचे सोहाळे झाले इतके पुरे. आता विद्येच्या आनन्दातच आयुष्य काढण्याचा, आणि साधेल झेपेल तर समाजसेवा करण्याचा माझा विचार आहे.

[क्लबाचा शिपायी येतो.]

**शिपाई**––अवऽ करान्तिबाय, अवऽ शेन्ताबाय.

**शान्ति**––अगबाई ! बोलण्याच्या नादात आपल्याला लेट झाला वाटतं.

**शिपाई**––ल्याट म्हजी ! व्हेरी ल्याट झालाया. समदी फि-याण्ड मण्डावली तकडं तुमची वाट पाहत्यात. शेम शेमबि वराडत्यात. पुरटीस व्हईल पुरटीस ! चला बिगी बिगी. किक् मार्च –आँ ! आन् ह्यो काय चिमित्कार ! वण्डार वण्डार ! श्येन्ताबायच्या कपाळाला कुकू ? कवा लागला तुमचा पाट ? अन् कुणालाबि न्हाय त्येची दाद ? आणखी याक पिकणी पारटी व्हणार.––चला बिगी बिगी. कमसून. [जातो.

**शान्ति**––क्रान्तिताई, मला बाई लाज वाटते असं कुंकू लाऊन पार्टीला जायला. सगळे फ्रेण्ड्स् माझी थट्टा करतील. टाकू का पुसून ?

**क्रान्ति**––खबरदार पुसशील तर. यात कसली आली आहे लाज ! विधवांची कुंकवं पुसून, बेवारशी बायका म्हणून रस्तोरस्ती त्यांचे धिण्डवडे काढणाऱ्या समाजाला वाटते का आपल्या लेकी बहिणी सुनांची लाज ? नाही ना ? मग कशाला पाहीजे त्या लाजेचा आपल्याला एवढा विधिनिषेध ? अगदी हळव्या मनाची आहेस तू शान्ते. अग नवीन सुधारणे प्रघात असाच धिटाईने सुरू करावा लागतो हो.

**शान्ति**––पण कुणी हासलं तर ?

**क्रान्ति**––कुणी हाशलं तर ! कुंकवाला हसायला कुणाला काय झालं ? हासले फ्रेण्ड्स् तर हासले. सांग त्यांना बेलाशक, म्हणावं ही, माझा पाट लागला, गन्धर्व झाला न् पुनर्विवाह पण उरकला.

**शान्ति**––अन् कुणाशी लागला म्हणून विचारलं, तर कायग सांगू ?

**क्रान्ति**––सांग, माझ्याशी तुझा पाट लागला म्हणून. धान्दरट कुठली. चल.

[जातात]

———

## प्रवेश दुसरा

[पुराणे व पाठोपाठ भैरव येतो.]

**पुराणे**——काय राण्डेचा हा धिंगाणा ! लग्नच मोडलेन् या बटकीच्या पोरीन् ! काय म्हणे, हुण्डेबाज गधड्याचं पाणिग्रहण करणार नाही. टराटर अंतर्पाट फाडला न् राण्डेची बोहल्यावरून पळाली. जुने डोळे न् नवे तमाशे. तुला कसे वाटतात रे भैरवा ?–कायरे, बोलतो ते ऐकू येत नाही वाटतं ? डोळे फुटले, का कान फुटले ?

**भैरव**——माझ्याशी काही बोलत का होतात तुम्ही ? [दुसऱ्या बाजूला येऊन उभा राहतो.] हां, बोला आता काय बोलावयचे ते.

**पुराणे**——म्हंजे ! आतापर्यन्त बोललो ते गेलं वाटतं सारं कचऱ्याच्या पेटींत.

**भैरव**——ड्रेनेजात का म्हणाना, गेलं खरं ! पुराणे, मला अलीकडे एक कानफाट्या विकार जडला आहे. केव्हा ना केव्हा माझा एक कान बहिरा असतो. कोणत्या वेळी कोणत्या कानाला घट्ट दडा बसेल, याचा मुळीच नेम नसतो. फण्डगुण्डांच्या हंगामी न् दिखाऊ देशभक्तीसारखी, माझ्या कानाच्या दड्याची भरतीओहोटी दर तासाला चालू असते.

**पुराणे**——चमत्कारिकच रोग म्हणायचा हा ! पण कोणत्या कानाला दडा बसलाय, हे तरी तुला उमगतं का ?

**भैरव**——तो सुद्धां धकाधकीचाच मामला ! कुणीतरी गचाण्डी धरून धकाण्डी दिल्याशिवाय नाही उमगत. थेट आत्ताच्या लग्नाचा प्रकार. क्रान्तिबाईनं कावळे वकिलाला बोहोल्यावर लाथांचा आहेर देईपर्यंत, हुण्ड्याच्या पापाची नाही त्याना अटकळ झाली. छान छान, झाला हा प्रकार छान झाला !

**पुराणे**——बोडके झाले छान. असा नाट कधी लागला नव्हता. लग्न न् मरतिक, दोन्ही अगदी हुकमी. गेलो का काम फत्ते. आजवर शेंकडों लग्नें पाहिली, न् मुर्दे जाळले. पण ना कधि लग्नात्नं नवरी पळाली, ना सरणात्नं मुर्दा उठून फरारी झाला. पण आत्ताचा प्रकार म्हंजे अगदी हाच ! शिक्षणामुळे मोकाट सुटल्या या पोरी ! कलियुग–कलियुग बरं का हे–भैरवा–कलियुग !

**भैरव**——कलियुग नाही का ? हे मी नेहमी बिनचुक विसरतो. उप-निषदाचं सत्ययुग न् रामकृष्णाचं द्वापारयुगच अझून चाललंय, असंच मला आपलं वाटतं.

**पुराणे**——अडणीवरचा आहेस. अरे ती युगं गेली–मेली–ठार झाली.

**भैरव**——त्यांची भुताटकीच काय ती उरली.

[आत–" भ्रान्तीनं चांगला दिला त्या मेल्याला धडा. "]

**भैरव**——बसला उजव्या कानाला दडा. पुराणे, डावीकडं येऊन पडा.

(दुसऱ्या बाजूला जातो.)

[आत–" कावळे वकील शेम शेम. " त्रिवार गर्जना. ]

**पुराणे**——शेण शेण ? हा कसला रे शेणसडा, भैरव.

**भैरव**——पुराणे, पळा पळा. हा इकडं येतोय शिकलेल्या बायांचा दरवडा. पळा. त्या दगडी पुतळ्याच्या आड दडा, नाहीतर भरला आपल्या हयातीचा धडा.

**पुराणे**——गाढवा, बायकांना भितोस ?

**भैरव**——अहो पण या शिकलेल्या आहेत.

**पुराणे**——शिकलेल्या असोत, नाहीतर पिकलेल्या असोत. बायकांना बाचकून पुरुषांचे कसं भागणार ? ब्रम्हदेवाची सृष्टी काय आजच बन्द पाडायची आहे ?

**भैरव**——त्या सृष्टीच्या धास्तीनंच मी शनवारचे निर्जळी उपास न् मारुतीची उपासना चालवली आहे.

**पुराणे**——तर मग तिथेच तुझा घात होणारे भैरवा. साडेसाताळलेले लोक मारुतीच्या शेन्दरात लोळपाटणी मारतात. पण बेट्या, मारुतीच्या मागची वान्झोट्या बायांची साडेसाती कुठं सुटली आहे ? पुत्रदर्शनासाठी धाधावलेल्या, शिकल्या पिकल्या बायांनी, प्रदक्षणा घालघालून त्या बालब्रम्हचाऱ्याला अगदी उठवणीस आणला आहे. ब्रम्हचारी म्हणून मारुतीच्या नादी लागशील, तर लग्नाच्या खटपटीशिवाय संसारांत अडकशील. लग्नसराईच्या लग्नांची आणेवारी काढली, तर सवा आठ आणे लग्नं मारुतीच्या देवळात, अन् पावणेआठ आणे लग्नं शाळा कॉलेजात जमतात हो. बायकांना भिऊन पळण्यात अर्थ काय ? रहा, त्या दगडी पुतळ्यासारखा ताठ उभा रहा. भितोस काय लेका असा ?

**भैरव**——अहो मी बायकांना भीत नाही, लग्नाला भितो.

**पुराणे**——लग्नाशिवाय संसार थाटायला तर नाही ना तुझी हरकत ? नसली, तर या, या बाजारातच तुझा सौदा जुळून येईल. धाबरू नकोस.

**भैरव**——नको बुवा. या शिकल्या सवरलेल्या श्रीमत्या म्हणजे धावत्या पळत्या संक्रान्ती ! पंचांगातल्या संक्रान्ती परवडल्या. त्या दक्षिणेकडे तोंड करून, ईशान्येला पाहातात, अन् वायव्येला मुरका मारून, उत्तरेला पळतात. पण या संक्रान्ती म्हणजे वायूच्या विहिणी, अंजनीच्या बहिणी अन् मारुतीच्या सवाष्णी.

**पुराणे**——भैरव, ती–ती–तीरे कोण ?

**भैरव**——ती ? तिथं तर तरुणींची एक जत्राच भरली आहे. त्याला तुमची ती कोणती, कशी सांगूं ?

**पुराणे**——माझी " ती " कशाला येते आता मरायला पुन्हा ! अन् आलीच, तर आहे कुठं आता घरांत व्हेकन्सी. शांतीच्या नव-याच्या तेराव्यालाच तिनें नदीचा कांठ गांठला——ती ती, ती पहा, घाटोळी बैलाच्या वशिंडाएवढा अंबाडा मानेवर घेतलेली ती. एऽहे एऽहे ! काय बटकीची, एकेका शब्दागणिक मानेला दहादहा हिसके न् मुरके मारतेय्. कोण रे गाढवाची लेक ही, भैरवा ?

**भैरव**——ती तर तुमचीच लेक, शांता.

**पुराणे**——अन् तिच्याबरोबर ती दुसरी फटाकडी रे कोण ?

**भैरव**——ती क्रांती. सनातन्याशी लग्न लागलेली——

(क्रांती शांती प्रवेश करतात.)

**क्रान्ति**——शटप् भैरव, यू फूल. त्याच्याशीं माझा विवाह झाला, पण लग्न लागलेलं नाही. आयाम ए व्हर्जिन्.

**पुराणे**——यूआरे व्हर्जिन्, ॲण्ड ही कोण ?

**शांति**——आय् टू-मी पण-व्हर्जिन नाही का बाबा ?

**पुराणे**——व्हर्जिन् असलीस तरी विधवा आहेस,-अगो, पण हे काय ? हे हे काय ? हे हे हे काय ?

**शांति**——बाबा झालं काय ?

**भैरव**——पुराण्याना हिवडं भरलं का काय ?

**पुराणे**——अगोऽ, तुझ्या कपाळीं कुंकूऽऽअ !

**क्रांति**——बायकानी नाही कुंकू लावायचं, तर काय पुरुषानी ?

**पुराणे**——जिचा नवरा जिवंत असतो, तिलाच कपाळीं कुंकू लावण्याचा अधिकार.

**क्रांति**——अन् एकादीचा नवरा जिवंत असून तिला मेल्यासारखा असला तर ?

**पुराणे**——तिनं नुसतं मेण चोपडावं. चहाटळ !

**क्रांति**——अन् लग्न न झालेल्या कुमारीच्या कुंकवाचा हो काय अर्थ ?

**भैरव**——वेदकाळीं कुमारिकाच होत्या कुठं मुळीं. त्या वेळी लग्न लागल्याशिवाय एकसुद्धां कारटं चुकून जन्माला आलं नाही.

**पुराणे**——कुमारीच्या कुंकवाला कवडीचाही अर्थ नाही.

**शांति**——मग माझ्याच कुंकवात कसला इतका अनर्थ दिसतो तुम्हाला ? मी पण कुमारीच नव्हे का बाबा ?

**पुराणे**––तूं कुमारी ? तूं कुमारी ?

**भैरव**––हां ! मी कुमार, तीही कुमारी.

**पुराणे**:––अगो तुझं लग्न होऊन, तुझा नवरा वारला ना ?

**भैरव**––नवऱ्या बरोबर कुकूं नाहीं वारलं, उलट वाढलं !

**शान्ति**––नवरा वारला, त्याला मी काय करणार बाबा. मी का त्याला मारलं, का मरायला सांगितलं.

**क्रान्ति**––नवरा मेला म्हणजे तुम्ही मुडदेफरास पुरुष, बायकांचे कुंकू पुसता न् मंगळसूत्रं तोडता. मग, एकाद्याची बायको मेली, तर त्याचे काय तुम्ही गंध पुसता का जानवं तोडता ?

**भैरव**––पुरुषांचं कुणी काही पुशीत नाही न् काही तोडीतहि नाही.

**शान्ति**––मला माझ्या लग्नाची आठवण सुद्धा नाही.

**पुराणे**––तुला नसेल आठवण. पण मला–तुझ्या बापाला आहे ना. बायकांच्या कपाळाचं कुंकू म्हणजे त्याच्या, नवऱ्याच्या जिवन्तपणाची निशाणी.

**भैरव**––जिवन्त राहाण्याची विमापॉलिसी तर नव्हे ना ?

**क्रान्ति**––तर मगं कुणाचे नवरे कधी मरते ना !

**भैरव**––अन् कपाळभर मळवट फासणाऱ्या बायांचे मेलेले दादले, सरणावरून ताड्दिशी उडी मारून घरच्या खाटल्यावर परत आले असते.

**पुराणे**––अगो पोरी, विधवा जर कुंकू लाऊ लागल्या, तर काही त्यांचा न् सवाष्णींच्या समाजात एकच गोंधळ उडेल.

**भैरव**––सवाष्ण पूजनाच्या राष्ट्रीय एळकोटात विधवांच्या ओट्या भरल्या जातील.

**शान्ति**––ओट्या भरताक्षणींच घरोघर पाळणे हालू लागतात, असा तर तोडगा नाही ना ?

**क्रान्ति**––सगळ्यांच बायकानी कुंकवाला कायमचा फाटा दिला, तर काय नवरा बायकोला ओळखणार नाही, भाऊ बहिणीला पारखणार नाही, का मूल आईला बिलगणार नाही !

**पुराणे**––अगो पोरीनो, ही तुमची तोण्डे, ताकघुसळणीचे भाण्डे, कां फोनोग्राफचे शिंगाडे !–भैरव, हें हें हें सारें शिक्षणाचें परिणाम बरं, शिक्षणाचें परिणाम !

**भैरव**––स्वराज्य झाल्याशिवाय बायकांच्या शिक्षणाला आळा, यायचा नाही, पुराणे, आपले पूर्वीचं स्वराज्य असतं, आऽहा !– शान्तीच्या नवऱ्याइतकीच त्याची आठवण ! पण जीव कसा अगदी कायदेभंग्यासारखा वैतागतो. स्वराज्य असतं, तर चोळीऐवजी पोलकी न् तिपेडी वेणीऐवजी फुग्याचे आम्बाडे घालणाऱ्या बायाना, श्रीमतांच्या जनानखान्याची जन्मठेप शिक्षा ठोठावली असती.

**क्रान्ति**——बायकांना पुरुषांच्या जनानखान्यात कोम्बण्याऐवजी, पुरुषांना बायकांच्या हमालखान्यात कोम्बण्याचा मनू उगवला आहे बरं !

**भैरव**——मनू उगवला असेल, पण संधी कुठं आहे ? संधिप्रकाश दाखवा. I most humbly beg to offer myself for the same. As for my qualifications मी सडासोट बजरंगबली आहे. आहे का एकादी व्हेकन्सी ?

**शान्ति**——नो व्हेकन्सी.

**भैरव**——असून नाही म्हणाल तर वशिल्याचे वंगण चोपडून खटपट करीन.

**क्रान्ति**——कुंकवाच्या वादात तुझ्या वंगणाची जरूर नाहीं. कानफाट्या !

**भैरव**——एकवार वापरून खातरी करा. स्वदेशीला उत्तेजन द्या. नमुना फुकट. वैधव्याची भीति नाही. मेलो तरी अखण्ड सौभाग्याची हमी.

**पुराणे**——सगळ्याच बायका कुंकवाचे मळवट भरूं लागल्या, किंवा पाण्ढऱ्या फटफटीत कपाळांनीं मिरवूं लागल्या, तर अमकी सवाशीण न् तमकी विधवा, हें लोकांना समजणार तरी कसें रे भैरव ?

**क्रान्ति**——लोकांना समजून करायचं काय ?

**भैरव**——मग संध्याकाळीं बाजार पेठेतल्या कंबरखुंट्या लोकांनी गप्पा तरी कसल्या मारायच्या ? बायकांच्या कपाळाच्या ?

**शान्ति**——ही कुमारी, ही सौभाग्यवती, ही विधवा, याच्या चाम्भारचौकशा हव्यात कशीला लोकांना ?

**भैरव**——तेवढीच बेरोजगाऱ्यांच्या संख्येंत घट होईल. तोण्डं पाहण्यापेक्षां चांभारचौकशा बऱ्या. आमच्या वाचाळपुरीला बेरोजगारीचे वावडे फार. नोकरी धन्दा नसला, तर घरचं खाऊन लष्करच्या भाकऱ्या भाजतील, पण आढ्याला तंगड्या लाऊन स्वस्थ बसणार नाहींत. इथल्यासारखा उद्योग जगात दुसरीकडं कुठेंहि आढळायचा नाहीं. पानसुपाऱ्या, पुराणं, प्रवचनं, प्रदर्शनं, परिषदा, पिक्‌पॉकेटिंग, पकडापकडी, सारखा पकारी प्रवाह चालू असतो. फार उद्योगी !

**शान्ति**——अमूक एक कुमारी, म्हणून तिच्याशीं लग्न लावायला कुणी पुढं होत नाही.

**भैरव**——शान्ता शान्ता, ही तरुणांची शुद्ध बदनामी आहे. आगळिकीशिवाय आमच्या कोमल भावना दुखावणारा खेटरप्रहार आहे. मोटेच्या बैलाप्रमाणे हा आरोप मागे घे. नाहीतर अस्साच तडक जाऊन चव्हाट्यावर उपासमारीचा जाहीर धिंगाणा करीन. मग गांधीच्याही मध्यस्थीचा मुलाजा राखणार नाही.–कुमारिकांचे पाणिग्रहण करायला म्हणे तरूण पुढे होत नाहीत ! पुढें व्हायचे कसे ? त्याच तुरतुर तोऱ्यानं सारख्या पुढंपुढं पळतात, तर त्यांच्या मागेमागे जाण्याशिवाय आमच्या हातात–नव्हे पायात काय असणार ? म्हणे तरुण पुढें होत नाहींत. शेंकडो होतील–नव्हे होतात, पण कुमारीच माघार घेतात.

**क्रान्ति**––जे तरुण पुढे येतात, ते हुण्ड्याचा मलिदा खायला येतात.

**भैरव**––शेण खायला येतात. पण येतात ना ?

**क्रान्ति**––चवली पासून रुपया इतक्या कुंकवाचे टिकले लावणाऱ्या बाया, म्हणजे जित्या नवऱ्याच्या जित्या प्रॉपर्ट्या. हे समजून उमजून सुद्धा त्यांच्याकडं काण्या डोळ्यांच्या नजरफेकी करायला पुरुषांना लाज नाहीं कारे वाटत भैरव ?

**भैरव**––बायका जर पुरुषाकडं चोरट्या नजरेनं पाह्यला चुकत नाहींत, तर पुरुषांना त्यांच्या डोळ्याला डोळा भिडवायला लाज कसली ? शिवाय, कवि चित्रकार न् लेखक याना या नजरफेकीचा अधिकारच असतो.

**शान्ति**––सारेच पुरुष काही कवि चित्रकार न् लेखक नसतात. कुंकवाच्या लाल बावट्याची सुद्धा तुम्हाला भीति वाटत नाही, तर मेल्यानों तुमच्या वाह्यात नजरफेकीनं, आम्हा विधवांची काय तिरपीट उडत असेल, याची कल्पना तरी करून पहा.

**क्रान्ति**––जावे त्याच्या वंशा तेव्हां कळे.

**भैरव**––त्यासाठी काय विधवेच्या पोटीं जन्म घेतला पाहिजे ?

**शान्ति**––त्यासाठी विधवेचा जन्म घेतला पाहिजे.

**भैरव**––विधवेचा जन्म ? जन्मताच कोण कशी विधवा होऊ शकेल ? कुमारीचा जन्म घेऊन, मग मुद्दाम विधवा बनलं पाहिजे, असं तरी म्हण.

**क्रान्ति**––अनाथ विधवेला माणुसकीच्या कळवळयानं, सनाथ करायला तर कोणी पुढं व्हायचं नाही–

**शान्ति**––उलट, कुत्सित बुद्धीनं, बेवारशी चीज म्हणून हवे ते पुरुष त्या बिचारीकडं चारगट नजरेने टौकारून पाहातात. म्हणून म्हणते, कपाळी कुंकवाचा टिकला असला, तर तेवढाच त्यांच्या चारगटपणाला आळा बसेल.

**भैरव**––हां हे मात्र खरं आहे बुवा. कुंकवाच्या लाल बावट्याला लोक थोडेसे भितात. पण पाण्ढऱ्या बावट्याला पाहाताच, डोळेफेकीची मेलगाडी भरधाव त्या फीमेलवर सोडतात.

**क्रान्ति**––कशाचे मेले लाल बावट्याला भितात ? डोक्यापासून पायापर्यंत ताम्बडे लुगडे पांघरलेल्या तरुणीकडे तर मेले अधिकच टौकारून पाहतात.

**भैरव**––हा कोण बुटबैंगण, टौकारून पाहात इकडं आला ?

[शिपायी प्रवेश करतो]

**शान्ति**––हा आमच्या क्लबचा शिपायी बगळांजी. कारे झाली का सगळी बोटिंगची तयारी ?

**बगळाजी**——तयारी म्हजी ? समद्या होड्या भरल्या. तुमी जाऊन बसलात का वल्ही मारून होडी ढकलायची. चला बिगि बिगी. किकमार्च. [जातो]

**क्रान्ति**——शान्ते, चल लवकर. ब्रेव्हो भैरव; बाय बाय रावसाहेब.

[जाते]

**शान्ति**——थँक्यू भैरव. गुडबाय् पपा. (जाते)

**पुराणे**——तुझा बाप पपा. बिघडली कारटी. क्रान्तीच्या नादानं ही शान्ति बिघडली, का शान्तीनंच क्रान्तीला बिथरवली रे भैरवा ?–बसला का तुझ्या कानाला दडा ? (त्याला हालवून) तुझ्या कानाला दडा बसला दडा !

**भैरव**——मग या कानाशी कशाला ओरडा ? इकडे येऊन रडा.

(दोघे जागा बदलतात)

**पुराणे**——या कारटीनं कपाळावर मळवट भरून आमच्या पुराणे घराण्याचं तोण्ड काळं केलं.

**भैरव**——शान्तीची आई मेल्यावर, घरात ती एक घारी घार बाळगलीत, त्यानं नाही का तुमच्या घराण्याचं नाव बुडालं ?

**पुराणे**——मग मी काय बायकोशिवाय राहू वाटतं ? मला पेनशनर वयस्काला कोण देणार आपली मुलगी ? म्हणून ठेवली त्या घारीला घरट्यात आणून.

**भैरव**——पण लोक काय बोलतात ?

**पुराणे**——लोक लाख बोलतात. झक मारतात. आमच्या अडचणी आम्हाला माहीत.

**भैरव**——शान्तीच्या अडचणी शान्तीला माहीत.

**पुराणे**——म्हणून काय बालविधवा कुंकू लाऊन, बापाची जाहीरात देत शहरभर फिरेल ?

**भैरव**——बापाची का मेल्या नवऱ्याची, कुणी सांगावं ! तुम्हाला जर इतक्या उतार वयात अन्तराळी गिरक्या भिरक्या मारायला एक घारी घार लागते, तर शान्तीला नको का एकादा गटर्धुम पारवा शेजारी घुमायला.

**पुराणे**——म्हणजे ? ती कारटी पुनर्विवाह लावणार कीं काय ?

**भैरव**——गुपचूप अंगवस्त्रे बाळगणाऱ्या संभावीत पुराण्यापेक्षां उघड पुनर्विवाह लावणारी त्यांची मुलगी खास लोकादराला पात्र होईल.

**पुराणे**——त्या सटवीला म्हणावं, लाव पाहू कसा पाट लावतेस ती ! कुत्र्याची पुडी घालून त्या नवऱ्याला ठार मारीन. पुराण्यांच्या घराण्यात पाट ?

**भैरव**——पाट लावला नाही, तर पोट पाडील.

**पुराणे**---पोट पाडले तरी परवडले---

**भैरव**---आहेच तुमची घारी, पण्ढरीची वारकरी.

**पुराणे**---पण पाट लावलेला नाही मला खपायचा.

**भैरव**---पण तिला खपला तर ! ती आता काही मायनॉर नाही, मेजॉर आहे.

**पुराणे**---मेजॉर असो, नाही तर कॅपटन असो, मी तिचा बाप आहे बाप.-बेफाम कारटी. आंगाची अशी आग होते कीं आता माझ्यासमोर आली तर-अशी नरडी दाबून जीव घेईन. कुंकू लाव, पाट लाव.

(भैरवाची नरडी दाबतो. तो " मेलो मेलो-धावा धावा " ओरडतो.
डॉक्टर **प्रवाळ** व बॅरिस्टर **विवेकराव** धावत
येऊन भैरवाला सोडवतात.)

**पुराणे**---कुंकू लावायला पाहिजे-पाट लावायला पाहिजे-

**प्रवाळ**---अहो रावसाहेब, डोळे उघडून पहा नीट. हा भैरव-भैरव. कसले कुंकू ? कुणाचा पाट ?

**भैरव**---गंडांतर टळलें ! वा रावसाहेब, छान नाटक केलंत. शांति समजून माझीच मानगुटी दाबलीत. आपण धावून आलात म्हणून ठीक, नाहीतर गोव-यांआधींच मी नदीचा काठ गाठणार होतो.

**विवेक**---पण रावसाहेब इतके कां बिथरले ?

**भैरव**---यांच्या विधवा मुलीनं अलीकडं कुंकू लावण्याची केली आहे सुरवात---

**विवेक**---मग त्यांत काय बिघडलं ?

**पुराणे**---त्यात काय बिघडलं ? सुधारकच दिसता हो तुम्ही !

**प्रवाळ**---रावसाहेब, पोरीच्या कुंकवांत कशाला घालता एवढं लक्ष्य ?

**पुराणे**---मी काय माथेफिरू वेडा आहे वाटतं ? काय मी पायात पागोटं घातलं, कां डोकीवर वाहाणा घेतल्यात ?

**प्रवाळ**---घेतल्या नसाल तर आता घ्याल. शान्ति समजून भैरवाच्या बोकांडी बसलात ! वेडाला आता शिंगं का उरली ?

**पुराणे**---सुधारकांशीं बोलण्याची माझी इच्छा नाहीं. स्वराज्य तुम्हीच बुडवलं न् परक्यांना तुम्हीच घरांत घेतले. पाजी-चोर-सुधारक-कम्युनिष्ट. [जातो.]

**प्रवाळ**---भैरव, जा त्याच्या पाठोपाठ. नीट घरी पोचव. वेताळ भडकलाच, तर मला कळव, म्हणजे या म्हसोबाला ठाण्याच्या गोठ्यांत नेऊन ठाणबंद करतों.

**भैरव**——माझ्या भावी बायकोचं कुंकू राखल्याबद्दल हा जिता जीव आपल्याला थँक्यू करीत आहे. [जातो.]

**विवेक**——कायरे प्रवाळ, हे पुराणे रावसाहेब म्हणजे पुरणपोळीच्या पुण्याईवर बनलेले क्रॉफर्ड मामलेदार कायरे ?

**प्रवाळ**——होय तेच. कसा टणक आहे म्हातारा.

**विवेक**——आयुर्मर्यादा धनत्तर दिसते बेट्याची.

**प्रवाळ**——काठी पण कशी बळकट आहे अजून.

**विवेक**——जुन्या मताची छापही तशीच बळकट आहे. पण पूर्वी हा असा नव्हता. बिरबल क्लबांतला हा तर कडवा सुधारणावादी.

**प्रवाळ**——पण पेनशन घेतल्यापासून हा शिंगं मोडून वासरांत घुसला. विवेकराव, मला या असल्या लोकांचं मोठं नवल वाटते. नोकरीवर असेपर्यंत हे मारे सुधारणेच्या गप्पा झोडतात. साहेबांच्या बंगल्यावर हवं ते खातात पितात. त्याना आपल्या घरी तिखट्या मेजवान्या देतात. पण एकदा पेनशनींत घुसले, का यांच्या आंगांत पुराणमतांचा वेताळ हा असा संचारतो.

**विवेक**——अरे ही जुनी खोडं ! आतां यांचं काय राहिलंय ? हा वेताळ त्यांच्याबरोबरच सरणावर जाणार.

**प्रवाळ**——नॉट ॲटॉल विवेक. अलीकडे शेकडो तरूण पदवीधरसुद्धा याच मासल्याचे. तो सनातन्यातच घे ना.

**विवेक**——कॅंब्रिज एमे ? बर्लीनला त्याची माझी भेट झाली होती. तेथल्या सोशालिस्ट सोसायटीत त्याने स्त्रीदास्य-विमोचनावर व्याख्यान दिलें होतें.

**प्रवाळ**——वाचाळ पुरीचे पुतळे व्याख्यान प्रवचनात बृहस्पतीचे बाप न् सरस्वतीचे कण्ठमणी ! युरपची वारी करून हा सनातन्या परत आला मात्र, पंधरा दिवसाच्या आत पंचा पत्रावळ पातळभाजीत गडप ! टाळक्यावर शेण्डीचे प्रश्नचिन्ह वाढवून पुराणमतांचा पुरस्कार करायला, माण्डपंच्या सरसावून तयार. श्रीमंत पदवीधर तरुण म्हणून खळखळाट्यानी आपली ग्रॅजवेट मुलगी——

**विवेक**——कोण ? मिस क्रान्ती ?

**प्रवाळ**——होय. तिच्याशी या अर्कट मर्कटाचा विवाह केला.

**विवेक**——क्रान्तीचा विवाह सनातन्याशी ? किती विचित्र ही योजना ? खळखळाट्यानी नादानपणा केला. माकडाच्या गळ्यात रत्नच बान्धले म्हणायचे. डॉ. प्रवाळ, आय् पिटी पुअर क्रान्ति. अरे व्यवहारात सुद्धा क्रान्ति कधि सनातन्याच्या पचनी पडत नाही.

**प्रवाळ**——तशी ती पडली नाहीच. लग्नातच या बाळानं आपल्या अकलेची धुळवड केली. सारा युरप पायदळी घातला, पण त्याच्या पिण्डाचा हिंदुपणा नाही गेला. विवाहात सगळे जुने चोचले. वरात आल्यावर, डोक्यावर झाल धरून सगळ्या मानकरी मण्डळींच्या माण्डीवर वधूला बसवून तिच्या तोण्डात साखर कोम्बण्याचा एक बाष्कळ विधि करतात, तो तुझ्या पाहण्यात असेलच. क्रान्तीसारख्या ग्रॅज्वेट प्रौढ वधूला तो कसा आवडणार ? तिने स्पष्ट नकार दिला. झालं सनातन्यानं जमदग्नीचा आव आणून, क्रान्तीची भरमण्डळीत निर्भत्सना केली. तिनेही उलट या स्वदेशी म्हसोबाचे कान तिथच्या तिथे उपटून हातात दिले, अन् तडक बापाच्या घरचा रस्ता सुधारला.

**विवेक**——क्रान्तीची उष्टी हळद सनातन्याला चोपडणारांच्या अकलेचं दिवाळंच वाजलं म्हणायचं. पुढं काय झालं ?

**प्रवाळ**——त्या दिवसापासून क्रान्ति सनातन्याला मेली न् सनातन्या क्रान्तीला जन्माचा मुकला !

**विवेक**——टेरिबल, हॉरिबल ॲक्सिडण्ट !

(आंत बायकांच्या किंकाळ्या, " मेलो मेलो, बुडालो "
असा ओरडा. बगळाजी धाबरत धांवत येतो.)

**बगळाजी**——धावा धावा, कुणी तरी धावा बिगी बिगी. होडी फुटली, बाया बुडाल्या. बाया फुटल्या, होडी बुडाली. अक्षिधण अक्षिधण.

**प्रवाळ**——बोटींगचा ॲक्सिडण्ट दिसतो.

**विवेक**——धाबरू नकोस. चल पुढे. आम्ही आलो. डॉक्टर बकप्.

**बगळाजी**——किकमार्च, किकमार्च. [जातात.]

---

## प्रवेश तिसरा

(कावळे वकीलाची कचेरी. कावळे टेबलावरचे कागद चाळीत आहे. जवळ बावळे कारकून लिहीत आहे.)

**कावळे**—बावळे, तुम्ही अगदी बावळे आहात. कवडीची अक्कल नाही तुम्हाला.

**बावळे**—(स्वगत) म्हणूनच आपला मी कारकून !

**कावळे**—धण्टाळवाडीचं पोटपाडीचं अपील आज आहे, हे काल कां नाही मला सांगितलं. त्या बाईला रात्री भेटायला बोलावली असती.

**बावळे**—पण—साहेब—

**कावळे**—चूप बसा. बेवकूब. कामाचं महत्त्वच नाही तुम्हाला ! इकडं सेशनात पोटपाडीचा खटला न् त्याच वेळी तिकडं दिवाणीत तो गहाण खताचा खटला. आता त्या बाईला गहाणात ढकलून, तिच्या खटल्याचे काय खत करू ?—बरं, त्या ठकू म्हापशेकरणीचा बयाणा आला नाही ?

**बावळे**—मागायला गेलो तर ती म्हणाली, साहेबांचं न् माझं खातं आहे. वळते करून घ्या.

**कावळे**—अस्सं म्हणाली—अस्सं म्हणाली ? इकडं आलीच तर—

**बावळे**—तिनंच तिकडं तुम्हाला संध्याकाळी—

**कावळे**—शटप्. मी काय म्हणतो ते ऐकून घ्या. ती इकडं आलीच तर स्पष्ट सांगा, शंभर रुपये बयाणा हातीत पडल्याशिवाय मी हातात केस धरणार नाही.—हे नॉटपेड पत्र कुणाचे ? कशाला झक् मारायला घेतलेत ? बिलं वसूल करायची अक्कल नाही, न् अडीच अडीच आणे असल्या पत्रांच्या डोम्बलावर—

**बावळे**—हे त्या फासवडच्या चम्पीचं पत्र—

**कावळे**—असं कां ! हां, असं डोकं चालवलंत, तर कोण म्हणेल तुम्हाला बावळे ? शाबास.

**बावळे**—माझं आडनावच बावळे, तर मला बावळे म्हटल्याशिवाय तुमची न् जगाची सुटकाच नाही.

**कावळे**—होल्लो ! बावळे—बावळे, सध्याकाळी मला माजूरीला गेलंच पाहिजे. ड्रायवरला म्हणावं, गाढवाच्या लेका, कार तयार ठेव. नाहीतर जाशील म्हणावं सिनेमाला.

**बावळे**—पण आज साहेबाना वेळ नाही. शुद्धीसमारंभाला अध्यक्ष म्हणून जायचं आहे संध्याकाळी.

**कावळे**—डॅम दॅट शुद्धी ! नसते उपद्व्याप आहेत सगळे. आहेत त्याच हिन्दूना माणुसकीनं जगण्याची अक्कल नाही, त्यांत ही भरताड कशाला ? मरो ती शुद्धी. मी नाही गेलो तर होईल दुसरा कुणीतरी ठोकळा अध्यक्ष. ठोकळ्यांना काही दुकाळ पडला नाही. कार तयार ठेवा.

माजूरीला चम्पीचा जलसा. मला न जाऊन कसं भागणार ! आय मस्ट गो. (एक पाकीट उघडून)–ही तार कुणाची ? वेदालंकार कोळशेशास्त्र्यांची–अन् ही अशी खाली कशाला ठेवलीत ? बावळे, यू आरे फूल–सिली–डाँकी. अहो ही तार ना ? तार ना ? मग सगळ्या कागदांच्या थडग्याच्या खाली गाडून कशाला ठेवलीत ? तार म्हणजे पत्र नव्हे, अन् पत्र म्हणजे समन्स वॉरण्ट नव्हे, यूसलेस.

**बावळे**––साहेब, बस् झाली तुमची ही साहेबी. मला रजा द्या. कुठेहि मला पोट भरता येईल. या यूसलेस यूसलेस सर्टिफिकेटांचा मलिदा आता पुरे झाला !

**कावळे**––बावळे, अहो असं डोक्यात राख घालून थोडंच पोट भरतं ? यूसलेस म्हणजे काय ?

**बावळे**––निरूपयोगी.

**कावळे**––क्वाइट राइट. तुम्ही यूसलेस कुणाला? इतरांना. मला नाही. मी तुम्हाला यूसफूल म्हटलं, तर साऱ्या लोकांची तुम्हाला दृष्ट लागेल, त्याची वाट काय ? बावळे अर्थापेक्षा नेहमी गाभ्यालाच हात घालावा. बोला, तुम्ही यूसलेस–का यूसफूल ?

**बावळे**––मी ? साहेब यूसलेस–साहेब–यूसलेस–अगदी यूसलेस.

(घाबरलेला भैरव प्रवेश करतो.)

**भैरव**––यूसलेस–यूसलेस. आमचं नाटकच बन्द पडायची वेळ आली. महत्त्वाची सगळी पात्रं ॲक्सिडेण्टात सापडून पार जायबन्दी झाली. अजून पहिला अंकसुद्धा गाठला नाही. यूसलेस–होपलेस !

**कावळे** ––व्हॉटू यू मीन भैरव ? हा कावळे जिवन्त असेपर्यंत नाटक बन्द ? पात्रांशिवाय नाटके, सूत्राशिवाय ठोकळे, आणि तक्रारीशिवाय फिर्यादी रंगवणारा मी रंगारी. झालं काय इतकं होपलेस व्हायला ? कसला ॲक्सिडेण्ट ?

**भैरव**–पेपर वाचा, पेपर वाचा.

**कावळे**––अरे मला मरायला नाही फुरसद. ऐंगेजमेण्टांची पठाणी परवड सारखी हात धुवून लागली आहे माझ्या मागं. दोन दोन दिवस पत्रांकडं नुसता डोळा मारायला होत नाही.

**बावळे**––पात्रांच्या परवडीनं पत्रांकडे पाहायला वेळच मिळत नाही साहेबाना.

**भैरव**––पात्रांच्या टेहळणीपेक्षा पत्रांची न्याहाळणी अधिक ठेवा आता.

**कावळे**––भैरव, तू आहेसना आमचा चालता धावता लोकल टाइम्स ? मग कोण लेक ही सगळ्या पत्रांची कचरपेटी उपसायची यातायात करतो ? सांग सांग कसला झाला अक्सिडेण्ट तो.

**भैरव**––एकचसा काय, पाठोपाठ वन्, टू, थ्री. काल रावसाहेब पुरण्यानी शांतीच्या कपाळी कुंकू पाहिलं न् काडकन् त्यांचं डोकंच फिरलं " कुंकू लाव, पाट लाव " अशा आरोळया मारीत, चिंध्या फाडीत ते गावभर धुमाकूळ घालीत आहेत.

**कावळे** ---शांतीच्या कुंकवानं पुराण्यांचं डोकं फिरलं ?

**बावळे**---पोटच्या गोळयाची तिडीक डोक्यालाच विशेष भोवते.

**कावळे**---पण पुराण्यांना डोकं असतं किंवा होतं, याची आजवर खरोखरच कुणाला कल्पना नसेल. बरं, दुसरा कोणता अपघात ?

**भैरव**---काल काही कॉलेज तरुणी नदीत बोटींग करताना, -खळखळाट्यांची ती सौभाग्यवति - विधवा मुलगी---

**कावळे**---कोण ? क्रान्ती ?

**भैरव**---तिची होडी उलटली अन् क्रान्ती बुडून वहाणीला लागली.

**कावळे**---टेरीबल् टेरीबल्. पण आजूबाजूला कुणी लोक होते का नव्हते ?

**भैरव**---रेल्वेचे शंण्टींग, दारुपिठ्यांचे पिकेटींग, न् बायकांचे बोटींग बघायला तमासगिरांची उणीव कशाला पडेल ! नदीचा काठ कॉलेजतरुणांच्या वॅनिटी फेअरने भरगच्च उफाललेला होता. पण '' धावा धावा-बुडाली बुडाली '' या ओरड्याशिवाय कोणी काही केले नाही. अखेर तो नवीन बॅरिस्टर विवेकराव आला आहेना ? तो गर्दीतून रेटारेटी करीत धावला, न् त्याने सुटाबुटा सकट धडाड उडी घेऊन, क्रान्तीला पाण्याबाहेर काढली, न् बेशुद्ध स्थितीत आपल्या साईड-कारमध्ये घालून---

**कावळे**---स्वतःच्या चेंबरमध्ये नेली की काय ?

**भैरव**---डॉक्टर प्रवाळाच्या हॉस्पिटलात नेवून पोचविली.

**बावळे**---विवेकाला कावळ्यांचं डोकं थोडंच असणार. तेथे पाहिजे जातीचे !

**कवळे**---सन्यातन्याला हे कळले की नाही ?

**भैरव**---कुणी सांगावं ! पुराण्यांच्या जोडीने चिंध्या फाडीत, धोण्डे मारीत भटकतांना, सनातने अझून कुणाला दिसले नाहीत.

**कावळे**---हे एक पात्र तरी नाटकात अझून शिल्लक आहे म्हणायचं !

**बावळे**---सनातन्याशिवाय वाचाळपुरीत एकही नाटक रंगायचं नाही.

**भैरव**---रंगायचं नाही ? अन् रंगलेलं भंगायचं नाही. पण बेट्याच्या पाठकण्याचाच पत्ता नाही.

**कावळे**---पाठकणा असो वा नसो. पण त्याचं डोकं फिरल्याशिवाय किंवा कुणी फिरविल्याशिवाय कोणतंच नाटक रंगणार नाही.

**बावळे**---पण सनातन्याना डोकं असल्याशिवाय ते फिरणार कसं, न् कोण शहाणा फिरवणार तरी कसं ?

**भैरव**––तोच तर वान्धा आहे ना. सनातन्याला डोकं असतं, तर क्रान्तीसारखी बायको गमाऊन तो कशाला बसता.

**कावळे**––आणि हातातून निसटलेली बायको, गावभर मोकाट भटकताना उघड्या डोळ्यांनी कशाला पहाता !

**बावळे**––आधी जातं डोकं न् मग जाते बायको.

**भैरव**––बायको टिकवायला डोकं लागतं. क्रान्तीला प्रसन्न करून घेता येत नाही, त्या सनातन्याच्या नशिबी पोरं किंवा ढोरं वळण्यापलीकडे कसलं भाग्य असणार ?

**कावळे**––डॅम हिज भाग्य. तिसरा आणखी अक्सिडंण्ट कोणता ?

**भैरव**––इजा बिजा तिजा केला शान्तीनं. क्रान्ती हॉस्पिटलात गेल्यावर, एका मित्राची मोटार-सायकल घेउन शान्ती लेडीज क्लबावर जात असता, दिली एका म्हाताऱ्या वडारणीला धडक न् धाडली तिला यमाकडं तडक.

**कावळे**––ओ ! धिसीज डेंजरस. शहाण्या, मग इतका वेळ हे का नाहीं आधी सांगितलंस.

**भैरव**––शेवटची गोष्ट शेवटी सांगितली. आधी कशी सांगायची !

**कावळे**––शान्ती आता कुठं आहे ?

**भैरव**––त्या म्हातारीला कायमची शान्ती देऊन, ती सेण्ट्रल पोलीस स्टेशनात शान्त बसली आहे. बापाकडं जाईन, तर त्याचं फिरलंय डोकं. क्रान्ती अत्यवस्थ. भ्रान्ती––

**कावळे**––तिचं नाव काढू नकोस माझ्यासमोर.

**भैरव**––चुकलो. आता तिला कोण मदत करणार ? म्हणून आलो धावत तुमच्याकडं. शान्तीसाठी हा आडला नारायण–गाढवाचे, नव्हें तुमचे पाय धरीत आहे.

**कावळे**––डोण्ट बी अफ्रेड भैरव. मी आत्ता तिची सुटका करतो, न् सारी भानगड त्या म्हातारीच्या मुर्द्याबरोबरच गाडतो. (टेलीफोन घेऊन)हल्लो–सेण्ट्रल !-मिस्टर ब्रेन–कावळे स्पिकींग––यस् दॅट मोटार–सायकल ॲक्सिडंण्ट. शान्ती माझी नातेवाईक, क्लोज रिलेटिव–बूझम फ्रेण्ड–यस–यस–(टेली॰ ठेऊन) भैरव जा. माझी कार घेऊन जा न् शान्तीला इकडं पाठवून दे.––बावळे, परशाला म्हणावं, गाडी बाहेर काढ. जा लवकर.

**बावळे**––(स्वगत) भ्रान्तीची व्हेकन्सी शान्तीनं भरून काढण्याचा डाव दिसतो. [जातो]

**कावळे**––भैरव शान्तीला सांग, म्हणावं तुमच्या सगळ्यांच्या मनात माझ्याबद्दल कसलेही गैरसमज असले, तरी या कावळ्याचं मन बगळ्यासारखं पांढरे फेक आहे. अशी तिची खातरी पटव. तिला गाडीतून एकटीच इकडं पाठवून दे.

**भैरव**––मीच तिला बरोबर घेऊन येतो.

**कावळे**---छे छे छे छे. या नसत्या फन्दात तू पडू नकोस. आरोपीबरोबर उघड फिरायला, तू वकील का आहेस ! तुला तिच्याबरोबर आता कुणी पाहील, तर या खुनाच्या प्रकरणात तू विनाकारण अडकशील. भैरव, हा खून आहे खून. कल्पेबल् होमिसाइडसुद्धा नाही. तिला दे गाडीत बसवून न् तू जा आपल्या कामाला बिनधास्त. शान्तीची व्यवस्था मी लावतो. (बावळे प्रवेश करतो.) बावळे, तुम्ही कशाला मरायला परत आलात ? यूसलेस !

**बावळे**---परश्याने गाडी बाहेर काढली, हे सांगायला आलो साहेब.

**कावळे**---व्हेरि गुड. असे शहाण्यासारखे वागलात तर कोण तुम्हाला गाढव म्हणेल ? भैरव, नौ बकप्. शान्तीला लवकर पाठवून दे.

**भैरव**---एकटीच ना ?

**कावळे**---अगदी एन्टायर्ली एकटी पाठवून दे.

**भैरव**---थँक्यू !

[जातो]

**कावळे**---बावळे, परशाला म्हणावं, अशिलाला घेऊन डिरेक्ट इकडंच ये. नाहीतर भलतीच समजून, जायचा लेक तिला घेऊन साऱ्या शहराची रस्ते-पहाणी करायला. जा, त्याला क्लियर वॉर्निंग द्या.

**बावळे**---वॉर्नींग देणं माझं काम, पण ऐकण्याचं काम त्याचं ना ? साऱ्या वाचाळपुरीचा लीडींग ड्रायव्हर, म्हणून या परशाला केवढी घमेण्ड ! त्यात आपण त्याला अगदी डोक्यावर चढवून ठेवलाय.

**कावळे**---बावळे, तुम्ही बावळे आहात. अहो, साप मुंगसाचा खेळ करणाऱ्या गारोड्याला असले हाण्डीबाग हमखास संगही ठेवावे लागतात, अन् यालाच लोकसंग्रह असं म्हणतात.

**बावळे**---लोकसंग्रह करा. नाहीतर हण्डिबाग-संग्रह करा. पण देवाआधी माशीच नैवद्याला चाखते, त्याची वाट काय ?

**कावळे**---नैवद्याची माशी ? बावळे, सांगता काय ? नैवेद्याची माशी, [बाहेर मोटारीचा हॉर्न वाजतो.] माशी स्टार्ट झाली. बावळे, माशी उडाली. स्टॉप हिम-परशा-परशा-परश्या स्टॉप हिम. ऽऽऽ डॅमिट. व्हॉट टूडू. कसं करावं आता ! बावळे, तुम्ही तरी भैरवाबरोबर गेला असतात---

**बावळे**---त्या तसल्या नैवेद्याच्या ताटावर माझ्यासारखा जाळीचा रुमाल काय कामाचा ? माशी बसायची ती बसणारच.

**कावळे**---माझी खात्री आहे, खादीच्या जाड रुमालासारखा तुमचा उपयोग झाला असता.

**बावळे**---परश्या-वाऱ्यानं हा रुमाल वाटेत तेव्हाच उडवला असता.

**कावळे**---ते काही नाही. टॅक्सी करून तुम्ही जा त्याच्या पाठोपाठ, न् तुम्ही स्वतः शान्तीला बरोबर घेऊन या आपल्या गाडीतून.

**बावळे**---माझ्या बरोबर कशाला ? त्या ववडीला माझ्यासारखा कच्च्या सुताचा धागा कितीसा आवरणार ?

**कावळे**---त्या परश्या शोफरचा मांजा तरी काय कामाचा ? रास्कल माझाच थ्रेड तोडून टाकायचा !

**बावळे**---कावळ्यांना तोडून परश्याचं कसं भागणार ? सध्या सहकार चळवळीचे दिवस आहेत. भागीचा डिविडण्ड प्रत्येकाला प्रमाणात मिळालाच पाहिजे. नाहीतर ही वाचाळपुरी तेव्हाच बजबजपुरी व्हायची. चाललंच आहे ! घार उडते आकाशी अन् गुळापाशी चिकटे माशी (बाहेर हार्न वाजतो.)

**कावळे**---इतक्यात आली ? शाबास परशा शाबास ! माझ्या मोटारीवरून तुझा जीव ओवाळून टाकावा. बावळे, परशा एरवी कसाही असला, तरी माझ्याशी तो लक्स साबणासारखा स्वस्त न् स्वच्छ वागतो. किती जलदी तो शान्तीला घेऊन आला ! याला म्हणतात क्विक् डिस्पॅच्. मिलिटरी डिसिपलीन्. जा म्हणजे गो, अन् ये म्हणजे कम्. परश्या परश्या, तुला हजार खून माफ आहेत !

**बावळे**---वकीलाचा एवढा आशीर्वाद असल्यावर हवा तो गावगुण्ड शोफर बनेल.

**कावळे**---बावळे तुम्ही बावळे आहात. मोटारखाली खून पाडून ते जिरवायला सुद्धा स्पेशल अक्कल लागते—ही पहा, जिन्यावर पावलं वाजली. शान्ति आली.---बावळे, बी ऑफ---बी ऑफ. [ बावळे जातो ] आ ऽ हा ऽ ! शान्ते शान्ते---तुला कॉर्जल वेलकम् द्यायला, तुझा दासानुदास हा कावळे आपले दोन्ही हात होकायन्त्रासारखे ताणून उभा आहे. [ डोळे मिटून अवसानात उभा राहतो, तोच सनातने त्याच्यापुढे येऊन उभा राहतो. ]

**सनातने**---गुड मॉर्नींग्.

**कावळे**---गुड मॉर्निंग-गोड गोड मॉर्नींग शान्- [ डोळे उघडून ] आँ !

**सनातने**---आँ ? व्हाय धिस् आँ ?

**कावळे**---(स्वागत) मोतन खातर डुब्बी मारी तो शंख लगे हात ! (उघड) कोण ? मिस्टर सनातने ? बरे वेळेवर आलात. पण मला आता वेळ नाही.

**सनातने**---मलाहि आता वेळ नाही. म्हटलं उभ्या उभ्या भेटून जावं.

**कावळे**---उभ्यानं नको न् ओणव्यानं नको.–ही घ्या, सही होऊन आली तुमची पोटगी नोटीशीची रिसीट.

**सना०**---डॅम दॅट नोटीस ॲण्ड रिसीट. मला या कायदेबाजीचा अगदी वीट आला. कायद्याच्या जोरावर पतिपत्नीची फाटलेली अन्तःकरणं जुळवायचा खटाटोप यूसलेस आहे. माझा त्यावर मुळीच विश्वास नाही !

**कावळे**—इझिट ? नव्या अकलेची ही नवी लाट दिसते. कायदेबाजीवर विश्वास असो वा नसो, कोणतंहि प्रकरण चिघळत चिघळत निकरावर आलं, म्हणजे निर्वाणीला त्यावर कायदेबाजीचं पालस्तर मारावंच लागते. मग त्यावेळी हातून निसटलेल्या मोकाट बायकोची गोष्ट कशाला ? जन्मदात्या आईबापाला सुद्धा पोलीस-चावडी दाखवायचा कुणी विधिनिषेध बाळगीत नाही. क्रान्तीनं आत्महत्त्येचा प्रयत्न केला—

**सना॰**—काय, आत्महत्त्येचा प्रयत्न ?

**कावळे**—यस यस. डिलिबरेट सुईसाईड ! आय. पी. सी. सेक्शन त्री हण्ड्रेड नाइन.

**सनातने**—नॉन्सेन्स ! काय वकील झालात म्हणून हवं ते बरळता ? कालच तिच्या एमेचा रिझल्ट लागून, ती फर्स्टक्लास फर्स्ट आली न् तिला पाच हजाराचं वाडिया प्राईज सुद्धा मिळालं. ती कशाला आत्महत्त्या करील ?

**कावळे**—असं असं ! म्हणून का या नवरोबाला आपल्या पळपुट्या बायकोचा इतका जिव्हाळा फुटला ?—अहो राव, मग असे बाहेर बाहेरून कशाला खडे मारता ? जा,जा तडक दवाखान्यात; न् धरा त्या मावलीचे पाय. न् म्हणावं, जगदम्बे-मातोश्री, त्राहिमाम् त्राहिमाम् त्राहिमाम्.

**सना॰**—असं करायला काही हरकत नाही. ती माझी बायको आहे न् मी तिचा नवरा आहे.

**कावळे**—ब्रेव्हो नवरीचा नवरा ! अंगाला हळद लागली म्हणून ? का सप्तपदीची तंगडझाड केलीत म्हणून ? मंगलाष्टकांची नान्दी, पाणी ग्रहणाचा विष्कंभक, आणि मंगलसूत्राची दावेबांधणी, असल्या नाटकी खटपटीनं जर स्त्री-पुरुषांची अन्तकरणं बिनतोड एकजीव जुळती, तर सनातने, तुम्ही क्रान्तीला जन्माचे मुकलेच नसता.

**सनातने**—म्हणजे ? विवाहविधी हे काय नुसतं नाटक ?

**कावळे**—मानली तर अटक, नाहीतर नाटक. लोक मानतात तोवर ठीक आहे. पण एकदा का त्यानी त्याचा विधिनिषेध बाळगला नाही, की मग पुढे काय ? विवाहनिधीच्या नुसत्या नाटकाने जर पतिपत्नीच्या जोड्या अभंग जुळत्या, तर समाजात कष्टी कुटुंबांचा उकीरडा इतका फैलावलाच नसता !

**सना॰**—वाहवा ! ही छान सोय ! विवाहाचाच विधिनिषेध राहिला नाही, तर सगळीकडं संकराची संक्रान्तच उसळायची. संकरी नरकायैव !

**कावळे**—संकराचा उघड नरक परवडला, पण खोट्या समाजशुद्धीच्या बुरख्याखालचा विषम विवाहाचा शेणसडा आता कुणालाच परवडत नाहीसा झाला आहे.

**सना॰**—हव्या त्या गोष्टीचा विधिनिषेध होऊ लागला, तर कोण शहाणा स्वस्थ बसेल ?

**कावळे**—शहाण्यानी स्वस्थ बसून कसं चालेल ?

**सनातने**—हा सनातन्या तरी हातपाय जोडून बसणार नाही.

**कावळे**—मुळीच बसू नका. हातपाय झाडा. संकराचा प्रलयकाळ विधिनिषेधाची नाटके नाचवू लागला, तर त्याला पायबंद ठोकायला तुम्ही-सनातन्यानीच-कंबर कसली पाहिजे.

**सना०**—कावळे, तुम्ही सनातने शब्दाचा शिवीसारखा उपयोग करताहात. पण ते माझे आडनाव आहे, हे लक्ष्यांत ठेवा. मी एवढा केंब्रिज एमे. सारा युरप पायदळी घातला. तिकडच्या एकनेक समाजाची काकडोळी पाहणी केली. सगळा संकर-एकजात संकर ! असल्या संकराने आपली संस्कृति काय जिवंत गाडायची ? सुधारणा कुणाला नको ? कुणाला नको सुधारणा ? मलाहि सुधारणाच पाहिजे. मीसुद्धा सुधारकच आहे. पण सुधारणेली काही ताळतंत्र ! उठल्या सुटल्या विधिनिषेध—उठल्या सुटल्या विधिनिषेध, ही काय सुधारणा ? विधवेच्या मुलासारखे समाजाच्या पोटात राहूनच सुधारणा करणारा हा सनातने सुधारक आहे. लग्नाची बायको घरी येत नाही. काय सरकारचा कायदा मेला—ठार झाला ?

**कावळे**—आलात ना अखेर कायद्यावर ? अहो, वायदे थकले का कायदेच पहावे लागतात.

**सना०**—हो हो, मी आता कायद्याचीच कास धरणार.

**कावळे** —त्यासाठी वकीलाचेच पाय धरले पाहिजेत.

**सना०**—धरीन धरीन. हवे त्याचे पाय धरीन. मी देशभक्त म्हणवीत असलो, तरी वेळ पडल्यास, नाक्यावरच्या कॉन्स्टेबलाचे कलेक्टर म्हणून पाय चाटीन, करू नये ते करीन, काय वाटेल ते करीन. क्रांतीला माझा – सनातन्याचा – विधिनिषेध वाटत नाही काय ? कायद्याच्या जेरबंदाखाली झोडपीत घरी आणीन ! हा सनातन्या सैतान बनला तर बापाला बाप नाही म्हणायचा, तर बायकोला आई मानील काय ?

**कावळे**—सनातने सनातने, बारोमीटर असा सढवू नका. आता घरी जा न् डोक्यावर पाण्याची पट्टी ठेवा.

**सना०**—पाण्याची पट्टी ठेवा ? मी पाण्याची पट्टी ठेवीन, नाहीतर पट्टीचं पाणी ठेवीन. तुम्हाला कशाला ही उठाठेव ! तुम्ही काय डॉक्टर आहात ? वकील आहात. बस्. कायद्याने बोला.–मला आता माणूसकीचा सुद्धा विधिनिषेध नाही. लग्नाची बायको म्हणे निसटते. घरी येत नाही. कायद्याचा इंगा पाहिला की आलीच पाहिजे–आलीच पाहिजे. (बावळे येतो.)

**बावळे**—आली, आली साहेब ती–आपली ही आली—

**कावळे**—आली ? आली ?

**सनातने**—आलीच पाहिजे. जाते कुठं. सरकारी कायदा काही मेला नाही, अन् कायदा मेला असला, तरी हा सनातने काही ठार झाला नाही.

**कावळे**—सनातने, आता रजा घ्या. मग केव्हातरी निवान्तीने भेटा. जा आता. जा हो. गुड्

बाय् म्हणतो ना ?

**सना०**——गुड् बाय् म्हणता तर जातो. गुड् बायचा विधिनिषेध न बाळगून चालणार कसं ? माझं काही डोकं फिरलं नाही. आज सन्ध्याकाळी माझं व्याख्यान आहे. म्हणे येत नाही ? आलीच पाहिजे. (जातो.)

**बावळे**——साहेब, तुम्ही बाहेर येता, का तिला आत बोलवू ?

**कावळे**——बावळे, माझ्याजवळ आत बाहेर काही नाही. सगळा उघडा सौदा. दे तिला आत पाठवून न् तू पोलीस स्टेशनात जाऊन, या ॲक्सिडेण्टाच्या कागदाच्या नकला ताबडतोब घेऊन ये. जा. बी क्विक !

(बावळे जातो. कावळे टेबलाजवळ लिहीत बसतो. कावरी बावरी शान्ती हळूहळू येते.)

**शान्ति**——वकील साहेब——

**कावळे**——कोण ? शान्ती ? कमॉन् डिअर.

**शान्ति**——डिअर ?

**कावळे** ——यस् डिअर. वकीलाला प्रत्येक अशील डिअरचा काय–व्हेरी डिअर असतो. टेक युवर सीट प्लीज. डोण्ट बी अफ्रेड. शान्ते, प्रकरण मोठे सीरीअस आहे. दहापैकी एकादीच केस सफाईत सुटली तर सुटते. बाकीच्या बिनशर्त सक्त मजुरीला जातात. (शांति घाबरते.) पण तू कशाला इतकी धाबरतेस ? हा कावळे वकील शांतीच्या पाठीशी जोवर अस्सा उभा आहे, अन् त्याच्या प्रेमाचा वरदहस्त तिच्या मस्तकावर अस्सा फिरत आहे, तोवर तुझ्याकडं वाकड्या नजरेनं पहाण्याची प्रत्यक्ष काळाची छाती नाही. धीर सोडू नकोस. माझ्या कर्दन – कायदा डोळ्याना डोळे अस्से भिडवून– हां शाबास ! अश्शी माझ्या स्पिरीटशी एकतान एकजीव समरस हो. शान्ती, तुझ्यासाठी मी माझ्या जिवाचा धुरोळा करीन. खालची कोर्टं कायद्याच्या निसरड्यावरून घसरून न्यायच्युत झाली, तरी मी माझं सर्वस्व पणाला लाऊन, हायकोर्ट प्रीव्हीकौन्सिलला गदगदा हालवून, माझ्या शान्तीला अश्शी अलगज उचलून घरी आणीन. (टेलिफोनची घण्टा वाजते) ——हू यू ? सेण्ट्रल पोलीस ? यस. कावळे. ——ती म्हातारी बहिरी न् आंधळी होती ! वारस कुणीच नाही ? ——हॉर्न——

**शान्ति**——मी एकसारखी हॉर्न वाजवीत होते——

**कावळे**——क्वाइट राईट ! –यस. ——धर्मार्थ ? होमच ? फिफ्टी ? व्हाय ? टेक हण्ड्रेड रुपीज.——कोणत्या संस्थेला ? – लेडीज क्लबला. ——थँक्यू मि. ब्रेन. ——बावळ्याना टेलिफोनवर पाठवा.——बावळे, तुमच्या जवळचे शंभर रुपये भरून टाका आणि प्रकरण मिटल्याचा शेरा घेऊन या. शान्ति, लेट मी काँग्रॅच्युलेट यू.

**शान्ति**——(पाकीटातून नोट काढून) ही घ्या दण्डाची रकम. आपण कशाली भरता ?

**कावळे**——शान्ति, मी तुला काळाच्या जबड्यातून खेचून काढली.

**शान्ति**——आपले उपकार मी जन्मभर विसरणार नाही. माझ्या दण्डाचे पैसे आपण कशाला

भरता ?

**कावळे**——शान्ति, मला तुझ धनदान नको. —मनदान पाहिजे. डोळ्यात चमकणारं हे पाणीदान नको, मला तुझं हे अस्सं पाणीदान पाहिजे. (तिचा हात धरतो.) शान्ति शान्ति, विल्यू बी माईन ? फॉर लाईफ ? शान्ते, स्वतःच्या पराक्रमावर कमावलेल्या या माझ्या ऐश्वर्याची स्वामिनी तू झालं पाहिजेस. गोन्धळू नकोस-धाबरू नकोस-बावरू नकोस. तुला हा माझा अतिक्रम वाटत असेल, तुझ्या अडचणीचा मी गैरफायदा घेत आहे, असं वाटंत असेल, तर हा पहा-हा सोडला मी तुझा हात. मला क्षमा कर. आय् बेग युअर पार्डन.

[ बराच वेळ कोणी बोलत नाही. मधून मधून चोरटे कटाक्ष चालतात. ]

**कावळे**——सन्धिकाळची ही शान्ती आता बस् झाली. कोणीतरी आईस ब्रेक केलाच पाहिजे. —शान्ते, तुझ्या खटल्याचं जज्मेण्ट मी अनुकूल मिळवलं न् तुझी सुटका केली. —माझ्या दैवाच्या खटल्याचा निकाल आता तुझ्या हाती आहे. गो ऑन. डिक्लेअर ध जजमेण्ट. गुड ऑर बॅड. आयाम् रेडी.

**शान्ति**——आपण मला गोन्धळात टाकलीत, अन् गोन्धळात टाकलीतही नाहीत. लौकिकी दृष्टीनं मी जरी बालविधवा असले, तरी मी प्युअर व्हर्जिन——निष्पाप निष्कलंक कुमारीच आहे. कॉलेजमध्ये शेकडो तरूणांशी मी मनमोकळेपणाने कितीही वागले, तरी आत्तापर्यन्त या शान्तिनं आपल्या दिलाचं दान कुणालाच केलेलं नाही.

**कावळे**——पण ते करायचंच नाही, असा तर निश्चय नाही ना ?

**शान्ति**——असा निश्चय का असावा ? का विधवाना तारूण्य भासत नाही, का मानवी विकारांच्या भावनाच त्याना असत नाहीत ?

**कावळे**——हौ इझिट पॉसिबल ? इम्पॉसिबल !

**शान्ति**—

**पद**

**नवति नसे कां विधवा ।**
**कुसुमित नव लतिका ॥ धृ० ॥**
**जीवन——मोहना तृपित चातकी ।**
**नवजल——स्वाद——तृषार्ता ॥ १ ॥**

माझ्या मोटार —बाईकनं काल जसा एक अपघात केला, तसाच वैधव्य हाहि एक ॲक्सिडेण्टच. सगळ्या अपघाताना उपाय असतात, पुरूषांच्या विधुरतेला तर हमखास असतोच असतो. मग आम्ही तरुण विधवानीच काय कुणाचं असं घोडं मारलं ! विधवाना संसार—सुखाची

आशाच नसते, असं मानणाऱ्या फत्तरांच्या अकलेची तारीफच केली पाहिजे. गुलाब मोगऱ्याच्या फुलांसारख्या मुलाबाळांच्या वसंतानं खुलते फुलते संसाराचे हजारो बागबगीचे, आमच्या आजूबाजूला घनदाट डवरले बहरलेले आम्ही सारखे पहात असता, केवळ कपाळावरच्या कुंकवाचा टिळा पुसता क्षणीच, आमच्या उफलत्या तारुण्याच्या फुरफुरत्या भावनाच पुसल्या जातील, असं ठरवणारे शास्त्रकार मेले माणूस होते का फत्तर !

**कावळे**—या फत्तरांच्या फत्तरी काळजाचा निषेध म्हणून तू कुंकू लावायला सुरवात केलीस, का त्यात आणखी काही हेतू आहे ?

**शांति**—मला पुनर्विवाह करायचा आहे. मी करणार. करायचा मला जन्मसिद्ध हक्क नसला, तरी तारुण्यसिद्ध अधिकार आहे, हे समाजाला उघड सांगण्यासाठीच मी हे धाडस केलं आहे, आणि माझ्यासारख्या एकूनेक हतभागिनीनें तसं करावं, अशी आमच्या लेडीज क्लबाने चळवळ चालेविली आहे.

**कावळे**—Splemdid, Very nice ! तुझ्या नैतिक धैर्याची मी सिन्सियर्ली तारीफ करतो. Oh ! very bold ! शांते, तू जितक्या मोकळ्या मनाने आपले विचार मांडलेस, तितक्याच कळकळीनं मी तुला माझ्या पाणीदानाची ऑफर देतो. भ्रांतीसारखी भ्रांती पडली असेल, तुला माझ्या एकनिष्ठेचा विश्वास वाटत नसेल, तर स्पष्ट नो म्हणून नकार दे. मला मुळीच वाईट वाटणार नाही.

**शान्ति**—आपल्या उपकाराची फेड म्हणून—

**कावळे**—मला तुझं पाणिदान साफ नको. वकील नात्याने मी माझे कर्तव्य चोख बजावलं आहे. वकीलीची फी म्हणून तुझ्या जीवनसर्वस्वाची दक्षणा घेणारा नीच्च हा कावळे नव्हे. तू एक निष्कलंक कुमारी आहेस न् मी एक निष्पाप कुमार बॅचलर आहे. तुला पुनर्विवाह कर्तव्य आहे, तुझ्यासारख्या पाणीदार तत्त्वनिष्ठ सहचरीच्या मी शोधात आहे. तू प्रेमदान केलंस, तर मी जन्माचा धन्य होईन.

**शान्ति**—प्रेमदान मी करीन पऽण—

**कावळे**—हवा तो पण लाव, मी तो जिंकीन.

**शान्ति**—अव्यवस्थित व्यवहारापेक्षा व्यवस्थित विवाह बरा, असं माझं मत आहे. आपण उघड रीतीनं चारचौघात माझं पाणीग्रहण केलं पाहिजे.

**कावळे**—ऑफ कोर्स ! बायॉल मीन्स ! शान्ते शान्ते मी आज धन्य झालो.

(तिला कवटाळतो, तोच " लाव कुंकू लाव पाट " अशा आरोळ्या ऐकू येतात. दोघे दचकून दूर होतात.)

**शांति**---लाव कुंकू, लाव पाट ! कसली ही आरोळी ?

**कावळे**---आकाशवाणी झाली की काय !

(वेड्याच्या वेषात पुराणे प्रवेश करतो.)

**पुराणे**---आकाशवाणी-नळाचे पाणी-तेल्याची गाणी-राजाराणी-आणी आणी आणी काय ? लाव कुंकू, लाव पाट.

**कावळे**---हा वेडा इकडं कसा आला ?

**पुराणे**--तुमचा पाट लावायला आला. लाव कुंकू, लाव पाट.

**कावळे**---रावसाहेब, जरा स्वस्थ बसा. तुमचं फिरलय् डोकं---

**पुराणे**---कुणाचं डोकं फिरलंय ? या रावसाहेब पुराण्याचं ? क्राफर्ड मामलेदाराचं ? डोकी फिरलेली पाट लावतात. कुंकू लावतात. लाव कुंकू, लाव पाट.

(कावळे टेलीफोन करून शिपाई मागवतो.)

**शान्ति**---बाबा बाबा. असं काय करता ? घरी चला.

**पुराणे**---घरी ? घरी नाही घारी । तिला पंढरीची वारी । म्हणून बाहेर पडली स्वारी । चल् लाव कुंकू,-लाव पाट.

**शान्ति**---बाबा असं काय भलतचं बडबडता ? कुणी लावलं कुंकू ? कुणी लावला पाट ? कुणी नाही हो. घरी चला पाहू. मी येते तुमच्या बरोबर.

**पुराणे**---मी आता जाणार मसणात. तुम्ही लावा पाट. ए म्हसोबा, तोण्डाकडं काय पहातो ? लाव हिचा पाट. लाव हिला कुंकू. नाही लावीत ? मी लावतो तुझ्याशी पाट. छू टॉमी छू टॉमी.

(अंगावर धावतो. पोलीस येतात. कावळे " पकडा पकडा याला " ओरडतो " अरे मला पाट लावायचा आहे. कुंकू लावावयाचे आहे. " असं पुराणे ओरडतो.)

## अंक १ ला समाप्त.

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला.

[ हातावर हार घेतलेले सनातने व पाठोपाठ
भैरव प्रवेश करतात.]

**भैरव**—वाहवा ! सनातने, आजच्याइतके आपले दणदणीत, खणखणीत न् झणझणीत व्याख्यान यापूर्वी मी कधीच ऐकलं नव्हतं. सुरेंद्रनाथ बानर्जीची ट्रम्पेट त्यापुढे रद्द. आपल्या भाषणाची स्पीड पाहून, सगळ्या बातमीदारानी लेखण्या खाली ठेवून तुम्हाला हात जोडले. तुम्ही नाही पाहिलं ?

**सनातने**—नाही. विषयात मी एकदा रममाण झालो,का मग मला काही दिसत नाही.

**भैरव**—दिसतंच ते. व्याख्यानाचा परिणामसुद्धा लोकावर तसाच झाला.

**सनातने**—भैरव, प्रत्यक्ष अनुभवाचे सिद्धांत असेच परिणामकारक होत असतात. पण माझे विचार मी हयात असेपर्यंत तरी लोकाना पटणार नाहीत.

**भैरव**—जिवंतपणी पटले तर तुम्ही सनातने हो कसचे !

**सनातने**—तशात हे इथचे लोक मोठेच गाजरपारखी.

**भैरव**—त्यानी तुम्हाला पुरे पारखले

**सनातने**—त्याना एकादी गोष्ट पटली, तरी सांप्रदायीक हट्टवादाने, मुद्दाम वेड पांघरून केडगावाऐवजी पेडगावला जातील. जाऊ दे. माझा विचाराचा समानधर्मा, जिवन्तपणी नाही तर नाही, पण मेल्यावर जरी जन्माला आला—

**भैरव**—अहो, मेल्यावर कशाला ? आत्ता हयात आहे, अन् त्याचे तुमचे विचार तुलनेला घातले, तर तो तुमच्यापुढं दहा मैल गेलेला आहे.

**सनातने**—माझ्यापुढं दहा मैल ? असा कोण महात्मा आहे तो ?

**भैरव**—महात्मा नाही. महात्मीण आहे महात्मीण.

**सनातने**——महात्मीण ? आहा, माझं मन उसळ्या मारू लागलं. सांग सांग, त्या देवीचं नाव सांग, पत्ता सांग. मी तिच्या पायावर आपले मस्तक घाशीन. कुलदेवता, ग्रामदेवता, तालुकादेवता, जिल्हादेवता म्हणून त्रिकाल तिची पूजा बांधीन. केडगावच्या नारायण महाराजांना रामराम ठोकून, या नारायणी पुढं माझ्या शिष्यत्वाचा नारळ फोडीन. बोल सांग, ती कुठं रहाते ? कोणत्या पेठेत ? कोणत्या बोळात, कोणाच्या आधाडी ? कोणाच्या पिछाडी ? घर नंबर किती ? भैरवा भैरवा, सांग तिचा नाव पत्ता चटकन्.

**भैरव**——नाव पत्ता सांगून काय उपयोग ! प्रकरण फार जहाल जलाल आहे. प्रायमस स्टव नंबर हंण्ड्रेड. ती आपलं तोण्डसुद्धा पहायला राजी नाही. पदव्यांच्या जोरावर तुम्ही आणखी शंभर सभा जिकल्यात, तरी या नारायणीला जिंकण्याचं काम फार कठीण आहे, सनातने.

**सनातने**——एका विदुषीला मला सुप्रसन्न करून घेता येणार नाही ? कशाला केंब्रिज एमे झालो मी ?

**भैरव**——ते तुम्हाला माहीत ? एका क्षुल्लक आग्रहासाठी क्रान्तीबाईना आपण दुखावल्यामुळे, सगळ्या स्त्री-समाजात तुमची नाचक्की झाली आहे. म्हणूनच गेल्या तीन वर्षांत एकाहि कुलीन किंवा कुलहीन घराण्यातून चुकून सुद्धा एकादी मुलगी सांगून आली नाही. आपण श्रीमन्त आहात, पदवीधर विद्वान आहात, लेखक वक्ते आहात, सर्व काही ठीक आहे. पण क्रान्तीशी आपण वागलात ती रीत इतकी नाठाळ म्हणून कुप्रसिद्ध झाली आहे, की तुमचा वारा घ्यायला तरुणींचे तर नावच घेऊ नका, पण दन्तोडवाडी ओस पडलेल्या थेरड्या सुद्धा खूष नाहीत. मग ही नारायणी तर काय, बोलून चालून तुमच्या नादान रोषाला बळी पडलेली क्रान्तीच.

**सनातने**——काय, आता तू क्रान्तीची स्तुति करीत होतास ? क्रान्ती माझी समानधर्मा म्हणून सांगत होतास ?

**भैरव**——नव्या विचारांच्या क्षेत्रात क्रान्तीबाई समानधर्माचशा काय, पण तुमच्या-पेक्षा कमानधर्मा बनल्या आहेत.

**सनातने**——ओ ग्लॅड टु हिअर दॅट.

**भैरव**——कालच मी त्यांची समजूत करायला मुद्दाम हॉस्पिटलात गेलो होतो.

**सनातने**——मग काय, येते का आता ती आपल्या घरी ?

**भैरव**——नॉट ॲटाल. सनातने क्रान्तीची हळद चुकून तुमच्या आंगाला लागली, या ॲक्सिडेण्टाचे आभार मानीत स्वस्थ बसा.

**सनातने**---अखेर क्रान्ती माझ्या विनंतीचा स्वीकार मुळीच करीत नाहीना ?

**भैरव**---तुमचं तोण्ड पाहू इच्छित नाही.

**सनातने**---भैरवा, या एकलकोण्ड्या जीवनाचा मला आता अगदी वीट आला आहेरे.

**भैरव**---आधी गेली अक्कल, न् मग गेलं भाण्डवल.

**सनातने**---आता या वाक्प्रहारांनी माझ्या भावना दुखऊ नकोस. क्रान्तीला मुकल्यामुळं या सनातन्याच्या भावना सडक्या अंजीरासारख्या दुबऱ्या बनल्या आहेत. साधा सुस्कारा सुद्धा काळजाला भगदाडं पाडतो. तू तरी काही तोड काढतोस का ?

**भैरव**---तोड कशावर ? नासक्या भावनांवर ?

**सनातने**---भावनावर नको. एकलकोण्ड्या फटींग जीवनावर.

**भैरव**--तोड निघेल. पण हे भावनांचे फॅड डोक्यातून उपटून काढा पाहू. क्रान्तीचा त्याग करणाऱ्या सनातन्याना कसल्या हो आल्या भावना ? भावना असती तर अक्कल का जाती ? जेव्हा तेव्हा, भावना दुखावल्या, भावना दुखावल्या, असे काय हो बरळत सुटता ?

**सनातने**---बोल बाबा बोल, हवं ते बोल. पण यावर बिनतोड तोडगा काढ.

**भैरव**---सांगेन ती मसलत प्रास्टीट्यूट कराल ?

**सनातने**---प्रॉस्टिट्यूट ? प्रॉस्टिट्यूट का प्रॉसिक्यूट ?

**भैरव**---शब्दांचे कीस काढू नका. प्रास्टिट्यूशन शिवाय प्रॉसिक्यूशन होत नाही, आणि प्रॉसीक्यूशन हे सुद्धा एकार्थी प्रॉस्टिट्यूशनच नाही तर काय ?

**सनातने**---बोल बोल, तुझी मसलत बोल.

**भैरव**---क्रान्तीचा नाद सोडून, आता शान्तीचा नाद धरा.

**सनातने**---असं करू ?

**भैरव**--तिला नाही नवरा, तुम्हाला नाही बायको हे समानधर्मी त्रयराशीक चटकन् सुटेल.

**सनातने**---आणि तिनेही क्रान्तीसारख्या लाथा झाडल्या तर ?

**भैरव**---झाडल्या तर खाव्या. त्यात काय आहे भावना दुखावण्या इतकं ! बैलापेक्षा गाईच अधिक लाथाळ असतात. पुरुषापेक्षा बायकांच्या लाथा बऱ्या. आडपडद्यात असतात. सुरवात चांगली अन्दाजी धोरणाने कराल, तर डोळे मिटून किल्ला सर कराल.

**सनातने**——ठीक आहे. बोल कशी सुरवात करायची ती.

**भैरव**——थेट विलायती मार्गाने. स्वदेशीचा अभिमान बस झाला आता. एक बायको गमाऊन बसलात. आता सुरवातीचे यंत्र म्हणजे लव्हलेटर.

**सनातने**——लव्हलेटर-लव्ह-रोमान्स ! आहा, मारसेली बन्दराची आठवण होते रे भैरवा ! लव्हलेटर ! बोल कसे लिहू ते.

**भैरव**——लिहिताना असेल नसेल ती विद्वत्ता खर्ची घाला. हृदयाचें प्रेम व्यक्त करताना, वाचणाराला असे वाटले पाहिजे, की हे लव्हलेटर आहे, का लेखकाच्या लिव्हर लंग्जने भरलेली लव्हाळ्याची टोपली आहे. हं, चला, उठा, प्रथम प्रेमपत्राचा सांगाडा उभा करा.

**सनातने**——प्रेमपत्र न् सांगाडा ? भैरवा, ही काय भाषा ?

**भैरव**——लघुव्याकरणापुरतीच माझी विद्या. दादोबाचे मोठे मी थोडेच पाहिले आहे !

**सनातने**——प्रेम कशाशी खातात हे सुद्धा तुला माहीत नसावं ! चल सांग, प्रेम पत्राच्या कवितेसाठी कोणतं वृत्त घेऊ ?——डोळ्यांनी बघतो——शार्दूलविक्रीडित ?

**भैरव**——शार्दूलविक्रीडित ? अहो राव, ती कोवळ्या मनाची पोर भेदरून जाईल पटकन्.

**सनातने**——हेहि खरेच.——ज्याच्या मस्तकीं नूतन जटा,——स्रग्धरा, स्रग्धरा ?

**भैरव**——स्रग्धरा ? शांति म्हणेल परता घरा.

**सनातने**——तेहि खरेच.—मन्दाक्रान्ता !

**भैरव**——मन्द मन्द आक्रान्त आताहि चाललाच आहे. काही नवीन काढा——नवीन काढा.

**सनातने**——आहा. भैरवा टाळी दे——टाळी दे. सायकॉलॉजिकल खटक्याचे वृत्त. मना सज्जना भक्ति पंथेचि जावे. मनाचे श्लोक. थेट काळजाला जाऊन भिडतील. वृत्त भुजंगप्रयात.

**भैरव**——पण त्या नागिणीने या भुजंगावर फुस्स केलं तर ?

**सनातने**——सगळेच बस्तान बिघडायचं ! कोणतं वृत्त चांगलं ? पदाच्या चाली विकण्याचे दुकान नाही कारे कुठं भैरवा ?

**भैरव**——दुकान नाही. पण एक पात्र आहे. जुन्या पौराणिक नाटकात अललल डुर्रर विदुषकाचं काम करणारा लाटणे नावाचा नटकोहिनूर पोळपाट्यांच्या बोळात राहतो. दररोज संध्याकाळी मदिरापीठातून तो बाहेर पडला की, त्याच्या पदांच्या चाली

उचलायला, कितीतरी नाटकवाले न् टाकीवाले त्याच्या मागे लागतात.

**सनातने**—मला पदांच्या चाली नकोत. वृत्तांच्या पाहिजेत.—बस ठरला निश्चय. अश्वधटी ! तोडा तडड ताड, फोडा फडड फाड, खाडा बडा खोदला. अश्वधटीच छान.

**भैरव**—त्यापेक्षा अश्वकंचुकी—घोडाचोळी काय वाईट ? शान्तीला अगदी फिट बसेल.

**सनातने**—गाढवा, अश्वधटी हे वृत्त आहे, अन् अश्वकंचुकी आयुर्वेदातली मात्रा आहे.

**भैरव**—मात्रेशिवाय वृत्त नाही, न् वृत्ताशिवाय मात्रा नाही. प्रेमाचे वृत्त कळवायला मात्राच पाहिजे. इच्छाभेदीचा वळसा अगत्य द्या.म्हणजे कोठा साफ. पोटातली घाण आधी साफ धुतल्याशिवाय, ओठातून प्रेमाचे बोल स्पष्ट उमटायचे नाहीत. चला द्या पत्र लिहून. तुम्ही कालिदास, न् मी तुमचा मेघदूत !

**सनातने**—चल घरी. (जातात.)

---

## प्रवेश दुसरा

[डॉ. प्रवाळच्या हॉस्पिटलचा व्हराण्डा. डॉ. प्रवाळ व क्रान्ति. क्रान्ति बसली आहे तोंच डॉ. प्रवेश करतात.]

**प्रवाळ**——क्रान्तिबाई, नौ यू आर ओके. आता तुम्हाला घरी जायला काही हरकत नाही. यू आर डिस्चार्ज. विचाराला ताण पडेल, किंवा मनाची व्यग्रता वाढेल, असे सध्या काही करता कामा नये. नर्व्हस सिस्टीम अगदी डेलिकेट झालेली आहे. रीडिंग सुद्धा डाएटप्रमाणे अगदी लाइट ठेवा. पब्लिक मूव्हमेण्टच्या भानगडीत आणखी एक महिना तरी तुम्हाला पडता येणार नाही. मी घेऊ आता रजा ?

**क्रान्ति**——डॉक्टरसाहेब, आपले आभार कोणत्या शब्दांनी मी मानू ? माझ्या जोपासनेसाठी आपण न् आपल्या नर्सिंग स्टाफनी मायबापासारखे श्रम घेतले. मला घरी मायेचं आहे कोण म्हणा !— पण इथं घरची आठवण सुद्धा कधी मला आली नाही. घरीच मी पडले असते, तर खास इतक्या लवकर उठले नसते.

**प्रवाळ**——थँक्यू व्हेरी मच्. हा तुमचा अनुभव लोकाना नीट समजाऊन देण्याचं काम हाती घ्याल, तर ती सुद्धा एक उत्तम समाजसेवाच होईल.— बरं, मला आता रजा द्या. (दाघे शेकहँड करतात) तुमची कार आली नाही वाटतं ?

**क्रान्ति**——दिसत नाही. विवेकराव आपली कार घेऊन येणार होते. पण ते अद्याप आले नाहीत. (विवेकराव प्र. क.)

**विवेक**——हजर आहे. अगदी ठरल्या मिनिटाला हजर आहे. गुडमॉर्निंग डॉ. प्रवाळ, गुड मॉर्निंग क्रान्ति. आज पेशण्टला देणार का डिसचार्ज ?

**क्रान्ति**——देणार कसला ? दिला सुद्धा.

**प्रवाळ**——बरं, मी घेतो आता रजा. हे हॉस्पिटल पडल्यामुळं, " या-येत जा नेहमी असेच " असं म्हणणं सुद्धा, जरा चमत्कारीकच, नाही का ? विश्‌ यू गुड हेल्थ, मि-मि-मिस्-मिसेस् क्रान्ति. (जातो.)

**विवेक**——इतक्या लवकर आपण रिकव्हर व्हाल, अशी कुणाचीच कल्पना नव्हती.

**क्रान्ति**——डॉक्टसाहेबांनी माझ्यावर पित्यासारखं प्रेम केलं. इतर डॉक्टर नर्सनी भाऊ बहीणींची उणीव भरून काढली. आपण तर मला प्राणदानच दिलं. आपले आभार मी कोणत्या शब्दानी मानू ?

**विवेक**——नो मेन्शन् क्रान्ति. आभाराचा प्रश्नच येत नाही. मी माझं कर्तव्य बजावलं. अशा अपघाताच्या प्रसंगी कोणीहि आपला जीव धोक्यात घालून, आपल्याला खास वाचवलं असतं.

**क्रान्ति**——नॉट ॲटॉल ! नदीच्या काठावर शेकडो तमासगीर जमले होते. एरव्ही कॉलेज तरुणींजवळ मर्दुमकीच्या गप्पा झोडणारे कितीतरी कॉलेजवीर तिथं उभे होते. पण आपल्या एकट्याशिवाय धडाड नदीत उडी घेण्याचं धाडस कुणी बरं केलं ?

**विवेक**——लेट बाय्‌गॉन्स बी बायगॉन्स. त्या गोष्टीचा आता विचारच करू नका. सध्याच्या मनस्थितीत आपण स्वस्थ विश्रान्तीच घेणं अगत्याचं आहे.

**क्रान्ति**——स्वस्थ राहण्याचा मी कितीहि हिय्या केला, तरी माझं मन कुठं स्वस्थ राहात आहे ? त्याची गिरणी अखण्ड चालूच आहे.–खरोखर त्या अपघातात मी बुडून मरते, तर छान झालं असत !

**विवेक**——व्हॉट डू यू मीन. हा विचार, आत्महत्त्येच्या विचाराइतकाच आततायीपणाचा नाही का ? आपल्यासारख्या समाजशास्त्रज्ञ एमे विदुषीला तरी ही विचारसरणी शोभत नाही. आपण जरी जिवाला वैतागला असला, तरी आपल्यासारखे विदुषी रत्न गमवायला देशाची खास तयारी नाही.

**क्रान्ति**——देश ? कुठं आहे देश ? देशानं का माझ्या जीवनाची जबाबदारी पत्करली आहे ? माझ्या सुखदुःखाची कसली तिडीक देशाला येत आहे ? मुळीच नाही. मग मला देशाची काय म्हणून पर्वा वाटावी ?

——जगण्यासारखं माझ्या जीवनात, खरं म्हणाल तर, कसला चार्म उरला आहे ? कुणासाठी–कशासाठी–क्रान्तीनं या देशात जगण्याची व्यर्थ धडपड करावी ? मायेच्या उमाळ्यानं '' क्रान्ती ये '' म्हणून मला जवळ करणारा, आपुलकीच्या भावनेनं मला पोटाशी धरणारा, एक तरी जिता जीव या मोठी वसतीच्या देशात दिसतो का तुम्हाला ? सारं जग, विवेकराव, आकर्षणावर जगत असतं.

**न या जिवाला मोहन । लवभरि ।**
**तनमन झोके खाई । भासे प्राण असार ऐसा ॥ धृ ॥**
**झुरत सतत मनिं । क्रान्त क्रान्ति ही ।**
**जीवन कसले । रसाभाविं या ॥ १ ॥**

**विवेक**——मला आपल्या करुणास्पद स्थितीची काही कल्पना आहे. पण जोवर आपण हिन्दुस्थानात न् हिन्दु समाजात वावरत आहोत,–नव्हे, वावरल्याशिवाय सुटकाच नाही.–तोवर आपल्या स्थितीला उपाय काय ?

**शान्ति**——युरोप अमेरिकेची सफर करून आलेल्या तरूण विद्वानात सुद्धा असले निराशेचे उद्‌गार ! पेसिमिझम्-निराशा हाच हिन्दु संस्कृतीचा पिंड दिसतो.

**विवेक**——दिसतो कसला ? आहेच मुळी.

**शान्ति**——मग पिंड बदलल्याशिवाय ब्रम्हाण्डात तरी आम्हाला कसला मोक्ष मिळणार ! स्वतंत्र कल्पनांच्या वातावणाकडे, काळाचा ओघ झपाट्यानं जात असताना सुद्धा, दहा हजार वर्षांपूर्वीच्या धर्मकर्मांच्या गंजड बंधनातच आम्ही गिरक्या खात बसावे, ही गोष्ट आमच्या माणुसकीचीच किंमत ठरवीत नाही का ? आपण तर नावाचे विवेक.

या गुलाम देशात विवेकवादाच्या प्रसाराला पदोपदी अडथळा व्हावा, याची कारणं नाही का तुम्हाला उमगत ? शान्तीसारखी निष्पाप कुमारी बालविधवा म्हणून समाजाच्या निन्देची न् टीकेची बेवारशी चीज ठरावी, अन् क्रान्तीच्या सौभाग्याची किंमत वेश्येच्या मोलानी मापली जावी, याचा तुम्हाला काहीच का विधिनिषेध वाटत नाही ?

**विवेक**——वाटत नाही कसा ? सन्ताप येतो. कित्येक वेळा तर मनोवृत्ति इतकी बेफाम खवळते, की वाटतं एखादी सिविल वॉर होऊन, समाजबन्धनाची ही स्टील फ्रेम उध्वस्त करील तर फार छान होईल.

**क्रान्ति**——ही नुसती कल्पना ! जल्पना ! भावना !

**विवेक**——क्रान्ति, आमच्या अधःपाताचे मूळ आमच्या वैवाहिक बन्धनात न् जीवनात आहे. त्यांच्यातच आमूलाग्र क्रान्ति झाल्याशिवाय——

**क्रान्ति**——किंवा कोणी केल्याशिवाय.——

**विवेक**——आमची सामाजिक गुलामगिरी नाहीशी होणार नाही.

**क्रान्ति**——आणि सामाजिक गुलामगिरी गेल्याशिवाय राजकीय स्वातंत्र्य लाभणार नाही.

**विवेक**——चुकून माकून लाभलेच तर टिकणारहि नाही. आमच्या जिण्याच्या कल्पनाच नादान बनल्या आहेत.

**क्रान्ति**——कुणी तरी बदलण्याचा धीर केल्याशिवाय का त्या कल्पना बदलणार आहेत ?

**विवेक**——काही तरी जबरदस्त धक्का दिल्याशिवाय समाजाच्या आचार विचारात क्रान्ति होणार नाही.

**क्रान्ति**——हा जबरदस्त धक्का द्यायला कुणी तरी आपल्या सौख्यावर, जिवावर, सर्वस्वावर तुळशीपत्र ठेवायला तयार झालं पाहिजे. समाजाच्या रोषाला न् सरकारी कायद्याच्या दण्डाला त्याने बिनतक्रार तोंड दिलं पाहिजे.

**विवेक**——हिन्दुसमाजाच्या उज्वल भवितव्यासाठी एवढा आत्मयज्ञ करणारे अनेक तरूण आज–आत्ता–या घडीला पुढे येतील.

**क्रान्ति**——विवेकराव, भावनावश होऊ नका. काय बोलता त्याचा नीट विचार करा. ही रंगभूमी नव्हे, आणि तुम्ही न् मी नाटकातली पात्रं नव्हत. तुम्ही वर्णन करता असले तरूण जर या आभागी देशात असते, तर आमच्या सामाजिक जीवनाचा असा उकीरडाच झाला नसता.

**विवेक**——क्रान्ति, या विवेकाचा विवेक चांगला जागा आहे. भावनेच्या भरात नव्हे, प्रामाणिक विचारांच्या तिडकेनंच मी हे विधान करीत आहे. अनेक तरूणांची गोष्ट सोडून द्या, या सर्व प्रतिज्ञा पार पाडायला, एक तरी तरूण या क्षणाला तयार आहे, ही खात्री ठेवा. तसेच हेहि लक्ष्यात असू द्या, की समाजोद्धारासाठी तरूणांनी कितीहि कम्बर कसली, तरी ऐन वेळेला बायकाच त्यांचा तेजोभंग करतात.

**क्रान्ति**——बायका तेजोभंग करतात ? त्या कशा ?

**विवेक**——समाजसुधारणेच्या क्षेत्रात मी थोडंफार काम केलं आहे, न् आज करीत आहे. विधवांच्या पुनर्विवाहाचा प्रश्न सोडवणाऱ्या अनेक संस्था न् व्यक्ति शहरोशहरी झटत आहेत. मग तरूण विधवा त्यांचा का फायदा घेत नाहीत ? अनुभव असा आहे की, तरूण जरी विधवांच्या पाणिग्रहणाला तयार झाले, तरी विधवाच उघड माथ्याच्या पुनर्विवाहाला तयार होत नाहीत. त्या पंढरीच्या वाऱ्या करतील, आळीबोळातल्या तरुणांच्या मनस्थितीला बिघडवतील, भ्रूणहत्त्येच्या गुन्ह्यात सापडून शिक्षेला जातील, आत्महत्त्या करतील. पण उघड पुनर्विवाहाचं नैतिक धैर्य दाखवणार नाहीत. अशा परिस्थितीत हिंमती तरूण नाऊमेद होऊन अर्जुनासारखे हतबुद्ध स्वस्थ बसले, तर त्यात दोष कुणाचा ? आमचा का तुम्हा बायकांचा ? सामाजिक दोषांच्या नुसत्या विधिनिषेधाची नाटके नटवण्यात आता काहीच अर्थ नाही. कल्पनेत क्रान्ति करायला, समाजाच्या मनोवृत्तीला जबरदस्त धक्काच देणं अगत्याचं वाटतं, तर हिंमती तरुणांच्या बरोबरीनं तरुणीनीहि आत्मयज्ञाच्या होमकुण्डात धडाड उड्या घेण्याचं नैतिक धैर्य दाखवलं पाहिजे.

**क्रान्ति** हे नैतिक धैर्य दाखवायला ही क्रान्ति तयार आहे. मी कुमारी, सौभाग्यवती का विधवा, हे माझं मलाच उमगत नाही. हा हात म्हणतो की विवाहाचा डाग लागलेली मी सौभाग्यवति आहे ; पण मी म्हणते की, मी विधवा असून कुमारी पण आहे. वडलांच्या इच्छेसाठी एका जिवंत माणसाशी माझा विवाह झालेला असला, तरी माझ्या दिलाचं दान अझून कुणालाच मी केलेलं नाही. मी एक तरूणी आहे, तारूण्याच्या माझ्या सर्व भावना जिवन्त आहेत, आणि समविचारी सहचाऱ्याच्या सहवासाची मला तहान लागली आहे. समाज आणि सरकारी कायदा ही तहान भागवण्याचा मला प्रतिबन्ध करीत आहेत. क्रान्तीला संसारसुखाची आशा नाही न् तिला त्याचा विधिनिषेधहि नाही. परस्पर प्रेमाच्या अभंग कमावणीशिवाय, नुसत्या विवाहविधिने घडलेल्या बन्धनाच्या बेड्या तोडण्यासाठीं मी हा आपला हात पुढे करीत आहे. विवाहाशिवाय सुद्धा हव्या त्या तरूण तरूणीला पतिपत्नीच्या शुद्ध नात्यानें समाजात प्रतिष्ठेने वावरता यावं, असल्या आचारक्रान्तीचा धक्का समाजाला देण्याची ज्या मर्दाला हिंमत असेल, त्याने हा क्रान्तीचा हात खुशाल धरावा. क्रान्ति त्याची सहधर्मचारिणी होईल.

**विवेक**——क्रान्तीच्या आव्हानाचा स्वीकार विवेकानेच केला पाहिजे.

**क्रान्ति**---विवेकानेच करा. या हाताला समाजाचा पाठिम्बा नाही. सरकारी कायद्याची सहानुभूति नाही दिसायला जरी हा नाजूक गोण्डस दिसला, तरी यात इण्डियन पिनल कोड ४९७ कलमाची ५ वर्षांची सक्तमजुरी भलेली आहे, याचा नीट विचार करा.

**विवेक**---क्रान्तीचा स्वीकार करताना, हा विवेक प्रत्यक्ष मृत्यूचीहि क्षिति बाळगणार नाही. (तिचा हात धरतो) क्रान्ति-क्रान्ति, यू आर माइन्-माइन् फॉर लाईफ ! [भैरव प्र. क.]

**भैरव**---शुभमंगल सावधान ! शुभमंगल सावधान !

**विवेक**---कोण हा ? भैरव. कायरे इकडं कुणीकड ?

**भैरव**---इकडं ? अक्षता टाकायला ! (अक्षता टाकून) शुभमंगल सावधान !

**क्रान्ति**---यांनी खऱ्याखुऱ्या अक्षता खरोखरच उधळल्या ! कुठून रे आणल्यास या अक्षता भैरवा ?

**भैरव**---भ्रान्तीच्या लग्नातल्या. तिनं लग्नातूनंच पोबारा केला, तेव्हा त्या तशाच राहिल्या खिशात. चार वेळ उधारीनं परटाकडे कोट धुवायला गेला, पण अक्षता शीरसलामत ! याला म्हणतात अक्षता, न् याचं नाव लगीन !

**क्रान्ति**---खरंच भैरव, विवाहाशिवाय आम्ही आज पतिपत्नीचं नातं पत्करलं !

**विवेक**---समाजाला एक अपूर्व धडा घालून दिला.

**भैरव**---अपूर्व ? यात अपूर्व काय, न् नवीन काय आहे ? गावोगाव असल्या जोडप्यांच्या खास पेठाच असतात.

**विवेक**---डॅमिट् ! आम्ही पतिपत्नी म्हणू उघडपणे मिरवणार.

**भैरव**---मिरवा. कोणी तुमचे कान उपटणार नाही. त्याच्यापैकीच एक नमुना समजून लोक स्वस्थ बसतील.

**क्रान्ति**---आम्ही या लग्नाची वर्तमानपत्रात जाहिरात देऊ.

**भैरव**---त्यात तुमच्यापेक्षा डार्विन साहेबांचाच लौकिक अधिक होईल.

**विवेक**---डार्विनसाहेबाचा लौकिक ? तो कसा काय होणार ?

**भैरव**---तरूण तरूणींच्या या असल्या माकडचेष्टा पाहिल्या की माणसांची उत्पत्ति माकडांपासून झाली, हा डार्विनचा शोध बिनचूक खरा ठरतो.

**क्रान्ति**---पण यावेळी तू इकडे कसा ?

**भैरव**---अहो, गांवात लग्न न् कुत्र्याची लडबड ! शान्तीला एक पत्र द्यायला गेले आठ दिवस पायताणांचे नाल झिजवले. घरी नाही, क्लबात नाही, कावळ्यांच्या बंगल्यावर नाही---

**क्रान्ति**---कावळ्यांच्या बंगल्यावर ? तिकडे कशाला ?

**भैरव**---कशाला म्हणजे ? अहो, काळ फार पुढे गेला-फार पुढे. तुम्ही फार मागे पडलात. अगदी बॅकवर्ड ! अहो, तेहि थेट असंच शुभमंगल त्रांगडं होऊन बसलंय त्रांगड !

**क्रान्ति**---त्रांगडं ! शान्तीनं कावळ्याशी पुनर्विवाह लावला की काय ?

**भैरव**---लग्न लागून आज चार महिने झाले. विवाह होईल मागाहून फुरसतीनं त्याची कसली घाई ! शिवाय सध्या काटकसरीचे दिवस. पोराच्या बारशालाच घेतील विवाह उरकून. त्याचा कोण लेक बाळगतो विधिनिषेध ! सणात सण, नवलाईचा सण, आई सवाशीण, बाप गण.

**क्रान्ति**---शान्तीला कुणी दिलंय ते पत्र ?

**भैरव**---कुणी ? कॉन्फिडेंशल आहे कॉन्फिडेंशल. एका कालीदासानं या मेघदूता-बरोबर काव्यसंदेश पाठवलाय काव्य-संदेश.

**क्रान्ति**---काव्यसंदेश ? दे मला त्याची डिलिवरी. मी देईन तो शान्तीला.

**भैरव**---हे घ्या. (पत्र देतो)

**क्रान्ति**---हे तर सनातन्याचं हॅण्डरायटिंग दिसते ?

**भैरव**---त्यानीच शानतीला हे पत्र पाठवलं आहे.

**क्रान्ति**---अस्सं का ? तर मग मी हे तिला बिनचुक देईन बरं का.

**भैरव**---बिनचुक द्या. जबाबदारीचं पत्र. जबाबदारीचं पत्र. तुम्ही डिलिवरी घेतल्यामुळं, माझी हातीपायी सुटका झाली. पत्र बिनचूक द्या. नाहीतर पोस्टऊमन-पेक्षा पोस्टमनच बरे म्हणण्याची पाळी यायची माझ्यावर. बरं. घेतो आता रजा.

**विवेक**---चल आमच्या बरोबर. पायी कशाला ?

**भैरव**---तुमच्या त्या फटफटीत जागा कशी होणार ? क्रान्तीबाईना साईडमध्ये घालून तुम्ही ड्राइव्ह करणार. पार्सलच्या लेबलासारखा मी कशाला तुमच्या पिलियनवर नसते हिसके खायला ? चला म्हणता तर चला-नाहीतर आहे कोण मला ?

(सर्व जातात)

---

## प्रवेश तिसरा

[ रस्ताच्या दोनही बाजूनी कावळे व सनातने अनुक्रमे टाईम्स व ज्ञानप्रकाश पत्रे तोंडासमोर धरून वाचीत येतात व एकमेकांवर कोलमडतात.]

**कावळे**——व्हॉटीज धिस् नॉनसेन्स !

**सनातने**——धिसीज नॉट नॉनसेन्स, धिसीज ज्ञानप्रकाश.

**कावळे**——ओहो ! कोण सनातने का ? पाहिलात का तुमच्या बायकोचा कसा पडला ज्ञानप्रकाश तो ?

**सनातने**——तोच पाहात येत होतो, तो या टाइम्स ऑफ इण्डियाची टक्कर झाली. काय म्हणतो तुमचा टाइम्स ?

**कावळे**——विवेक-क्रान्तीचा, हा पहा, गळ्यात गळा घातलेला फोटो. " वृक्षवेल या दोहीची छान शोभते । जोडी छान शोभते, " ही आण्णा किर्लोस्करांची वाणी आज खरी ठरली. काय छान पोझ घेतली आहे दोघांनी ! क्रान्तीचा हा ठसकेदार मुरका, विवेकाला कवटाळण्यात चवळीच्या शेंगेसारखी घेतलेली ही लवचिक मुरड, आणि त्याच्या डोळ्याला डोळा भिडवण्यातली स्वीट ॲण्ड चार्मिंग चमक ! वाहवा ! सनातने, डोळे भरून आपल्या बायकोचं दर्शन घ्या. सगळे पूर्वज गतीला जातील !

**सनातने**——आमचा एकहि पूर्वज नरकात गेलेला नाही.

**कावळे**——त्यांची तशी पत्रं आलीत की काय ? का वर्षश्राद्धाच्या खादीच्या वेळी तसा त्यानी तुम्हाला कानमंत्र दिला ?

**सनातने**——अहो, सनातन्यांसाठी स्वर्ग खास रिझर्व राखलेलाच असतो.

**कावळे**——पृथ्वीवरचा नरकसुद्धा तुमचीच वतनी जहागीर की काय ? तरीच-तरीच, लग्नाची बायको अश्शी दुसऱ्याचा हात धरून, तुमच्या नाकावर टिच्चून, टाइम्समधे फडकते ! धन्य आहे बुवा तुमच्या भाग्याची !

**सनातने**——यात कसलं आलंय भाग्य ? ज्याचा भाग त्याला मिळाला. या ऋणानुबंधाच्या गोष्टी, पाणी आपली सपाटी हटकून हुडकणारच.

**कावळे**——तुम्हाला या प्रकाराबद्दल काहीच वाटंत नाही ?

**सनातने**——वाटून काय चाटायचं आहे ! विवाहाची हळद म्हणजे नवराबायकोच्या मिलाफाचा सरस नव्हे, हेच क्रान्तीनं सिद्ध करून दाखवलं. नवरा म्हणजे कोण ? मानला तर देव, नाहीतर धोण्डा !

**कावळे**——अखेर, सनातने म्हणजे धोण्डा, आणि विवेक म्हणजे देव, हा क्रान्तीचा सिद्धान्त पटतो म्हणायचा तुम्हाला !

**सनातने**——न पटायला मी काय धोण्डा आहे वाटतं ? चांगला धडधाकट चालताबोलता जिता माणूस आहे. मला माणुसकी आहे.

**कावळे**——हा मात्र नवीन शोध आहे खरा.

**सनातने**——क्रान्तीला विवेक आवडला, यात मला वाईट वाटण्याचं कारण काय ?

**कावळे**——अहो, ती तुमची लग्नाची बायको ना ?

**सनातने**——असेल ! लग्नाचे नवरेसुद्धा जर बाराहि मास हवी तेथे श्रावणी उरकतात, तर बायकांच्या नावानंच एवढा फोल्यून करायचं कारण काय ?

**कावळे**——अरे वा ! क्रान्तीला मुकलात, तरी तुमच्या विचारात बरीच क्रान्ति झालेली दिसते.

**सनातने**——तुम्ही मला काय भोटमामा समजता ? अहो, " वेष धरावा बावळा न् अन्तरी असाव्या नाना कळा " या समर्थ वाक्यानुसारच हा सनातने पावलं टाकीत असतो. आडनावाचा मी सनातन्या असलो तरी—मेहरबान-मी कडवा सुधारक आहे, कडवा सुधारक. दिसायला मी जरी मुरमाचा ठिसूळ डिखळा असलो, तरी अन्तर्यामी-निपाणकराच्या लाखी दरवाज्याच्या काळ्या फत्तराचा चिरा आहे, मी काळ्या फत्तराचा चिरा.

**कावळे**——लोक तुम्हाला पाषाणहृदयी म्हणतात ते काही खोटं नाही.

**सनातने**——क्रान्तीला विवेक नवरा पाहिजे होता, तर मला तिनं तसं स्पष्ट कळवलं असतं, तर मी स्वतः जाऊन तिचं कन्यादान केलं असतं. तिच्या बापाचीसुद्धा पर्वा ठेवली नसती. इतकी धमक नसेल, त्याने सुधारक म्हणून मिरवू नये. नुसते हॅट बूट सूट धातले म्हणजे सुधारक होत नसतो.

**कावळे**——बायकोचे कन्यादान करणाऱ्या सुधारकाला साष्टांग नमस्कारच घातला असता, पण पाटलोणीपुढे नाइलाज आहे. अहो शहाणे, तुम्ही धडधडीत जिवन्त असता, तुमची लग्नाची बायको दुसऱ्याशी पत्नीच्या नात्याने राहाते——

**सनातने**——मग काय, तिचा पुनर्विवाह कायदेशीर ठरवण्यासाठी मी जीव देऊ, का नाटकातल्या पात्रांसारखा कंसात सुरू ? तिला सोड-चिठी देईन, तर तशी सवलत नाही, प्रघात नाही, कायदा नाही. कायदा असता तर त्याचा फायदा मी खास घेतला असता. मेल्या दादल्याच्या जित्या बायकोला कायद्याने पाटाची सवलत दिलेली आहे. पण जित्या मर्दाच्या जित्या बायकोने तीच धडाडी दाखविली, तर त्या वीरांगनेचं अभिनन्दन करायचं, का तिच्या नवऱ्याला " मरा हो, मरा हो " असा आग्रह करायचा ?

कायदे-पण्डिताला तरी हे शोभत नाही. घटस्फोटाचा कायदा पास करा, आमच्यासारख्या अडचणीत सापडलेल्या महात्म्यांची तेवढीच सुटका होईल. पण बाप भीक मागू देईना, न् आई जेऊ घालीना, या प्रकारचा विधिनिषेध मी किंवा माझ्या बायकोने का म्हणून बाळगावा ?

**कावळे**——उघडाउघड दुसऱ्याचा हात धरून गेली, तरी अझून " बायको बायको " काय करता हो !

**सनातने**——मग काय तिला " आई " म्हणू, का " ताई " समजून भाऊबीज करू ? जोवर आमचा विवाह रद्द होण्याची सवलतच नाही, तोवर तिला मी " बायको " म्हणू नको, तर काय " रखेली " समजू ? मोठी पंचाईतच झाली !

**कावळे**——दुसऱ्याची रखेली स्वताची बायको मानण्यात काय शहाणपणा ?

**सनातने**——शहाणपणा म्हणा, नाहीतर गाढवपणा म्हणा. त्याचे पाप सरकारी कायद्याच्या आणि कौन्सिलर लोकांच्या डोक्यावर फोडून मी तिला बायकोच म्हणणार.

**कावळे**——विधीशिवाय पाट लावणाऱ्या जित्या बायकोच्या जित्या नवऱ्याचे मी हॅट काढून अभिनंदन करतो.–पण आतां पुढे संसाराची वाट काय ? कालपर्यंत "आज येईल, उद्या येईल " या आशेवर बायकोची वाट पाहिलीत. खानावळीच्या आमटीवर जगलात. दुसऱ्या सोयरिकीचा मार्ग मागेच बंद झाला. मग ? आतां रामदासाच्या जिण्याने जगून, मनाचे श्लोक गुणगुणत सरणावर स्वारी करणार की काय ?

**सनातने**——तुम्ही मला तम्बोऱ्याचा भोपळा समजता काहो ! केम्ब्रिज एमे आहे मी, केम्ब्रिज एमे. मी पुरुष आहे, पुरुष ! पुरुषांचा माथा केव्हाहि मोकळाच !

**कावळे**——पण तुमच्या घाटमाथ्यावर माळरानात शेण्डीच्या प्रश्नचिन्हाची दाण्डी उभी आहे ना !

**सनातने**——तिचा नाही मला आता विधिनिषेध ! बायकोला जर विवाहविधीचा विधिनिषेध नाही, तर मी तरी तो कशाला उराशी बाळगू ? छू मन्तर, चले जाव. लग्नाची बायको निसटली, तरी लव्हाळ्याच्या जाळ्यात हव्या तितक्या मासोळ्या पकडायची अक्कल अस्मादिकाला आहे बरं ! सनातने म्हणजे भोटमामा नव्हे ! मनात आणायचा अवकाश, माझ्या वाड्याला गायकैवारी गोकूळ करीन गोकूळ !

**कावळे**——अरे वा ! अकलेची ही नवीन कमायी तारीफ करण्यासारखी आहे बुवा.

**सनातने**——लग्नाशिवाय तुमचा रतिविलास बंगला जर सवाष्णींच्या रोषनाईने दररोज चमकतो, तर या सनातन्याच्या वाड्यात गोकुळकाल्याची हंडी फुटणार नाही ?

**कावळे**---अरे, आम्हाला घ्या की तुमच्या कटात. तुमच्या गोकुळात आपण होतो बुवा एक यादव.---काय, कुठे मारलात तीर ?

**सनातने**---तुम्हाला सांगा न् गावभर करा, एतका गाढव मी नव्हे, सावजाशिवाय तिरंदाजी, आणि व्हेकन्सीशिवाय अर्जी, असली गधडेगिरी माझ्याजवळ नाही. आधी नेम धरणार नाही, पण धरून तीर मारला की काम फत्ते. गेला---बाण सुटला---चोवीस तासात गोठ्यात गाई हजर. क्रांती गेली तर गेली, पण शांती नाही ना मेली ? योगः कर्मसु कौशलम् ! ट्रिगर दाबला की बुलेट-शॉट ! [ जातो.]

**कावळे**---बुलेट शॉट ! या चोराने मलाच शॉट केला ! सनातने शांतीला आपल्या जाळ्यात पकडणार ? माझ्या जाळ्याच्या दोऱ्या इतक्या कुजक्या झाल्या ? शांति कावळ्याशी बेमान ? का मी तिच्याशी बेमान ? मी बेमान म्हणून ती बेमान ? का ती मुळचीच बेमान ? बेमान, बेमान– सारी दुनिया बेमान.

(ब्रीफांचे पुडके घेऊन बावळे येतो.)

**कावळे**---बावळे, तुम्ही पण बेमान,---नव्हे, अगदी बावळे आहात.

**बावळे**---साहेब, लाख वेळा तुम्ही मला बावळे म्हणा. पण बेमान म्हणाल तर ब्रिफांचे हे पुडकं इथं रस्त्यावर फेकून होईन चालता.

**कावळे**---बावळे बावळे, अहो तुम्ही पुरुष ना ? पुरुष कधि बेमान असतात वाटतं ? बायका बेमान असतात.

**बावळे**---त्या म्हणतात, पुरुष बेमान असतात.

**कावळे**---पुरुषाना बेमानीचा विधिनिषेध नसतो, हे बायकाना सांगून समजणार नाही. कारण त्या बेमान असतात. तुम्ही बेमान कसे असणार ? नॉट ॲटॉल. बावळे, अलीकडे तुमचं डोकं फार फिरूं लागलंय्. अर्थापेक्षां नेहमीं गाभ्यालाच हात घालीत जा.

**बावळे**---गाभ्यात माझं डोकंच घुसत नाही.

**कावळे**---नाही ? नाहीतर लवकर लग्नाचा बार द्या उडवून. त्याशिवाय डोकं ताळ्यावर येणार नाही.

**बावळे**---डोकी असलेले लोक लग्नाच्या फन्दातच पडत नाहीत. आपल्यासारख्या थोरामोठ्यांच्या वाड्यात मोगलाई जनानखाना उफललेला दिसत असता, लग्नाच्या फन्दात पडून, मेहुणपुऱ्याचा उत्पादक म्हणून कशाला होऊ मी लोकमान्य ? भ्रान्तीने दिवे लावले, क्रान्तीने काकडे पेटवले–

**कावळे**——अन् शान्तीने, शान्तीने ? तिने काय केलं ?

**बावळे**——तिचा टेम्भा तुम्हीच भडकवला.

**कावळे**——बावळे, शान्तीबद्दल तुमचा काय अभिप्राय आहे ?

**बावळे**——घोडीची चाल स्वाराला ठावी, इतरानी ती काय सांगावी ? हव्या त्या गोष्टीवर डोळे मिटून अभिप्राय द्यायला, मी काय वर्तमानपत्राचा एडीटर आहे, देशभक्त आहे, का गावगुण्ड आहे ?

**कावळे**——पण शान्तीची एकन्दर चाल कशी आहे ?

**बावळे**——कधि कधी ढेकणासारखी तुरतुर चालते. मधून मधून हत्तीसारखी डुलतडुलत चालते, तर कधिकधीं बुजऱ्या घोडीसारखी भरधाव पळते.

**कावळे**——बावळे, तुम्हाला तिच्या बदचालीचा काही संशय येतो का ?

**बावळे**——ही बदचालीची भानगड माझ्यापेक्षा एखाद्या डॉक्टरला लवकर उमगेल.

**कावळे**——बरं, मी शान्तीशी पुनर्विवाह करावा, का करू नये ? स्पष्ट मत द्या.

**बावळे**——जोवर " गुड्ज् ऑन ॲप्रूव्हल " मिळतात, तोवर खरेदीची यातायात कशाला ? नाटकाचा फुकट पास हातात असल्यावर, तिकीटला पैसे कशाला खर्चावे ? बघवेल तितके नाटक बघावे, नाहीतर उठून जावे. आला वारा, गेला वारा, कोण कुणाचा सोयरा ! आधी विधीला मान वाकवून, मग त्याचा निषेध करीत बसण्यापेक्षा कशाचाच विधिनिषेध बाळगला नाही, म्हणजे ठीक.

**कावळे**——असं म्हणता ? असं म्हणता ? All Right ? [जातो.]

**बावळे**——Good Night ! [जातो.]

—— -- ——

## प्रवेश चवथा

[ सार्वजनिक बागेतला एक लतामण्डप. त्यात दोन पाठमोऱ्या खुर्च्या भैरव व सनातने येतात.]

**भैरव**—हाच तो तेरा नंबरचा बॉवर. करेक्ट. आता छातीत चांगला भरपूर धीराचा वारा भरा. शांतीला असं वाटलं पाहिजे, का ही छाती, का मिच्लीन् टायर. नाहीतर कराल ऐन रंगात पंक्चर, आणि इतका जुळवलेला घाट, व्हायचा फडान् फाट !

**सनातने**—अरे, आस्स रंगवतो कोर्टींग् की तू पण म्हणशील, देखते रहेना !

**भैरव**—घोडमैदान लांब नाही. कोर्टींग करतांना सगळी विलायती अक्कल आज खर्ची घाला, आणि शान्तीला प्रेमाच्या जाळ्यात अडकवून डिरेक्ट होमवर्ड बाऊण्ड करा. सनातने, सिंहगड घेण्याइतकेच हे काम कठीण आहे.

**सनातने**—सिंहगड घेताना शिवाजीनं न् तानाजीनं केलेल्या सगळ्या घोडचुका माझ्या डोक्यात आहेत.

**भैरव**—त्याच आता इथं करणार की काय ? सनातने बी केअरफुल. त्यावेळी सिंह गेला, पण गड आला. आजच्या गडाला गडकऱ्यांचा तोटा नाही, पण या ग्रामसिंहाला मात्र गावात तोण्ड काढायला एक बोळ सुद्धा उरणार नाही.

**सनातने**—भैरव, अरे हा सनातने म्हणजे तू काय थट्टा समजतोस ? हव्या त्या बोळात सभा भरवून हव्या त्या व्यक्तींची न् विषयाची सोईस्कर थट्टा करणारा, वाचाळपुरीचा मी धट्ट थट्टेश्वर ! माझी थट्टा होईल कशी न् करणार तरी कोण ?

**भैरव**—खरं आहे, खरं आहे. सार्वजनिक थट्टेच्या पात्राची थट्टा कोण शहाणा करील ! बरं, मी जाऊन बसतो तिकडं त्या पुष्करणीत. गड काबीज केलात की मला तीन वेळा हाका मारा. वन् टू थ्री—वकट लेण्ड मुण्ड ! नाहीत, सिंहगड घेतल्याची खूण म्हणून शेलारमामानी गडावर होळी पेटवली, तशी द्याल या बागेला आग लावून, न् फायर ब्रिगेडला लावाल शंख वाजवायला.

**सनातने**—पण शान्ति अझून बॉवरमध्ये आलेली दिसत नाही ती ? बॉवरचा नंबर चुकला, का तिला पत्रच मिळाले नाही ?

**भैरव**—पत्र न मिळायला काय झालं ? पोस्टात टाकलं होतं थोडंच ! मी स्वतः त्या तुमच्या त्या हिला-हिला म्हणजे तिला-तिला म्हणजे हिलाच दिलं नो. पर्सनल डिलिवरी-प्रत्यक्ष सुटका-केली. येईल. पण वाजले किती ? (सनातने खिशातून घड्याळ काढायला जातो, तो साखळीला लटकलेले कुलूप हातात येते)

**सनातने**——आँ हे कुलूप !

**भैरव**——आँ ! कॅपिटल " ओ " सारखे तोंड काय वासता ? शेतखान्याला घड्याळ अडकवून, खिशात कुलूप घेऊन आलात ? स्वराज्याला अगदी लायक आहात बुवा ? ठेवा-ठेवा ही स्वदेशी अक्कल खिशात. अहो राव, शान्तीच्या प्रेमाचा गड जिंकायला आलात, तर तेवढी तरी अक्कल आहेना डोक्यात ? का भलतंच कुणाचं तरी डोकं धडावर घेऊन आलात ? [डोळ्यावर मास्क घातलेली क्रान्ति मनगट-घड्याळाकडे पहात, मागल्या बाजूने येऊन बॉवरमधल्या एका खुर्चीवर पुस्तक वाचीत बसते.]

**भैरव**——हा घ्या जिवंत एव्हीडन्स ॲक्टच आला. पोचलंना पत्र ? मी घेतो आता रजा. आता शेजारी जाऊन बसा न् करा सुरवात लव्हाळ्याच्या तेलगाळणीला !–विश् यू गुड् ल्लक् मिस्टर कुलपे. (जातो.)

**सनातने**——(स्व०) हा तर गेला, न् माझी छाती तर कटोल डब-यासारखी धडधडू लागली.– छे, आता धीर सोडून काय होणार ! गाईसारखी एक बाई मला जिंकता आली नाही, तर आम्हाला स्वराज्य कसे मिळणार ? नो नो. या वेळी आत्महत्येसारखी धडाडी दाखवली पाहिजे. मेलो तरी हरकत नाही, शांतीनं माझ्या मढ्याशी लग्न लावलं पाहिजे. सिंह गेला तरी गड आलाच पाहिजे. (बावरच्या रिकाम्या खुर्चीवर जाऊन बसतो.) आता सुरवात कशी करायची ? आधी सुस्कारे सोडायचे, का भोकाडा पसरायचा ?–छे छे. भगवंत गायनाने प्रसन्न होतो. या भगवतीला माझ्या गायन्तानेच आळवली पाहिजे.–इंग्लीश पोएट्री म्हणू–का संगीत भावगीताची देऊ एक तनारी भिरकावून ! पण मला गाता येत नाही. अडचणच आली. यापूर्वी मी एखाद्या गायनवादन शाळेत गेलो असतो तर !–हो, पण भावगीताना गवयाचे नरडे कशाला ? नरड्याचं धिरडं झालेले बेरडच काव्यगायनाचे मैदानी जलशे नाही का पार पाडीत ? आ ऽ ऽ ऽ ! ठीक आहे. नरडे माझे आहे, गीत माझे आहे, अन् गाणाराहि मीच आहे. बस्स पंडतजी, छोड देव लिरिक पोएट्रीकी एक बेताल लावणी ! (उ.)

Sing bird sing a song to me,
There is one who cares for thee.

(स्व०) नो रिस्पॉन्स ? बॅटरी थंड पडली की काय ? कुछ पर्वा नही. और एक छोड देव. (उ.)

Youth's the season made for joys,
Love is then our duty,
She alone who that employs,
Well deserves her beauty.
Let's be gay,
While we may,
Beauty's a flower, despised in decay !

(स्वगत) टेलिग्राफ ऑफिस बन्द झालं की काय ?–ओ ! व्हाट अ फूल ॲमाय् ! एका म-हाठी सुन्दरीला इंग्रजी काव्याने मी कसा प्रसन्न करू शकणार ? म-हाठी भावनेचा न् भाषेचा केवढा हा अपमान ! म-हाठी युनिव्हर्सिटी प्रसूतिवेदनात अशा वेळी इंग्रेजीचा मेघनाद कशाला ? म-हाठी. म-हाठी-बस् म-हाठी ! आणि ते सुद्धा शाकुन्तली म-हाठी. (उघड)–

**मना तळमळशी ।**
**उगिच का असा हळहळशी ।**
**प्रथम फसलेशी ।। मना ऽ ऽ ।।**

**क्रान्ति**——

**लता मण्डपा सुख सेवाया ।**
**येइन अशी तुजपाशी ।। मना० ।।**

**सनातने**——(स्वगत) रेडिओने सेण्टर कॅच् केला. आता, मिस्टर सनातने, रेडी हो ! (उ.) शान्ता, माझ्या निमंत्रणाला मान दिलास, भावगीताला भावगीताचा जबाब दिलास, म-हाठीचा मान राखलास, मी जितेपणीच मोक्ष पाहिला. शान्ते, कस बोलू ? काय बोलू , किती बोलू , कुठे बोलू , केवढं बोलू , कोणाशी बोलू ? का कक्काची बाराखडीच बोलू ? शान्ते, माझ्या हृदयाचे पापड, मनाच्या निखाऱ्यावर भाजीत, संसाराच्या भडकत्या भट्टीवर मी बसलो आहे.

**क्रान्ति**——लोकनिन्देच्या पोळपाटावर, टीकेच्या कुत्सित लाटण्यानी, माझ्या जिवाच्या कणकाच्या पोळ्या लाटल्या जात आहेत.

**सनातने**——त्या पोळ्यांच्या पदरात, उकडून शिजलेल्या माझ्या प्रेमाचे पुरण भरून, तुझ्या माझ्या संयोगाच्या पुरणपोळ्यांची मेजवानी साऱ्या वाचाळपुरीला द्यायला मी तयार आहे.

**क्रान्ति**——ही पुरणपोळ्यांची मेजवानी थाटण्यापूर्वी तुम्ही आपल्या लग्नाच्या बायकोच्या जीविताची पातळ भाजी का केलीत, हे मी विचारलं तर राग नाही ना येणार ?

**सनातने**——राग ? आणि मला ? सनातन्याला ? इंपॉसिबल. केम्ब्रिज एमे मी. राग येता तर त्या गावभवानीचं जिवन्तपणीच माझ्या श्राद्धाचे वडे धारगे त्या पाजी विवेकाला चारताक्षणीच, मी तिच्या नरडीचा घोट नसता का घेतला ! शान्ते, मी रागी नव्हे, अनुरागी आहे. मी बेळगावी तुपासारखा सात्विक न् बदामगरासारखा पौष्टीक आहे. माझ्या प्रेमाच्या फुलत्या गुलाबाच्या पाकळ्यात, तुझ्या पुनर्विवाहाची काल्पी खडीसाखर मिसळून, त्याचा गुलकन्द बनला, की मला क्रान्तीच्या अळणी पातळ भाजीची मुळी आठवणच येणार नाही.

**क्रान्ति**---क्रान्तीसारख्या विदुषी पत्नीचा त्याग करायला जर तुम्ही विधिनिषेध बाळगला नाही, तर या शान्तीनं तरी कोणत्या विश्वासानं तुम्हाला आपल्या दिलाचं दान करावं, हा क्रान्तीचा पॉइण्ट विचार करण्यासारखा नाही का ?

**सनातने**---असा पॉइण्टला पॉइण्ट खुशाल भिडवा. सडेतोड खुलासा करतो. युक्लीडचा पहिला सिद्धान्त हाच, की A point has position, but no magnitude. क्रान्तीच्या पॉइण्टला कितीही पोझीशन असली, तरी मॅग्निट्यूड असणेच शक्य नाही. नव्हतेच मुळी. पहिल्यापासूनच ती चवण्ढाळ-चवचाल-बदचाल. आता तर तिने धडधडीत दुस-याचा हात धरला. यात कसला आलाय पॉइण्ट, पोझीशन न् मॅग्निट्यूड ! क्रान्ती म्हणजे आडदाण्ड धसळा-मुसळी सुरंगाची बत्ती. ठिणगी लागताच सा-या संसाराचा उन्हाळा करून, नव-याच्या डोळ्यातून पावसाळा काढायची. माझ्यासारख्या भेण्ड्याच्या भाजीला करडई तेलाची ही कडकडीत फोडणी परवडलीच नसती. माझ्यासारखा कोण सच्चा सुधारक, क्रान्तीची ध्यास धरून शान्तीला मुकण्याचा मूर्खपणा करील ? आय् वॉण्ट शान्ति-आय् वॉण्ट यू !

**क्रान्ति**---चवण्ढाल, चवचाल, बदचाल, गावभवानी, ही तुम्ही क्रान्तीला दिलेली विशेषणे, तिला कळली तर ?

**सनातने**---कळली तर कळली. कळलीच पाहिजेत. आणि कळलीच तर, तर ती काय माझं करणार ? मी पुरुष आहे. समाज हेच बोलणार न् , सरकारी कायदा सुद्धा मलाच उचलून धरणार. ती सटवी माझं काय करणार ?

**क्रान्ति**---हातात खेटर घेऊन, चवताळलेल्या वाघिणीसारखी धावत आली तर ?

**सनातने**---बिनशर्त माफी मागून मोकळा होईन. माफी न मागायला, मी काय कर्जाने बेजार झालेला पोटाळ देशभक्त आहे, का वकिली डॉक्टरची प्रॅक्टिस वाढवण्यासाठी हंगामी सत्याग्रहाचं नाटक करणारा सभ्य गावगुण्ड आहे ! मर्दाने माफी मागावी न् नामर्दाने हट्टवाद करावा. असला नादान हा सनातन्या नाही. क्रान्तीला माझ्यावर चवताळायचं आता काय कारण ? घागर भरल्यावर पाणवठ्यावर, आणि जेवण झाल्यावर ओटीवर थाम्बण्याची जरूर काय ? तिने विवेकाला पत्करून आपल्या जिण्याचा मार्ग मोकळा केला. पण आता शान्ते, तू जर आपल्या प्रेमाच्या दिव्य भोपळ्याचा आधार मला देशील, तरच मी हा भवसागर सफाईत सरळी मारून तरून जाईन; आणि सनातने घराण्याच्या वंशवेलाने सा-या महाराष्ट्राला हिरव्यागार सोवळ्या कुम्पणाचा वेढा घालून ठेवीन.

**क्रान्ति**---तुमच्या घराण्याची थोरवी, काळजाची कालवाकालव, विद्वतेची श्रीमन्ती न् विचाराचे वैभव ऐकून, दगड धोण्डे सुद्धा मुके बनतील. मग मी मुकी झाले तर नवल कसले ?

**सनातने**——मुकी झालीस ? तू मुकी झालीस ? शान्ति मुकी झाली ?

**क्रान्ति**——अगदी मुकी झाले. बोलायला तोण्ड असलं तरी शब्दच नाहीत.

**सनातने**——आणि मला शब्द असले तरी तोण्डच नाही. तू मुकी मी मुका. मुका आणि मुकी एकत्र आल्यावर, दादोबांच्या नियमाप्रमाणे बुक्का बुक्की बुक्के, तसे मुका मुकी, आणि पाठोपाठ मुके उसळलेच पाहिजेत–शान्ति, तू मुकी बनून, मला मुका केलास. आता ती डोळ्यावरची विलायती अन्धारी काढून, तुझ्या शुद्ध स्वदेशी प्रेमाच्या चकारीत चकरा मारणाऱ्या या चकोराला, मुखचन्द्राचे दर्शन देऊन धन्य कर.

**क्रान्ति**——सनातन्याना शान्ति मिळताहेसे पाहून, क्रान्तीला सवति मत्सर तर नाही ना वाटणार ? समजा, इतक्यात ती इथं आली तर ?

**सनातने**——आली तर ? आली तर मी तुझ्या पाठीशी लपून बसेन. आहे काय त्यात ? बायकांच्या पाठीशी दडून आमच्या पूर्वजांनी हजारो राज धर्मकारणे लढवली आहेत. हा लढवय्या क्रान्तीला भिणार ? क्रान्ति खवळली तरी हा सनातन्या शान्तीची पाठ सोडणार नाही. तू माझ्याशी पाट लावलास की मी तुझी पाठ धरलीच !

(आत :——पुराणे.–लाव कुंकू-लाव पाट.)

**सनातने**——ऐक ऐक. आकाशातल्या देव गन्धर्वाचे हे कोरस ऐक. (पुन्हा आरोळी) आऽहा! शान्ति-शान्ति तुला माझ्याशी गन्धर्व लावलाच पाहिजे.–(पुन्हा आरोळी) आता आले मला अवसान–आता आले मला अवसान! (तिच्या जवळ जातो.) तू मुकी–मी मुका–

(वेडा पुराणे प्रवेश करतो.)

**पुराणे**——

**ही मुकी तू मुका । कसा घेशिल हिचा मुका ।**
**हा बघ आला तुझा काका । लाव कुंकू लाव पाट ॥**

**सनातने**——अरे बापरे, हा प्लेग इथ कशाला आला!

**पुराणे**——तुला धोड्याची लस टोचायला! कायरे ए लव्हाळ्या, माझ्या पोरीशी पाट लावतोस ना ? मग लाव–लाव, चल लाव कुंकू–लाव पाट–अणि ए म्हशी, कसली ग ती धोड्याची अंधारी चढवलेस डोळ्यावर ?

**डोळे मिटुन लावशील पाट ।**
**सडकून काढीन तुझी पाठ ।**
**दाविन तुला धरचि खाट । लाव कुंकू० ॥**

चल, सोड ती अंधारी (मास्क काढून टाकतो.)

**सनातने**——अरे बापरे, ही तर क-क-क्रांती ऽ ऽ!

**पुराणे**--

> **तुला हवी लेका शांती ।**
> **तुला कारे नको क्रांती**
> **आता गेली तुझी भ्रांती ।**
> **हां ! काढू नको वांती । चल लाव० ॥**

**सनातने**--भैरव-भैरव-भैरवा ऽ ऽ ! अरे धाव. वन् टु थ्री-वकट लेण्ड मुण्डा ! धाव.

**क्रांती**--का ? आता कशाला धावा धावा. मी चवचाल-चवण्ढाळ-बदचाल-गावभवानी ! आणि तू कोण ?

**पुराणे**--लाव कुंकू, लाव पाट!

**सनातने**--बये महालक्ष्मी, मी तुझा रेडा आहे. तुझ्या पाया पडतो. हा जिता जीव जिवंत राहू. दे. भैरव, धाव. (भैरव गडबडीने येतो.)

**भैरव**--कायहो, गड आला का सिंह गेला!

**सनातने**--भैरवा धाव, सिंह आला न् गड गेला ?

**भैरव**--कोर्टींग केलंत का नीट ? अरे बापरे, ही तर क्रांति! सनातने, घूस समजून घोरपड धरलीत. पळा आता.

**सनातने**--पळायला ताकद नाही. कोर्टींग बस् झाले आता. कार्टींग करून मला घरी ने बाबा. मेलो तरी पुन्हा लव्हाळ्याच्या फन्दात पडणार नाही.

**भैरव**--आता या अकलेचा उपयोग काय! विलायती लव्हाळे स्वदेशी हवेला मानवणार नाही.

**पुराणे**--चोरा, क्रान्तीची निन्दा करणाऱ्या सनातन्याला मसणातच शान्ति मिळेल बर! अजून असेल छाती, तर लाव कुंकू लाव पाट.

**भैरव**--सनातने, पळा पळा.

(पडदा पडतो)

## अंक दुसरा समाप्त.

# अंक तिसरा

[पब्लिक पार्क. बावळे धाईधाईने येतो व जातो. पाठोपाठ शान्ति त्याला हाका मारीत येते. तो परततो.]

**शान्ति**––बावळे-अहो बावळे, जरा थांबाल का!

**बावळे**––मी थांबलो, तरी जगाच्या भानगडी थोड्याच थांबणार आहेत ? त्यांची मोटार-दौड चालूच आहे. जगाच्या भानगडीवर आमच पोट. थांबून कसं भागणार आमचं, शान्तिबाई.

**शान्ति**––अलीकडं यांचा पत्ता काय ?

**बावळे**––यांचा ? सर्वनामावरून लिंगाचा अन्दाज लागतो, पण नामाचा पत्ता कसा लागणार ? मागचा पुढचा संदर्भ हस्तगत झाल्याशिवाय काय सांगू ? यांचा ? यांचा म्हणजे कोणाचा ?

**शान्ति**––यांचा म्हणजे साहेबांचा हो.

**बावळे**––साहेबांचा ? साहेबांची दाद मडमेला, न् मडमेची ब्याद साहेबाना.

**शान्ति**––बावळे, तुम्हाला माझ्या अवस्थेची काही कल्पना आहे का ?

**बावळे**––आहे म्हटली तर आहे, आणि नाही म्हटली तर नाही. तुम्ही स्त्री, आणि मी पुरुष. तुम्ही मेम्‌साब, मी एक पोटार्थी कारकून. कशी असणार मला तुमची कल्पना!

**शान्ति**––बावळे, तुमचं आडनाव जरी बावळे असलं, तरी तुम्ही मुद्दाम वेड पांघरीत आहात.

**बावळे**––तसं केल्याशिवाय माझी कारकुनी कशी टिकणार शान्ताबाई. कारकुनी ही माझी आई, न् तीच माझी बाई. आईसारखी ती पोटाला घालते, न् बायकोसारखी पाठिंबा देते. साहेबासारख्या गरम खिशाच्या न् वकीली पेशाच्या लोकानी आईला लाथा मारल्या, आणि गाईसारख्या अनेक बाया नादी लावून हुसकून दिल्या, तरी तीच बेमानी कारकुनीशी करून माझं कसं भागणार ?

**शान्ति**––गेले दोन महिन्यात साहेबांची मला भेटच नाही. वेळा आलटून पालटून दिसात्‌नं तीनचार वेळा मी बंगल्यावर जाते. जेव्हा बघावं तेव्हा आऊट!

**बावळे**––अलीकडं व्हेकन्सीचा प्रॉब्लेम फार सीरियस झाला आहे, शान्ताबाई. कणसाळलेल्या शेतावरच कावळ्यांची गर्दी. पण आमच्या साहेबांचा खाक्याच न्यारा! कोऱ्या करकरीत मळ्यावर, जिव्हाळ्याची मोट लावून, पेरणी लावणीची दगदग हवी तशी करतील. प्रॅक्टिसची पर्वा करणार नाहीत. पण एकदा का ताठीला कणस बाजलं, की मग पुढच्या भानगडीला रामराम. चुकून नाही मळ्याकडं फिरकायचे! सारे पीक कृष्णार्पणमस्तु!

**शान्ति**––हेच का याचं चरित्र न् चारित्र्य !

**बावळे**——फार उशिरा उमगलं तुम्हाला ! बेटर लेट दॅन् नेव्हर.

**शान्ति**——पण असं वागण्याचं याना कारण काय ?

**बावळे**——देशभक्ती ! असले रसाळ किंवा इरसाल देशभक्त देशात नसते, तर अनाथ बालकाश्रमांच्या सगळ्या इमारती ओसाड नसत्या का पडल्या ?

**शान्ति**——बावळे, बावळे, मला आज तुम्ही बुळीबावळी केलीत. माझ्या नशिबाच्या चित्रानं माझ्या डोळ्यात चरचरीत अंजन घातलंत !

**बावळे**——शान्ताबाई, शॉर्ट लॉंग साईटवर चष्मे मिळतात, डोळ्यातले मोतिबिन्दु शस्त्रक्रियेशिवाय काढता येतात. पण तरुण तरुणींच्या डोळ्यावर येणारी विलायती प्रेमाची धुंदी, नव्या सृष्टीच्या बोजाचे ओझे तरुणीच्या पदरात पडेपर्यंत उतरत नाही. सुरवातीला प्रेमाची वावडी कितीहि उंच अन्तराळी उडाली, तरी अखेर तुटलेला दोरा बिनधोक भिंगरीला येऊन भिडतो, आणि वावडी जाते झोके खात नशिबाच्या वाऱ्यावर ! तुका म्हणे उगे रहावे, जे जे होईल ते ते पाहावे !

**शान्ति**——कावळ्यानी मला फसवलं, माझा घात केला, विश्वासघात केला.

**बावळे**——वाईट वाटून घेऊ नका. तुमच्या दुःखाच्या वाटेकरणी आळीआळी न् पेठीपेठी आहेत. इतर कावळे पिण्ड खाऊन मोकळे होतात, आमचे कावळे पिण्ड बनवून मोकळे होतात.

**शान्ति**——माझ्यासारख्या निष्पाप भाबड्या तरुणीला असं फसवायला, त्या मेल्याला लाज कशी वाटली नाही ?

**बावळे**——ज्याला देशभक्तीची खाज, त्याने कोळून प्यावी लाज.

**शान्ति**——देशभक्ती हा धन्दाच झाला म्हणायचा ?

**बावळे**——देशभक्तीच्या बुरख्याखाली हवे ते धन्दे बिनधोक करता येतात, मनाचा लज्जेशी घटस्फोट झाल्याशिवाय, कोणाहि शहाण्याला देशभक्त फण्डगुण्ड आणि पुढारी होताच येत नाही.—शान्ताबाई, तुम्ही बीए आहात, विद्वान् आहात, विचारी आहात. पुरुषांच्या बरोबरीने, समाज–राज–कारणात स्त्रिया समान हक्कांच्या भागीदार बनल्या, तरी सेक्स इम्पल्सच्या क्षेत्रात पुरुष तो पुरुष, आणि बायका त्या बायकाच, या विधिघटनेची कोण्डी फुटणार कशी ? मी म्हणतो की, विवाहविधि हे एक नाटक मानले, तरी त्याच्या बंधनावर समाजाचा न् कायद्याचा धाक असल्यामुळे, पतिपत्नीच्या प्रेमाच्या फलश्रुतीला गंगार्पण करण्याचा प्रसंग तरुणीवर येत नाही.

**शान्ति**——खरंच, लग्नापूर्वीच माझा पुनर्विवाह झाला असता—

**बावळे**——तर लगेज्चा हा बोजा, ॲट् ओनर्स रिस्क बरोबर घेऊन फिरण्याचा प्रसंगच आला नसता. समाजाने आणि सरकारने मालकाचा कान पकडून डिलिव्हरी घ्यायला भाग पाडलं असतं, पण अन्क्लेम्ड प्रॉपर्टीचा वाली कोण ? संशयित मालाच्या पार्सलाचा पत्तेदार सुद्धा, '' मी तो नव्हे '' म्हणून कानावर हात ठेऊन नामानिराळा होतो ; आणि इथं तर काय ? भलताच प्रसंग.

**शान्ति**——बावळे, त्या मेल्या नराधमाच्या गोडगोड भाषेला भुरळण्यात, मी माझ्या जिवाचा उकीरडा केला हो.

**बावळे**——शांतिबाई, प्रेमाने वेडे बनलेले लोक इतराना वेडे समजतात. परस्पर विश्वासावर पतिपत्नीच्या जोड्या ठरवणारा गंधर्वविधि सर्रास चालू होता, त्या काळीसुद्धा दुष्यंतासारख्या जबाबदार राजानं शकुंतलेचा विश्वासघात करायला कमी केलं नाही. पुरुषांच्या बेमानीची असली शेकडो उदाहरणं पाहूनच, गंधर्वविधीला समाजाने गचांडी दिली असावी. आताहि त्याच विधीचा हट्ट तरुणानी धरला, तरी त्यांच्या इमानाची तरुणीना गॅरंटी काय ? फुलाप्रमाणं किंवा फुलपाखराप्रमाणं प्रेमाचेहि रंग बदलतात. त्यालाहि भरती-ओहटी असतेच, ओहटी लागली की तरुणीच्या दैवाची नौका बसलीच रुतून चिखलात !

**शांति**——निष्पाप तरुणींच्या प्रेमाशी प्रतारणा करणाऱ्या तरुणांच्या नरड्याला नागिणीप्रमाणं डसलं पाहिजे.

**बावळे**——तो आला तुमचा डोमकावळा. आता त्याच्या नरड्याला नागिणीसारख्या डसा, नाहीतर वाघिणीसारख्या धुसफुसा. हा सूर्य न् हा जयद्रथ ! यादव कृष्णाचा गुडबाय. (जातो.)

[ कावळे गाणें गात येतो, शांतीकडे लक्ष जाते, दचकतो, लगेच न पाहिल्यासारखे करून तडक जातो. शांति प्रथम हळू, नंतर मोठ्याने हाका मारीत राहते. ]

**शांति**——ऐकलं का, ऐकलं का, ऐकलं का ऽ ऽ साहेब——साहेब——मिस्टर कावळे, कम् हिअर प्लीज.

**कावळे**——(प्र. क.) हू यू ?

**शांति**——हू यू ? वा ! चांगलं नाटक नटवायला शिकलात हो.

**कावळे**——What do you want ? I have no time.

**शान्ति**——व्हॉट डू आय वॉण्ट ? आय वॉण्ट यू.

**कावळे**——बऱ्याच उलट्या काळजाच्या दिसता हो. तुम्हांला मी पाहिजे का ? कशाला ?

**शान्ति**——कशाला ? केलेलं कर्म निस्तरायला. लाज वाटत नाही असला प्रश्न विचारायला ! शेमलेस ! ब्रूट !

**कावळे**——शेमलेस ? कोण ? मी का तू ? या सार्वजनिक पार्कमध्ये, बेधडक एका जण्ट्लमनला हाक मारून I want you म्हणता ? जनाची नाही पण मनाची काही लाज ? Get you gone, you whore. (जाऊ लागतो. शान्ति त्याला आडवते)

**शान्ति**——मी अशा नाटकानं फसणारी नव्हे बरं. तुम्ही कोण ? जण्ट्लमन ! आणि मी कोण ? व्होर!

**कावळे**——Yes, Yes. You are a whore, a strumpet, बाजार बसवी.

**शान्ति**——शटप् यू रास्कल्.

**कावळे**—Rascal ?

**शान्ति**—लाख वेळा या तिव्हाट्यावर ओरडून म्हणेन, तुम्ही—कावळे-रास्कल्, रोग, रॉबर, थीफ्, दगलबाज, पाजी आहात. समाजात अनीतिचा शेणसडा माजवणारे डोमकावळे आहात. करून सवरून पुन्हा जसे काय त्या गावचेच नव्हेत.–ही शान्ति म्हणजे काय दावणीची गाय समजता ?

**कावळे**—मोकाट चरणीला सवकलेली तू ओढाळ लाथाळ गाय. तुला कोण शहाणा दावणीची गाय समजेल ?

**शान्ति**—ओढाळ म्हणा, लाथाळ म्हणा, पण मी गाय आहे आणि पुनर्विवाहाच्या थापावर झुलवून, अखेर तिचा विश्वासघाताने गळा कापणारे तुम्ही खाटीक आहात.

**कावळे**—फार लवकर अक्कल आली ही तुला म्हणायची! सुगन्धानं दरवळणाऱ्या आणि मधुर मधानं रसरसणाऱ्या प्रत्येक गुलजार फुलाचा आस्वाद घेणारा भुंगा, प्रत्येक फुलाशी विवाहपाटाचे थाट उरकीत बसला, तर त्याला सारी दुनिया बिग्फूलच म्हणेल.

**शान्ति**—अहो, पण आता या सहा महिन्याच्या पार्सलाचा धनि कोण ?

**कावळे**—लेबलावरचा नाव पत्ता तुलाच छान वाचता येईल. ज्याचे लेबल असेल, त्याच्या बांध नेऊन गळ्यात ते पार्सल. मला काय विचारतेस ?

**शान्ति**—कोळशे झाले तुमच्या जिभेचे.

**कावळे**—वकिलाला कोणाचेच शाप बाधत नसतात.

**शान्ति**—या शान्तीच्या ब्रीदाला असला नसता कलंक लावाल, तर या पायाशी जीभ हासडून मी प्राण देईन.

**कावळे**—ज्यूरी करून तुला फुकून टाकीन. डॅम् रॉट! (तिला ढकलून निघून जातो. शान्ति मूर्छित पडते न पडते तोच क्रान्ति येऊन तिला सावरते.)

**क्रान्ति**—पाहिलीस-पाहिलीस, या सुशिक्षित पदवीधर पुढाऱ्यांची मनं कशी सडकी कुसकी आहेत ती! तुझ्या सारख्या अनेक अल्लड गाईंची मान कापून, समाजात प्रतिष्ठेनं मिरवणारे खाटीक, कसल्या रंगाढंगाचे असतात, ते पाहिलंस ना ?

**शान्ति**—कोण ते ? क्रान्ति, क्रान्ति, शान्तीचं या समाजातलं जिणं आता कवडीमोल झालं! कावळ्यांनी शान्तीचं तोण्ड काळं केलं!

**क्रान्ति**—हॅव् करेज्, शान्ते, हॅव करेज्. चल ऊठ.

**शान्ति जरी झाली अगतिका ।**
**विसरत नाहि क्रान्ति तिला ।**
**कडकडाट करि आत्मराज झणिं ।।ध्रृ०।।**
**शान्ति क्रान्ति या भिन्न असति का ।**
**दिसती दोन परि । एकजीव या ।।१।।**

**शान्ति**––पण आता माझं पुढचं कर्तव्य काय क्रान्ते ?

**क्रान्ति**––कर्तव्य? ते जसं स्पष्ट न् उघड आहे, तसं ते निष्ठूरहि आहे, तू कपाळी कुंकू लावलंस, एका शहाण्याच्या पुनर्विवाहाच्या थापाना बळी पडलीस, अनाथ म्हणून उकीड्यावर झुगारली गेलीस, तरी समाज तुला विधवाच लेखणार. विधवा म्हणूनच तुझ्याकडं रोखरोखून पाहणार. भर रस्त्यात तुझी बेलगाम टवाळी करणार, आणि अखेर तुझा न् तुझ्या उदरी येणाऱ्या निष्पाप जिवाचा मरेपर्यंत अखण्ड छळ करणार. अशा प्रसंगी गर्भहत्या करुन मातेने जिवंत राहण्याचीच सोय पाहिली पाहिजे.

**शान्ति**––काय! गर्भहत्या?

**क्रान्ति**––यस्. अबॉर्शन.

**शान्ति**––क्रान्ति-क्रान्ति, काय सांगतेस तू? सारी दुनिया माझ्याशी बेमान झाली, तरी मातृहृदयाच्या तिडकेला मी कशीग बेमान होऊ?

**क्रान्ति**––तू कितीही सात्विक असलीस, तरी समाज तुला माणुसकीनं थोडाच वागवणार आहे?

**शान्ति**––यापेक्षा मी आत्महत्या केलेली काय वाईट?

**क्रान्ति**––आत्महत्या करणारी तूच काही एकटी न् पहिली नव्हेस! समाजाच्या छळाला कण्टाळून, कितीतरी अभागिनी रोज आत्महत्या करीत असतील. एकाद् दुसरी केस उघडकीला आली, म्हणजे वर्तमानपत्रात त्याचा गाजावाजा होतो,––

(विवेक प्र. क.)

**विवेक**––आणि इण्डियन पिनल कोड ३०९ किंवा ३१२ सेक्शनखाली त्या अभागनीला भयंकर शिक्षा होते.

**क्रान्ति**––कायद्याची बाजू हे बॅरिस्टर नीट समजावून सांगतील.

**विवेक**––शान्ताबाई, आत्महत्या करून का असला सार्वजनिक महत्वाचा प्रश्न सुटणार आहे? आजवर बेमान तरुणांनी फसवलेल्या, तुझ्यासारख्या शेकडो अब्रूदार तरुणींनी आपल्या सोनेमोल जीवीताचा शेवट केला, म्हणून अन्यायी ३१२ कलमाची कुणाला कितीशी तिडीक आली? रौलट आक्टाविरुध्द काळी निशाणे फडकवणाऱ्या कितीशा देशभक्तांना, कावळ्यासारख्या नराधमांचा सन्ताप येतो, आणि तुझ्यासारख्या फसलेल्या निष्पाप गाईचा कळवळा येतो ? यायचाच नाही. सामाजिक दोषांकडे डोळेझाक करून राजकीय समतेच्या डोम्बारी ढोलक्या पिटण्यातच आमचा सारा पुरुषार्थ! वास्तवीक या अवस्थेला तू कारण नसून, तो ट्रेचर डोमकावळाच जबाबदार. पण समाज किंवा सरकारी कायदा, त्याच्या पापांचा किंवा विश्वासघाताचा मुळींच विचार करीत नाही.

**शान्ति**––आताहि आमचे कायदे-पण्डित न् कौन्सिलर्स, या आणि असल्या अनेक सेक्शनांत, माणुसकीच्या तळमळीनं योग्य तो बदल करून घेतील, तर माझ्यासारख्या हजारो तरुणी त्यानां दुव्वा देतील.

**विवेक**——असल्या प्रयत्नाकडे विद्वानांचे लक्ष्य आता लागले आहे. हिन्दू लॉ सुधारण्यासाठी कायदे--पण्डितांची एक कमिटी सध्या काम करीत आहे.

**क्रान्ति**——या कमेट्या म्हणजे कंबक्त्याच म्हटल्या तरी चालतील. सरणावरती रोगी जाई, नन्तर डॉक्टर धावत येई. कायदा कितीहि कडक असला, तरी बालहत्त्या न् गर्भहत्त्या थाम्बल्या आहेत का ? मुळीच नाही. उलट, गुन्ह्याचा सूड म्हणून, आन्धळा न्याय, त्या अभागी मातांचीहि हत्त्या करून मोकळा होतो.

**शान्ति**——माता मारून, लोकसंख्या वाढवण्याची उमेद धरणारा कायदा, सान्दीला टाकण्यालायिकच नव्हे का ? ३१२ कलमाखाली शिक्षेला गेलेली एकहि बाई " आई " म्हणून समाजात वावरलेली दिसली आहे का कुणाला ?

[ आत——" उठा या काला, गाईला भिक्षा घाला " असा गीतध्वनि ऐकू येतो. ]

**क्रान्ति**——हे कोण ? गोरक्षणवाले. जिवन्त तरण्या बाया मरणाच्या दारी उभ्या, आणि या कानफाट्यांची सडक्या रोडक्या गायांच्या उद्धाराची धडपड !

**विवेक**——लोकांच्या भोळ्या भावनेवर मोकाट चरणाऱ्या वासुदेव, कुडमुडे जोशी, कडकलक्ष्मी वगैरे पोळांच्या जोडीने, या बेरोजगारी बैलासाठी, धन्द्याची ही छान सोय झाली.

[ जामानिमा केलेला गोरक्षण्या गात प्र. क्र. ]

**पद**
**उठा या काला । गाईला भिक्षा घाला ॥ धृ. ॥**
**तुम्चि आम्ची स ऽ गळ्यांचि गाइ माता ।**
**तिचे तुमि दूध् दहि ताक् तूप् खाता ।**
**तिला तुमि कसायाच्या हाति कशि देता ।**
**बैल मग मिळेल कुठुन हो शेता ।**
**शेति जाता, वासून् बसाल् मग दाता ।**
**मर्ता गोमाऽता । जग बुडेल हां हां म्हणता ॥ १ ॥**

——जय गोमातांकी जय ! ऐका हो ऐका. रामदास स्वामींचे औरस वंशज, स्वताच्या जिवासाठी गाईचे जीव वाचवण्याचा भीष्मपणा करणारे पणपण्डित, त्रिखण्ड-ठणाणित श्रीखण्डस्वामी, यानी या बाचाळपुरीत, नस्तापेठेत, फुकट्याच्या बोळात, नकट्यांच्या पिछाडीला, घर नम्बर पूज्य येथे अनाथ गायांच्या संरक्षणासाठी एक गोखाना काढला आहे. तेथे हवे त्याला हवे तितके शेणगोमूत्र मोफत मिळण्याची सोय केलेली आहे. परदेश-गमन, अभक्ष्यभक्षण, श्रावण्या व शुद्धिसमारंभासाठी आमचेच शुद्ध पवित्र व खास स्वदेशी शेणगोमुत्र मागणी येताच तारेने पाठवण्यात येते. या गोखान्याचे शेणगोमूत्र नेहमी ताजे व बिनभेसळींचे असल्याबद्दल सगळ्या वर्तमानपत्रकारांचे अभिप्राय मिळालेले आहेत. अभिप्राय-पुस्तकाची किंमत गवताची एक गुण्डी.

(शा.म.मु.) एन ४२०५—२८ (१,१४०—२-९९)

कसायाच्या हाती न पडलेल्या हजारो गाया, स्वामी महाराजांच्या कृपेने, लोकांच्या घरोघर जिवन्त जगल्या आहेत. अशा गोखान्याला सर्व लोकानी घरेदारे पोरेबाळे विकून मदत करावी हो ऽ ऽ. (घंटी वाजवतो.)

**विवेक**---अहो गोखानदार, इकडं या. [ तो " जय गोमाताकी जय " म्हणून फण्डाचे डबरे पुढे करतो. ] ते तुमचं डबरं असू द्या तसंच गळ्यात. मी असं विचारतो, गाया प्रमाणेच अडल्या नाडल्या बायांची, होते का सोय तुमच्या या कारखान्यात ?

**गोर०**---आमचा खाना गोखाना आहे, दवीखाना नव्हे.

**विवेक**---तुम्ही म्हणता की गोमातांचा संहार झाला, तर शेती बुडेल ; आणि आपला देश शेतीप्रधान असल्यामुळे तो अखेर भिकेला लागेल !

**गोर०**---यात मुळीच संशय नाही. या विवेचनेनं आमच्या श्रीखण्ड महाराजाना डाळ भाताचे साधे अन्नसुद्धा पचेनासे झाले आहे. भक्तांच्या भिडेसाठी दिवसातून फक्त तीनदा, भरगच्च वाडगाभर श्रीखण्ड आणि परातभर गाईच्या तुपातल्या पुऱ्या, अल्पोपहार म्हणून ग्रहण करतात. फार थोर विभूति ! कान्ति काय, शान्ति काय, काय काय ! छे, छे, कुणी विचारू नये, न् आम्ही सांगू नये ! मांजरीच्या लीला, ठाण्या तिच्या पिला, अक्कल काम करीत नाही.

**क्रान्ति**---अशा विभूति फक्त कलियुगातच चमकायच्या !

**विवेक**---गाई या जशा माता, तशा स्त्रियानाहि तुम्ही माता समजता का नाही ?

**गोर०**---लग्नाची किंवा मानाची बायको वगळून, बाकीच्याना माता न मानणारा मातृगमन्या मी नव्हे.

**विवेक**---तरुणींच्या अल्लडपणाचा गैरफायदा घेऊन त्याना फसवणारे आणि अखेर अडचणीत टाकून निसटणारे नराधम तुमच्या माहितीचे असतील.

**गोर०**---माहितीचे नाहीत हो, माहीत आहेत. पुष्कळ आहेत. पण माझी नोकरी गाई-बैलांच्या गोठ्यात असल्यामुळे---

**क्रान्ति**---तुम्हाला आम्ही बैल म्हणणार नाही बरें !

**गोर०**---गायांच्या कळपात वळूची सोय ठेवावीच लागते.

**विवेक**---पशूंचा प्रश्न वेगळा आहे. पण अशा नराधमानी अनेक तरुणींच्या जीविताचा उकीरडा केला, तर आपला समाज, त्या हलकटाची उपेक्षा करून, कसायासारखाच त्या अभागी तरुणीवर छळाचं शस्त्र नाही का धरीत ? जिवन्तपणीच तिला मरणप्राय दुःख नाही का देत ?

**गोर०**---देतो देतो. बरं नाही ते.

**विवेक**---तिनं भ्रूणहत्या करावी, तर कायदा तिला जन्मठेपीला पाठवतो, न करावी तर समाज तिला धरातल्या धरात ठार मारतो. समाजातल्या या मातांचा जर असा सर्रास संहार होत असला, तर खुद्द समाजालाहि क्षयाची कीड लागून त्याचा विध्वंस नाही का होणार ?

**गोर०**—पटतं पटतं, मला तुमचं म्हणणं काहीसं पटतं. पण याला उपाय काय? गोखान्याच्या गोठे सफाईवर पोट भरणारा मी पोटार्थी.

**क्रान्ति**—असाल. पण तेवढ्यानं तुमच्या माणुसकीचं शेण तर नाही ना झालं?

**गोर०**—छे, छे! असं मीच कबूल केलं तर सारं जग माझ्याच तोण्डात शेण घालील. सध्या आमची नजर फक्त गायापुरतीच आहे. बायांकडे दृष्टी देण्याचे आमचे ध्येयच नाही. अडल्यानाडल्या बायांसाठी गावोगाव आश्रम आहेत. तिथं जाऊन त्यानी आपल्या कर्माची ओझी ठेवावी, आणि देवाला वाहिलेल्या पोळगायाप्रमाणं खुशाल मोकाट गावभरू फिरावे. त्याचा कोणी हात धरणार नाही.

**क्रान्ति**—अहो, मानवी मातांपेक्षा तुम्हाला या पशूमातांची एवढी काळजी का? मानवी माताच्या नावानं, समाजाचा विध्वंस झाला, तर तुमच्या या गोमाता, ती शेति, न् दुधातुपाला कोण चाटणार?

**गोर०**—कोण म्हणजे? आम्ही न् आमचे महाराज.

**विवेक**—धन्य आहात दोघं. घ्या आता रजा.

[ पोलीस इन्स्पेक्ट गोरक्षण्याचा चेहरा एका फोटोशी पडताळीत येतो. त्याला पाहून गोरक्षण्या भेदरतो. ]

**इन्स्पे०**—(स्व.) तन्तोतन्त जुळला. हाच तो गुन्हेगार (उघड) अहो, गाय-बैलवाले, इकडे या पाहू.

[ गोरक्षण्या आल्या वाटेने पळण्याचा प्रयत्न करतो. इन्स्पेक्टर त्याला पकडून थाम्बवतो. ]

**इन्स्पे०**—काय हो पोळ, मी तुम्हाला हाक मारतो ना?

**गोर०**—" उठा या काला। गाईला भिक्षा घाला. "

**इन्स्पे०**—गाईची व्यवस्था नीट लागली, या बैलाचा बन्दोबस्त करायचा आहे. तुझं नाव कायं?

**गोर०**—या देहाला कालबडदास शेणगोळे म्हणतात.

**इन्स्पे०**—राहता कुठे?

**गोर०**—वसति गोखान्याच्या गोठ्यात, आणि फिरती पाय जातील तिकडे.

**इन्स्पे०**—अरे चोरा. सोंग तर मोठे छान सजवलेस? विलास नगरच्या मालति कलावन्तिणीचे दागिने चोरून पळालेला धोण्ड्या बेरड तूच नाहीस का? —हा बघ तुझा फोटोग्राफ.

**गोर०**—अहो गणेशपेटर साहेब, हा फोटोग्राफ माझा नव्हे हो. गोमातेची शपथ—बारामतीच्या वळूची शपथ, हा फोटो माझा नव्हे.

**इन्स्पे०**——तुझा नाही, तर काय तुझ्या बापाचा ?

**गोर०**——बरोबर हेरलंत. माझा न् माझ्या वड्लांचा तोण्डावळा इतका एकसारखा हुबेहूब. का बाप कोणता न् लेक कोणता, हे हुडकायचा आईलाहि फारसा विधिनिषेध राहात नसे. पंचाईत पडायची.——बरं, येतो मी. जय गोमाता की जय. (जाऊ लागतो.)

**इन्स्पे०**——(त्याची गचाण्डी धरून) हरामखोरा, आम्हाला बनवतोस काय ? चल, आपल्या पापांची फळे भोगायला पोलीस चावडीवर.

**विवेक०**——काय, कसली भानगड आहे ही ?

**इन्स्पे०**——असल्या बेरडांजवळ भानगडींना हो काय तोटा ? गावोगाव दरवडे घालून इस्टेटी करायच्या, आणि बेण्ड फुटायची वेळ आली, का घुसले असल्या सोंगाढोंगाच्या बुरख्यात. कोण आहे तिकडे. (शिपाई येतो ] जा या बेरडाला घेऊन् ठेवा लॉकपमधे. (शिपाई गोरक्षण्याला पकडतात.)

**गोर०**——चला, सत्यमेव जयते. '' पकडा मऽऽला । गाईला चारा घाला ॥ '' (जातो).

**इन्स्पे०**——या बैलालाहि कडिबेड्याची पेण्ड चारा.

**विवेक**——किती उलट्या काळजाचे लोक असतात हे !

**इन्स्पे०**——दुसऱ्याच्या बायकोला फितवून स्वताची बायको करणाऱ्या संभाविता इतकेच उलट्या काळजाचे !

**विवेक**——व्हॉट् डु यू मीन ?

**इन्स्पे०**——हे बेरड पोटासाठी तरी गुन्हा करतात, पण तुमच्या सारखे बॅरिस्टर, स्वताच्या फुकट जाहिरातीसाठी, हवे ते उत्पात करतात.

**विवेक**——मिस्टर इन्स्पेक्टर, होल्ड युअर टंग्.

**इन्स्पे०**——एक्सक्यूज मिस्टर विवेकराव, आपण माझे कैदी आहात. यू आर अण्डर अरेस्ट.

**शान्ति**——काय ? विवेकराव कैदी ? तुम्हाला पकडलं ! तुमचा काय गुन्हा ?

**विवेक**——शान्ते, ही घाबरण्याची का वेळ? पकडलं तर पकडलं. होईल कोर्टात खऱ्याखोट्याचा निकाल. इन्स्पेक्टरसाहेब, आपल्याजवळ वारण्ट आहे ना ?

**इन्से०**——आपल्या सारखे कायदेपण्डित अशी शंका घेणारच. म्हणून हे पहा तयार आहे.

**विवेक०**——फिर्यादी कोण ?

**इन्स्पे०**——सनातनेतर्फे कावळे वकील.

**शान्ति०**——कावळे-कावळे. कावळे ! ताई, ताई, मी आता काय करू ? कुठं जाऊ ?

**क्रान्ति०**——शान्ते रडू नकोस. हे पहा, डॉ प्रवाळ आले. [ डॉ. प्रवाळ येतो. ] डॉक्टर, शान्तीची आता तुम्ही काळजी घ्या.

**प्रवाळ**——ओ ! अखेर माझाच होरा खरा ठरला——

**इन्स्पे०**——बी किक् मिस्टर विवेकराव.

**क्रान्ति**——वी आर रेडी. डॉक्टर, शान्तीला संभाळा.

**प्रवाळ**——शान्ती माझी बहीण आहे. तिची चिन्ता मला. विश् यू गुड पलक, विवेक क्रान्ति.

**क्रान्ति**——विवेक हद्दपार झाला, तरी मरणारी नव्हे. आणि क्रान्ति चेचली ठेचली गेली, तरी मरणारी नव्हे. पण शान्ति फार हळव्या मनाची. तिला धीर देऊन जपा.

**प्रवाळ**——डोण्ट वरी. गुडबाय्.

(सर्व जातात.)

---

## प्रवेश दुसरा

[हातात व खाकोटीला कायद्यांच्या लठ्ठलठ्ठ बुकांचा बोजा घेऊन बावळे येतो. पाठोपाठ भैरव हाका मारीत येतात. ]

**भैरव**---बावळे, अहो बावळे, जरा स्टॉप् सबूर हॉल्ट. काय, कसली उडाली आहे एवढी लगीन घाई ?

**बावळे**---निवान्तीने घरी येऊन भेटा. आता मरायला सुद्धा मला फुरसद नाही.

**भैरव**---अहो पण जरा थोडे तर जगाल. मरायचं तेव्हां ठार मरा. आहे काय एवढी धामधूम ? आणि हे एवढे कसले ओझे ?

**बावळे**---बैलचिये पाठी साखरेच्या गोणी.

**भैरव**---अबबब ! या भाराखाली गाढवसुद्धा बेजार व्हायचा !

**बावळे**---गाढव बेजार होईल. पण वकीलाला न् त्याच्या कारकुनाला बेजार होऊन भागणार नाही. हे गाढवाचे ओझे डोक्यात जिरवणारा प्राणी वकील होतो, आणि हे असे डोक्यावर मिरवणारा, त्याचा कारकून होतो.

**भैरव**---अरेच्चा ! मोठाच चमत्कार हा ! पण आहे काय असे या ओझ्यात परब्रह्म ? का, सगळा गाढवांचा गोंधळ न् लाथांचा सुकाळ ?

**बावळे**---परब्रह्माची व्याख्या जवळजवळ अश्शीच. पण या गाढवाच्या ओझ्यात कायदा आहे कायदा ! लॉ ! खटले चालवायला यांचीच जरूरी लागते वकीलाना.

**भैरव**---अरेच्चा ! जगाच्या फार मागे राहिलो रे मी !

**बावळे**---राजा, परमेश्वराचा शेण्डाबुडखा उमगेल, ब्रह्ममायेचा पाट लावता येईल, फण्डगुण्डाच्या फाटक्या खिशाचा न् गायतोण्ड्या वेषाचा ठाव घेता येईल, पण–हे बॅक्वर्ड. महापुरुषा, वकीलाच्या अकलेची लांबी-रुन्दी मापताना, युक्लीडच्या अकलेचे तीनतेरा उडतील ! वकील म्हणजे काय थट्टा समजतोस ?

**भैरव**---हिवडं भरलं मला !

**बावळे**---लेंग्थ् विदाउट् ब्रेड्थ् ! रुन्दीशिवाय लांबी ! वकील जर असा, तर त्याचा कारकून कसा ?

**भैरव**---हेड् विदाउट् ब्रेन्. कॉक् विदाउट् हेन्. कोम्बडीशिवाय कोम्बडा, मॅन् विदाउट् वुमन् ! बायकोशिवाय चोम्बडा !

**बावळे**---असलो जरी मी असा, तरी दाबतो ना वकिलाच्या नसा ?

**भैरव**---सुकला माझा घसा, जरा थोडे खाली बसा.

**बावळे**---वकीलाचा कारकून खाली बसत नसतो. इतराना खाली बसवीत असतो.

**भैरव**---बावळे बावळे, तुमच्या कारकुनीवरून वकील ओवाळून टाकावा ! तुम्ही एक वण्डर आहात, फण्डर आहात, थण्डर आहात !

**बावळे**---भलतीच ब्लण्डर करूं नका. कायद्याने बोलावे न् कायद्याने चालावे. कायद्यात वण्डर नाही, थण्डर नाही, प्लण्डर नाही, आणि एकादा कायदा नालायक म्हणून रद्द झाला, तरी त्यांत ब्लण्डर होत नाही. भैरव, कायद्यांचा हा बोजा, म्हणजे एक बडा अक्कलखाना आहे. यात हजारो कलमे आहेत.

**भैरव**---कलमे ? कलमे का मलमे ?

**बावळे**---कायद्याचं कलम म्हणजे एक प्रकारचं मलमच म्हटले तरी चालेल. पण कोणत्या गुन्ह्याच्या पिकवणीवर कोणत्या कलमाचे मलम चोपडायचे, आणि गळू पिकून फुटलेच, तर त्याच्या बेमालूम छपवणीसाठी, कोणत्या कलमाच्या पुराव्याची मलमपट्टी बसवायची, याचं अवधान चुकलं, की विवेकरावासारखा बॅरिस्टर सुद्धा कायद्याच्या कचाटीत सापडतो.

**भैरव**---सापडला म्हणून कायदा काय त्याचे वांकडे करणार ?

**बावळे**---काय वाकडे करणार ? कळेल आता इतक्यात. कोर्टात केस चाललीच आहे. कलम ४९७ ! दुसऱ्याच्या विवाहित स्त्रीशी सम्बंध ! पाच वर्षे सक्तमजुरी न् वर दण्ड. सनातन्यांच्या वतीने आमच्या कावळे साहेबानी आज कोर्टात अश्शी वकिली केली–अश्शी वकिली केली–अस्सा इंग्रेजीचा चौफेर मारा केला, की कोर्टाच्या कचेरीला घाम फुटला.

**भैरव**---आणि क्रान्तीबाईला शिक्षा होणार ? बुवाला शिक्षा, बाईला शिक्षा,–असला कसला कायदा ?

**बावळे**---कायद्याच्या खाचाखोचा या बावळ्याला विचार. कारकून असलो, तरी बिकट त्रांगड्याच्या वेळी, मोठमोठ्या बालीस्टरांच्या टाळक्यात या बावळ्याचा मेन्दूच पुराणासारखा भरला जातो. ४९७ कलमाखाली क्रान्तीबाईला शिक्षा होत नाही, होणार नाही, होणे शक्य नाही, आणि होईलच होईल अशा पुराव्याचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष संभव नाही.---भैरव, याला म्हणतात कायद्याची कायदेशीर भाषा ! कर्ता, कर्म, क्रियापदाचा थांग लागला नाही, तरी क्रियेच्या पदावर कर्त्याचे कर्म हटकून ताठ उभे राहते.

**भैरव**---दादोबाच्या लघुमोठ्यावर ताण दिसते. तुमच्या कावळे वकीलानी कोर्टाच्या इमारतीला घाम फोडला. पण विवेकरावाने काय जबानी दिली ?

**बावळे**---कायदा कसाही असो, काहीहि म्हणो, आम्ही दोघे नवरा बायको आहोत. विवाहविधीचा आम्हाला विधिनिषेध वाटत नाही, असे दोघानी कोर्टाला स्पष्ट सांगितले. पण कायदा त्याना तसे थोडेच समजणार ?

**भैरव**——त्यांच्या विवाहावर तर मी संगीत सुरात रंगीत अक्षता उधळल्या आहेत ना ?

**बावळे**——अरे मग प्रोसीजर कोडा, तू का नाही धावलास साक्षीला ? भत्ता मिळाला असता आणि खटल्याच्या कायद्याचे कलम बदलले असते. तू तर विवेक-क्रान्तीचा सस्पेन्डर !

**भैरव**——सस्पेण्डर म्हणा, नाहीतर दस्पिण्डर म्हणा. पण साक्षीने कलम कसे बदलते ?

**बावळे**——दत्तविधानाच्या खटल्यात नुसत्या साक्षीवर बापाचे कलम बदलते, आणि आईची आढी उफलते.

**भैरव**——साक्षीला शिक्षा पण असते का ?

**बावळे**——खोट्या साक्षीला हमखास असते, पण खऱ्याला मुळीच नसते.

**भैरव**——खरी खोटी साक्ष ठरवतो कोणे ?

**बावळे**——पुरावा, कायदा आणि न्यायाधीश.

**भैरव**——हे तिघेहि माझ्या खानावळीत येत नाहीत. मग भत्त्याच्या आशेनं कशाला पडू मी या भाडोत्री लफड्यात ! विवेक-क्रान्ती नवरा बायको ठरली, तरी त्यांचे पोर माझं नाव थोडंच सांगणार ? आणि ठरली नाही, तर ते कारटं सनातन्याच्या नावावर थोडंच विकणार ? साक्षीच्या शिक्षेपेक्षा शिक्षेची साक्ष गावभर दिलेली काय वाइट ?

[आत——**इन्स्पेक्टर**——माझे ऐका, तुम्ही अशीच साक्ष द्या.]

**भैरव**——अशीच साक्ष द्या ! देववाणी का भूतवाणी !

**बावळे**——अरे बापरे ! हे तर इन्स्पेक्टर साहेब. आणि ते दुसरे कोण बरोबर ?

**भैरव**——डॉ. प्रवाळ ! याने काय गोन्धळ केला आणखी ? कोणाचं पोटबीट पाडलं, का घातली एकाद्या संस्थानिकाला औषध म्हणून कुत्र्याची पुडी ?

**बावळे**——काहीतरी भानगड दिसते. चल, आपण जरा बाजूलाच उभे राहू. (दोघे जातात.)

[डॉक्टर प्रवाळ व इस्पेक्टर येतात.]

**इन्स्पे.**——डॉक्टरसाहेब, आपण हा हट्ट सोडून द्या. मी सांगतो अशीच साक्ष द्या.

**प्रवाळ**——इन्स्पेक्टरसाहेब, आपली सूचना कितीहि सद्धेतूची असली, तरी मला ती तत्त्वासाठी मान्य करता येत नाही; मी दिलगीर आहे.

**इन्स्पे.**——शान्ताबाई सारख्या सुविद्य आणि सज्जन तरुणीला सामाजिक जीवन-स्वास्थ्य देण्यासाठीच तुम्ही हा गर्भपात केलात.

**प्रवाळ**——लिव् ॲण्ड लेट लिव्, जगा आणि जगवा, हेच सामाजिक जीवन-स्वास्थ्याचे मूळतत्त्व आहे.

**इन्स्पे.**——कायदा याच तत्त्वावर उभारलेला आहे.

**प्रवाळ**——पण भ्रूणहत्येचा ३१२ सेक्शन् मात्र याला खास अपवाद दिसतो, निदान हिन्दुसमाजापुरता तरी.

**इन्स्पे.**——पण त्यात सुद्धा अपवादाच्या फटी आहेत ना ? धोक्यात असलेल्या बाईचा जीव वाचवण्यासाठीच गुड् फेथ्नें मीं हे ॲबॉर्शन् केलं, असा जबाब तुम्ही दिलात, तर तुम्हीहि सुटाल, न् ती बिचारी शान्तीहि सुटेल. तुमच्या सारख्या लण्डन् एम्. डी. वर कोण विश्वास ठेवणार नाही !

**प्रवाळ**——आणि म्हणूनच मला कायद्याच्या या असल्या फटीतून निसटायची मुळीच इच्छा नाही. गर्भपाताला शान्तीची आधी मुळी सम्मतीच नव्हती. पण सगळ्या वृत्त-पत्रात काल मी जे स्टेटमेण्ट प्रसिद्ध केलं——

**इन्स्पेक्टर**——उगाच घाई केलीत ती.

**प्रवाळ**——ती तत्त्वं तिला पटली, तेव्हाच तिने सम्मति दिली. समाजाने शान्तीची न् तिच्या अर्भकाची अनन्वित छळाने हत्या करण्यापेक्षा, तिला वाचवण्यासाठी मी ही ॲबॉर्शनची स्टेप् घेतली. परिणामांचा विचार करून घेतली. कायद्याची कदर ओळखून घेतली.

**इन्.**——कावळे वकीलाच्या त्या बावळे कारकुनाने पोलीस स्टेशनवर वर्दी दिली नसती, तर आम्हाला या भानगडीत पडण्याची जरूरच नव्हती. तुमच्यासारखे विद्वान् डाक्टर भलतंच करतील, असे मानायला आमची डोकी खास फिरलेली नाहीत. पण तक्रार आल्यावर तपास न करून चालणार कसे ?

**प्रवाळ**——या प्रकरणातला मुख्य गुन्हेगार कोण, तो तुम्हाला चांगला माहीत आहे. पण कायद्याची कदर चोराला सोडून संन्याशालाच फाशी देत असेल, तर निष्पाप शान्तीच्या-माझ्या बहिणीच्या-जोडीने फासावर जायला हा डॉक्टर प्रवाळ तयार आहे. इन्स्पेक्टरसाहेब, ३१२ सेक्शन्खाली, जाणून अगर नेणून, आयुष्याची माती करून घेणारी, शान्ति ही एकटीच का अभागी तरुणी आहे ? आजवर या कलमाने असल्या शेकडो मातांचा संहार करून, पाषाणहृदयी हिन्दुसमाजाच्या खुनसटपणाची भूक भागविली आहे. या भडकलेल्या भुकेच्या भट्टीत शान्तीचा न् या प्रवाळाचा बळी पडलेला पाहून, हे ३१२ कलम योग्य रीतीने बदलायची कुणा महात्म्याला बुद्धी झाली, आणि सरकारच्या भूतदयेने तिला पाठिम्बा दिला, तर आमचे प्राण सत्कारणी खर्ची पडले, हे समाधान सुद्धा बिनमोल नाही का ? (घड्याळ पाहून) चला. उशीर होईल कोर्टात जायला.

**इन्.**——चला. आयॅम् व्हेरी सॉरी फॉर यू बोथ [दोघे जातात.]

——

## प्रवेश ३ रा

[वकीलांचे चेम्बर. कावळे व सनातने येतात.]

**कावळे**——का ? घातला की नाही खाड्यात त्या बॅरिस्टराला ! ३ वर्षे सक्तमजुरी आणि २ हजार रुपये दण्ड ! लण्डनची वारी करून आले न् लागले या वाचाळपुरीत विलायती चाळे करायला. म्हणे आम्हाला याचा विधिनिषेध नाही न् त्याचा विधिनिषेध नाही. पण कायदा कसा यांच्या चाळ्यांचा विधिनिषेध मानणार ! आज मात्र तुम्ही खरी मात करून वाचाळपुरीचे नाव राखलेत, सनातने.

**सनातने**——डोण्ट टॉक वर्ड, यू रास्कल, स्कौण्ड्रल.

**कावळे**——पुराण्यासारखे डोके फिरले की काय ? बायकोचा ॲक्टिंग नवरा तुरुंगात गेला म्हणून ? का गरोदर बायको बेवारशी सुटली म्हणून ?

**सनातने**——तुझ्यासारखा समाजकण्टक डोमकावळा फासावर का जात नाही म्हणून !

**कावळे**——मला फासावर जाऊन भागणार कसे, आणि देणार तरी कोण मला फाशी ? कावळ्यांचा निर्वंश झाला, तर वाचाळपुरीचे चैतन्यच नष्ट व्हायचे. तुमच्यासारख्या मुसळ्या मानवानी लोकसंख्येचे पोट फुगवण्याची पुण्याई मिळवावी——

**सनातने**——आणि तुझ्यासारख्या डोमकावळ्याने, शान्तीचा उकीरडा करावा, क्रान्तीला देशोधडी लावावी, विवेकाची मुस्कटदाबी करावी,——

**कावळे**——आणि अखेर या सनातन्याला गाढव बनवावा ! माझ्यासारखे शहाणे असल्याशिवाय विधिनिषेधाची नाटके भरधोस रंगत नसतात, बरं का ?

(बावळे येतो.)

**बावळे**——आणि बावळ्यांच्या फोडणीशिवाय कावळ्यांची कढी खमंग होत नसते बरं !

**कावळे**——Quite right बावळे. What is the news ?

**बावळे**——३१२ कलमाखाली शान्तीला दोन वर्षे, आणि प्रवाळाला एक वर्ष सक्तमजुरी झाली.

**कावळे**——Oh, glad to hear that. बावळे. जॉनी वॉकरच्या हम्परची ऑर्डर द्या.

**सनातने**——छे छे छे छे ! तुमची सावली घेईल, त्याला साथ नसतानाहि प्लेग होईल. अरे, तुम्ही माणसे, राक्षस का साप ? शान्ति-प्रवाळसारख्या सज्जनांची आपत्ति पाहून हासता ! त्यांच्या आत्मयज्ञांच्या क्लेशांची टवाळी करता !

(भैरव येतो.)

**भैरव**——कोणी कितीहि टवाळी केली, तरी त्याना शिक्षा देणाऱ्या गोऱ्या जज्जाने मात्र माणुसकी दाखविली.

**कावळे**——माणुसकी दाखविली ? कशी काय ? त्याना सोडले की काय?

**भैरव**——फेपऱ्याची फिट् आणू नका. त्याना नाही सोडले. पण जज्जाने मात्र आपली न्यायदानाची नोकरी तडिकन् सोडली.

**सनातने**——कारे का, भैरवा का ?

**भैरव**——निकाल दिल्यावर जज्जासाहेब कळवळून म्हणाले, कायद्यापुढे नाइलाज, म्हणून मला या दोघाना शिक्षा द्यावी लागत आहे. पण एकंदर व्यवहार पाहिला, तर हा अन्याय होत आहे. गिल्टी बाजूला राहून इन्नोसण्ट शिक्षेला जात आहेत. हायकोर्टाने अनेक वेळा ३१२ कलमाचा हा अन्याय उघड दाखवून निषेध केला आहे. पण त्याचा कोणीहि विधिनिषेध बाळगला नाही. असला अर्धवट अन्यायी कायदा, कायदेबुकावर असेपर्यन्त न्यायदानाचे काम करण्यापेक्षा, राजीनामा देणेचे श्रेयस्कर, असे म्हणून त्या गोऱ्या जज्जाने जागच्या जागी राजीनामा खरडून कोर्टाला रामराम ठोकला.

**सनातने**——आहा ! त्या हतभागी प्रवाळ-शान्तीच्या दुर्दैवाची चीड अखेर एका गोऱ्या जज्जाला आली आं ! आमच्या सामाजिक जुलमाचं पाप, त्यालाच उमगावं, आणि आमच्या स्वदेशी शहाण्यानी त्या पापावर खुनसटपणाचे देव्हारे थाटण्यातच जन्माची सफलता मानावी ! शान्ते शान्ते, तुझ्या अशाहि आपत्तीत, तुझ्यावरील अन्यायाचा सक्रीय निषेध करणारा एक गोरा सज्जन निघाला, हे समाधानसुद्धा तुला काही थोडं नाही !

**कावळे**——का ? शान्तीचे लव्हाळे फसले, म्हणून का या पोकळ डोक्यात एवढी उमाळ्याची राजापुरी गंगा फुटली ? अहो राव, मग इथं कशाला थाम्बता ? जा तडक धावत जेलात आणि लावा शान्तीशी जेलखानी पाट.

**बावळे**——जन्मठेप किंवा फाशीची शिक्षा झालेल्या गुन्हेगाराशी तुरुंगात लग्नं लावून, देशभक्ती गाजवणाऱ्या तरुण तरुणींची एक साथच आली आहे.

**कावळे**——घुसा या साथीत आणि पाट लावून होऊ द्या तुमच्या फोटोची जाहिरात सगळीकडं.

**सनातने**——फोटोसाठीं पाट ?

[आत :—पुराणे :—लाव कुंकू-लाव पाट]

**कावळे**——विधिनिषेध नाटकाच्या भरतवाक्यासाठी आला का हा लावा कुंकू-लावा पाट ?

[पुराणे येतो.]

**पुराणे**——हां ! आला आला. शान्तीचा बाप आला, तुझा दत्तक सासरा आला.——

**वाचाळपुरी आटपाट ।।**

**सनातन्याची फुटली पाठ ।।**

**कावळ्यांची गर्दी दाट ! लाव कुंकू ।।१।।**

**भैरव**——अहो रावसाहेब, शान्त व्हा. प्रसंगाचा विचार करा.

**पुराणे**——प्रसंग ? कसला आला प्रसंग ?——

**निसंगाशी संग आणि प्राणाशी गाठ !**

**शान्ति माझि विधवा तिशी लावा कुणि पाट ।।**

**लावा कुंकू ।।१।।**

**भैरव**——अहो तुमच्या शान्तीला दोन वर्षे सक्तमजुरीची शिक्षा झाली शिक्षा !

**पुराणे**——सक्तमजुरी ? शिक्षा ? शान्तीला ? माझ्या पोरीला ? या पुराण्याच्या एकुलत्या एक फुलाला ? शिक्षा ? भैरव-भैरवा, कोणी दिली शिक्षा ? का ?

**भैरव**——तिने गर्भपात केला गर्भपात !

**पुराणे**——गर्भपात ? कलम ३१२ ? अरे, पण तिचा कुणी केला विश्वासघात ? दाखव मला तो पाजी. त्याच्या नरडीला डसतो. दाखव.

**कावळे**——गुडबाय जण्टलमेन. नाटकाच्या नायकाने आता एक्झिट करणेच शहाणपणाचे बावळे बकप्-एक्झिट. (कावळे व बावळे जातात.)

**भैरव**——कायहो, झिट आली म्हणून का एक्झिट ?

**सना. भैरव**——कावळे वकील शेमशेम !

**पुराणे**——भैरव, कुठं आहे तो विश्वासघातक्या ?

**भैरव**——तो शहाणा-डोमकावळा-गेला-उडाला.

**पुराणे**——उडाला ? उडाला ! उडाला. या पुराण्याचा भ्रम उडाला. (कपडे तपासून) हे काय ? मी या वेषात ?

**सनातने**——रावसाहेब, अलीकडं आपलं डोकं फिरलं होतं.

**पुराणे**——तुम्ही कोण ? सनातने ! तुमचं नाही का डोकं फिरलं ?

**भैरव**——त्यांना डोकंच नाही. मग फिरले कुठून ? ते आहेत धालवेडे, न् तुम्ही झालात फार वेडे.

**पुराणे**——वेडा ? रावसाहेब पुराणे वेडा ? क्रॉफर्ड साहेबाचा हा भक्त असा वेडा ? का झाला वेडा ? कुणि केला वेडा ?

**भैरव**——अहो, शान्तीनं कपाळी कुंकू लावलं, म्हणून तुमचं डोकं फिरलं ना ?

**पुराणे**——शान्तीच्या कुंकवानं माझं डोकं फिरलं ? कुंकू लाऊन तिनं आपल तोण्ड उजळ केल, म्हणून मी माझ्या तोण्डाला धुळवड फासली ? शान्ते शान्ते, पोरी, तुझे सगळे लाड मी पुरवले, मग या कुंकवाच्या टिकल्यासाठीच मी कसा ग तुझा कसाब बनलो !

**सनातने**——रावसाहेब, शान्त व्हा-शान्त व्हा.

**पुराणे**——माझी निष्पाप शान्ति खडी फोडायला गेली, आता या पापी पुराण्याला मसणातच काय ती शान्ति !

**सनातने**——रावसाहेब, तुमच्या इतकाच मीहि पापी आहे.

**भैरव**——यांच्या पापाला शेणगोमुत्राचा उताराहि नाही चालायची.

**सनातने**——देहान्त प्रायश्चितच घेतलं पाहिजे. काळाचा ओघ स्पष्ट दिसत असताना सुद्धा, त्याच्या प्रवाहाबरोबर न चालता, रावसाहेब, आपण त्याला प्रतिकाराची टक्कर मारण्याचा मुर्दाडपणा केल्यानंच, या पशूकोटीला आलो.

**भैरव**——नन्दी म्हणून सुद्धा मन्दिरप्रवेश तुम्हाला मिळणार नाही.

**पुराणे**——दैवानं आज कहर केला. सनातने, भैरवा, माझा अन्नदाता क्रॉफर्डसाहेब, आपल्या पोरीच्या अशाच एका हट्टासाठी वैतागला आणि अखेर वेडा होऊन मेला. आता माझ्यावर——या क्रॉफर्ड मामलेदारावर——रावसाहेब पुराण्यावर-पोटच्या पोरीच्या, माझ्या शान्तीच्या नावाने टाहो फोडीत मरायचा प्रसंग आला हो.—शान्ते-कुठं आहे माझी शान्ति.

**भैरव**——रावसाहेब, शान्त व्हा. ती पहा आली शान्ति. (क्रान्ति येते) अहो सनातने, पळा ही क्रान्ति !

**पुराणे**——(क्रान्तीजवळ जाऊन) शान्ते शान्ते, मला क्षमा कर. या बापाला क्षमा कर. माझे वेड गेले. शान्ते, माझे डोळे लख्ख उघडले.

**क्रान्ति**——बाबा, डोळे नीट उघडून पहा. मी शान्ति नव्हे.

**पुराणे**——मग कोण, भ्रान्ती का आहेस तू ?

**क्रान्ति**——भ्रान्ति मेली, शान्ति रसातळाला गेली, म्हणूनच ही क्रान्ति इथं अवतरली. कोणी धाबरू नका.

**पुराणे**——क्रान्ति-क्रान्ति, तूच आता माझी शान्ति.

**सनातने**——क्रान्ति, तुझं वास्तविक स्वरूप या मूढ सनातन्याला न उमगल्यामुळेच, विधिनिषेधाच्या या नाटिकेत मला अस्सं रंगावं लागलं. मला क्षमा कर. विवेकाच्या दडपशाहीला मी कारण झालो, याची मला फार लाज वाटत आहे.

**भैरव**——(हळूच सनातन्याला) क्रान्तिबाईला दिवस गेले आहेत, त्याची नाही तोळामासा लाज ?

**क्रान्ति**——भैरव, क्रान्ति पडदानशीन नार नव्हे. माझा खुलासा नीट ऐका. विवेक-क्रान्तीची ताटातूट झाली, विवेकाची मुस्कटदाबी झाली, तरी क्रान्तीच्या उदरात विवेकाचे नवचैतन्य या क्षणाला फुरफुरत आहे. कसल्याहि विरोधाला न जुमानता, ते योग्यकाळी पूर्ण उमलून जन्माला येईल. कुकल्पनांचा अंधार नष्ट करील, आणि भूतदयेच्या कमळांना फुलवून समतेच्या प्रकाशानं सर्वत्र माणुसकीच्या तेजाचा सडा पाडील. तामस भ्रान्ति नष्ट झाली, सात्त्विक शान्ति दिङ्मूढ बनली, तरी त्रिगुणात्मक समानतेची ही क्रान्ति समाजोद्धारासाठी योग्य वेळी कडकडल्याशिवाय कशी राहील ?

**पुराणे**——क्रान्ति ये.

**क्रान्ति**——आहा ! या गोड हाकेसाठी मी भुकेली होते.

**पुराणे**——सनातने या. भैरव, तू पण ये. वेडाच्या भरात मी '' लाव कुंकू लाव पाट '' आरोळ्या मारीत भटकत होतो.

**भैरव**——त्या मॅड्नेसमध्येसुद्धा मेथड होती की काय ?

**पुराणे**——असेल. पण आता चांगला शुद्धीवर आलेला हा पुराणे, माझ्या साऱ्या तरुण विधवा मुलींना हेच ओरडून सांगत आहे, की मुलींनो कसलाहि विधिनिषेध न बाळगता '' लावा कुंकू लावा पाट ''

**क्रान्ति**——

**भारत-भालिं तिलक नव देवा ।**
**लाल भडक विभवाचा लावा ।।**
**स्वातन्त्र्याचा हिरकणी बिन्दि बिज्वरा शिरा ।**
**विवेक-क्रान्तिच्या जडवाचा शिरपेच तुरा ।।**
**रमाकान्त कृति-गौरव व्हावा ।।१।।**

**सर्व**——विधिनिषेध समाप्त. विश्वाच्या सूत्रधारा, सोड तुझ्या अभंग यशाचा पडदा या नाटिकेवर.

**समाप्त**

अभिनववाङ्मयमालेचें ४ थें पुष्प.

वीर वामनराव कृत

# शीलसंन्यास नाटक

समर्थ नाटक मंडळी स्टेजवर

आणीत असलेलें

**लवकरच प्रसिद्ध होईल.**

महाराष्ट्र पब्लिशिंग हाऊस लि. पुणें.

